ॐ तत्सत् ।

# श्रीमद्भगवद्गीता

गीतेचे मूळ संस्कृत श्लोक, मराठी भाषान्तर
आणि अर्थ निर्णायक टिपा.

**बाळ गंगाधर टिळक**

यांनीं रचलेल्या

## श्रीमद्भगवद्गीतारहस्य

ह्या ग्रंथाचा शेवटील भाग.

( प्रथम मुद्रण )

( ९,००० प्रती )

---

तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर ।
असक्तो ह्याचरन्कर्म परमाप्नोति पुरुषः ॥

गीता. ३. १९.

---

पुणें.

८४६ ] [ सन् १९२४ ई०

# उपोद्घात.

ज्ञानानें आणि श्रद्धेनें, पण त्यांतल्या त्यांतहि विशेषेंकरून भक्तीच्या सुलभ राजमार्गानें, बुद्धि होईल तितकी सम करून प्रत्येकानें लोकसंग्रहार्थ स्वधर्माप्रमाणें आपआपलीं कर्में निष्काम बुद्धीनें आमरणान्त करीत रहाणें हेंच त्याचें परम कर्तव्य असून, त्यांतच त्याचें इहलौकिक व पारलौकिक कल्याण आहे, मोक्षप्राप्तीसाठीं कर्में सोडण्याची किंवा दुसरें कोणतेंहि अनुष्ठान करण्याची जरूर नाहीं, हा सर्व गीताशास्त्राचा फलितार्थ होय, हें गीतारहस्यांत प्रकरणशः सविस्तर प्रतिपादन केलें आहे. तसेंच या धोरणानें गीतेच्या अठरा अध्यायांची संगति सरळ कशी लागत्ये, आणि या कर्मयोगपर गीताधर्मांत इतर मोक्षसाधनांतील कोणकोणते भाग कसकसे आले आहेत, हेंहि तेथेंच चवदाव्या प्रकरणांत दाखविलें आहे. इतका ऊहापोह झाल्यावर वास्तविक म्हटलें म्हणजे गीतेच्या श्लोकांचा आमच्या मताप्रमाणें क्रमशः प्राकृतांत सरळ अर्थ सांगण्यापलीकडे कांहीं जास्त काम रहात नाहीं. परंतु गीतेच्या दरएक अध्यायांतील विषयाचे विभाग कसे केले आहेत तें सांगणें, किंवा कांहीं विशिष्ट श्लोकांतील पदांची टीकाकार स्वसंप्रदायसिद्ध्यर्थ कशी ओढाताण करितात हें दाखविणें, गीतारहस्यांतील सामान्य विवेचनांत शक्य नव्हतें. म्हणून या दोन्ही गोष्टींचा विचार करून पूर्वापर संबंधहि जेथल्या तेथेंच नीट लक्षांत येण्यासाठीं भाषान्तराला जोडून टीकेच्या रूपानें कांहीं टीपा देणें जरूर पडलें. तथापि जे विषय गीतारहस्यांत सविस्तर वर्णन केलेले आहेत त्यांचें फक्त दिग्दर्शन करून गीतारहस्याच्या ज्या प्रकरणांत त्या विषयाचा विचार केलेला आहे त्यास हवाला दिला आहे. या सर्व टीपा मूळ ग्रंथाहून निराळ्या ओळखितां याव्या म्हणून त्यांच्या भोंवतीं [ ] असे चौकोनी कंस घातले असून मागें उभी तुटकी रेघ आहे. श्लोकांचें भाषांतर होईल तितकें शब्दशः

केलें आहे; आणि कित्येकदां मूळांतीलच शब्द कायम ठेवून व पुढें "म्हणजे अमुक" असा त्याचा मराठींत अर्थ देऊन लहानसहान टीपा देण्याचें काम भाषांतरांतच उरकून घेतलें आहे. परंतु इतकें झालें तरी संस्कृत व प्राकृत भाषासरणी भिन्न असल्यामुळें मूळ संस्कृत श्लोकाचा पूर्ण अर्थ मराठींत व्यक्त करण्यास कांहीं शब्द जास्त घालावे लागतात; व कित्येकदां मूळांतील शब्द भाषांतरांत हवाल्याला द्यावा लागतो. हे शब्द लक्षांत येण्याकरितां ( ) अशा गोल कंसांत दिलेले आहेत. संस्कृत ग्रंथांत श्लोकाचा आंकडा श्लोकाचे अखेरीस असतो; पण भाषांतरांत आम्हीं तो आरंभीं दिला आहे. म्हणून एखाद्या श्लोकाचें भाषांतर पहाणें असल्यास भाषांतरांतील त्या आंकड्यापुढला मजकूर वाचिला पाहिजे. भाषांतराची रचना प्रायः अशी ठेविली आहे कीं, टीपा सोडून भाषांतरच वाचीत गेल्यास त्यांत अर्थाचा कोठेंहि खंड पडूं नये. तसेंच मूळांत एकच वाक्य अर्थ एकापेक्षां जास्त श्लोकांत पुरें झालें आहे तेथें तितक्याच श्लोकांच्या भाषांतरांत तो अर्थ पुरा केला आहे. यामुळें कांहीं श्लोकांचीं भाषांतरें जोडून वाचिलीं पाहिजेत. असे श्लोक जेथें आहेत येथें श्लोकांच्या भाषांतरापुढें पूर्णविराम घातलेला नाहीं. तथापि कांहीं झालें तरी भाषांतर तें भाषांतरच, हें विसरतां कामा नये. गीतेचा सरळ, उत्तान व मुख्य अर्थ भाषांतरांत आणण्याचा आम्हीं प्रयत्न केला आहे खरा; पण संस्कृत शब्दांत, व विशेषतः भगवंताच्या प्रेमळ, रसाळ, व्यापक आणि "प्रतिक्षण नवीच रुचि" देणाऱ्या वाणींत, लक्षणेनें अनेक व्यंग्यार्थ उत्पन्न करण्याचें जें सामर्थ्य आहे तें यत्किंचित् कमीजास्त न होतां दुसऱ्या शब्दांनीं जसेंच्या तसेंच भाषांतरांत आणणें अशक्य आहे; अर्थात् संस्कृत भाषा जाणणारा पुरुष गीतेंतील श्लोकांचा लक्षणेनें अनेक प्रसंगीं जसा उपयोग करील, तसा गीतेचें नुस्तें भाषान्तर वाचणाऱ्या पुरुषास करितां यावयाचा नाहीं. किंबहुना तो चुकण्याचाहि पुष्कळ संभव असतो. यासाठीं शक्य असेल त्यानें मूळ गीताग्रंथाचें संस्कृतांत अध्ययन केल्याखेरीज राहूं नये, अशी

सर्वांस आमची आग्रहपूर्वक विनंति आहे; व भाषांतराबरोबरच मूळ श्लोक देण्याचें एक कारण हेंच होय. गीतेच्या प्रत्येक अध्यायांतील विषयाचा बोध होण्यास सोयीचें पडावें म्हणून या सर्व विषयांची अध्यायवार श्लोकशः अनुक्रमणिका, वेदांतसूत्रांच्या अधिकरणमालेच्या धर्तीवर, प्रथम निराळी दिली आहे. प्रत्येक श्लोक पृथक् पृथक् न वाचितां अनुक्रमणिकेच्या या धोरणानें गीतेंतील श्लोक एकत्र करून वाचिल्यास गीतेच्या तात्पर्याबद्दल प्रस्तुतचा गैरसमज पुष्कळांशीं दूर होईल. कारण सांप्रदायिक टीकाकारांनीं गीतेंतील श्लोकांची ओढाताण करून आपल्या संप्रदायाच्या सिद्ध्यर्थ कांहीं श्लोकांचीं जीं अर्थांतरें दिलीं आहेत तीं प्रायः या पूर्वापार संदर्भाकडे दुर्लक्ष करून केलेलीं आहेत. उदाहरणार्थ, गी. ३,१९; ६.३; १८ २ पहा. अशा दृष्टीनें पाहिलें तर गीतेचें हें भाषांतर व गीतारहस्य या परस्परांच्या पुरवण्या आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं; व ज्याला आमचें म्हणणें काय आहे हें पूर्णपणें समजून घेणें असेल, त्यानें हे दोन्ही भाग पाहिले पाहिजेत. भगवद्गीताग्रंथ तोंडपाठ करण्याचा प्रघात असल्यामुळें त्यांत महत्त्वाचीं पाठांतरें कोठेंच आढळून येत नाहींत. तथापि गीतेवरील सध्यां उपलब्ध होणाऱ्या भाष्यांपैकीं अतिप्राचीन जें शांकरभाष्य त्यांत दिलेले पाठच आम्हीं प्रमाण धरिलेले आहेत, हें येथें सांगणें जरूर आहे.

---

# गीतेच्या अध्यायांतील विषयांची श्लोकवार अनुक्रमणिका.



[ टीप—गीतेच्या अध्यायांतील विषयांचे या अनुक्रमणिकेंत श्लोकवार जे विभाग केले आहेत ते पुढें छापलेल्या मूळ संस्कृत श्लोकांमागें §§ अशी खूण घालून दाखविले आहेत; आणि भाषान्तरांत त्या त्या श्लोकापासून निराळा पारिग्राफ सुरू केला आहे. ]

## अध्याय पहिला—अर्जुनविषादयोग.

१. धृतराष्ट्राचा संजयास प्रश्न. २–११. दुर्योधनाचें द्रोणाचार्यांजवळ उभयपक्षांच्या सैन्याचें वर्णन. १२–१९. युद्धारंभीं परस्परांच्या सलामीचा शंखनाद. २०–२७. अर्जुनाचा रथ पुढें नेऊन सैन्यनिरीक्षण. २८–३७. दोन्ही सैन्यांत आपलेच बांधव, व त्यांना मारून कुलक्षय होणार, हें पाहून अर्जुनास झालेला विषाद. ३८–४४. कुलक्षयादि पातकांचे परिणाम ४५–४७. युद्ध न करण्याचा अर्जुनाचा निश्चय व धनुर्बाणत्याग.

## अध्याय दुसरा—सांख्ययोग.

१–३. श्रीकृष्णांचें प्रोत्साहन. ४–१०. अर्जुनाचें उत्तर, कर्तव्यमूढता व धर्मनिर्णयार्थ श्रीकृष्णास शरण जाणें. ११–१३. आत्म्याचें अशोच्यत्व. १४, १५. देह आणि सुखदुःख यांचें अनित्यत्व. १६–२५. सदसद्विवेक व आत्म्याच्या नित्यत्वादि स्वरूपकथनानें त्याच्या अशोच्यत्वाचें समर्थन. २६, २७. आत्म्याच्या अनित्यत्वपक्षीं उत्तर. २८. सांख्यशास्त्रप्रमाणें व्यक्त भूतांचें अनित्यत्व व अशोच्यत्व. २९, ३०. आत्मा लोकांना दुर्ज्ञेय खरा; पण तूं खरें ज्ञान प्राप्त करून घेऊन शोक सोड. ३१–३८. क्षात्रधर्माप्रमाणें

युद्ध करण्याची अवश्यकता. ३९. सांख्यमार्गाप्रमाणें प्रतिपादनाची समाप्ति, व कर्मयोगाच्या प्रतिपादनास सुरुवात. ४०. कर्मयोगाचें स्वल्पाचरणहि क्षेमकर. ४१. व्यवसायात्मक बुद्धीची स्थिरता. ४२–४४. कर्मकांडानुयायी मीमांसकांच्या अस्थिर बुद्धीचें वर्णन. ४५, ४६. स्थिर व योगस्थ बुद्धीनें कर्मे करण्याबद्दल उपदेश. ४७. कर्मयोगाची चतुःसूत्री. ४८–५०. कर्मयोगाचें लक्षण व कर्मापेक्षां कर्त्याच्या बुद्धीचें श्रेष्ठत्व. ५१–५३. कर्मयोगापासून मोक्षप्राप्ति. ५४–७०. अर्जुनाच्या प्रश्नावरून कर्मयोगी स्थितप्रज्ञाची लक्षणें आणि त्यांतच प्रसंगानुसार विषयासक्तीपासून कामादिकांच्या उत्पत्तीचा क्रम. ७१, ७२. ब्राह्मी स्थिति.

## अध्याय तिसरा–कर्मयोग.

१, २. कर्मे सोडावी किंवा करावीं; खरें काय? असा अर्जुनाचा प्रश्न. ३–८. सांख्य (कर्मसंन्यास) व कर्मयोग अशा जरी दोन निष्ठा आहेत तरी कर्मे कोणालाच सुटत नसल्यामुळें कर्मयोग श्रेष्ठ ठरवून तोच आचरण्याबद्दल अर्जुनास निश्चित उपदेश. ९–१६. मीमांसकांचें यज्ञार्थ कर्महि आसक्ति सोडून करण्याबद्दल उपदेश, यज्ञचक्राचें अनादित्व व जगाच्या धारणार्थ अवश्यकत्व. १७–१९. ज्ञानी पुरुषाला स्वार्थ रहात नाहीं म्हणूनच प्राप्त झालेलीं कर्मे त्यानें निःस्वार्थ म्हणजे निष्काम बुद्धीनें केलीं पाहिजेत; कारण कर्म कोणालाच सुटलें नाहीं. २०–२४. जनकादिकांचा दाखला; लोकसंग्रहाचें महत्त्व व भगवंताचा स्वतःचा दाखला; २५–२९. ज्ञानी व अज्ञानी यांच्या कर्मांतील भेद, व निष्काम कर्मे करून ज्ञान्यानें अज्ञान्यास सदाचरणाचा धडा घालून देण्याची अवश्यकता. ३०. ज्ञानी पुरुषाप्रमाणें परमेश्वरार्पणपूर्वक बुद्धीनें युद्ध करण्याचा अर्जुनास उपदेश. ३१, ३२. श्रद्धेनें भगवंताच्या या उपदेशाप्रमाणें वागण्याचें आणि न वागण्याचें फल. ३३, ३४. प्रकृतीचें प्राबल्य व इन्द्रियनिग्रह. ३५. निष्काम कर्म करणें तेंहि स्वधर्माचें करावें, त्यांत मरण आलें तरी बेहेत्तर. ३६–४१.

मनुष्यास त्याचे इच्छेविरुद्ध पाप करण्यास लावणारा काम असून त्याचा इंद्रियसंयमनानें नाश. ४२, ४३. इंद्रियांच्या श्रेष्ठत्वाचा क्रम व आत्मज्ञानपूर्वक तन्नियमन.

## अध्याय चवथा–ज्ञानकर्मसंन्यासयोग.

१–३. कर्मयोगाची संप्रदायपरंपरा. ४–८. जन्मरहित परमेश्वर दिव्य जन्म म्हणजे अवतार मायेनें कसे, केव्हां व कशासाठीं घेतो याचें वर्णन. ९, १०. या दिव्य जन्माचें व कर्मांचें तत्त्व जाणिल्यानें पुनर्जन्म सुटून भगवत्प्राप्ति. ११, १२. अन्यरीत्या भजेल तर तसें फल, उदा० इहलोकींच्या फलार्थ देवतोपासना. १३–१५. भगवंतांचीं चातुर्वर्ण्यादि निर्लेप कर्में, त्यांतील तत्त्व ओळखण्यानें कर्मबंधनाश व तशीं कर्में करण्यास उपदेश. १६–२३. कर्म, अकर्म व विकर्म यांमधील भेद; अकर्म म्हणजे निःसंग कर्म. तेंच खरें कर्म आणि त्यानेंच कर्मबंधनाश. २४–३३. अनेक प्रकारच्या लाक्षणिक यज्ञांचें वर्णन; व त्यांपैकीं ब्रह्मबुद्ध्या केलेल्या यज्ञाचें अर्थात् ज्ञानयज्ञाचें श्रेष्ठत्व. ३४–३७. ज्ञात्यापासून ज्ञानोपदेश, ज्ञानानें आत्मौपम्यदृष्टि व पापपुण्यनाश. ३८–४०. ज्ञानप्राप्तीचे उपाय,–बुद्धि (-योग) व श्रद्धा. तदभावीं नाश. ४१, ४२. (कर्म-) योग व ज्ञान यांचे पृथक् उपयोग सांगून दोहोंच्या आश्रयानें युद्ध करण्यास उपदेश.

## अध्याय पांचवा–संन्यासयोग.

१, २. संन्यास श्रेष्ठ का कर्मयोग श्रेष्ठ ? असा स्पष्ट प्रश्न. दोन्ही मोक्षपद पण त्यांतहि कर्मयोग श्रेष्ठ असें भगवंताचें निश्चित उत्तर. ३–६. संकल्प सोडिल्यानें कर्मयोगी नित्यसंन्यासीच होतो, आणि कर्मांशिवाय संन्यासहि सिद्ध होत नाहीं. सबब दोन्ही तत्त्वतः एकच. ७–१३. मन सदैव संन्यस्त; व कर्में केवळ इंद्रियांचीं, असल्यामुळें कर्मयोगी सदा अलिप्त, शान्त व मुक्त. १४, १५ खरें कर्तृत्व व भोक्तृत्व प्रकृतीचें पण

अज्ञानानें आत्म्यांनें किंवा परमेश्वराचें समाजतात. १६, १७. या अज्ञानाच्या नाशानें पुनर्जन्मापासून सुटका. १८–२३. ब्रह्मज्ञानानें प्राप्त होणाऱ्या समदर्शित्वाचें स्थिर बुद्धीचें आणि सुखदुःखक्षमतेचें वर्णन. २४–२८. सर्वभूतहितार्थ कर्में करूनहि कर्मयोगी इहलोकींच सदैव ब्रह्मभूत, समाधिस्थ व मुक्त. २९. (कर्तृत्व स्वतःवर न घेतां) परमेश्वर यज्ञतपाचा भोक्ता व सर्व भूतांचा मित्र हें ओळखण्याचें फल.

## अध्याय सहावा–ध्यानयोग.

१, २. फलाशा सोडून कर्तव्य करणाराच खरा संन्यासी व योगी. संन्यासी म्हणजे निरग्नि व अक्रिय नव्हे. ३, ४. कर्मयोग्याच्या साधनावस्थेंत व सिद्धावस्थेंत शम व कर्म यांच्या कार्यकारणाची अदलाबदल व योगारूढाचें लक्षण ५, ६. योग सिद्ध करून घेण्यास आत्म्याचें स्वातंत्र्य. ७–९. जितात्म योगयुक्तांमध्येंहि समबुद्धीचा श्रेष्ठ. १०–१७. योगसाधनास लागणारें आसन व आहारविहार यांचें वर्णन. १८–२३. योग्याचें आणि योगसमाधींतील आत्यांतिक सुखाचें वर्णन २४–२६. मन हळू हळू समाधिस्थ, शान्त व आत्मनिष्ठ कसें करावें ? २७, २८. योगीच ब्रह्मभूत व अत्यंत सुखी. २९–३२. योग्याची सर्वांभूतीं आत्मौपम्यबुद्धि. ३३–३६. अभ्यास आणि वैराग्य यांनीं चंचल मनाचा निग्रह. ३७–४५ अर्जुनाच्या प्रश्नावरून योगभ्रष्टास किंवा जिज्ञासूसहि जन्मोजन्मीं चढतें फल मिळून अखेर पूर्ण सिद्धि कशी मिळते याचें वर्णन ४६,४७. तपस्वी, ज्ञानी आणि नुस्ते कर्मी यांपेक्षां कर्मयोगी–व त्यांतहि भक्तिमान् कर्मयोगी श्रेष्ठ. म्हणून अर्जुनास (कर्म-)योगी होण्याबद्दल उपदेश.

## अध्याय सातवा–ज्ञानविज्ञानयोग.

१-३. कर्मयोगा सिद्ध्यर्थ ज्ञानविज्ञाननिरूपणाला आरंभ. सिद्ध्यर्थ प्रयत्न करणारांची दुर्मिळता. ४–७. क्षराक्षरविचार. भगवंतांची अष्टधा अपरा व जीव-

रूपी परा प्रकृति; त्यापासून पुढें सर्व विस्तार. ८–१२. विस्तारांतल्या सात्विकादि सर्व भागांत ओंवलेल्या परमेश्वरस्वरूपाचें दिग्दर्शन. १२–१५. हीच परमेश्वराची गुणमयी व दुस्तर माया, व त्यालाच शरण गेल्यानें मायातरण, १६–१९. भक्त चतुर्विध; त्यांमध्यें ज्ञानी श्रेष्ठ. अनेक जन्मांनीं ज्ञानाची पूर्णता व भगवत्प्राप्तिरूप नित्य फल. २०–२३. अनित्य काम्य-फलार्थ देवतोपासना; पण त्यांतहि तत्तच्छ्रद्धाफलदातृत्व भगवंताचें २४, २८ भगवंताचें खरें स्वरूप अव्यक्त; पण मायेमुळें आणि द्वंद्वमोहामुळें दुर्ज्ञेय. मायामोहनाशानें स्वरूपज्ञान. २९, ३०. ब्रह्म, अध्यात्म, कर्म, आणि अधिभूत, अधिदैव, अधियज्ञ मिळून सर्वत्र एकच परमेश्वर हें जाणिल्यानें अखेरपर्यंत ज्ञानसिद्धि.

## अध्याय आठवा-अक्षरब्रह्मयोग.

१–४. अर्जुनाच्या प्रश्नावरून ब्रह्म, अध्यात्म, कर्म, अधिभूत, अधिदैव, अधियज्ञ व अधिदेह यांच्या व्याख्या. त्या सर्वांत एकच ईश्वर. ५–८. अंतकाळीं भगवत्स्मरणानें मुक्ति. पण जें नित्य मनीं तेंच अंतीं; म्हणून सदाच भगवंताचें स्मरण करण्यास व लढण्यास उपदेश. ९–१३. अंतकाळीं परमेश्वराचें म्ह० ॐकाराचें समाधिपूर्वक ध्यान व त्याचें फल. १४–१६. नित्य भगवच्चिंतनानें पुनर्जन्मनाश. ब्रह्मलोकादि गति नित्य नव्हेत. १७–१९. ब्रह्मदेवाचे दिवसरात्र, दिवसारंभीं अव्यक्तापासून सृष्ट्युत्पत्ति व रात्र्यारंभीं त्यांतच लय. २०–२२. या अव्यक्ताच्याहि पलीकडला अव्यक्त व अक्षर पुरुष. त्याचें भक्तिगम्यत्व व तत्प्राप्तीनें पुनर्जन्मनाश. २३–२६. देवयान व पितृयाण मार्ग; पहिला पुनर्जन्म नाशक, दुसरा उलट. २७–२८. या मार्गांतील तत्त्व जाणणाऱ्या योग्यास मिळणारें फल अत्युत्तम, म्हणून त्याप्रमाणें सदा वागण्याचा उपदेश.

## अध्याय नववा–राजविद्याराजगुह्ययोग.

१–३. ज्ञानविज्ञानयुक्त भक्तिमार्ग मोक्षप्रद असूनहि प्रत्यक्ष व सुलभ; अतएव राजमार्ग. ४–६. परमेश्वराची अगाध योगकरणी. सर्व

भूतांत असूनहि त्यांत नाहीं, व भूतेंहि त्यांत असून नाहींत. ७–१०. मायात्मक प्रकृतीला हातीं धरून सृष्टीची घडामोड, भूतांची उत्पत्ति व लय. इतकें करूनहि निष्काम अतएव अलिप्त. ११, १२. हें न ओळखितां मोहांत गुंतून मनुष्यदेहधारी परमेश्वराची अवज्ञा करणारे मूर्ख व आसुरी. १३–१५. तद्विरुद्ध ज्ञानयज्ञानें अनेक प्रकारें उपासना करणारे दैवी १६–१९ ईश्वर सर्वत्र असून तोच जगाचा आईबाप, मालक, पोषक व बऱ्यावाईटाचा कर्ता. २०–२२. श्रौत यज्ञयागादिकांची खटाटोप स्वर्गप्रद असली तरी तें फल अनित्य. योगक्षेमार्थ म्हणावी तर तो भक्तीनेंही साध्य. २३–२५. अन्यदेवताभक्ति पर्यायानें परमेश्वराचीच, पण जशी देवता व भावना तसें फळ. २६. भक्ति असल्यास परमेश्वर फुलाच्या पाकळीनेंहि संतुष्ट. २७, २८. सर्व कर्मे ईश्वरार्पण करण्याबद्दल उपदेश. त्यानेंच कर्मबंधापासून सुटका व मोक्ष. २९–३३. परमेश्वर सर्वांस सारखा. दुराचारी असो, पापयोनि असो, स्त्री असो, वैश्य असो, शूद्र असो, निःसीम भक्त बनल्यास सर्वांस एकच गति. ३४. अर्जुनास हाच मार्ग स्वीकारण्याबद्दल उपदेश.

## अध्याय दहावा–विभूतियोग.

१–३ अजन्मा परमेश्वर देवांच्या व ऋषींच्याहि पूर्वींचा हें जाणिल्यानें पापनाश. ४–६. ईश्वरी विभूति व योग. ईश्वरापासूनच बुद्ध्यादि भाव, सप्तर्षि व मनु यांची, आणि परंपरेनें सर्वांची, उत्पत्ति ७–११. हें जाणणाऱ्या भगवद्भक्तांस ज्ञानप्राप्ति; पण त्यांस सुद्धां बुद्धिसिद्धि भगवानच देतात. १२–१८. आपल्या विभूति व योग सांगण्याबद्दल अर्जुनाची विनंति. १९–४०. भगवंतांच्या अनंत विभूतींपैकीं ठळकठळक विभूतींचें वर्णन. ४१,४२. जे कांहीं विभूतिमत्, श्रीमत् व ऊर्जित तें सर्व परमेश्वरी तेज, पण अंशानें.

## अध्याय अकरावा–विश्वरूपदर्शनयोग.

१–४. पूर्वाध्यायांत सांगितल्याप्रमाणें आपलें ईश्वरी रूप दाखविण्याबद्दल भगवंतांस विनंति. ५–८. हें आश्चर्यकारक व दिव्य रूप पहाण्यासाठीं

अर्जुनास दिव्य दृष्टिज्ञान. ९–१४. विश्वरूपाचें संजयकृत वर्णन. १५–३१. विस्मयानें व भीतीनें नम्र होऊन अर्जुनानें केलेली विश्वरूपाची स्तुति, व प्रसन्न होऊन 'तुम्हीं कोण' हें सांगण्याबद्दल विनंति. ३२–३४. 'मी काळ' असें सांगून या काळानें पूर्वींच ग्रस्त झालेल्या वीरांस निमित्त होऊन मारण्याबद्दल अर्जुनास प्रोत्साहनपर उपदेश. ३५–४६. अर्जुनानें केलेलें स्तवन, क्षमापन आणि पूर्वींचें सौम्य रूप दाखविण्याबद्दल प्रार्थना. ४७–५१. विश्वरूप पहाणें अनन्य भक्तीखेरीज अशक्य. पुनः पूर्वरूपधारण. ५२–५४. विश्वरूपदर्शन भक्तीवांचून देवांसहि अशक्य. ५५. म्हणून भक्तीनें निःसंग व निर्वैर होऊन परमेश्वरार्पण बुद्धीनें कर्में करण्याबद्दल अर्जुनास सर्वार्थसारभूत अखेरचा उपदेश.

## अध्याय बारावा–भक्तियोग.

१. पूर्वाध्यायांतील अखेरच्या सारभूत उपदेशावर अर्जुनाचा प्रश्न–व्यक्तोपासना श्रेष्ठ कीं अव्यक्तोपासना श्रेष्ठ? २–८. दोहोंत गति एकच; पण अव्यक्तोपासना क्लेशकारक, आणि व्यक्तोपासना सुलभ व लवकर फलप्रद. सबब निष्काम कर्मपूर्वक व्यक्तोपासना करण्याबद्दल उपदेश. ९–१२. भगवंताचे ठायीं चित्त स्थिर करण्याचे अभ्यास, ज्ञान, ध्यान इत्यादि उपाय, व त्यांतला कर्मफलत्याग श्रेष्ठ. १३–१९. भक्तिमान् पुरुषाच्या स्थितीचें वर्णन व भगवत्प्रियत्व. २०. या धर्मानें वागणारे श्रद्धालु भक्त भगवंतास अत्यंत प्रिय.

## अध्याय तेरावा–क्षेत्रक्षेत्रज्ञविभागयोग.

१, २. क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्या व्याख्या. त्यांचे ज्ञान म्हणजे परमेश्वरज्ञान. ३, ४. क्षेत्रक्षेत्रज्ञविचार उपनिषदांतला व ब्रह्मसूत्रांतला. ५,६. क्षेत्रस्वरूपलक्षण. ७–११. ज्ञानाचें स्वरूपलक्षण. तद्विरुद्ध अज्ञान. १२–१७. ज्ञेयाचें स्वरूपलक्षण. १८. हें सर्व जाणिल्याचें फल. १९–२१. प्रकृतिपुरुषविवेक. प्रकृति कर्त्री, पुरुष अकर्ता पण भोक्ता, द्रष्टा इ० २२,२३. पुरुष

## अध्याय चवदावा–गुणत्रयविभागयोग.



## अध्याय पंधरावा–पुरुषोत्तमयोग.



## अध्याय सोळावा–दैवासुरसंपद्विभागयोग.

दैवी संपत्ति मोक्षप्रद आणि आसुरी बंधकारक. ६–२०. आसुरी लोकांचें विस्तृत वर्णन, त्यांस जन्मोजन्म अधोगति. २१,२२. नरकाचें त्रिवेध द्वार–काम, क्रोध, लोभ. हे वर्ज्य केल्यानें कल्याण. २३,२४. शास्त्राप्रमाणें कार्याकार्यनिर्णय व आचरण करण्याबद्दल उपदेश.

## अध्याय सतरावा–श्रद्धात्रयविभागयोग.

१–४. अर्जुनाच्या प्रश्नावरून प्रकृतिस्वभावानुरूप सात्त्विकादि त्रिविध श्रद्धेचें वर्णन. जशी श्रद्धा तसा पुरुष. ५, ६. आसुर याहून भिन्न. ७–१०. सात्त्विक राजस व तामस आहार. ११–१३. त्रिविध यज्ञ १४–१६. शारीर, वाचिक व मानस असे तपाचे तीन तीन भेद १७–१९. पैकीं प्रत्येक सात्त्विकादि भेदांनीं त्रिविध. २०–२२. सात्त्विकादि त्रिविध दान. २३. ॐतत् सत् हा ब्रह्मनिर्देश. २४–२७. पैकीं ॐ यानें आरंभसूचक, 'तत्' यानें निष्काम आणि 'सत्' यानें प्रशस्त कर्मांचा समावेश. २८. बाकीचें म्ह० असत् इहपरलोकीं निष्फल.

## अध्याय अठरावा–मोक्षसंन्यासयोग.

१,२. अर्जुनाचे प्रश्नावरून संन्यास व त्याग यांच्या कर्मयोगमार्गातल्या व्याख्या. ३–६. कर्मांच्या त्याज्यात्याज्यतेबद्दल निर्णय; यज्ञयागादि कर्में सुद्धां इतर कर्मांप्रमाणें निःसंग बुद्धीनें केलींच पाहिजे. ७–९. कर्मत्यागाचे सात्त्विक, राजस व तामस असे तीन प्रकार; पैकीं फलाशा सोडून कर्तव्य-कर्म करणें हाच सात्त्विक त्याग. १०,११. कर्मफलत्यागीच सात्त्विक त्यागी, कारण नुसतें कर्म कोणासच चुकलें नाहीं. १२ कर्मांचें त्रिविध फल सात्त्विकत्यागी पुरुषास बंधक होत नाहीं. १३–१५. कोणतेंहि कर्म घडण्याचीं कारणें पांच आहेत, केवळ मनुष्यच नव्हे. १६,१७. म्हणून मी करितों ही अहंकारबुद्धि सुटली म्हणजे करूनहि अलिप्त. १८,१९. कर्मचोदना व कर्मसंग्रह यांचें सांख्योक्त लक्षण व त्रैविध्य. २०–२२. पैकीं ज्ञानाचें

सात्त्विकादि गुणभेदानें त्रैविध्य. ' अविभक्तं विभक्तेषु ' हें सात्त्विक. २३–२५. कर्माचें त्रैविध्य. फलाशारहित कर्म सात्त्विक. २६–२८. कर्त्याचें त्रैविध्य. निःसंग कर्ता सात्त्विक. २९–३२. बुद्धीचें त्रैविध्य. ३३–३५. धृतीचें त्रैविध्य. ३६–३९. सुखाचें त्रैविध्य. आत्माबुद्धिप्रसादज सात्त्विक. ४०. सर्व जगाचें गुणभेदानें त्रैविध्य. ४१–४४. चातुर्वर्ण्याची गुणभेदानें उपपत्ति; क्षत्रिय वैश्य आणि शूद्र यांचीं स्वभावजन्य कर्में. ४५–४६. चातुर्वर्ण्यविहित स्वकर्माचरणानेंच अखेर सिद्धि. ४७–४९. परधर्माचरण भयावह, स्वकर्म सदोष असलें तरी अत्याज्य; व स्वधर्माप्रमाणें सर्व कर्में निःसंग बुद्धीनें केल्यानेंच नैष्कर्म्य सिद्धि. ५०–५६. सर्व कर्में करून सुद्धां ही सिद्धि कशी मिळते याचें निरूपण. ५७,५८. हाच मार्ग स्वीकारण्याबद्दल अर्जुनास उपदेश. ५९–६३. प्रकृतिधर्मापुढें अहंकाराचें चालत नाहीं. ईश्वरालाच शरण गेलें पाहिजे. हें गुह्य समजून घेऊन तुझ्या इच्छेस येईल तें कर, असा अर्जुनास उपदेश. ६४–६६. सर्व धर्म सोडून " मला " शरण ये " म्हणजे सर्व पापांपासून " मी तुला मुक्त करीन " असें भगवंताचें शेवटचें आश्वासन. ६७–६९. कर्मयोगमार्गाची परंपरा पुढें राखण्याचें श्रेय. ७०, ७१. त्याची फलश्रुति. ७२,७३. कर्तव्यमोह नाहींसा होऊन अर्जुनाची युद्ध करण्याची तयारी. ७४–७८. धृतराष्ट्रास ही कथा सांगितल्यावर संजयाचा उपसंहार.

---

# श्रीमद्भगवद्गीता.



## प्रथमोऽध्यायः ।

धृतराष्ट्र उवाच ।

धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः ।
मामकाः पांडवाश्चैव किमकुर्वत संजय ॥ १ ॥

## अध्याय पहिला.

[ भारती युद्धारंभीं श्रीकृष्णांनीं अर्जुनास जी गीता उपदेशिली तिचा लोकांत पुढें कसा प्रसार झाला याची परंपरा हल्लींच्या महाभारतांतच अशी वर्णिली आहे कीं, युद्धारंभीं व्यास धृतराष्ट्राकडे जाऊन " युद्ध पहाण्याची तुझी इच्छा असल्यास मी तुला दृष्टि देतो, " असें त्यास म्हणाले. परंतु आपल्या कुलाचा क्षय पहाण्यास आपण चहात नाहीं असें धृतराष्ट्रानें सांगितलें. तेव्हां संजय नांवाच्या सूतास बसल्या जागींच प्रत्यक्ष सर्व ज्ञान व्हावें अशी दिव्यदृष्टि देऊन, व त्यानें धृतराष्ट्रास युद्धाची हकीकत सांगावी अशी व्यवस्था करून, व्यास निघून गेले (म.भा. भीष्म. २ ). या व्यवस्थेप्रमाणें पुढें युद्धांत भीष्म पडल्यावर ती बातमी धृतराष्ट्रास सांगण्यास प्रथम संजय त्याजकडे गेला, तेव्हां भीष्माबद्दल शोक करून युद्धाची सर्व हकीकत सांगण्यास धृतराष्ट्रानें संजयास आज्ञा केली. संजयानें प्रथम उभय पक्षांकडील सैन्यांचें वर्णन करून नंतर धृतराष्ट्राच्या प्रश्नावरून गीता सांगण्यास सुरुवात केली आहे. हीच हकीकत पुढें व्यासांनीं आपल्या शिष्यांस, नंतर त्या शिष्यांपैकीं वैशंपायनानें जनमेजयास व अखेर सौतीनें शौनकास सांगितली असून महाभारताच्या सर्व छापील

संजय उवाच ।

§§ दृष्ट्वा तु पांडवानीकं व्यूढं दुर्योधनस्तदा ।
आचार्यमुपसंगम्य राजा वचनमब्रवीत् ॥ २ ॥

प्रतींत भीष्मपर्वाच्या २५ ते ४२ अध्यायांत ही गीता गोंविलेली आहे. या परंपरेप्रमाणें—]

धृतराष्ट्र म्हणाला—(१) संजया ! कुरुक्षेत्राच्या पुण्यभूमींत एकच जमलेल्या माझ्या आणि पांडूच्या युद्धेच्छु पुत्रांनीं काय केलें ?

[ कुरुक्षेत्र म्हणजे हस्तिनापूरच्या सभोंवारचें मैदान होय. हल्लींचें दिल्ली शहर या मैदानावरच आहे. कौरपांडवांचा पूर्वज कुरु नांवाचा राजा या मैदानांत नांगर धरून कष्टानें तें नांगरीत होता, म्हणून त्याला क्षेत्र ( किंवा शेत ) असें म्हणतात. पुढें इंद्रानें या क्षेत्रांत जे तप करीत किंवा युद्धांत मरतील त्यांस स्वर्गप्राप्ति होईल असा कुरूस वर दिल्यावर त्यानें हें क्षेत्र नांगरण्याचें सोडून दिलें, अशी भारतांत कथा आहे (म. भा. शल्य. ५३.) इंद्राच्या या वरामुळेंच या क्षेत्रास धर्मक्षेत्र किंवा पुण्यभूमि असें म्हणूं लागले. याच मैदानावर परशुरामानें एकवीस वेळां पृथ्वी निःक्षत्रिय करून पितृतर्पण केलें अशी कथा असून, अर्वाचीन कालींहि या क्षेत्रावर मोठमोठ्या लढाया झालेल्या आहेत. ]

संजय म्हणाला–(२) त्या वेळीं पांडवांचें सैन्य व्यूह रचून ( उभें ) राहिलें आहे असें पाहिल्यावर दुर्योधन राजा ( द्रोण ) आचार्यांजवळ जाऊन असें भाषण करिता झाला कीं,—

कौरवांच्या सैन्याचा व्यूह प्रथम भीष्मांनीं रचिल्यावर पांडवांचें सैन्य कौरवांपेक्षां कमी असल्यामुळें त्यांनीं युद्धशास्त्राप्रमाणें आपलें सैन्य वज्र नांवाचा व्यूह रचून उभें केलें होतें असें महाभारतांतील गीतेच्या

पश्यैतां पांडुपुत्राणामाचार्य महतीं चमूम् ।
व्यूढां द्रुपदपुत्रेण तव शिष्येण धीमता ॥ ३ ॥
अत्र शूरा महेष्वासा भीमार्जुनसमा युधि ।
युयुधानो विराटश्च द्रुपदश्च महारथः ॥ ४ ॥
धृष्टकेतुश्चेकितानः काशिराजश्च वीर्यवान् ।
पुरुजित्कुंतिभोजश्च शैब्यश्च नरपुंगवः ॥ ५ ॥
युधामन्युश्च विक्रांत उत्तमौजाश्च वीर्यवान् ।
सौभद्रो द्रौपदेयाश्च सर्व एव महारथाः ॥ ६ ॥

पूर्वीच्या अध्यायांत वर्णन आहे (म. भा. भी. १९. ४-७; मनु. ७. १९१). युद्धांत पुढें दररोज हे व्यूह बदलत असत. ]

( ३ ) आचार्य ! तुमचा बुद्धिमान् शिष्य द्रुपदपुत्र ( धृष्टद्युम्न ) यानें जिचा व्यूह रचिला आहे अशी पांडुपुत्रांची ही मोठी सेना पहा. ( ४ ) यांत शूर, महाधनुर्धर, आणि युद्धांत भीमार्जुनांसारखे (असे) युयुधान (सात्यकि) विराट आणि महारथी द्रुपद, (५) धृष्टकेतु, चेकितान व वीर्यवान् काशिराज, पुरुजित् कुंतिभोज आणि नरश्रेष्ठ शैब्य. ( ६ ) तसाच पराक्रमी युधामन्यु व वीर्यशाली उत्तमौजा, आणि सुभद्रेचा पुत्र ( अभिमन्यु ) व द्रौपदीचे ( पांच ) पुत्र, हे सर्वच महारथी आहेत.

[ दहा हजार धनुर्धारी योद्ध्यांबरोबर जो एकटाच युद्ध करूं शकतो-त्याला महारथी म्हणतात. दोन्ही बाजूंच्या सैन्यांत कोणकोणते रथी, महारथी, किंवा अतिरथी होते यांचें वर्णन उद्योगपर्वाच्या १६४ ते १७१ या आठ अध्यायांत केलेलं आहे. धृष्टकेतु हा शिशुपालाचा मुलगा होता असें त्यांत म्हटलें आहे. तसेंच पुरुजित् कुंतिभोज हीं दोन पुरुषांचीं दोन नांवें नव्हेत; कुंती ज्या कुंतीभोज राजाला दत्तक दिली होती, त्याचा पुरु-जित् हा औरस मुलगा असून कुंतिभोज हें त्याचें कुळनांव आहे; व धर्म,

अस्माकं तु विशिष्टा ये तान्निबोध द्विजोत्तम।
नायका मम सैन्यस्य संज्ञार्थं तान्ब्रवीमि ते ॥ ७॥
भवान्भीष्मश्च कर्णश्च कृपश्च समितिंजयः।
अश्वत्थामा विकर्णश्च सौमदत्तिस्तथैव च ॥ ८॥

भीम व अर्जुन यांचा मामा होता असें वर्णन आहे (म. भा. उ. १७१.२) युधामन्यु व उत्तमौजा हे दोघे पांचाल्य, व चेकितान हा एक यादव होता. युधामन्यु व उत्तमौजा हे युद्धांत अर्जुनाचे चक्ररक्षी होते. शैब्य हा शिबि देशाचा राजा होय. ]

(७) हे द्विजश्रेष्ठा! आतां आमच्या प्रमुख बाजूचे प्रमुख माझ्या सैन्याचे जे नायक त्यांचीं नांवें दिग्दर्शनार्थ आपल्यास सांगतो. तीं लक्षांत घ्या (८) आपण आणि भीष्म आणि कर्ण व युद्धांमध्यें जय पावणारा कृप, अश्वत्थामा आणि विकर्ण (दुर्योधनाच्या शंभर भावांपैकीं एक) व तसाच सोमदत्ताचा पुत्र (भूरिश्रवा), (९) आणि याशिवाय दुसरे पुष्कळ शूर माझ्या साठीं प्राण देण्यास तयार असून, सर्वच नाना प्रकारच्या शस्त्रांनीं लढणारे व युद्धामध्यें प्रवीण आहेत. (१०) या प्रकारचें आमचें भीष्मानें रक्षण केलेलें सैन्य अपर्याप्त म्हणजे अपरिमित किंवा अफाट, तर भीमानें रक्षिलेलें यांचें हें सैन्य पर्याप्त म्हणजे परिमित किंवा मोजकें आहे.

[ या श्लोकांत पर्याप्त आणि अपर्याप्त या शब्दांचे अर्थ कसे लावा-लयाचे याबद्दल मतभेद आहे. 'पर्याप्त' याचा सामान्य अर्थ 'पुरेसें' असा असल्यामुळें "पांडवांचें सैन्य पुरें आणि आमचें अपुरें (अपर्याप्त आहे," असा अर्थ कित्येक करितात. पण हा अर्थ बरोबर नाहीं. पूर्वी उद्योगपर्वांत धृतराष्ट्रास आपल्या सैन्याचें वर्णन देतांना वर सांगित-लेल्या प्रमुख सेनानायकांचीं नांवें सांगून "माझें सैन्य मोठें व गुणवान् असल्यामुळें मलाच जय मिळणार" असे दुर्योधनाचे उद्गार आहेत (उ. ५४.६०–७०); तसेंच भीष्मपर्वांत पुढें द्रोणाचार्यां जवळ पुनः

अन्ये च बहवः शूरा मदर्थे त्यक्तजीविताः ।
नानाशस्त्रप्रहरणाः सर्वे युद्धविशारदाः ॥ ९ ॥
अपर्याप्तं तदस्माकं बलं भीष्माभिरक्षितम् ।
पर्याप्तं त्विदमेतेषां बलं भीमाभिरक्षितम् ॥ १० ॥

सैन्याचें वर्णन करीत असतां दुर्योधनाच्या तोंडांतून गीतेंतील वरील श्लोकांसारखेच श्लोक अक्षरशः बाहेर पडले आहेत ( भीष्म. ५१.४–६ ); व सर्व सैनिकांना प्रोत्साहन देण्यासाठीं हर्षानें हें वर्णन केलें असल्यामुळें या ठिकाणीं 'अपर्याप्त' याचा "अमर्यादित; अफाट किंवा अगणित" याखेरीज दुसरा अर्थच संभवत नाहीं. 'पर्याप्त' या शब्दाचा धात्वर्थ "सभोंवार ( परि ) वेष्टन करण्यासारखें ( आप=प्रापणें )" असा आहे. पण "अमुक कामासाठीं पर्याप्त" किंवा "अमक्याला पर्याप्त" याप्रमाणें पर्याप्त शब्दामागें दुसरें चतुर्थ्यर्थक पद घालून प्रयोग केला म्हणजे "त्या त्या कामाला पुरें पडणारें किंवा समर्थ" असा पर्याप्त शब्दाचा अर्थ होतो; आणि 'पर्याप्त' याच्या मागें जर कांहीं शब्द नसेल तर म्हणजे नुसत्या 'पर्याप्त' शब्दाचा "पुरेसें मोजकें, ज्याची गणती करितां येत्ये" असा अर्थ होतो. उदाहरणार्थ, 'पर्याप्त' याशीं समानार्थक "ग्रासून टाकण्यासारखें" हे मराठी शब्द घ्या. "अमक्याला ग्रासून टाकण्यासारखें" असें म्हटलें म्हणजे त्याला पुरून उरणारें असा अर्थ होतो; आणि नुसतेंच "ग्रासून टाकण्यासारखें" असें म्हटलें म्हणजे दुसरा कोणी त्याला ग्रासून टाकील असा अर्थ होतो. प्रस्तुत श्लोकांत पर्याप्त शब्दामागें दुसरा शब्द नसल्यामुळें हा दुसरा अर्थच या ठिकाणीं विवक्षित आहे; व भारताखेरीज इतरत्रहि तसे प्रयोग असल्याचें उदाहरण ब्रह्मानंदगिरी टीकेंत दिलेलें आहे. दुर्योधन भिऊन आपलें सैन्य अपर्याप्त किंवा अपुरें म्हणतो अशी जी उपपत्ति कित्येकांनीं दिली आहे ती बरोबर नाहीं; कारण दुर्योधन भ्यालेला होता असें कोठेंच वर्णन नसून, उलट दुर्योधनाचें

अयनेषु च सर्वेषु यथाभागमवस्थिताः ।
भिष्ममेवाभिरक्षन्तु भवन्तः सर्व एव हि ॥ ११ ॥

सैन्य मोठें म्हणून पांडवांनीं वज्र नांवाचा व्यूह रचिला आणि कौरवांचें मोठें सैन्य पाहून युधिष्ठिराला विषाद वाटला ( म. भा. भीष्म. १९.५ व २१.१ ) अशीं वर्णनें आहेत. पांडवांच्या सैन्याचा सेनापति धृष्टद्युम्न असतां 'भीमानें रक्षिलेलें' असें म्हणण्याचें कारण असें कीं, पहिल्या दिवशीं वज्र नांवाचा पांडवांनीं जो व्यूह रचिला होता, त्याच्या रक्षणार्थ या व्यूहाच्या अग्रभागीं भीमाचीच योजना केलेली होती; व म्हणून सेना रक्षक या नात्यानें तोच तेव्हां दुर्योधनाला पुढें दिसत होता ( म. भा. भीष्म. १९. ४–११,३३,३४ ); आणि याच अर्थी 'भीमनेत्र' व 'भीष्मनेत्र' अशीं या दोन सैन्यांचीं वर्णनें गीतेच्या पूर्वींच्या महाभारताच्या अध्यायांतून (म. भा. भीष्म. २०.१ पहा) आलेलीं आहेत. ]

(११) (तरी आतां ) नेमून दिल्याप्रमाणें सर्व अयनांत म्हणजे सैन्याच्या निरनिराळ्या प्रवेशद्वारांत राहून तुम्हीं अवघ्यांनीं मिळून भीष्माचेंच सर्व बाजूंनीं रक्षण करावें.

[ सेनापती भीष्म हे स्वतः पराक्रमी कोणालाही हार न जाणारे असतां सर्वांनीं सर्व बाजूंनीं त्यांचें रक्षण केलें पाहिजे असें म्हणण्याचें कारण दुर्योधनानें दुसऱ्या ठिकाणीं (म. भा. भी. १५. १५–२०; ९९. ४०, ४१) असें सांगितलें आहे कीं, शिखंडीवर आपण शस्त्र धरणार नाहीं असा भीष्मांचा निश्चय असल्यामुळें शिखंडीकडून भीष्मांचा घात होण्याचा संभव होता म्हणून सर्वांनीं खबरदारी घेतली पाहिजे—

अरक्ष्यमाणं हि वृको हन्यात् सिंहं महाबलम् ।
मा सिंहं जंबुकेनेव घातयेथाः शिखंडिना ॥

"महाबलवान् सिंहाचें रक्षण केलें नाहीं तर लांडगा त्याला मारील;

§§ तस्य संजनयन्हर्षं कुरुवृद्धः पितामहः ।
सिंहनादं विनद्योच्चैः शंखं दध्मौ प्रतापवान् ॥ १२ ॥
ततः शंखाश्च भेर्यश्च पणवानकगोमुखाः ।
सहसैवाभ्यहन्यन्त स शब्दस्तुमुलोऽभवत् ॥ १३ ॥
ततः श्वेतैर्हयैर्युक्ते महति स्यंदने स्थितौ ।
माधवः पांडवश्चैव दिव्यौ शंखौ प्रदध्मतुः ॥ १४ ॥
पांचजन्यं हृषीकेशो देवदत्तं धनंजयः ॥
पौंड्रं दध्मौ महाशंखं भीमकर्मा वृकोदरः ॥ १५ ॥
अनंतविजयं राजा कुंतीपुत्रो युधिष्ठिरः ।
नकुलः सहदेवश्च सुघोषमणिपुष्पकौ ॥ १६ ॥

म्हणून कोल्ह्यासारख्या शिखंडीकडून सिंहाचा घात होऊं देऊं नका." शिखंडीखेरीज दुसऱ्या कोणाचाही समाचार घेण्यास भीष्म एकटेच समर्थ असून दुसऱ्याच्या सहाय्याची त्यांस अपेक्षा नव्हती. ]

(१२) (इतक्यांत) दुर्योधनाला हर्षवित होत्साते प्रतापशाली वृद्ध कौरव पितामह (सेनापति भीष्म) यांनीं सिंहसारखी मोठी गर्जना करून (लढाईची सलामी म्हणून) आपला शंख फुंकिला. (१३) त्याबरोबर अनेक शंख, भेरी (नौबती), पणव, आनक आणि गोमुख हीं (रणवाद्यें) झडण्यास एकदम सुरुवात झाली व तो नाद तुंबळ म्हणजे चोहोंकडे गर्द भरून गेला. (१४) नंतर पांढरे शुभ्र घोडे जोडिलेल्या मोठ्या रथांत बसलेले माधव (श्रीकृष्ण) आणि पांडव (अर्जुन) यांनीं (आमच्या पक्षाचीही तयारी म्हणून प्रत्युत्तरादाखल) दिव्य शंख फुंकिले. (१५) हृषीकेश म्हणजे श्रीकृष्ण यांनीं पांचजन्य (नांवाचा शंख), अर्जुनानें देवदत्त, भयंकर कर्मे करणाऱ्या वृकोदरानें म्हणजे भीमसेनानें पौंड्र नांवाचा मोठा शंख फुंकिला (१६) कुंतीपुत्र युधिष्ठिरराजानें अनंतविजय, नकुल आणि सहदेव यांनीं सुघोष

काश्यश्च परमेष्वासः शिखंडी च महारथः ।
धृष्टद्युम्नो विराटश्च सात्यकिश्चापराजितः ॥ १७ ॥
द्रुपदो द्रौपदेयाश्च सर्वशः पृथिवीपते ।
सौभद्रश्च महाबाहुः शंखान्दध्मुः पृथक् पृथक् ॥ १८ ॥
स घोषो धार्तराष्ट्राणां हृदयानि व्यदारयत्।
नभश्च पृथिवीं चैव तुमुलो व्यनुनादयन् ॥ १९ ॥
§§ अथ व्यवस्थितान्दृष्ट्वा धार्तराष्ट्रान्कपिध्वजः ।
प्रवृत्ते शस्त्रसंपाते धनुरुद्यम्य पांडवः ॥ २० ॥
हृषीकेशं तदा वाक्यमिदमाह महीपते ।

अर्जुन उवाच ।

सेनयोरुभयोर्मध्ये रथं स्थापय मेऽच्युत ॥ २१ ॥
यावदेतान्निरीक्षेऽहं योद्धुकामानवस्थितान् ।
कैर्मया सह योद्धव्यमस्मिन् रणसमुद्यमे ॥ २२ ॥

आणि मणिपुष्पक,( १७ ) तसेंच महाधनुर्धर काशिराज, महारथी शिखंडी, आणि धृष्टद्युम्न, विराट व अजिंक्य सात्यकि, ( १८ ) द्रुपद आणि द्रौपदीचे (पांच) मुलगे आणि महाबाहु सौभद्र ( अभिमन्यु ), या सर्वांनीं, हे राजा ( धृतराष्ट्रा )! चोहोंकडे आपआपले पृथक् शंख फुंकिले, ( १९ ) आकाश व पृथ्वी दणाणून सोडणाऱ्या त्या तुंबळ आवाजानें कौरवांचें काळीज फाडून टाकिलें.

(२०) नंतर कौरव व्यवस्थेनें उभे आहेत हें पाहून, एकमेकांवर शस्त्रप्रहार होण्याची वेळ आली असतां धनुष्य उचलून, ध्वजावर मारुति असणारा पांडव म्हणजे अर्जुन, (२१) हे राजा धृतराष्ट्रा ! श्रीकृष्णास असे शब्द बोलला कीं,–अर्जुन म्हणाला–हे अच्युता ! माझा रथ दोन्ही सैन्यांच्या मध्यें (जरा) नेऊन उभा कर, ( २२ ) म्हणजे तितक्यांत युद्धाच्या इच्छेनें

योत्स्यमानानवेक्षेऽहं य एतेऽत्र समागताः ।
धार्तराष्ट्रस्य दुर्बुद्धेर्युद्धे प्रियचिकीर्षवः ॥ २३ ॥

संजय उवाच ।

एवमुक्तो हृषीकेशो गुडाकेशेन भारत ।
सेनयोरुभयोर्मध्ये स्थापयित्वा रथोत्तमम् ॥ २४ ॥

तयार असलेल्या या लोकांचें मी अवलोकन करितों, व मला या रणसंग्रामांत कोणाबरोबर लढावयाचें आहे, आणि (२३) दुर्बुद्धि दुर्योधनाचें कल्याण करण्याच्या इच्छेनें जे हे येथें लढणारे जमले आहेत, ते मी पाहून घेतों. संजय म्हणाला–(२४) हे धृतराष्ट्रा! गुडाकेशानें म्हणजे आळसाला जिंकणाऱ्या अर्जुनानें याप्रमाणें सांगितल्यावर हृषीकेश म्हणजे इंद्रियांचे स्वामी श्रीकृष्ण यांनीं (अर्जुनाचा) उत्तम रथ दोन्ही सैन्यांच्या मध्यभागीं नेऊन उभा केला केला; व—

[हृषीकेश व कुडाकेश या शब्दांचे वर जे अर्थ दिले आहेत ते टीकाकारांस अनुसरून दिले आहेत. नारदपंचरात्रांतहि हृषीक म्हणजे इंद्रियें व त्यांचा ईश म्हणजे स्वामी अशी हृषीकेशाची निरुक्ति दिली आहे (ना. पंच. ५. ८. १७) आणि अमरकोशावरील क्षीरस्वामीच्या टीकेंत हृषीक म्हणजे इंद्रियें हा शब्द हृष्–आनंद देणें या धातूपासून झाला असून इंद्रिये मनुष्याला आनंद देतात म्हणून हृषीक हें त्यांचें नांव आहे तथापि हृषीकेश व गुडाकेश यांचे वरील अर्थ बरोबर आहेत कीं नाहींत याबद्दल शंका येत्ये. कारण हृषीक म्हणजे इंद्रियें, आणि गुडाका म्हणजे निद्रा किंवा आळस, हे शब्द प्रचारांत नसून हृषीकेश व गुडाकेश या शब्दांची दुसऱ्या रीतीनेंहि व्युत्पत्ति लागण्या सारखी आहे. हृषीक+ईश आणि गुडाका+ईश याऐवजीं हृषी+केश व गुडा+केश असाहि पदच्छेद करितां येईल; आणि मग हृषी म्हणजे हर्षानें उभारलेले किंव

भीष्मद्रोणप्रमुखतः सर्वेषां च महीक्षिताम्
उवाच पार्थ पश्यैतान्समवेतान्कुरूनिति ॥ २५ ॥
तत्रापश्यत्स्थितान्पार्थः पितॄनथ पितामहान् ।
आचार्यान्मातुलान्भ्रातॄन्पुत्रान्पौत्रान्सखींस्तथा ॥ २६ ॥
श्वशुरान्सुहृदश्चैव सेनयोरुभयोरपि ।

प्रशस्त ज्याचे केस तो कृष्ण, व गुडा म्हणजे गूढ किंवा दाट ज्याचे केस तो अर्जुन, असे अर्थ होऊं शकतील. भारतावरील टीकाकार नीलकंठ यानें गुडाकेश शब्दाचा हा अर्थ गीता १०.२० वरलि आपल्या टीकेंत विकल्पानें सुचविलेला आहे, व रोमहर्षण असें जें सूताच्या बापाचें नांव आहे त्यावरून हृषीकेश शब्दाची वर दिलेली दुसरी व्युत्पत्तीहि असंभवनीय म्हणतां येत नाहीं. किंबहुना महाभारतांत शांतिपर्वांतर्गत नारायणोपाख्यानांत विष्णूच्या मुख्य मुख्य नांवांची निरुक्ति देतांना हृषी म्हणजे आनंददायक, आणि केश म्हणजे किरण असा अर्थ करून सूर्यचंद्ररूप आपल्या विभूतींच्या किरणांनीं सर्व जगाला हर्षवितो म्हणून त्याला हृषीकेश म्हणतात असें सांगितलें आहे. ( शां. ३४५. ४७ व ३४२.६४,६५ पहा; उद्यो. ६९.९ ); व त्याचप्रमाणें केशव हा शब्दहि केश म्हणजे किरण या शब्दापासून निघाला असें पूर्वींच्या श्लोकांतून म्हटलें आहे ( शां. ३४१.४७ ). यांपैकीं कोणताहि अर्थ घेतला तरी श्रीकृष्णास व अर्जुनास हीं नांवें पडण्याचें संबंधीं योग्य कारण सांगतां येत नाहीं. पण हा दोष नैरुक्तिकांचा नव्हे. अत्यंत रूढ झालेल्या विशेषनामांची निरुक्ति सांगावयाची म्हटली म्हणजे अशा प्रकारच्या अडचणी येणें किंवा मतभेद होणें अगदीं साहजिक आहे. ]

(२५) भीष्मद्रोणाच्या व सर्व राजांच्या समोर "अर्जुना! ( येथें ) जमलेले हे कौरव पहा," असें ( ते ) म्हणाले. (२६) तेव्हां अर्जुनाच्या असें नजरेस आलें कीं, तेथें जमलेले सर्व ( आपलेच ) वडील, आजे, आचार्य,

तान्समीक्ष्य स कौन्तेयः सर्वान्बधूनवस्थितान् ॥ २७ ॥
कृपया परयाविष्टो विषीदन्निदमब्रवीत् ।

अर्जुन उवाच ।

§§ दृष्ट्वेमं स्वजनं कृष्ण युयुत्सुं समुपस्थितम् ॥ २८ ॥
सीदंति मम गात्राणि मुखं च परिशुष्यति ।
वेपथुश्च शरीरे मे रोमहर्षश्च जायते ॥ २९ ॥
गांडीवं स्रंसते हस्तात्त्वक्चैव परिदह्यते ।
न च शक्नोम्यवस्थातुं भ्रमतीव च मे मनः ॥ ३० ॥
निमित्तानि च पश्यामि विपरीतानि केशव ।
न च श्रेयोऽनुपश्यामि हत्वा स्वजनमाहवे ॥ ३१ ॥
न कांक्षे विजयं कृष्ण न च राज्यं सुखानि च ।
किं नो राज्येन गोविंद भोगैर्जीवितेन वा ॥ ३२ ॥

मामे, भाऊ, पुत्र, नातू व मित्र, (२७) आणि सासरे व स्नेही दोन्ही सैन्यांत आहेत; ( व याप्रमाणें ) जमलेले ते सर्व आपले बांधव आहेत असें पाहिल्यावर कुंतीपुत्र अर्जुन (२८) परम करुणेनें व्याप्त होत्साता खिन्न होऊन असें बोलूं लागला.

अर्जुन म्हणाला—कृष्णा ! युद्ध करण्याचे इच्छेनें ( येथें ) जमलेल्या या स्वजनांस पाहून (२९) गात्रें शिथिल होतात, व तोंड कोरडें पडतें, आणि शरीराला कंप सुटून रोमांचहि उभे रहातात; (३०) गांडीव (धनुष्य) हातांतून गळून पडतें व अंगाचाहि सर्वत्र दाह होतो; उभें रहावत नाहीं आणि माझें मन भ्रमल्यासारखें झालें आहे. (३१) तसेंच हे केशवा ! ( मला सर्व ) लक्षणें विपरीत दिसतात, आणि स्वजनांना युद्धांत मारून श्रेय म्हणजे कल्याण ( होईल असें ) दिसत नाहीं. (३२) मला, हे

येषामर्थे कांक्षितं नो राज्यं भोगाः सुखानि च ।
त इमेऽवस्थिता युद्धे प्राणांस्त्यक्त्वा धनानि च ॥ ३३ ॥
आचार्याः पितरः पुत्रास्तथैव च पितामहाः ।
मातुलाः श्वशुराः पौत्राः श्यालाः संबंधिनस्तथा ॥ ३४ ॥
एतान्न हन्तुमिच्छामि घ्नतोऽपि मधुसूदन ।
अपि त्रैलोक्यराज्यस्य हेतोः किं नु महीकृते ॥ ३५ ॥
निहत्य धार्तराष्ट्रान्नः का प्रीतिः स्याज्जनार्दन ।
पापमेवाश्रयेदस्मान्हत्वैतानाततायिनः ॥ ३६ ॥
तस्मान्नार्हा वयं हन्तुं धार्तराष्ट्रान्स्वबांधमान् ।
स्वजनं हि कथं हत्वा सुखिनः स्याम माधव ॥ ३७ ॥

कृष्णा ! विजयाची इच्छा नाहीं, राज्य नको, आणि सुखेंहि नकोत. हे गोविंदा ! राज्य, उपभोग किंवा जीवित तरी असून आम्हांला त्याचा काय उपयोग ? (३३) ज्यांच्यासाठीं राज्याची, उपभोगाची व सुखांची इच्छा धरावयाची, तेच हे जीवाची व संपत्तीची आशा सोडून युद्धाला उभे आहेत. (३४) आचार्य, वडील, मुलगे, तसेच आजे, मामे, सासरे नातू मेहुणे आणि संबंधी, (३५) हे (आम्हांस) मारण्यास उठले आहेत तरीहि त्रैलोक्याच्या राज्यासाठीं सुद्धां हे मधुसूदना ! मी (त्यांस) मारूं इच्छित नाहीं; मग पृथ्वीची गोष्ट कशाला ? (३६) जनार्दना ! या कौरवांना मारून आमचें कोणतें प्रिय होणार ? हे जरी आततायी आहेत तरी यांना मारिल्यानें आम्हांस पापच लागणार. (३७) म्हणून आपलेच बांधव जे कौरव त्यांना आम्हींच मारणें योग्य नव्हे. कारण, हे माधवा ! स्वजनांस मारून आम्ही सुखी कसे होणार ?

§§ यद्यप्येते न पश्यन्ति लोभोपहतचेतसः ।
कुलक्षयकृतं दोषं मित्रद्रोहे च पातकम् ॥ ३८ ॥
कथं न ज्ञेयमस्माभिः पापादस्मान्निवर्तितुम् ।
कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिर्जनार्दन ॥ ३९ ॥
कुलक्षये प्रणश्यन्ति कुलधर्माः सनातनाः ।
धर्मे नष्टे कुलं कृत्स्नमधर्मोऽभिभवत्युत ॥ ४० ॥

[ अग्निदो गरदश्चैव शस्त्रपाणिर्धनापहः । क्षेत्रदाराहरश्चैव षडेते आततायिनः ॥ ( वसिष्ठस्मृ. ३. १६ ) म्हणजे घर जाळण्यास आलेला, विष घालणारा, हातांत शस्त्र घेऊन मारण्यास आलेला, धन लुटून नेणारा आणि बायको किंवा शेत हरण करणारा हे सहा आततायी होत. या दुष्टांस बेशक ठार मारावें, त्यांत कांहीं पाप नाहीं, असें मनूनेंहि ( मनु. ८, ३५०, ३५१ ) म्हटलें आहे ].

( ३८ ) लोभानें बुद्धि नष्ट झालेल्या यांना कुलक्षयामुळें होणारा दोष आणि मित्रद्रोहाचें पातक जरी दिसत नाहीं, ( ३९ ) तरी हे जनार्दना ! कुलक्षयाचा दोष आम्हांस स्पष्ट दिसत असतां या पापापासून पराङ्मुख होण्याचें आमच्या मनांत आल्यावांचून कसें रहाणार ?

( युद्धांत गुरुवध, सुहृद्वध व कुलक्षय होणार हें प्रत्यक्ष प्रथमतः दिसून आल्यावर लढाई करण्याचें जें आपलें कर्तव्य त्याबद्दल अर्जुनास जो व्यामोह पडला त्यांतील बीज काय ? गीतेंतील पुढील प्रतिपादनाशीं याचा संबंध काय ? व तद्दृष्ट्या प्रथमाध्यायाचें महत्त्व कोणतें ? इत्यादि प्रश्नांचा विचार गीतारहस्याच्या पहिल्या व पुनः चवदाव्या प्रकरणांत आम्हीं केला आहे तो पहा. लोभानें बुद्धि नष्ट झाल्यामुळें दुष्टांना आपला दुष्टपणा कळत नसला तरी शहाण्या पुरुषानें दुष्टांच्या नादीं लागून दुष्ट होऊं नये—न पापे प्रतिपापः स्यात्—स्वस्थ बसावें, इत्यादि ज्या सामान्य कोट्यांचा या ठिकाणीं उल्लेख केलेला आहे त्या अशा प्रसंगीं

अधर्माभिभवात्कृष्ण प्रदुष्यन्ति कुलस्त्रियः ।
स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसंकरः ॥ ४१ ॥
संकरो नरकायैव कुलघ्नानां कुलस्य च ।
पतन्ति पितरो ह्येषां लुप्तपिंडोदकक्रियाः ॥ ४२ ॥
दोषैरेतैः कुलघ्नानां वर्णसंकरकारकैः ।
उत्साद्यन्ते जातिधर्माः कुलधर्माश्च शाश्वताः ॥ ४३ ॥
उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां जनार्दन ।

कितपत लागू पडतात किंवा कराव्या ह्याहि एक वरच्याप्रमाणेंच महत्त्वाचा प्रश्न आहे, व त्याचें गीतेप्रमाणें उत्तर काय हें आह्मीं गीतारहस्याच्या बाराव्या प्रकरणांत (पृ. ३९०–३९५) निरूपिलें आहे. गीतेच्या पुढील अध्यायांतून जें विवेचन आहे तें पहिल्या अध्यायांत अर्जुनास आलेल्या शंकांची निवृत्ति करण्यासाठीं आहे हें लक्षांत ठेविलें म्हणजे गीतेचें तात्पर्य काय याबद्दल शंका रहात नाहीं. भारती युद्धांत एकच राष्ट्रांतील व धर्मांतील लोकां मध्यें दुफळी होऊन ते परस्परवधार्थ उद्यक्त झालेले असल्यामुळें या शंका उद्भवल्या असून, अर्वाचीन इतिहासांत असे प्रसंग जेथें जेथें आले तेथें तेथें हेच प्रश्न उपस्थित झालेले आहेत. असो; कुलक्षयापासून पुढें काय काय अनर्थ होतात हें अर्जुन आतां स्पष्ट करून सांगतो.]

(४०) कुलक्षय झाला म्हणजे सनातन कुलधर्म नष्ट होतात, आणि (कुल) धर्म सुटले म्हणजे सर्व कुलावर अधर्माचा पगडा बसतो; (४१) अधर्म माजला म्हणजे हे कृष्णा! कुलस्त्रिया बिघडतात; बिघडल्या म्हणजे हे वार्ष्णेया! वर्णसंकर होतो. (४२) आणि वर्णसंकर झाला म्हणजे तो कुलघातक आणि (सर्व) कुल यांना निश्चयेंकरून नरकाला नेतो, व पिंडदानतर्पणादि क्रिया लुप्त झाल्यामुळें त्यांचे पितरहि पतन पावतात. (४३) कुलघातकांच्या या वर्णसंकरकारक दोषांनीं पुरातन जातिधर्म व

अर्जुन उवाच ।

§§ कथं भीष्ममहं संख्ये द्रोणं च मधुसूदन ।
इषुभिः प्रतियोत्स्यामि पूजार्हावरिसूदन ॥ ४ ॥

दिला आहे तो पहा. हा संकल्प महाभारतांत नसला तरी हा गीतेवर संन्यासमार्गाच्या टीका होण्यापूर्वीचा असला पाहिजे; कारण कोणीहि संन्यासमार्गांतील पंडित असा संकल्प देणार नाहीं. गीतेंत संन्यासमार्गाचें प्रतिपादन नसून कर्मयोगाचें शास्त्र म्हणून संवादरूपानें विवेचन आहे असें यावरून उघड होतें. संवादात्मक आणि शास्त्रीय पद्धति यांतील भेद रहस्याच्या चवदाव्या प्रकरणाच्या आरंभीं सांगितला आहे.]

---

## अध्याय दुसरा.

संजय म्हणाला-(१) याप्रमाणें करुणेनें व्यापिलेल्या, अश्रूंनीं भरून डोळे दाटून आलेल्या, आणि विषाद पावणाऱ्या अर्जुनास मधुसूदन (श्रीकृष्ण) असें भाषण करिते झाले.-श्रीभगवान् ह्मणाले-(२) हे अर्जुना! आर्यांनीं म्हणजे सत्पुरुषांनीं ( कधींहि ) न आचरिलेलें, अधोगतीला नेणारें आणि दुष्कीर्तिकारक असें हें काळेंबेरें ( कश्मलं ) या संकटसमयीं तुझ्या मनांत कोठून आलें ? ( ३ ) हे पार्था ! असा नामर्द होऊं नको ! हें तुला शोभत नाहीं. अरे तूं शत्रूस ताप देणारा ! अंतःकरणाचें हें क्षुद्र दुबळेपण सोडून देऊन ( युद्धास ) उभा रहा !

[ परंतप या शब्दाचा आम्हीं या ठिकाणीं अर्थ दिला आहे खरा. पण अनेक ठिकाणीं येणारीं विशेषणरूपी संबोधनें किंवा कृष्णार्जुनांचीं नांवें गीतेंत हेतुगर्भ किंवा साभिप्राय योजिलीं आहेत, असें जें बहुतेक टीकाकारांचें म्हणणें आहे, तें आमच्या मतें सयुक्तिक नाहीं.

गुरूनहत्वा हि महानुभावान् श्रेयो भोक्तुं भैक्ष्यमपीह लोके ।
हत्वार्थकामांस्तु गुरूनिहैव भुंजीय भोगान् रुधिरप्रदिग्धान् ॥ ५ ॥

पद्यरचनेला अनुकूल पडेल तशीं हीं नांवें घातलेलीं असून त्यांत कांहीं विशिष्ट अर्थ उद्दिष्ट नसतो असें आमचें मत आहे; व त्यामुळें कित्येकदां श्लोकांतलेंच नांव भाषांतरांत न घालतां 'अर्जुन' किंवा 'श्रीकृष्ण' असें त्याचें सामान्यतः भाषांतर आम्हीं केलें आहे. ]

अर्जुन म्हणाला—(४) हे मधुसूदना! (परम) पूज्य असे जे भीष्म व द्रोण यांच्याशीं हे शत्रुनाशना! युद्धांत बाणांनीं मी उलट कसा लढूं? (५) महात्म्या गुरुंस न मारितां या लोकीं भिक्षा मागून पोट भरणेंहि श्रेयस्कर होय; पण अर्थाला ओशाळलेले (असले तरी) जे गुरु त्यांस मारून या जगांतच मला त्यांच्या रक्तानें माखलेले भोग भोगावे लागणार.

[ 'गुरुंस' या अनेकवचनी शब्दानें 'वडील माणसें' असा अर्थ घेतला पाहिजे. कारण विद्या शिकविणारा गुरु एकट्या द्रोणाचार्यांखेरीज सैन्यांत दुसरा कोणीहि नव्हता. युद्धाला प्रारंभ होण्यापूर्वीं अशा गुरुंचें म्हणजे भीष्म, द्रोण व शल्य यांचें पादवंदन करून त्यांचा आशीर्वाद घेण्यास युधिष्ठिर रणांगणावर आपलें कवच काढून नम्रपणानें त्यांजकडे गेल्यानंतर, शिष्टसंप्रदायाचें योग्य अनुसरण करणाऱ्या युधिष्ठिराचें अभिनंदन करून सर्वांनीं त्यास आपण दुर्योधनाच्या बाजूनें कां लढणार याचें कारण असें सांगितलें कीं—

अर्थस्य पुरुषो दासो दासस्त्वर्थो न कस्यचित् ।
इति सत्यं महाराज बद्धोऽस्म्यर्थेन कौरवैः ॥

"मनुष्य अर्थाचा गुलाम आहे, अर्थ कोणाचा गुलाम नाहीं, असा खरा प्रकार असल्यामुळें हे महाराज युधिष्ठिरा! कौरवांनीं मला अर्थानें बांधून टाकिलें आहे" (म. भा. भी. अ. ४३ श्लो. ३५, ५०, ७६). "अर्थाला ओशाळलेले" असे जे वर शब्द आहेत ते या श्लोकांतील अर्थाचेच द्योतक होत. ]

न चैतद्विद्मः कतरन्नो गरीयो यद्वा जयेम यदि वा नो जयेयुः ।
यानेव हत्वा न जिजीविषामस्तेऽवस्थिताः प्रमुखे धार्तराष्ट्राः ॥ ६ ॥
कार्पण्यदोषोपहतस्वभावः पृच्छामि त्वां धर्मसंमूढचेताः ।
यच्छ्रेयः स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम् ॥
न हि प्रपश्यामि ममापनुद्याद् यच्छोकमुच्छोषणमिंद्रियाणाम् ।
अवाप्य भूमावसपत्नमृद्धं राज्यं सुराणामपि चाधिपत्यम् ॥ ८ ॥

संजय उवाच ।

एवमुक्त्वा हृषीकेशं गुडाकेशः परंतपः ।

( ६ ) आम्हीं जय मिळवावा किंवा आम्हांस ( त्यांनीं ) जिंकावें, या दोहोंपैकीं आम्हांस श्रेयस्कर कोणतें हेंहि कळत नाहीं. ज्यांना मारून जिवंत रहण्याची इच्छा नाहीं तेच हे कौरव ( युद्धास ) समोर उभे आहेत !

[ या श्लोकांत 'पुष्कळांचें पुष्कळ सुख' यासारखी कर्माकर्माचें लाघव-गौरव ठरविण्याची कसोटी उद्दिष्ट असून कोणाचा जय होणें बरें, हें त्याप्रमाणें ठरवितां येत नाहीं, असा एकंदर आशय आहे. गीतारहस्य पृ. ८५ व ८६ पहा. ]

( ७ ) दैन्यानें माझी स्वाभाविक वृत्ति नष्ट होऊन ( माझ्या ) धर्माचा म्हणजे कर्तव्याचा मनाला मोह पडल्यामुळें मी तुम्हांला विचारीत आहे. जें निश्चयेंकरून श्रेयस्कर असेल तें मला सांगा. मी तुमचा शिष्य, तुम्हांला शरण आलेल्या मला बोध करा. ( ८ ) कारण पृथ्वीवर निष्कंटक समृद्ध राज्य किंवा देवांचेंहि ( स्वर्गाचें ) स्वामित्व मिळालें तरी इंद्रियांना शोषून टाकणारा हा माझा शोक जें दूर करील असें कांहींच ( साधन ) मला दिसत नाहीं. संजय म्हणाला:-( ९ ) याप्रमाणें शत्रूला ताप देणारा जो गुडाकेश म्हणजे अर्जुन त्यानें हृषीकेशाला ( श्रीकृष्णाला ) सांगित-ल्यावर " मी लढणार नाहीं " असें गोविंदाला सांगून ( तो ) आपला

न योत्स्य इति गोविंदमुक्त्वा तूष्णीं बभूव ह ॥ ९ ॥
तमुवाच हृषीकेशः प्रहसन्निव भारत।
सेनयोरुभयोर्मध्ये विषीदन्तमिदं वचः ॥ १० ॥

स्तब्ध राहिला! (१०) (नंतर) हे भारता (धृतराष्ट्रा)! दोन्ही सैन्यांचें मध्यें खिन्न होऊन बसलेल्या त्या अर्जुनास श्रीकृष्ण हंसल्यासारखे करून असें म्हणाले.

[ एके बाजूस क्षत्रियाचा स्वधर्म व दुसरीकडे गुरुहत्या व कुलक्षय या पातकांची भीति याप्रमाणें ओढीत असतां "मरावें का मारावें" या मोहांत पडून लढाई सोडून भिक्षा मागण्यास तयार झालेल्या अर्जुनास त्याचें या जगांत खरें कर्तव्य काय याचा भगवान् आतां उपदेश करीत आहेत. लढाईसारख्या घोर कर्मानें आत्म्याचें कल्याण होणार नाहीं अशी अर्जुनाची शंका होती. सबब ज्या थोर पुरुषांनीं परब्रह्माचें ज्ञान करून घेऊन आपल्या आत्म्याचें पूर्ण कल्याण करून घेतलें ते या जगांत कसे वागतात, येथपासूनच गीतेंतील उपदेशास सुरुवात आहे. भगवान् म्हणतात कीं, जगाच्या रहाटीकडे पाहीलें तर आत्मज्ञानी पुरुषाच्या आयुष्यक्रमणाचे अनादिकालापासून दोन मार्ग चालत आले आहेत असें दिसून येतें (गी. ३. ३; व गीतारहस्य प्र. ११ पहा). आत्मज्ञान संपादन केल्यावर शुकासारखे पुरुष संसार सोडून आनंदाने भिक्षा मागत हिंडतात, तर जनकासारखे दूसरे आत्मज्ञानी ज्ञानोत्तरहि स्वधर्माप्रमाणें लोककल्याणार्थ जगाच्या शेंकडों उलाढालींत आपला वेळ घालवीत असतात. पहिल्या मार्गास सांख्य किंवा सांख्यनिष्ठा असें म्हणतात, आणि दुसऱ्यास कर्मयोग किंवा योग असें नांव आहे (श्लो. ३९ पहा) पण या दोन्ही निष्ठा जरी प्रचारांत असल्या तरी त्यांतले त्यांत कर्मयोग अधिक श्रेष्ठ असा गीतेचा सिद्धान्त आहे (गी. ५. २) हें पुढें सांगण्यांत येईल. या दोन निष्ठांपैकीं

श्रीभगवानुवाच ।

§§ अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषसे ।
गतासूनगतासूंश्च नानुशोचन्ति पंडिताः ॥ ११ ॥

[ अर्जुनाच्या मनाचा कल आतां संन्यासनिष्ठेकडे वळला होता. म्हणून त्याच मार्गांतील तत्त्वज्ञानानें अर्जुनाची चूक प्रथम त्याच्या नजरेस आणून देऊन पुढें ३९ व्या श्लोकापासून कर्मयोगाच्या प्रतिपादनास भगवंतांनीं सुरवात केली आहे. सांख्य मार्गांतले पुरुष ज्ञानोत्तर कर्मे करीत नसले तरी त्यांचे ब्रह्मज्ञान व कर्मयोगांतील ब्रह्मज्ञान कांहीं निराळे नसतें. तेव्हां सांख्यनिष्ठप्रमाणें पाहिले तरीहि आत्मा जर अविनाशी व नित्य आहे तर मग "मी अमक्याला कसे मारूं" ही तुझी बडबड होय, असें किंचित उपहासपूर्वक अर्जुनास भगवंताचे प्रथम सांगणं आहे. ]

श्रीभगवान् म्हणाले—( ११ ) ज्यांचा शोक करूं नये त्यांचा तूं शोक करीत आहेस आणि ज्ञानाच्या बाता सांगतोस ! कोणाचे प्राण गेले ( काय ) आणि राहिले ( काय ), ज्ञानी पुरुष त्यांचा शोक करीत नाहींत.

[ या श्लोकांत प्राण गेल्याचा किंवा राहिल्याचाहि शोक करीत नाहींत असें विधान आहे. पैकीं गेल्याचा शोक करणें साहजिकच असून तो न करण्याबद्दलचा उपदेश करणे युक्त आहे. पण प्राण राहिल्याचा शोक कसा व कां करावयाचा अशी शंका येऊन टीकाकारांनीं त्याबद्दल बरीच चर्चा केली आहे; आणि कित्येकांनीं मूर्ख व अज्ञानी लोकांचें प्राण रहाणें हें शोकाचेंच कारण होय असें म्हटलें आहे. पण इतका कीस काढीत न बसतां 'शोक करणें' या शब्दांचाच 'बरें अथवा वाईट वाटणें' किंवा 'परवा करणें' असा व्यापक अर्थ करावा म्हणजे कांहींच अडचण रहात नाहीं. ज्ञानी पुरुषास दोन्ही गोष्टी सारख्याच असतात, एवढेंच या ठिकाणीं सांगणें आहे. ]

न त्वेवाहं जातु नासं न त्वं नेमे जनाधिपाः ॥
न चैव न भविष्यामः सर्वे वयमतः परम् ॥ १२ ॥
देहिनोऽस्मिन्यथा देहे कौमारं यौवनं जरा ।
तथा देहान्तरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यति ॥ १३ ॥

( १२ ) असें पहा कीं मी ( पूर्वी ) कधीं नव्हतों असें तर नाहींच, तूं व हे राजे ( पूर्वी ) नव्हते असें नाहीं, आणि आपण सर्व यापुढें होणार नाहीं असेंहि नाहीं.

[ या श्लोकावर टीका करितांना रामनुजभाष्यांत असें लिहिलें आहे कीं, 'मी' म्हणजे परमेश्वर आणि "तूं व राजे" म्हणजे इतर आत्मे हे दोन्हीहि जर पूर्वी व पुढें होणार आहेत तर परमेश्वर व आत्मा हे दोन्ही पृथक्, स्वतंत्र व नित्य आहेत असें या श्लोकावरून सिद्ध होतें. पण हें अनुमान बरोबर नाहीं, सांप्रदायिक आग्रहाचें आहे; कारण या ठिकाणीं सर्वच नित्य आहेत एवढेंच प्रतिपाद्य असून त्यांचा परस्पर संबंध काय हें येथें सांगितलें नाहीं व सांगण्याचें कारणहि नव्हतें. तसा प्रसंग आला तेव्हां सर्व प्राण्यांच्या शरीरांत देहधारी आत्मा मी म्हणजे एकच परमेश्वर आहे असा अद्वैत सिद्धांत पुढें गीतेंतच ( गी. ८.४; १३.३१) स्वच्छ सांगितला आहे. ]

( १३ ) देह धारण करणाऱ्यास या देहांत ज्याप्रमाणें बालपण, तरुणपण आणि म्हातारपण ( प्राप्त होतें ), त्याप्रमाणेंच ( पुढें ) दुसरा देह प्राप्त होत असतो. ( म्हणून ) या बाबतींत ज्ञानी पुरुष मोह पावत नाहींत.

"मी अमक्याला कसें मारूं" हीच काय ती अर्जुनाच्या मनांतील मोठी भीति अगर मोह होता. म्हणून तो घालविण्याकरितां मरणें म्हणजे काय आणि मारणें म्हणजे काय याचाच तत्त्वदृष्ट्या भगवान् प्रथम

§§ मात्रास्पर्शास्तु कौंतेय शीतोष्णसुखदुःखदाः ।
आगमापायिनोऽनित्यास्तांस्तितिक्षस्व भारत ॥ १४ ॥

विचार सांगतात ( श्लो. ११–३० ). मनुष्य म्हणजे केवळ देहरूपी नुसती वस्तु नसून देह आणि आत्मा यांचा समुच्चय आहे. पैकीं ' मी ' या अहंकाररूपानें व्यक्त होणारा आत्मा नित्य व अमर आहे. तो आज आहे, काल होता व उद्यांहि असणारच. म्हणून मरणें किंवा मारणें हे शब्दच त्यास लागू पडत नाहींत व त्याचा शोकहि करावयास नको. बाकी राहिला देह. हा तर बोलून चालून अनित्य व नाशवंत असून आज नाहीं उद्यां, उद्यां नाहीं तर शंभर वर्षांनीं तरी तो नाश पावणार हें निश्चित आहे,—अद्य वाब्दशतान्ते वा मृत्युर्वै प्राणिनां ध्रुव. ( भाग. १०. १. ३८ ); आणि एक देह सुटला तरी कर्मानुरूप पुढे दुसरा देह मिळाल्याखेरीज रहात नाहीं म्हणून त्याचाहि शोक करणें बरोबर नव्हे. सारांश, देह किंवा आत्मा या दोन्ही दृष्टींनीं विचार केला तरी मेल्याचा शोक करणें वेडेपणा होय असें सिद्ध होतें. पण हा जरी वेडेपणा ठरला तरी प्रस्तुत देहाचा नाश होतांना जे क्लेश होतात त्यासाठीं त्यांचा शोक कां करूं नये हें सांगावयास पाहिजे. म्हणून भगवान् आतां कायिक सुखदुःखांचें स्वरूप सांगून त्यांचाहि शोक करणें युक्त नाहीं असें दाखवितात. ]

( १४ ) हे कुंतीपुत्रा ! शीतोष्ण किंवा सुखदुःख देणारे जे हे मात्रांचे म्हणजे बाह्य सृष्टींतील पदार्थांचे ( इंद्रियांशीं ) संयोग त्यांना उद्भव व नाश आहेत. ( म्हणून ) ते अनित्य म्हणजे विनाशी होत. हे भारता ! ( शोक न करितां ) ते तूं सहन कर. ( १५ ) कारण हे नरश्रेष्ठा ! सुख व दुःख समान मानणारा ( असल्यामुळें ) ज्या ज्ञानी पुरुषाला यांची व्यथा लागत नाहीं तोच अमृतत्व म्हणजे अमृत ब्रह्माची स्थिति प्राप्त करून घेण्यास समर्थ होतो.

यं हि न व्यथयन्त्येते पुरुषं पुरुषर्षभ ।
समदुःखसुखं धीरं सोऽमृतत्वाय कल्पते ॥ १५ ॥

[ ज्या पुरुषाला ब्रह्मात्मैक्यज्ञान होऊन नामरूपात्मक जग मिथ्या असें कळलें नाहीं, तो बाह्य पदार्थ व इंद्रियें यांच्या संयोगापासून होणारे शीतोष्णादि किंवा सुखदुःखादि विकार सत्य मानून त्यांचा आत्म्याच्या ठायीं अध्यारोप करीत असतो; व त्यामुळें त्याला दुःखाची पीडा होते. पण हे सर्व विकार प्रकृतीचे असून आत्मा अकर्ता व अलिप्त आहे हें ज्यानें ओळखिलें त्याला सुख आणि दुःख दोन्हीं सारखींच; व या सम-बुद्धीनें तूं तीं सहन कर असें भगवान् आतां अर्जुनाला सांगत असून तोच अर्थ पुढील अध्यायांतून अधिक विस्तारानें वर्णिला आहे. 'मात्रा' या शब्दाचा 'मीयते एभिरिति मात्राः' म्हणजे ज्यानें बाह्य पदार्थ मोजले जातात किंवा कळतात तीं इंद्रियें, असा शांकरभाष्यांत अर्थ केला आहे. पण मात्रा म्हणजे इंद्रियें हा अर्थ न घेतां, इंद्रियांनीं मोजले जाणारे जे शब्दरूपादि बाह्य पदार्थ ते मात्रा होत असा अर्थ करून त्यांचा इंद्रियांशीं जो स्पर्श म्हणजे संयोग तो मात्रास्पर्श होय. असाहि कित्येक अर्थ लावितात; व तोच आम्हीं स्वीकारिला आहे. कारण या श्लोकांतीलच विचार गीतेंत पुढें ज्या ठिकाणीं आले आहेत (गी. ५. २१–२३) तेथें 'बाह्य-स्पर्श' असा शब्द असून, 'मात्रा-स्पर्श' शब्दाचा आम्हीं दिल्याप्रमाणें अर्थ केला म्हणजे हे दोन्ही शब्द एकमेकाशीं जुळते होतात. पण हे दोन्ही शब्द जरी याप्रमाणें जुळते असले तरी मात्रास्पर्श हा शब्द पुरातन दिसतो. कारण मनुस्मृतींत (६. ५७) याच अर्थीं मात्रासंग हा शब्द आला असून बृहदारण्य-कोपनिषदांत ज्ञानी पुरुषाच्या आत्म्याचा मेल्यावर मात्रांशीं असंसर्ग (मात्राऽसंसर्गः) होतो, म्हणजे तो मुक्त होऊन त्याला मेल्यावर संज्ञा रहात नाहीं, असें वर्णन आहे (बृ. माध्यं. ४. ५. १४; वे. सू. शां. भा. १.

§§ नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः।
उभयोरपि दृष्टोऽन्तस्त्वनयोस्तत्त्वदर्शिभिः ॥ १६ ॥

४. २२ ). शीतोष्ण व सुखदुःख हीं पदें उपलक्षणात्मक असून त्यांतच राग व द्वेष, सत् व असत्, मृत्यु व अमरत्व इ० परस्परविरुद्ध द्वंद्वांचा समावेश होतो. हीं द्वंद्वें मायासृष्टींतील व खरें परब्रह्म नारदीय सूक्तांत वर्णिल्याप्रमाणें या द्वंद्वांपलीकडचें असल्यामुळें अनित्य माया, सृष्टींतील हीं द्वंद्वें शांतपणें सोसून बुद्धीची या द्वंद्वांमधून सुटका केल्याखेरीज ब्रह्मप्राप्ति होत नाहीं हें उघड आहे. ( गी. २. ४५; ७. २८ आणि गी. र. प्र. ९ पृ. २२६ व २५२ पहा ). हाच अर्थ आतां अध्यात्मशास्त्रदृष्ट्या व्यक्त करून दाखवितात—]

( १६ ) जें नाहीं ( असत् ) तें आहेसें होत नाहीं, व जें आहे ( सत् ) तें नाहींसें होत नाहीं, असा 'आहे व नाहीं' ( सत् आणि असत् ) या दोहोंचा तत्त्वज्ञानी पुरुषांनीं अंत पाहिला आहे, म्हणजे शेवट पाहून त्याच्या स्वरूपाचा निर्णय केला आहे.

[ या श्लोकांतील 'अंत' शब्दाचा अर्थ व 'राद्धान्त' 'सिद्धान्त' व 'कृतान्त' ( गी. १८. १३ ) यांतील अंत शब्दाचा अर्थ एकच असून, शाश्वतकोशांत ( शा. ३८१ ) "स्वरूपप्रांतयोरन्तमंतिकेऽपि प्रयुज्यते" असे 'अन्त' शब्दाचे अर्थ दिले आहेत. सत् म्हणजे ब्रह्म आणि असत् म्हणजे नामरूपात्मक दृश्य जग असे अर्थ या श्लोकांत विवक्षित आहेत. ( गी. र. प्र. ९ पृ. २२१ व २४१–२४३ पहा ). "जें आहे तें नाहींसें होत नाहीं" इत्यादि तत्त्व दिसण्यांत जरी सत्कार्यवादासारखें दिसलें तरी त्याचा अर्थ थोडा निराळा आहे हें लक्षांत ठेविलें पाहिजे. एका वस्तूपासून जेथें दुसरी वस्तु निर्माण होते–उदा० बीजापासून वृक्ष–तेथें सत्कार्यवादाचें तत्त्व लागू पडतें. प्रस्तुत श्लोकांत तशा प्रकारचा प्रश्न नसून सत् म्हणजे जें आहे त्याचें अस्तित्व ( भाव ) आणि असत् म्हणजे

अविनाशि तु तद्विद्धि येन सर्वमिदं ततम् ।

जें नाहीं त्याचा अभाव, हीं दोन्ही नित्य म्ह० सदैव कायम टिकणारीं आहेत एवढेंच सांगणें आहे. दोहोंचे यथाक्रम भावाभाव याप्रमाणें नित्य मानिले म्हणजे जें 'सत्' त्याचा नाश होऊन त्याचेंच 'असत्' होत नाहीं असें पुढें आपोआपच प्राप्त होतें. पण हें अनुमान आणि सत्कार्य-वादांत प्रथमच गृहीत धरलेली एका वस्तूपासून दुसऱ्या वस्तूची कार्य-कारणरूप उत्पत्ति हीं दोन्ही एकसारखीं नव्हेत (गी. र. प्र. ७ पृ. १५४ पहा). या श्लोकांतील 'नासतो विद्यते भावः' या पहिल्या चर-णांत 'विद्यते भावः' याचीं 'विद्यते+अभावः' अशीं पदें पाडून व असत् म्हणजे अव्यक्त जी प्रकृति तिचा अभाव म्हणजे नाश होत नाहीं असा या चरणाचा माध्वभाष्यांत अर्थ केला आहे; आणि दुसऱ्या चर-णांत ज्या अर्थी सताचाहि नाश होत नाहीं असें म्हटलें आहे त्या अर्थी असत् आणि सत् दोन्हीहि नित्य आहेत, असा आपल्या द्वैती संप्रदाया-प्रमाणें मध्वाचार्यांनीं या एकंदर श्लोकाचा अर्थ दिला आहे! पण हा अर्थ सरळ नव्हे, ओढाताणीचा आहे. कारण असत् आणि सत् या परस्परविरोधी शब्दांप्रमाणेंच अभाव आणि भाव हे दोन विरोधी शब्दच या ठिकाणीं योजिलेले आहेत असें स्वाभाविकरीत्या दिसून येतें; आणि दुसऱ्या चरणांत म्ह० 'नाभावो विद्यते सतः' यांत जर अभाव शब्दच घ्यावा लागतो तर पहिल्या चरणांत भाव हाच शब्द असला पाहिजे, असें उघड होतें. शिवाय असत् आणि सत् हीं दोन्ही नित्य आहेत हें सांगण्यास 'अभाव' आणि 'विद्यते' हीं पदें दोनदां घालण्याची कांहीं जरूरी नव्हती. पण मध्वाचार्य म्हणतात त्याप्रमाणें ही द्विरुक्ति जरी आदरार्थक मानिली, तरी व्यक्त किंवा दृश्य सृष्टींत पडणारें मनु-ष्याचें शरीर नाशवंत म्हणजे अनित्य आहे असें पुढें अठराव्या श्लोकांत स्पष्टच म्हटलें आहे. म्हणून आत्म्याबरोबर देहहि भगवद्गीतेप्रमाणें नित्य मानिता येत नाहीं, एक नित्य व दुसरें अनित्य आहे, असें उघड सिद्ध

विनाशमव्ययस्यास्य न कश्चित्कर्तुमर्हति ॥ १७ ॥
अन्तवन्त इमे देहा नित्यस्योक्ताः शरीरिणः
अनाशिनोऽप्रमेयस्य तस्माद् युध्यस्व भारत ॥ १८ ॥

होतें. तथापि सांप्रदायिकदृष्ट्या ओढाताण कशी करितात हें वाचकांच्या लक्षांत येण्यासाठीं माध्वभाष्यांतील या श्लोकाचा अर्थ नमुन्यासाठीं आम्हीं येथें दिला आहे. असो; जें सत् तें कधींच नाहींसें होत नाहीं, म्हणून सत्स्वरूपी आत्म्याचा शोक करावयास नको; आणि नामरूपात्मक देहादि किंवा सुखदुःखादि विकार मूळांतच तत्त्वदृष्ट्या विनाशी असल्यामुळें त्यांचा नाश झाल्याबद्दल शोक करणंहि उचित नव्हे. म्हणून ' ज्याचा शोक करूं नये त्याचा तूं शोक करितोस ' असें जें अर्जुनास सांगितलें तें सिद्ध झालें. आतां सत् आणि असत् यांच्या अर्थांचीच पुढील दोन श्लोकांत जास्त फोड करून सांगतात—]

( १७ ) हें सर्व ( जग ) ज्यानें विस्तारिलें किंवा व्यापिलें आहे तें ( मूळ आत्मस्वरूप ब्रह्म ) अविनाशी आहे हें लक्षांत ठेव. या अव्यय तत्त्वाचा नाश करण्यास कोणीहि समर्थ नाहीं.

[ मागच्या श्लोकांत ज्याला सत् म्हटलें त्याचेंच हें वर्णन आहे. आतां शरीराचा मालक म्हणजे आत्मा याच नित्य कोटींत पडतो असें सांगून अनित्य किंवा असत् कशाला म्हणावयाचें तें सांगतात—]

( १८ ) नित्य, अविनाशी व अचिंत्य असा जो शरीराचा मालक ( आत्मा ) त्याला प्राप्त होणारे हे देह किंवा शरीरें नाशवंत म्हणजे अनित्य होत असें म्हटलें आहे. म्हणून हे भारता ! तूं युद्ध कर !

[ सारांश, याप्रमाणें नित्यानित्यविवेक केला तर " मी अमक्याला मारितों " ही बुद्धिच खोटी ठरून युद्ध न करण्यास अर्जुनानें दाखविलेलें कारण निर्मूल पडतें. हाच अर्थ आतां अधिक स्पष्ट करितात—]

य एनं वेत्ति हन्तारं यश्चैनं मन्यते हतम् ।
उभौ तौ न विजानीतो नायं हन्ति न हन्यते ॥ १९ ॥
न जायते म्रियते वा कदाचिन्नायं भूत्वा भविता वा न भूयः ।
अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे ॥२०॥
वेदाविनाशिनं नित्यं य एनमजमव्ययम् ।
कथं स पुरुषः पार्थ कं घातयति हन्ति कम् ॥ २१ ॥

(१९) (शरीराचा मालक किंवा आत्मा) हाच मारणारा आहे असें जो मानितो, किंवा तो मारिला जातो असें जो समजतो, त्या दोघांनाहि खरें ज्ञान नाहीं. (कारण) हा (आत्मा) मारीत नाहीं आणि मारलाहि जात नाहीं.

[ कारण आत्मा हा नित्य व स्वतः अकर्ता असून सर्व खेळ प्रकृतीचा आहे. हा व पुढील श्लोक कठोपनिषदांत आले असून (कठ. २. १८, १९) शिवाय महाभारतांत अन्य ठिकाणींहि कालानें सर्व ग्रासिलें असून या कालाच्या क्रीडेसच ‘ मारितो व मरतो ’ या लौकिक संज्ञा आहेत (शां. २५. १५) असें वर्णन आहे. गीतेंतहि (११. ३३) भीष्मद्रोणादिकांस कालस्वरूपानें मींच पूर्वी मारिलें आहे, तूं फक्त निमित्त हो, असें भक्तिमार्गाच्या भाषेनें हेंच तत्त्व पुढें भगवंतांनीं अर्जुनास पुनः सांगितलं आहे. ]

(२०) हा (आत्मा) कधीं जन्मत नाहीं किंवा मरतहि नाहीं; हा (एकदां) होऊन पुनः होणारा नाहीं असेंहि नाहीं; हा अज, नित्य, शाश्वत व पुरातन आहे. आणि शरीराचा वध झाला तरीहि मारिला जात नाहीं. (२१) हे पार्था ! हा आत्मा अविनाशी, नित्य, अज आणि अव्यय आहे हें ज्यानें ओळखिलें तो पुरुष कोणास कसा मारविणार व कोणास

वासांसि जीर्णानि यथा विहाय नवानि गृह्णाति नरोऽपराणि ॥
तथा शरीराणि विहाय जीर्णान्यन्यानि संयाति नवानि देही ॥२२॥
नैनं छिंदन्ति शस्त्राणि नैनं दहति पावकः ।
न चैनं क्लेदयन्त्यापो न शोषयति मारुतः ॥ २३ ॥
अच्छेद्योऽयमदाह्योऽयमक्लेद्योऽशोष्य एव च ।
नित्यः सर्वगतः स्थाणुरचलोऽयं सनातनः ॥ २४ ॥
अव्यक्तोऽयमचिंत्योऽयमविकार्योऽयमुच्यते ।

मारणार (तरी) कसा? (२२) ज्याप्रमाणें एखादा मनुष्य जुनीं वस्त्रें टाकून देऊन दुसरीं नवीं ग्रहण करितो, त्याप्रमाणें देही म्ह. शरीराचा मालक आत्मा जुनीं शरीरें टाकून दुसऱ्या नव्या शरीरांशीं संगम पावतो.

[ वस्त्राची ही उपमा प्रचारांतली आहे. महाभारतांत दुसऱ्या ठिकाणीं एक घर (शाला) सोडून दुसऱ्या घरांत जाण्याचा दृष्टांत घेतला आहे (शां. १५. ५६); व एका अमेरिकन ग्रंथकारानें हीच कल्पना पुस्तकाला नवा पुठा घालण्याचा दृष्टान्त देऊन व्यक्त केली आहे. मागें तेराव्या श्लोकांत बालपण, तारुण्य व वार्धक्य या अवस्थांस जो न्याय लागू केला आहे तोच आतां शरीराला लाविला आहे. ]

(२३) याला म्हणजे आत्म्याला शस्त्रें तोडीत नाहींत, याला अग्नि जाळीत नाहीं, तसेंच याला पाणी भिजवीत नाहीं, व वायु सुकवीतहि नाहीं. (२४) (कधींहि) न तुटणारा, न जळणारा, न भिजणारा व न सुकणारा हा (आत्मा) नित्य, सर्वत्र भरलेला, स्थिर, अचल व सनातन म्ह० चिरंतन आहे. (२५) या आत्म्यालाच अव्यक्त म्हणजे इंद्रियांना गोचर न होणारा, अचिंत्य म्हणजे मनानेंहि जाणण्यास अशक्य आणि अविकार्य म्ह० ज्याला कोणत्याच विकाराची उपाधि नाहीं, असें म्हणतात. यासाठीं हा (आत्मा) अशा प्रकारचा आहे हें जाणून त्याचा शोक करणें तुला योग्य नाहीं.

तस्मादेवं विदित्वैनं नानुशोचितुमर्हसि ॥ २५ ॥
§§ अथ चैनं नित्यजातं नित्यं वा मन्यसे मृतम् ।
तथापि त्वं महाबाहो नैनं शोचितुमर्हसि ॥ २६ ॥
जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च ।
तस्मादपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि ॥ २७ ॥

[ हें वर्णन उपनिषदांवरून घेतलेलें असून तें निर्गुण आत्म्याचें आहे, सगुणाचें नव्हे. कारण अविकार्य किंवा अचिंत्य हीं विशेषणें सगुणास लागूं शकत नाहींत. त्याच्या आधारें शोक न करण्याबद्दल ही उपपत्ति सांगितली. आतां कदाचित् कोणी असा पूर्वपक्ष करील कीं, आम्ही आत्मा नित्य समजत नसल्यामुळें तुमची उपपत्ति आम्हांस ग्राह्य नाहीं. म्हणून या पूर्वपक्षाचा प्रथम उल्लेख करून त्याचें भगवान् असें उत्तर देतात कीं— ]

(२६) अथवा हा आत्मा ( नित्य नसून शरीराबरोबरच ) नेहमीं जन्मतो किंवा नेहमीं मरतो असें तूं मानीत असलास तरीहे हे महाबाहो त्याचा शोक करणें तुला उचित नाहीं. (२७) कारण जो जन्मला त्याला मृत्यु निश्चित आहे, आणि जो मेला त्याला जन्म निश्चित आहे; म्हणून ( या ) अपरिहार्य ( तुझ्या वरील मताप्रमाणेंहि ) शोक करणें तुला उचित नाहीं.

[ वरील दोन श्लोकांत सांगितलेली उपपत्ति सिद्धान्तपक्षाची नाहीं, 'अथ च= अथवा ' या शब्दानें मध्येंच उपस्थित केलेल्या पूर्वपक्षाला हें उत्तर आहे हें लक्षांत ठेविलें पाहिजे. आत्मा नित्य माना कीं अनित्य माना उभयपक्षींहि शोक करण्याचें कारण नाहीं, एवढेंच दाखवावयाचें आहे. गीतेचा खरा सिद्धान्त आत्मा सत्, नित्य, अज, अविकार्य आणि अचिंत्य किंवा निर्गुण आहे असें प्रथमच सांगितलें आहे. असो; देह अनित्य म्हणून शोक करणें युक्त नाहीं याचीच दुसरी म्हणजे सांख्य-शास्त्राप्रमाणें उपपत्ति सांगतात— ]

§§ अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत।
अव्यक्तनिधनान्येव तत्र का परिदेवना ॥ २८ ॥

§§ आश्चर्यवत्पश्यति कश्चिदेनमाश्चर्यवद्वदति तथैव चान्यः
आश्चर्यवच्चैनमन्यः शृणोति श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित् ॥ २९ ॥

(२८) सर्व भूतें आरंभीं अव्यक्त, मध्यंतरीं व्यक्त मरणसमयीं पुनः अव्यक्तच; ( अशी जर सर्वांचीच स्थिति आहे ) तर हे भारता ! त्यांत शोक ( राहिला ) कोठें ?

[ अव्यक्त या शब्दाचाच अर्थ 'इंद्रियांना गोचर न होणारें' असा आहे, मूळ एका अव्यक्त द्रव्यापासूनच पुढें क्रमाक्रमानें सर्व व्यक्त सृष्टि निर्माण होऊन शेवटीं म्हणजे प्रलयकालीं सर्व व्यक्त सृष्टीचा पुनः अव्यक्तांतच लय होतो. ( गी. ८. १८), या सांख्य सिद्धान्ताला अनुसरून या श्लोकांतला युक्तिवाद आहे. सांख्यांच्या या सिद्धान्ताचा खुलासा गीतारहस्याच्या सातव्या व आठव्या प्रकरणांत केला आहे तो पहा. कोणत्याहि पदार्थाची व्यक्त स्थिति जर याप्रमाणें केव्हांना केव्हां तरी नाश पावणारी आहे, तर निसर्गतःच नाशवंत अशा व्यक्त स्वरूपाबद्दल शोक करण्याचें कारण रहात नाहीं. हाच श्लोक ' अव्यक्त ' शब्दाऐवजीं 'अभाव' हा शब्द योजून महाभारताच्या स्त्रीपर्वांत (म. भा. स्त्री. २.६) आला असून पुढें " अदर्शनादापतिताः पुनश्चादर्शनं गताः । न ते तव न तेषां त्वं तत्र का परिदेवना ॥" ( स्त्री. २. १३ ) असा ' अदर्शन ' म्हणजे दृष्टीआड होणें या शब्दाचाहि मरणाला उद्देशून उपयोग केलेला आहे. सांख्य व वेदान्त या दोन्ही शास्त्रांप्रमाणें शोक करणें जर व्यर्थ ठरतें, आणि आत्मा अनित्य आहे असें मानिलें तरीहि जर हीच गोष्ट सिद्ध होत्ये, तर मग लोक मृत्यूबद्दल शोक कां करितात ? आत्मस्वरूपाबद्दलचें अज्ञान हेंच याचें उत्तर होय कारण—]

(२९ जणूं काय आश्चर्य ( अद्भुत वस्तु ) म्हणून याजकडे कोणी

देही नित्यमवध्योऽयं देहे सर्वस्य भारत ।
तस्मात्सर्वाणि भूतानि न त्वं शोचितुमर्हसि ॥ ३० ॥

पहातो, तसेंच दुसरा कोणी आश्चर्यासारखें याचें वर्णन करितो, आणि (त्याहून) दुसरा कोणी जणूं काय आश्चर्य म्हणून ऐकतो. पण (याप्रमाणें पाहून, वर्णन करून व) ऐकूनहि (यांपैकीं) कोणी याला (तत्त्वतः) जाणीत नाहीं.

[अपूर्व वस्तु म्हणून आश्चर्यानें आत्म्याबद्दल मोठमोठ्या लोकांनीं किती जरी वाटाघाट केली तरी त्याचें खरें स्वरूप कळणारे लोक फारच थोडे असल्यामुळें मृत्यूबद्दल पुष्कळ लोक शोक करीत असतात. पण तसें न करितां तूं पूर्ण विचारानें आत्मस्वरूप यथातथ्यानें समजून घे व शोक सोड असा याचा अर्थ आहे. कठोपनिषदांत (कठ. २ ७) याच मासल्याचें आत्म्याचें वर्णन आहे.]

(३०) सर्वांच्या शरीरांत (असणारा) शरीराचा मालक (आत्मा) हा सर्वदा अवध्य म्ह० कधींहि वध न पावणारा आहे; म्हणून हे भारता (अर्जुना)! सर्व म्ह० कोणत्याहि भूताबद्दल शोक करणें तुला योग्य नाहीं.

[सांख्य किंवा संन्यासमार्गांतील तत्त्वज्ञानाप्रमाणें आत्मा हा अमर म्हणून व देह हा स्वभावतःच अनित्य असल्यामुळें कोणी मरो वा मारो त्यांत 'शोक' करण्याचें कारण नाहीं असें आतांपर्यंत सिद्ध केलें. परंतु एवढ्यावरून कोणीं कोणाला मारिलें तर त्यांत 'पाप' नाहीं असें जर कोणी अनुमान करील तर ती भयंकर चूक होय. मरणें किंवा मारणें या दोन शब्दांच्या अर्थांचें पृथक्करण असून, मरण्याची किंवा मारण्याची जी भीति वाटते ती प्रथम दूर करण्यापुरतेंच हें ज्ञान सांगितलें आहे. मनुष्य म्हणजे आत्मा व देह यांचा समुच्चय होय. पैकीं आत्मा अमर असल्यामुळें मरणें किंवा मारणें हे दोन्ही शब्द त्यास लागत नाहींत. बाकी राहिला देह, पण तोहि स्वभावतःच अनित्य असल्यामुळें

§§ स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकंपितुमर्हसि ।
धर्म्याद्धि युद्धाच्छ्रेयोऽन्यत्क्षत्रियस्य न विद्यते ॥ ३१ ॥

त्याचा नाश झाल्यास त्यांत शोक करण्यासारखें कांहीं नाहीं. परंतु यदृच्छेनें किंवा कालगतीनें कोणी मेला किंवा कोणाला कोणीं मारिलें म्हणून त्याचें सुखदुःख न मानितां शोक करण्याचें जरी सोडून दिलें, तरी लढाईसारखें घोर कर्म करण्यास मुद्दाम प्रवृत्त होऊन लोकांच्या देहाचा आपण कां नाश करावा, या प्रश्नानें त्याचा निकाल होत नाहीं. कारण, देह जरी अनित्य असला तरी आत्म्याचें कायमचें कल्याण किंवा मोक्ष संपादन करण्यास देह हेंच काय तें एक साधन असल्यामुळें आत्महत्या करणें, किंवा योग्य कारणाखेरीज दुसऱ्यास मारणें, हीं दोन्ही शास्त्रप्रमाणें घोर पातकेंच होत. म्हणून मेलेल्याचा शोक करणें जरी योग्य नाहीं तरी एकानें दुसऱ्याला कां मारावें याचें दुसरें कांहीं तरी सबळ कारण सांगणें जरूर आहे. यालाच धर्माधर्मविवेक हें नांव असून गीतेंतील खरा प्रतिपाद्य विषयहि तोच आहे. यासाठीं आतां प्रथम सांख्यमार्गासहि संमत असलेल्या चातुर्वर्ण्यव्यवस्थेप्रमाणें लढाई करणें हें क्षत्रियाचें कर्तव्य असल्यामुळें मेल्याचा किंवा मारल्याचा तूं शोक करूं नको इतकेंच नव्हे, तर लढाईत मरणें किंवा मारणें या दोन्ही गोष्टी क्षात्रधर्माप्रमाणें तुला प्राप्तच आहेत असें भगवान् सांगतात— ]

(३१) शिवाय स्वधर्माकडे पाहिलें तरीहि ( या वेळीं ) कचरणें तुला योग्य नाहीं. कारण, धर्मोचित युद्धापेक्षां क्षत्रियाला श्रेयस्कर असें दुसरें कांहीं नाहीं.

[ स्वधर्माची ही उपपत्ति पुढेंहि दोनदां (गी. ३. ३५ व १८. ४७) आली आहे. संन्यास किंवा सांख्य मार्गाप्रमाणें कर्मसंन्यासरूपी चतुर्थाश्रम ही जरी शेवटची पायरी असली तरी तत्पूर्वी ब्राह्मणानें ब्राह्मणधर्म व क्षत्रियानें क्षत्रियधर्म चातुर्वर्ण्यव्यवस्थेप्रमाणें पाळून गृहस्थाश्रम पुरा

यदृच्छया चोपपन्नं स्वर्गद्वारमपावृतम् ।
सुखिनः क्षत्रियाः पार्थ लभन्ते युद्धमीदृशम् ॥ ३२ ॥
अथ चेत्त्वमिमं धर्म्यं संग्रामं न करिष्यसि ।
ततः स्वधर्मं कीर्तिं च हित्वा पापमवाप्स्यसि ॥ ३३ ॥
अकीर्तिं चापि भूतानि कथयिष्यन्ति तेऽव्ययाम् ।
संभावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते ॥ ३४ ॥

केला पाहिजे असें मन्वादि सर्व स्मृतिकारांचें सांगणें असल्यामुळें, गृहस्थाश्रमी अर्जुनास युद्ध करणें भाग आहे असें या व पुढील श्लोकाचें तात्पर्य आहे. ]

(३२) आणि सहजगत्या उघडें सांपडलेलें स्वर्गाचें द्वारच असें जें हें युद्ध तें जे क्षत्रिय भाग्यवान् त्यांसच हे पार्था! प्राप्त होत असते. (३३) म्हणून (तुझ्या) धर्माला अनुकूल असें हें युद्ध जर तूं करणार नाहींस, तर स्वधर्म आणि कीर्ति गमावून पापाची जोड करशील; (३४) इतकेंच नव्हे तर (सर्व) तुझी अक्षय दुष्कीर्ति गात रहातील! आणि दुष्कीर्ति म्हटली म्हणजे संभावित पुरुषाला मरणापेक्षांहि मरण होय.

[ हेंच तत्त्व श्रीकृष्णांनीं उद्योगपर्वांत युधिष्ठिरासहि सांगितलें आहे (म. भा. उ. ७२. २४). "कुलीनस्य च या निंदा वधो वाऽमित्रकर्षण। महागुणो वधो राजन् न तु निंदा कुजीविका ॥" असा तेथें श्लोक आहे. पण त्यापेक्षां गीतेंत हा अर्थ थोडक्यांत सांगितला असल्यामुळें व गीता ग्रंथहि अधिक प्रचारांत असल्यामुळें, "संभावितस्य०" इ० गीतेंतलें वाक्य लोकांच्या तोंडीं बसून म्हणीसारखा त्याचा ते उपयोग करीत असतात. गीतेंतलें दुसरेहि पुष्कळ श्लोक याचप्रमाणें सर्वतोमुखीं झालेले आहेत. असो. प्रकृत स्थलीं दुष्कीर्तीचें स्वरूप काय तें सांगतात— ]

भयाद्रणादुपरतं मंस्यन्ते त्वां महारथाः ।
येषां च त्वं बहुमतो भूत्वा यास्यसि लाघवम् ॥ ३५ ॥
अवाच्यवादांश्च बहून्वदिष्यन्ति तवाहिताः ।
निंदन्तस्तव सामर्थ्यं ततो दुःखतरं नु किम् ॥ ३६ ॥
हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम् ।
तस्मादुत्तिष्ठ कौंतेय युद्धाय कृतनिश्चयः ॥ ३७ ॥
सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ ।
ततो युद्धाय युज्यस्व नैवं पापमवाप्स्यसि ॥ ३८ ॥

(३५) रणांतून तूं भयानें परतलास असें (सर्व) महारथी समजतील, आणि ज्यांना तूं (आज) बहुमान्य झालेला आहेस तेच तुझी किंमत कमी समजूं लागतील. (३६) तसेंच तुझ्या सामर्थ्याची निंदा करून (तुझ्याबद्दल) बोलूं नयेत अशा अनेक गोष्टी तुझे शत्रु बोलतील. यापेक्षां अधिक दुःखकारक तें काय ? (३७) मेलास तर स्वर्गास जाशील, आणि जिंकलेंस तर पृथ्वी भोगशील ! म्हणून हे अर्जुना ! युद्धाचा निश्चय करून ऊठ !

[ सांख्यज्ञानाप्रमाणें मारल्याचा किंवा मेल्याचा शोक करूं नये, इतकेंच नव्हे, तर स्वधर्माप्रमाणें युद्ध करणें हें कर्तव्य होय असें जरी वरील विवेचनानें सिद्ध झालें, तरी लढाईंत जी हत्या होणार तिचें 'पाप' कर्त्यास लागतें कीं नाहीं, या शंकेचें आतां उत्तर सांगतात. वस्तुतः पहातां या उत्तरांतील युक्तिवाद कर्मयोगमार्गांतला असून, त्या मार्गाची येथेंच प्रस्तावना झाली आहे. ]

(३८) सुखदुःख, नफानुकसान आणि जयापजय सारखे मानून नंतर लढायला लाग. असें केलें म्हणजे तुला (कोणतेंच) पाप लागणार नाहीं.

[ जगांत आयुष्यक्रमणाचे मार्ग दोन; एक सांख्य आणि दुसरा योग. पैकीं ज्या सांख्य किंवा संन्यास मार्गाचा आचार लक्षांत आणून

§§ एषा तेऽभिहिता सांख्ये बुद्धिर्योगे त्विमां शृणु ।
बुद्ध्या युक्तो यया पार्थ कर्मबंधं प्रहास्यसि ॥ ३९ ॥

[ अर्जुन लढाई सोडून भिक्षा मागण्यास तयार झाला होता त्या संन्यासमार्गातील तत्त्वज्ञानाप्रमाणें आत्म्याचा किंवा देहाचा शोक करणें उचित नाहीं. सुखदुःखें समबुद्धीनें सोसलीं पाहिजेत आणि स्वधर्माकडे लक्ष देऊन क्षत्रियानें युद्ध करणेंच योग्य व हें युद्ध समबुद्धीनें केलें असतां कोणतेंहि पाप लागत नाहीं, असें भगवंतांनीं अर्जुनास सिद्ध करून दाखविलें. तथापि केव्हां ही झालें तरी संसार सोडून संन्यास घेणें हेंच प्रत्येकाचें या जगांत परम कर्तव्य असें या मार्गाचें मत असल्यामुळें, इष्ट वाटल्यास आतांच युद्ध सोडून संन्यास कां घेऊं नये, किंवा स्वधर्म तरी कां पाळवा, इ० शंकांचें सांख्यज्ञानानें निवारण होत नाहीं; व त्यामुळें अर्जुनाचा मूळ आक्षेप कायम रहातो, असें म्हटलें तरी चालेल. म्हणून भगवान् आतां असें सांगतात कीं— ]

( ३९ ) सांख्य म्हणजे संन्यासनिष्ठेप्रमाणें तुला ही बुद्धि म्हणजे ज्ञान किंवा उपपत्ति सांगितली. आतां ज्या बुद्धीनें युक्त झालास म्हणजे ( कर्मे न सोडितांहि ) हे पार्था ! तूं कर्मबंध सोडशील अशी ही ( कर्म- ) योगांतील बुद्धि म्हणजे ज्ञान ( तुला सांगतों ) ऐक.

[ भगवद्गीतेचें रहस्य समजण्यास हा श्लोक अत्यंत महत्त्वाचा आहे. सांख्य शब्दानें कापिल सांख्य किंवा नुसता वेदान्त, व योग शब्दानें पातंजल योग, हे अर्थ या ठिकाणी उद्दिष्ट नसून सांख्य म्ह० संन्यासमार्ग आणि योग म्ह० कर्ममार्ग हेच अर्थ या ठिकाणीं घेतलें पाहिजेत; असें गीता ३.३ या श्लोकावरून उघड होतें. हे दोन्ही मार्ग स्वतंत्र असून त्यांच्या अनुयायांसहि अनुक्रमें 'सांख्य'=संन्यासमार्गी, आणि 'योग'=कर्मयोग. मार्गी असें म्हणतात ( गी. ५.५ ) पैकीं सांख्यनिष्ठेंतील लोक केव्हांना केव्हां तरी अखेर कर्मे अजीबात सोडून देणेंच श्रेष्ठ मानीत असल्यामुळें

§§ नेहाभिक्रमनाशोऽस्ति प्रत्यवायो न विद्यते ।
स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात् ॥ ४० ॥
§§ व्यवसायात्मिका बुद्धिरेकेह कुरुनंदन ।
बहुशाखा ह्यनंताश्च बुद्धयोऽव्यवसायिनाम् ॥ ४१ ॥

"युद्ध कां करूं" या अर्जुनाच्या शंकेचें पुरें समाधान या मार्गातील तत्त्वज्ञानानें होत नाहीं. म्हणून संन्यास न घेतां ज्ञानप्राप्तिनंतरहि निष्काम बुद्धीनें सदैव कर्म करीत रहाणें हाच प्रत्येकाचा खरा पुरुषार्थ असें ज्या कर्मयोगनिष्ठेचें मत आहे त्या कर्मयोगांतील किंवा संक्षेपानें योगमार्गांतील ज्ञान सांगण्यास आतां सुरुवात करून, गीतेतील शेवटच्या अध्यायापर्यंत अनेक कारणें दाखवून व अनेक शंकांचें निवारण करून या मार्गाचेंच पुष्टीकरण केलेलें आहे. गीतेतील विषयनिरूपणाची खुद्द भगवंतांनीं केलेली ही फोड लक्षांत ठेविली म्हणजे गीतेंत कर्मयोगच प्रतिपाद्य आहे याबद्दल शंका रहात नाहीं. कर्मयोगाच्या मुख्य मुख्य सिद्धान्तांचा प्रथम निर्देश करितात– ]

(४०) येथें म्ह० या कर्मयोगमार्गांत (एकदां) आरंभिलेल्या कर्माचा नाश होत नाहीं व (पुढें) विघ्नहि येत नाहीं. या धर्माचें थोडेंहि (आचरण मोठ्या भयापासून संरक्षण करितें.

[ या सिद्धान्ताचें महत्त्व गीतारहस्याच्या दहाव्या प्रकरणांत (पृ. २८१) दाखविलें असून जास्त खुलासा पुढें गीतेंतहि केलेला आहे (गी. ६.४०–४६). कर्म-योगमार्गांत एका जन्मांत सिद्धि मिळाली नाहीं तरी केलेलें कर्म फुकट न जातां पुढील जन्मांत तें उपयोगी पडतें, आणि जन्मोजन्म अशी भर पडत जाऊन अखेर केव्हांना केव्हां तरी खरी सद्गति मिळते असा याचा अर्थ आहे. कर्मयोगांतील महत्त्वाचा दुसरा सिद्धान्त आतां सांगतात–]

(४१) हे कुरुनंदना ! व्यवसाय म्हणजे कार्याकार्याचा निश्चय कर-

§§ यामिमां पुष्पितां वाचं प्रवदन्त्यविपश्चितः

णारी ( इंद्रियरूपी ) बुद्धि या मार्गांत एक म्ह० एकाग्र असावी लागत्ये. कारण ज्यांच्या बुद्धीचा ( अशा प्रकारें एक ) निश्चय होत नाहीं त्यांच्या बुद्धि म्ह० वासना अनेक फांटे फुटलेल्या व अनंत ( प्रकारच्या ) असतात.

[ बुद्धि या शब्दाचे संस्कृतांत अनेक अर्थ आहेत. पैकीं 'ज्ञान' या अर्थानें हा शब्द ३९ व्या श्लोकांत आला आहे, व पुढें ४९ व्या श्लोकांत बुद्धि या शब्दाचाच " समजूत, इच्छा, वासना, किंवा हेतु " असा अर्थ आहे. परंतु बुद्धि या शब्दामागें 'व्यवसायात्मिका' हें विशेषण असल्यानें व्यवसाय म्ह० कार्याकार्यांचा निश्चय करणारें बुद्धींद्रिय असा या श्लोकाच्या पूर्वार्धांत बुद्धि या शब्दाचा अर्थ होतो ( गीतार. प्र. ६ पृ. १३१–१३७ पहा ). कोणत्याहि गोष्टीचा या बुद्धींद्रियानें प्रथम बरावाईट विचार केल्यावर मग त्याप्रमाणें कर्म करण्याची इच्छा किंवा वासना मनांत होत असत्ये; म्हणून या इच्छेस किंवा वासनेसहि बुद्धि हेंच नांव देतात. पण तेव्हां 'व्यवसायात्मिका' हें विशेषण मागें लावीत नाहींत. भेद दाखविणें जरूरच असेल तर 'वासनात्मक' बुद्धि असें म्हणतात. या श्लोकाच्या दुसऱ्या चरणांत 'बुद्धि' असा नुस्ताच शब्द आहे. मागें व्यवसायात्मक हें विशेषण नाहीं. म्हणून 'बुद्धयः' या अनेकवचनानें " वासना, कल्पनातरंग " असा अर्थ होऊन " ज्यांची व्यवसायात्मक बुद्धि म्हणजे निश्चय करणारें बुद्धींद्रिय स्थिर नाहीं त्यांच्या मनांत क्षणोक्षणीं नवे तरंग किंवा वासना उत्पन्न होत असतात," असा एकंदर श्लोकाचा अर्थ होतो. बुद्धि या शब्दाचे 'निश्चय करणारें इंद्रिय' व 'वासना' हे दोन्ही अर्थ लक्षांत ठेविल्याखेरीज कर्मयोगांतील बुद्धीच्या विवेचनाचें मर्म नीट समजावयाचें नाहीं. व्यवसायात्मक बुद्धि स्थिर किंवा एकाग्र नसला म्हणजे दररोज निरनिराळ्या वासनांनीं मन व्यग्र होऊन आज पुत्रप्राप्तीसाठीं अमुक कर्म कर, तर उद्यां स्वर्गप्राप्तीसाठीं अमुक कर्म कर, अशा नादांत मनुष्य कसा पडतो याचें आतां वर्णन करितात—]

वेदवादरताः पार्थ नान्यदस्तीति वादिनः ॥ ४२ ॥
कामात्मानः स्वर्गपरा जन्मकर्मफलप्रदाम् ।
क्रियाविशेषबहुलां भोगैश्वर्यगतिं प्रति ॥ ४३ ॥
भोगैश्वर्यप्रसक्तानां तयापहृतचेतसाम् ।
व्यवसायात्मिका बुद्धिः समाधौ न विधीयते ॥ ४४ ॥

(४२) हे पार्था! (कर्मकांडात्मक) वेदांतील (फलश्रुतीच्या) वाक्यांना भुललेले व त्याखेरीज दुसरें कांहीं नाहीं असें म्हणणारे मूढ (जे) लोक फुलवून असें भाषण करितात कीं- (४३) "अनेक प्रकारच्या (यज्ञयागादि) कर्मांनींच (पुनः) जन्म होणें हें फल मिळून (जन्मोजन्मीं) भोग व ऐश्वर्य प्राप्त होतें,"-ते स्वर्गाच्या पाठीस लागलेले काम्य बुद्धीचे (लोक), (४४) वरील भाषणाकडेच त्यांचें मन ओढलें जाऊन, भोग व ऐश्वर्य यांत गढून जातात, व त्यामुळें त्यांची व्यवसायात्मक ह्मणजे कार्याकार्याचा निश्चय करणारी बुद्धि (कधींच) समाधिस्थ ह्मणजे एका ठिकाणीं स्थिर होऊं शकत नाहीं.

[वरील तिन्ही श्लोक मिळून एकच वाक्य असून त्यांत श्रौतस्मार्त कर्मकांडाप्रमाणें आज अमुक हेतु सिद्ध होण्यास तर उद्यां दुसऱ्या कोणत्या तरी हेतूनें नेहमीं स्वार्थासाठींच यज्ञयागादि कर्में करण्यांत गुंग झालेल्या ज्ञानविरहित कर्मठ मीमांसामार्गीयांचें वर्णन असून तें उपनिषदाच्या आधारें केलेलें आहे. उदाहरणार्थ, मुंडकोपनिषदांत—

इष्टापूर्तं मन्यमाना वरिष्ठं नान्यच्छ्रेयो वेदयन्ते प्रमूढाः ।
नाकस्य पृष्ठे ते सुकृतेऽनुभूत्वेमं लोकं हीनतरं वा विशन्ति ॥

"इष्टापूर्तच काय तें श्रेष्ठ, दुसरें कांहीं श्रेष्ठ नाहीं, असें मानणारे हे मूढ लोक स्वर्गामध्यें पुण्याचा उपभोग घेतल्यावर पुनः खालच्या या मनुष्यलोकीं येतात" (मुंड. १. २. १०)—असें ह्मटलें असून, त्याच मासल्याची ज्ञानविरहित कर्माची निंदा ईशावास्य व कठ या उपनिष-

§§ त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन ।
निर्द्वंद्वो नित्यसत्त्वस्थो निर्योगक्षेम आत्मवान् ॥ ४५ ॥

दांतूनहि केलेली आहे ( कठ. २. ५; ईश. ९, १२ ). परमेश्वराचें ज्ञान प्राप्त करून न घेतां केवळ कर्मांत गढून गेलेल्या या लोकांस ( गी. ९. २१ पहा ) त्यांच्या त्यांच्या कर्मांचीं स्वर्गादि फलें मिळतात खरीं; पण त्यांची वासना आज या तर उद्यां त्या कर्मांत रत होऊन सैरावैरा चोहोंकडे धांवत असल्यामुळें, त्यांना स्वर्गाच्या येरझाऱ्या घडल्या तरी मोक्ष मिळत नाहीं. मोक्ष मिळण्यास बुद्धींद्रिय स्थिर किंवा एकाग्र असलें पाहिजे. ते एकाग्र कसें करावें याचा विचार पुढें सहाव्या अध्यायांत केलेला आहे. सध्यां तें एवढेंच सांगतात कीं ]

( ४५ ) हे अर्जुना ! ( कर्मकांडात्मक ) वेद ( अशा रीतीनें ) त्रैगुण्याच्या गोष्टींनीं भरलेलें असल्यामुळें तूं निस्त्रैगुण्य ह्मणजे त्रिगुणातीत, नित्यसत्त्वस्थ, सुखदुःखादि द्वंद्वांपासून अलिप्त, आणि योगक्षेमादि स्वार्थांत न गढतां आत्मनिष्ठ हो !

[ त्रैगुण्य म्हणजे सत्त्व, रज व तम या तीन गुणांच्या प्रकृतीचा संसार असा अर्थ असून, हा संसार सुखदुःखादि किंवा जन्ममरणादि विनाशी द्वंद्वांनीं भरलेला आहे व खरें ब्रह्म त्यापलीकडे आहे हें गीतारहस्यांत ( पृ. २२६ व २५३ ) स्पष्ट करून दाखविलें आहे. प्रकृतीच्या म्हणजे मायेच्या या संसारांतील सुखें प्राप्त होण्यासाठीं मीमांसकमार्गांतील लोक श्रौत यज्ञयागादि करीत असतात, व त्यांतच ते गढून गेलेले असतात, असें या अध्यायांतच त्रेचाळीसाव्या श्लोकांत सांगितलेलें आहे. कोणी पुत्रप्राप्ती व्हावी म्हणून अमुक याग करितो, तर कोणी पाऊस पडावा म्हणून दुसरी इष्टि करितो. हीं सर्व कर्मे इहलोकीं संसार चालण्यासाठीं म्हणजे योगक्षेम चालण्यासाठीं आहेत. म्हणून ज्याला मोक्ष मिळवावयाचा आहे त्यानें वैदिक कर्मकांडांतील हीं त्रिगुणात्मक व फक्त

यावानर्थ उदपाने सर्वतः संप्लुतोदके ।

योगक्षेम संपादन करणारीं कर्में सोडून देऊन आपलें चित्त यापलीकडल्या परब्रह्माकडे लाविलें पाहिजे हें उघड आहे; आणि याच अर्थी निर्द्वंद्व व निर्योगक्षेम हे शब्द वर आले आहेत. वैदिक कर्मकांडांतील हीं काम्य कर्में सोडिलीं तर योगक्षेम कसा चालेल अशी या ठिकाणीं शंका येण्यासारखी आहे ( गी र. पृ. २९० व ३८२ पहा ). पण त्याचें उत्तर येथें न देतां हा विषय पुढें पुनः नवव्या अध्यायांत आला आहे तेथें हा योगक्षेम भगवान् चालवितात असें म्हटलें आहे; व या दोनच ठिकाणीं गीतेंत 'योगक्षेम' हा शब्द आलेला आहे ( गी. ९. २२ व त्यावरील आमची टीप पहा ). नित्यसत्त्वस्थ या पदाचाच अर्थ त्रिगुणातीत असा होतो. कारण सत्त्वगुणाच्या नित्योत्कर्षानेंच पुढें त्रिगुणातीतावस्था प्राप्त होत असून तीच खरी सिद्धावस्था होय असें पुढें सांगितलें आहे ( गी. १४. १४ व २०, गी. र. पृ. १६४ व १६५ पहा ). तात्पर्य, मीमांसकांचीं योगक्षेमकारक त्रिगुणात्मक काम्य कर्में सोडून देऊन व सुखदुःखाच्या द्वंद्वांतून पार पडून ब्रह्मनिष्ठ किंवा आत्मनिष्ठ होण्याबद्दल येथें उपदेश केला आहे. पण आत्मनिष्ठ हो म्हणजे हीं सर्व कर्में स्वरूपतः अजीबात सोडून दे असाहि अर्थ समजावयाचा नाहीं, हेंहि पुनः लक्षांत ठेविलें पाहिजे. वरील श्लोकांत वैदिक काम्य कर्मांची जी निंदा केली आहे किंवा कमीपणा दाखविला आहे तो कर्मांचा नव्हे तर त्यांतील काम्य बुद्धीचा आहे ही काम्य बुद्धि मनांत नसेल तर नुस्ते यज्ञयाग कोणत्याहि प्रकारें मोक्षास प्रतिबंधक होत नाहींत. ( गी. र. पृ. २८९–२९२ ). म्हणून मीमांसकांचीं हींच यज्ञयागादि कर्में फलाशा व संग सोडून चित्तशुद्ध्यर्थ व लोकसंग्रहार्थ अवश्य केली पाहिजेत असें भगवंतांनीं आपलें निश्चित व उत्तम मत पुढें अठराव्या अध्यायाच्या आरंभीं सांगितलें आहे ( गी. १८, ६ ). गीतेंतलि दोन ठिकाणचीं हीं विधानें

तावान्सर्वेषु वेदेषु ब्राह्मणस्य विजानतः ॥ ४६ ॥

एकत्र केलीं म्हणजे या अध्यायातील श्लोकांत मीमांसकांच्या कर्मकांडाचा जो कमीपणा दाखविला आहे तो त्यांतील काम्य बुद्धीला उद्देशून आहे. नुसत्या क्रियेला नव्हे, हें उघड होतें हाच अभिप्राय मनांत आणून भागवतांतहि—

वेदोक्तमेव कुर्वाणो निःसंगोऽर्पितमीश्वरे ।
नैष्कर्म्यां लभते सिद्धिं रोचनार्था फलश्रुतिः ॥

"वेदोक्त कर्मांची वेदांत जी फलश्रुति सांगितली आहे ती रोचनार्थ म्हणजे सदर कर्मं करण्यांस गोड वाटावीं एवढ्याचकरितां आहे. म्हणून हीं कर्में त्या फळासाठीं करीत न बसतां निःसंग बुद्धीनें म्हणजे फलाशा सोडून ईश्वरार्पण-बुद्धीनें करणाऱ्या पुरुषास नैष्कर्म्यानें मिळणारी सिद्धि प्राप्त होत्ये,"—असें म्हटलें आहे ( भाग. ११. ३. ४६ ). सारांश, वेदांत अमुक अमुक करण्यासाठीं यज्ञ करावे असें जरी सांगितलें तरी त्याला न भुलतां केवळ यष्टव्य म्हणजे यज्ञ आपल्याला कर्तव्य आहे म्हणून हे यज्ञ करावे, काम्य बुद्धी सोडावी, यज्ञ सोडूं नये ( गी. १७. ११ ), व त्याचप्रमाणें इतर कर्मेंहि करावीं, हें गीतेच्या उपदेशाचें सारें आहे; व तोच अर्थ पुढील श्लोकांतून व्यक्त केला आहे. ]

(४६) चोहोंकडे पाण्याचा पूरच पूर झाला असतां विहिरीचा जितका अर्थ किंवा प्रयोजन रहातें (अर्थात् कांहींच काम रहात नाहीं), तितकेंच, ज्ञान प्राप्त झालेल्या ब्राह्मणाला सर्व ( कर्मकांडात्मक ) वेदांचें प्रयोजन असतें (म्हणजे नुसत्या काम्यकर्मरूपी वैदिक कर्मकांडाची त्याला अपेक्षा रहात नाहीं.)

[ या श्लोकाच्या फलितार्थाबद्दल मतभेद नाहीं. पण त्यांतील शब्दांची टीकाकारांनीं फुकट ओढताण केलेली आहे. 'सर्वतःसंप्लुतोदके' हें सप्तम्यन्त सामासिक पद आहे. पण तें नुसती सप्तमी किंवा उदपा-

§§ कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन।

नाचें विशेषणहि व समजतां सति सप्तमि मानिली ह्मणजे "सर्वतः-संप्लुतोदके सति उदपाने यावानार्थः (न स्वल्पमपि प्रयोजनं विद्यते) तावान् विजानतः ब्राह्मणस्य सर्वेषु वेदेषु अर्थः" असा कोणतेंहि बाहेरचें पद अध्याहृत न घेतां सरळ अन्वय लागून, त्याचा अर्थहि सरळ असा होतो कीं, "चोहोंकडे पाणीच पाणी होऊन (कोठेंही अनायासें पिण्यास मुबलक पाणी मिळूं लागल्यावर) ज्याप्रमाणें विहिरीला कोणीच विचारीत नाहीं, त्याप्रमाणें ज्ञान प्राप्त झालेल्या पुरुषास यज्ञयागादि नुसत्या वैदिक कर्मांचा कांहींच उपयोग नसतो" कारण वैदिक कर्म केवळ स्वर्ग-प्राप्तीसाठीं नव्हे, तर अखेर मोक्षसाधक ज्ञानप्राप्ति होण्यासाठीं करावयाचें असतें; आणि ही ज्ञानप्राप्ति या पुरुषास आधींच झाली असल्यामुळें त्याला वैदिक कर्म करून नवें कांहीं मिळवावयाचें शिल्लक राहिलेलें नसतें. याच हेतूनें "जो ज्ञानी झाला त्याला या जगांत कर्तव्य उरलेलें नसतें;" असें पुढें तिसऱ्या अध्यायांत (३. १७) म्हटलें आहे. मोठ्या तलावावर किंवा नदीवर अनायासें हवें तेवढें निर्मल उदक पिण्याची सोय असतां विहिरीकडे कोण ढुंकून पहाणार ? अशा प्रसंगीं कोणीहि विहिरीची अपेक्षा ठेवीत नाहीं. सनत्सुजातीयांतील अखेरच्या अध्यायांत (म. भा. उद्यो. ४.५. २६) हाच श्लोक थोड्या शब्दभेदानें आला असून त्यावरील माधवाचार्यांच्या टीकेंत त्याचा अर्थ आम्हीं वर दिल्याप्रमाणेंच केला आहे; आणि शुकानुप्रश्नांत ज्ञान व कर्म यांचें तारतम्यविवेचन चालू असतां "न ते (ज्ञानिनः) कर्म प्रशंसंति कूपं नद्यां पिबन्निव"-नदीवर ज्यास पाणी मिळतें तो विहिरीची ज्याप्रमाणें प्रतिष्ठा ठेवीत नाहीं, त्याप्रमाणें 'ते' म्हणजे ज्ञानी पुरुष कर्मांची मातब्बरी ठेवीत नाहींत-असें साफ म्हटलें आहे (म. भा. शां. २४०.१०). तसेंच पांडवगीतेंतील सतराव्या श्लोकांत वासुदेवाला सोडून जो दुसऱ्या देवाची उपासना करितो तो-"तृषितो जाह्नवीतीरे कूपं वांच्छति दुर्मतिः"-

मा कर्मफलहेतुर्भूर्मा ते संगोऽस्त्वकर्मणि ॥ ४७ ॥

भागीरथीच्या तीरीं पाणी पिण्यास मिळत असतां विहिरीची इच्छा करणाऱ्या तान्हेल्या पुरुषाप्रमाणें मूर्ख होय.–असा विहिरीचा दृष्टान्त आहे. केवळ वैदिक संस्कृत ग्रंथांतच हा दृष्टान्त येतो असें नाहीं; पाली बौद्ध ग्रंथांतहि तो घेतलेला आहे. ज्या पुरुषानें आपली तृष्णा समूळ नाहींशीं केली त्यास पुढें कांहीं मिळावयाचें रहात नाहीं हा सिद्धान्त बौद्ध धर्मासहि मान्य आहे, व तो सांगतांना त्याला दृष्टान्त म्हणून उदान नांवाच्या पाली ग्रंथांत (७. ९.) "किं कयिरा उदपादेन आपा चे सब्बदा सियुम्"–पाणी सर्वदा मिळेसें झाल्यावर विहिरीला घेऊन काय करावयाचें–असा श्लोक आला आहे. घरांत पाण्याची नळी घेतली म्हणजे विहिरीची कोणी परवा ठेवीत नाहीं असें मोठमोठ्या शहरांतून सध्यांहि अनुभवास येतें. यावरून व विशेषतः शुकानुप्रश्नांतील विवेचनावरून गीतेंतील दृष्टान्ताचें स्वारस्य कळून येऊन, आम्हीं या श्लोकाचा जो अर्थ वर केला आहे तोच सरळ व ठीक आहे असें दिसून येईल. परंतु या अर्थानें वेदांना किंचित् गौणत्व येतें म्हणून म्हणा, किंवा ज्ञानांतच सर्व कर्मांचा समावेश होत असल्यामुळें ज्ञान्यानें कर्में करण्याची जरूरी नाहीं या सांप्रदायिक सिद्धान्ताकडे दृष्टि देऊन म्हणा, गीतेवरील टीकाकार या श्लोकांतील पदांचा अन्वय थोड्या निराळ्या तऱ्हेनें लावीत असतात; व श्लोकाच्या पहिल्या चरणांत 'तावान्' व दुसऱ्या चरणांत 'यावान्' हें पद अध्याहृत घेऊन " उदपानें 'यावान्' हें पद अध्याहृत घेऊन "उदपाने यावानार्थः तावानेव सर्वतः संप्लुतोदके यथा संपद्यते तथा यावान्सर्वेषु वेदेषु अर्थः तावान् विजानतः ब्राह्मणस्य संपद्यते"–म्हणजे विहीरीचा स्नानपानादि कर्मासाठीं जितका उपयोग होतो तितकाच मोठ्या तळयांत (सर्वतःसंप्लुतोदके) देखील होऊं

(४७) कर्म करण्यापुरताच तुझा अधिकार आहे; फल (मिळणें किंवा न मिळणें हें) केव्हांही तुझ्या अधिकारांतलें म्ह० ताब्यांतलें नाहीं;

§§ योगस्थः कुरु कर्माणि संगं त्यक्त्वा धनंजय ।

शकतो. तद्वत् वेदांचा जितका म्हणून उपयोग आहे तितका सर्व ज्ञानी पुरुषास त्याच्या ज्ञानानें होऊं शकतो–असा अर्थ घेतात. पण या अन्वयांत पहिल्या श्लोकपंक्तीत 'तावान्' व दुसऱ्या पंक्तींत 'यावान्' अशीं दोन पदें अध्याहृत घ्यावीं लागत असल्यामुळें आम्हीं हा अन्वय व अर्थ स्वीकारिला नाहीं. आमचा अन्वय व अर्थ कोणतेंहि पद अध्याहृत घेतल्यावांचून लागत असून त्यांत प्रतिपाद्य असलेलें वेदांच्या नुसत्या ( म्हणजे ज्ञानव्यतिरिक्त ) कर्मकांडाचें गौणत्वच या ठिकाणीं विवक्षित आहे, असें पूर्वींच्या श्लोकांवरून सिद्ध होतें. परंतु ज्ञानी पुरुषास यज्ञयागादि कर्मांची अपेक्षा नसत्ये, असें म्हटल्यानें ज्ञानी पुरुषानें हीं कर्में करूं नयेत, अजीबात सोडून द्यावीं असें यावरून कित्येक लोक जें अनुमान काढीत असतात तें मात्र गीतेस संमत नाहीं. कारण, या कर्मांचें फल जरी ज्ञानी पुरुषास नको असलें तरी फलासाठीं म्हणून नव्हे, तर यज्ञयागादिक कर्में हें आपलें शास्त्रविहित कर्तव्य आहे या दृष्टीनें, कर्म त्याला कधींच सोडितां येत नाहीं. फलाशा नसली तरी इतर निष्काम कर्मांप्रमाणें यज्ञयागादि कर्में सुद्धां निःसंगबुद्धीनें ज्ञान्यानें केलीच पाहिजेत असें अठराव्या अध्यायांत भगवंतांनीं आपलें निश्चित मत स्पष्ट सांगितलें आहे ( मागील श्लोकावरील व गी. ६.१९ वरील आमची टीका पहा ); आणि हाच निष्कामपर अर्थ आतां पुढील श्लोकांत व्यक्त करून दाखवितात–– ]

( म्हणून माझ्या कर्मांचें ) अमुक फल मिळावें असा ( हावरेपणाचा हेतु ( मनांत ) ठेवून काम करणारा होऊं नको; आणि कर्में न करण्याचाहि तूं आग्रह धरूं नको.

[ या श्लोकाचे चार चरण एकमेकांच्या अर्थाचे पूरक असुन त्यामुळें अतिव्याप्ति न होता कर्मयोगाचें सर्व रहस्य थोडक्यात सुंदर रीतीनें देतां आलें आहे. किंबहुना हे चार चरण म्हणजे कर्मयोगाची

सिद्ध्यसिद्ध्योः समो भूत्वा समत्वं योग उच्यते ॥ ४८ ॥

चतुःसूत्रीच होय असें ह्मणण्यास हरकत नाहीं. " कर्म करण्याचाच तुझा फक्त अधिकार आहे " असें प्रथम सांगितलें. पण कर्माचें फल कर्माला लागूनच असल्यामुळें 'ज्याचें झाड त्याचें फल या न्यायानें जो कर्म करण्यास अधिकारी तोच फलाचाहि अधिकारी झाला अशी शंका येत्ये. ह्मणून ती दूर करण्यासाठीं " फलाचे ठायीं तुझा अधिकार नाहीं " असें दुसऱ्या चरणांत स्पष्ट विधान करून, नंतर " फलाशा मनांत ठेवून कर्म करणारा होऊं नको " असा त्यावरून निष्पन्न होणारा तिसरा सिद्धान्त सांगितला आहे. ( कर्मफलहेतुः कर्मफले हेतुर्यस्य स कर्मफलहेतुः, असा बहुव्रीहि समास होतो ), पण कर्म व त्याचें फल हीं संलग्न असल्यामुळें फलाशेबरोबरच फलहि सोडिलेंच पाहिजे असा सिद्धान्त कोणी प्रतिपादन करूं लागेल, तर तोहि खरा नाहीं हें सांगण्यासाठीं फलाशा सोड पण त्याबरोबर " कर्म न करण्याचा ह्मणजे सोडण्याचा आग्रह धरूं नको " असा शेवटीं स्पष्ट उपदेश केला आहे. सारांश, कर्म कर असें ह्मटल्यानें फलाशा धर असे होत नाहीं. व फलाशा सोड ह्मटल्यानें कर्म सोड असें होत नाहीं. ह्मणून फलाशा सोडून कर्तव्यकर्म जरूर केलें पाहिजे, कर्माची आसक्ति धरूं नये व कर्महि सोडूं नये—त्यागो न युक्त इह कर्मसु नापि रागः ( योग. ५. ५. ५४ )—असा या श्लोकाचा अर्थ आहे. आणि हाच अर्थ, फल मिळणें ही गोष्ट आपल्या ताब्यांत नसून दुसऱ्या पुष्कळ गोष्टींची त्यास अनुकूलता लागते असें दाखवून अठराव्या अध्यायांत पुनः दृढ केला आहे ( गी. १८. १४–१६ व रहस्य प्र. ५ पृ. ११४ व प्र १२ पहा). आतां यासच योग किंवा कर्मयोग ह्मणतात असें कर्मयोगाचें स्पष्ट लक्षण सांगतात–]

(४८) हे धनंजया ! आसक्ति सोडून व कर्म सिद्ध होवो किंवा निष्फळ होवो दोन्हीं सारखींच मानून, 'योगस्थ' होत्सातः कर्म कर; (कर्म सिद्ध होणें किंवा निष्फळ होणें यांचे ठिकाण असलेल्या ) सारखेपणाच्या

दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनंजय ।
बुद्धौ शरणमन्विच्छ कृपणाः फलहेतवः ॥ ४९ ॥
बुद्धियुक्तो जहातीह उभे सुकृतदुष्कृते ।
तस्माद्योगाय युज्यस्व योगः कर्मसु कौशलम् ॥५०॥

(मनो-)वृत्तीसच (कर्म-)योग म्हणतात. (४९) कारण बुद्धीच्या (सारखेपणाच्या) योगापेक्षां हे धनंजया! (बाह्य) कर्म फारच कनिष्ठ होय. (म्हणून या साम्य) बुद्धीला शरण जा. फलहेतुक म्हणजे फलाकडे नजर देउन काम करणारे लोक कृपण ह्मणजे दीन किंवा लालच्या पायरीचे होत. (५०) (साम्य) बुद्धीनें जो युक्त झाला तो पाप आणि पुण्य या दोहोंपासून या लोकीं अलिप्त रहातो, म्हणून योगाचा आश्रय कर. (पापपुण्य न लागतां) कर्मे करण्याची जी चतुराई (कौशल किंवा युक्ति) तिलाच (कर्म-)योग असें ह्मणतात.

[या श्लोकांतून कर्मयोगाचें जें लक्षण दिलें आहे तें महत्त्वाचें असून त्याबद्दल गीतारहस्याच्या तिसऱ्या प्रकरणांत (पृ. ५६–६४) जें विवेचन केलें आहे तें पहा. पण त्यांतले त्यांतहि 'कर्मापेक्षां बुद्धि श्रेष्ठ' असें ४९ व्या श्लोकांत कर्मयोगाचें जें तत्त्व सांगितलें आहे तें अत्यंत महत्त्वाचें होय 'बुद्धि' या शब्दामागें 'व्यवसायात्मिक' हें विशेषण नसल्यामुळें त्याचा अर्थ या श्लोकांत 'वासना' किंवा 'समजूत' असा घेतला पाहिजे बुद्धि ह्मणजे ज्ञान असा अर्थ करून ज्ञानापेक्षां कर्म हलक्या प्रतीचें असा या श्लोकाचा अर्थ कित्येक करूं पहातात; पण हा अर्थ खरा नव्हे. कारण, मागील ह्मणजे ४८ व्या श्लोकांत सांगितलेल्या समत्वाचेंच वर्णन ४९ व्या व पुढील श्लोकांतूनहि चालू असल्यामुळें बुद्धि ह्मणजे समत्वबुद्धि असाच या ठिकाणीं अर्थ केला पाहिजे. कोणत्याहि कर्माचा बरेवाईटपणा कर्मावर अवलंबून नसून कर्म एकच असलें तरी कर्त्याच्या बऱ्यावाईट बुद्धीप्रमाणें तें शुभ अगर अशुभ होत असतें;

§§ कर्मजं बुद्धियुक्ता हि फलं त्यक्त्वा मनीषिणीः ॥

ह्मणून कर्मापेक्षां बुद्धिच श्रेष्ठ होय; इत्यादि नीतितत्त्वांचा गीतारहस्याच्या चवथ्या, बाराव्या व पंधराव्या प्रकरणांत (पृ. ८८, ३७९, व ४७१–४७६ पहा) विचार केला असल्यामुळें, येथें अधिक चर्चा करीत नाहीं. वासनात्मक बुद्धि सम व शुद्ध रहाण्यास कार्याकार्याचा निर्णय करणारी व्यवसायात्मक बुद्धि प्रथम स्थिर झाली पाहिजे, हें वर ४१ व्या श्लोकांत सांगितलेंच आहे. ह्मणून 'साम्यबुद्धि' या शब्दानेंच स्थिर व्यवसायात्मक बुद्धि आणि शुद्ध वासना (वासनात्मक) या दोहोंचाहि बोध होतो; ही साम्य बुद्धिच शुद्ध आचरणाचें किंवा कर्मयोगाचें मूळ असल्यामुळें, ३९ व्या श्लोकांत कर्मे करूनहि कर्मांचा बाधा न लागणारी युक्ति किंवा योग तुला सांगतों असें जें भगवंतांनीं म्हटलें आहे, त्याला अनुसरून या श्लोकांत "कर्मे करितांना बुद्धि स्थिर, पवित्र, सम व शुद्ध ठेवणें" हीच ती 'युक्ति' किंवा 'कौशल' असून यासच 'योग' म्हणतात अशी योग शब्दाची द्विवार व्याख्या केली आहे. ५० व्या श्लोकांतील "योगः कर्मसु कौशलम्" या पदाचा याप्रमाणें सरळ अर्थ लागत असतां कित्येकांनीं "कर्मसु योगः कौशलम्"–कर्मांचे ठायीं जो योग त्याला कौशल म्हणतात–असा ओढाताणीनें अर्थ लावण्याचा प्रयत्न केलेला आहे. पण 'कौशल' शब्दाची व्याख्या देण्याचें येथें कांहीं कारण नसून 'योग' शब्दाचें लक्षण सांगणेंच प्रस्तुत असल्यामुळें हा अर्थ खरा मानितां येत नाहीं. शिवाय 'कर्मसु कौशलम्' असा सरळ अन्वय लागत असतां "कर्मसु योगः" अशी उलटापालट करणेंहि योग्य नव्हे. अशा रीतीनें साम्यबुद्धीनें सर्व कामें केली म्हणजे व्यवहाराचा लोप न होतां पूर्ण सिद्धि किंवा मोक्ष प्राप्त झाल्याखेरीज रहात नाहीं असें आतां सांगतात—]

जन्मबंधविनिर्मुक्ताः पदं गच्छन्त्यनामयम् ॥ ५१ ॥
यदा ते मोहकलिलं बुद्धिर्व्यतितरिष्यति ।
तदा गन्तासि निर्वेदं श्रोतव्यस्य श्रुतस्य च ॥ ५२ ॥
श्रुतिविप्रतिपन्ना ते यदा स्थास्यति निश्चला ।
समाधावचला बुद्धिस्तदा योगमवाप्स्यसि ॥ ५३ ॥

( ५१ ) ( समत्व ) बुद्धीनें ज्ञानी पुरुष युक्त झाले म्हणजे कर्मफलाचा त्याग केल्यानें ( ते ) जन्माच्या बंधनापासून मुक्त होत्साते (परमेश्वराच्या) दुःखविरहित पदाला जाऊन पोंचतात. (५२) जेव्हां तुझी बुद्धि मोहाच्या गढुळ आवरणांतून पार पडेल तेव्हां जें ऐकिलें असेल तें, आणि जें काय ऐकावयाचें असेल तें, या दोहोंचाहि तुला कंटाळा येईल.

[ म्हणजे जास्त कांहीं ऐकावयास नको असें वाटेल. कारण या गोष्टी ऐकण्यापासून जें काय फल मिळावयाचें तें, तुला आधींच प्राप्त झालेलें असेल. 'निर्वेद' हा शब्द प्रायः संसाराबद्दलच्या कंटाळ्यास किंवा वैराग्यास लावितात. या श्लोकांत त्याचा अर्थ सामान्यतः "कंटाळा" किंवा "नकोसें होणें" एवढाच विवक्षित आहे. हा कंटाळा विशेषेंकरून मागें सांगितलेल्या त्रैगुण्यविषयक श्रौतकर्माबद्दलचा आहे, असें पुढील श्लोकावरून दिसून येईल. ]

(५३) (नाना प्रकारच्या) वेदवाक्यांनीं गांगरून गेलेली तुझी बुद्धि जेव्हां समाधि वृत्तींत स्थिर व निश्चल होईल, तेव्हां ( हा साम्यबुद्धिरूप ) योग तुला प्राप्त होईल.

[ सारांश, पूर्वीं २. ४४ यांत सांगितल्याप्रमाणें वेदवाक्यांतील फलश्रुतीला भुलून जाऊन अमक्यासाठीं म्हणून अमुक कर्म कर अशा प्रकारच्या खटाटोपांत पडल्यानें बुद्धि स्थिर न होतां ती अधिक गांगरून जात्ये. म्हणून अनेक उपदेश ऐकण्याचें हें काम सोडून चित्ताची निश्चल

अर्जुन उवाच ।

§§ स्थितप्रज्ञस्य का भाषा समाधिस्थस्य केशव ।
स्थितधीः किं प्रभाषेत किमासीत व्रजेत किम् ॥ ५४ ॥

श्रीभगवानुवाच ।

प्रजहाति यदा कामान्सर्वान्पार्थ मनोगतान् ।
आत्मन्येवात्मना तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते ॥ ५५ ॥
दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः ।
वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते ॥ ५६ ॥

समाधि कर; म्हणजे साम्यबुद्धिरूप कर्मयोग तुला प्राप्त होऊन जास्त उपदेशाचीहि जरूर न पडतां कर्मे करूनहि त्यांचें पाप लागणार नाहीं अशा रीतीनें ज्या कर्मयोग्याची बुद्धि किंवा प्रज्ञा स्थिर झाली त्याला स्थितप्रज्ञ असें म्हणतात व त्याचें वर्तन कसें असतें असा आतां अर्जुनाचा प्रश्न आहे. ]

अर्जुन म्हणाला–(५४) हे केशवा ! समाधिस्त स्थितप्रज्ञ कोणाला म्हणावें ? त्या स्थितप्रज्ञाचें बोलणें, बसणें व चालणें कसें असतें ? ( तें मला सांगा ).

[ या श्लोकांत 'भाषा' हा शब्द 'लक्षण' या अर्थी योजिलेला आहे व त्यांतील भाष धातूला अनुसरून " कोणाला म्हणावें " असें त्याचें आम्हीं भाषांतर केलें आहे. स्थितप्रज्ञाचें वर्तन म्हणजे कर्मयोगशास्त्राचा पाया होय हें गीतारहस्याच्या बाराव्या प्रकरणांत ( पृ. ३६४–३७९ ) स्पष्ट करून दाखविलें आहे, व त्यावरून पुढील वर्णनाचें महत्त्व कळून येईल.]

श्रीभगवान् म्हणाले–(५५) हे पार्थ ! मनांतील सर्व काम म्हणजे वासना जेव्हां सोडितो व आपण आपल्या ठायींच संतुष्ट होऊन रहातो, त्याला स्थितप्रज्ञ म्हणतात. (५६) दुःखात ज्याच्या मनाला खेद होत नाहीं,

यः सर्वत्रानभिस्नेहस्तत्तत्प्राप्य शुभाशुभम् ।
नाभिनंदति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ५७ ॥
यदा संहरते चायं कूर्मोऽगानीव सर्वशः ।
इंद्रियाणींद्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ५८ ॥
विषया विनिवर्तन्ते निराहारस्य देहिनः ।
रसवर्जं रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते ॥ ५९ ॥

सुखाचे ठायीं ज्याची आसक्ति नाहीं, आणि प्रीति, भय व क्रोध हीं ज्यानीं सुटलीं, त्याला स्थितप्रज्ञ मुनि ह्मणतात. (५७) सर्व गोष्टींत ज्याचें मन निःसंग झालें, आणि यथाप्राप्त शुभाशुभाचा ज्याला आनंद किंवा विषादहि नाहीं, त्याची बुद्धि स्थिर झाली (ह्मणावयाची). (५८) कांसव आपले (हस्तपादादि) अवयव ज्याप्रमाणें सर्व बाजूंनीं आंखडून घेतो त्याप्रमाणें जेव्हां एखादा पुरुष इंद्रियांच्या (शब्दस्पर्शादि) विषयांपासून (आपलीं) इंद्रियें आंवरून धरतो तेव्हां त्याची बुद्धि स्थिर झाली (ह्मणावयाची). (५९) निराहारी पुरुषाचे विषय सुटले, तरी (त्यांतील) रस ह्मणजे गोडी सुटत नाहीं. पण परब्रह्माचा अनुभव आल्यावर ( सर्व विषय त्यांतील ) गोडी सुद्धां ह्मणजे विषय व त्यांतील गोडी हीं दोन्ही सुटतात.

[ इंद्रियांचें पोषण अन्नानें होतें. म्हणून निराहार किंवा उपोषणें केल्यानें इंद्रियें अशक्त होऊन आपआपल्या विषयांचें सेवन करण्यास असमर्थ होतात. पण विषयोपभोग अशा रीतीनें सुटणें ही केवळ जबरीच्या अशक्ततेची बाह्य क्रिया झाली. विषयवासना (रस) त्यामुळें कमी होत नाहीं, म्हणून ती वासना ज्यानें नाहींशी होईल तें ब्रह्मज्ञान संपादन करावें, आणि ब्रह्माचा याप्रमाणें अनुभव घडल्यावर मन आणि त्याबरोबरच इन्द्रियेंहि आपोआप ताब्यांत रहातात, इन्द्रियें ताब्यांत रहाण्याकरितां निराहारादि उपाय नकोत, असा एकंदर या श्लोकाचा भावार्थ आहे. आणि हाच अर्थ पुढें योग्याचा आहार माफक असावा, आहारविहारादि त्यानें

यततो ह्यपि कौंतेय पुरुषस्य विपश्चितः ।
इंद्रियाणि प्रमाथीनि हरन्ति प्रसभं मनः ॥ ६० ॥
तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्परः ।
वशे हि यस्येंद्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ६१ ॥

अगदींच सोडून देऊं नयेत, या सहाव्या अध्यायांतील श्लोकांत स्पष्टपणें वर्णिला आहे (गी. ६. १६, १७ आणि ३. ६, ७ पहा). सारांश, शरीर कृश करणारीं निराहारादि साधनें एकांगी अतएव त्याज्य ठरवून माफक आहारविहार आणि ब्रह्मज्ञान हेंच इंन्द्रियनिग्रहाचें उत्तम साधन होय असा गीतेचा सिद्धान्त आहे, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. या श्लोकांत रस या शब्दाचा जिव्हेनें अनुभवास येणारा गोड, कडू इ० रस असा अर्थ करून, उपोषणांनीं बाकीच्या इंन्द्रियांचे विषय सुटले तरी जिव्हेचा रस म्हणजे खाण्यापिण्याची इच्छा कमी न होतां पुष्कळ दिवसांच्या निराहारानें ती अधिक तीव्र होत्ये. असा अर्थ कित्येक करितात; आणि भागवतांत अशा अर्थाचा एक श्लोकहि आहे ( भाग. ११. ८. २० ). पण आमच्या मतें गीतेंतील या श्लोकाचा असा अर्थ करणें बरोबर नाहीं. कारण दुसऱ्या चरणाशीं तो जुळत नाहीं. शिवाय भागवतांत 'रस' शब्द नसून 'रसनं' हा शब्द आहे आणि गीतेंतील श्लोकाचा दुसरा चरणहि तेथें नाहीं. म्हणून भागवतांतील व गीतेंतील श्लोक एकार्थक मानणें युक्त नाहीं. ब्रह्मसाक्षात्काराखेरीज पुरा इंन्द्रियनिग्रह होणें शक्य नाहीं, हाच अर्थ पुढील दोन श्लोकांत आतां अधिक स्पष्ट करून सांगतात—]

(६०) कारण, केवळ ( इंन्द्रियदमनार्थ ) प्रयत्न करणाऱ्या विद्वानाचें देखील मन, हे कुंतीपुत्रा ! हीं दांडगीं इंद्रियें बलात्कारानें भलतीकडे ओढून नेतात. ( ६१ ) ( म्हणून ) या सर्व इंद्रियांचें संयमन करून युक्त म्हणजे योगयुक्त व मत्परायण होऊन रहावें. आपलीं इंद्रियें याप्रमाणें ज्याच्या स्वाधीन झालीं त्याची बुद्धि स्थिर झाली ( म्हणावयाची ).

ध्यायतो विषयान्पुंसः संगस्तेषूपजायते।

[या श्लोकांत माफक आहारानें इंद्रियनिग्रह करून त्याबरोबर ब्रह्मज्ञानप्राप्तीसाठीं मत्परायन म्हणजे ईश्वराच्या ठिकाणीं चित्त ठेवून रहावें असें म्हटलें आहे व त्यांतील हेतु ५९ व्या श्लोकाचा आम्हीं जो अर्थ केला आहे त्यावरून उघड होईल. मनूनें देखील "बलवानिंद्रिय-ग्रमो विद्वांसमपि कर्षति" (मनु. २. २–१५) याप्रमाणें नुसत्या इंद्रियनिग्रह करणाऱ्या पुरुषास इशारत दिली आहे व व त्याचाच अनुवाद वर ६० व्या श्लोकांत केला आहे. सारांश, ज्याला स्थिरतप्रज्ञ व्हावयाचें त्यानें आहारविहार माफक ठेवून ब्रह्मज्ञानच संपादन केलें पाहिजे, आणि हें ब्रह्मज्ञान होईल तेव्हांच मन निर्विषय होतें, शरीर-क्लेशाचें उपाय वरपांगी आहेत, खरे नव्हेत, असा या तीन श्लोकांचा भावार्थ आहे; व 'मत्परायण' या पदानें भक्तिमार्गाचेंहि यांत 'सूत-उवाच' झालें आहे (गी. ९. ३४ पहा). 'युक्त' असा जो शब्द वरील श्लोकांत आला आहे त्याचा अर्थ 'योगानें तयार झालेला किंवा बनलेला' असा आहे. गीता ६. १७ यांत 'युक्त' शब्दाचा अर्थ 'माफक' असा आहे. पण या शब्दाचा गीतेंतील नेहमींचा अर्थ "साम्यबुद्धीचा जो योग गीतेंत सांगितला आहे त्याचा उपयोग करून त्याप्रमाणें सर्व सुखदुःखें शान्तपणें सोसून वागण्यास तरबेज झालेला गृहस्थ" असा आहे (गी. ५. २३ पहा). अशा रीतीनें तरबेज झालेल्या गृहस्थासच 'स्थितप्रज्ञ' हें नांव असून त्याची जी अवस्था तीच सिद्धावस्था होय व तिचेंच या अध्यायाच्या व पुनः पांचव्या व बाराव्या अध्यायाच्या अखेर वर्णन आहे. विषयांतील गोडी सुटून स्थितप्रज्ञ होण्यास काय लागतें तें सांगितलें. आतां विषयांच्या ठायीं गोडी कशी उत्पन्न होते हें सांगून व या गोडीनें पुढें कामक्रोधादि विकार उत्पन्न होऊन अखेर त्यामुळें मनुष्याचा घात कसा होतो हें दाखवून त्यापासून सुटका कशी करून घ्यावी याचें पुढील श्लोकांत वर्णन करितात—]

संगात्संजायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते ॥ ६२ ॥
क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः ।
स्मृतिभ्रंशाद्बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति ॥ ६३ ॥
रागद्वेषवियुक्तैस्तु विषयानिंद्रियैश्चरन् ।
आत्मवश्यैर्विधेयात्मा प्रसादमधिगच्छति ॥ ६४ ॥
प्रसादे सर्वदुःखानां हानिरस्योपजायते ।
प्रसन्नचेतसो ह्याशु बुद्धिः पर्यवतिष्ठते ॥ ६५ ॥

( ६२ ) विषयांचें चिंतन करणाऱ्या पुरुषाचा सदर विषयांचे ठिकाणीं संग म्हणजे सलगी वाढत जात्ये. या संगापासून पुढें काम म्हणजे सदर विषय आपल्याला पाहिजेत ही वासना उत्पन्न होत्ये; आणि ( हा काम तृप्त होण्यास अडथळा झाला म्हणजे ) त्या कामापासूनच क्रोधाचा उद्भव होतो; ( ६३ ) क्रोधापासून संमोह म्ह० अविवेक होतो, संमोहापासून स्मृतिभ्रम, स्मृतिभ्रंशापासून बुद्धिनाश, आणि बुद्धिनाशापासून ( पुरुषाचा ) सर्वस्वीं घात होतो. ( ६४ ) पण आपला आत्मा म्हणजे अंतःकरण ज्याच्या ताब्यांत आहे तो ( पुरुष ) प्रीति व द्वेश यांपासून सुटलेल्या व आपल्या स्वाधीन असलेल्या इंद्रियांनीं विषययांमध्यें वागूनहि ( चित्तानें ) प्रसन्न असतो. (६५) चित्त प्रसन्न असलें म्हणजे त्याच्या सर्व दुःखांचा नाश होतो. कारण ज्याचें चित्त प्रसन्न त्याची बुद्धीहि तत्काल स्थिर होत्ये.

[ या दोन श्लोकांत विषय अगर कर्मे न सोडितां फक्त त्यांमधला संग सोडून स्थितप्रज्ञ विषयांतच निःसंगबुद्धीनें वागत असतो व त्याला जी शान्ति मिळत्ये ती कर्मत्यागामुळें नसून फलाशेच्या त्यागानें प्राप्त होत्ये असें स्पष्ट वर्णन आहे हें लक्षांत ठेविलें पाहिजे. कारण, याखेरीज इतर बाबतींत हा स्थितप्रज्ञ आणि संन्यासमार्गांतील स्थितप्रज्ञ यांत कांहीं भेद नाहीं. इंद्रियसंयमन, निरिच्छपणा व शांति हे गुण दोघां-

नास्ति बुद्धिरयुक्तस्य न चायुक्तस्य भावना।
न चाभावयतः शान्तिरशान्तस्य कुतः सुखम् ॥ ६६ ॥
इंद्रियाणां हि चरतां यन्मनोऽनुविधीयते ।
तदस्य हरति प्रज्ञां वायुर्नावमिवांभसि ॥ ६७ ॥
तस्माद्यस्य महाबाहो निगृहीतानि सर्वशः ।
इंद्रियाणींद्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ६८ ॥

सहि पाहिजेत; पण गीतेंतील स्थितप्रज्ञ कर्मांचा संन्यास न करितां लोकसंग्रहार्थ सर्व कर्में निष्काम बुद्धीनें करीत असतो, आणि दुसरा करीत नाहीं हा या दोहोंत महत्त्वाचा भेद आहे (गी. ३. २५ पहा). पण हा भेद गौण समजून गीतेवरील संन्यासमार्गीच टीकाकार स्थितप्रज्ञाचें वरील वर्णन संन्यासमार्गाचेंच आहे असें संप्रदायाच्या आग्रहानें प्रतिपादन करीत असतात. असो; ज्यांचें चित्त याप्रमाणें प्रसन्न नाहीं त्याचें वर्णन करून स्थितप्रज्ञाचें स्वरूप आतां अधिक व्यक्त करितात–]

(६६) जो पुरुष युक्त म्हणजे वरील प्रकारें योगयुक्त झालेला नाहीं त्याला (स्थिर) बुद्धि आणि भावना म्हणजे दृढबुद्धिरूप निष्ठाहि नसते. ज्याला भावना नाहीं त्याला शान्ति नाहीं, आणि ज्याला शान्ति नाहीं त्याला सुख तरी कोठून मिळणार ? (६७) (विषयांत) संचरणाऱ्या ह्मणजे वागणाऱ्या इंद्रियांच्या मागोमाग मन जें जाऊं लागतें तेंच–पाण्यांत नौकेस जसा वारा त्याप्रमाणें–पुरुषाची बुद्धि हरण करीत असतें. (६८) ह्मणून हे महाबाहो अर्जुना ! इंद्रियांच्या विषयांपासून ज्याचीं इंद्रियें सर्व बाजूंनीं आंवरून धरिलेलीं (असतात) त्याचीच बुद्धि स्थिर झाली (ह्मणावयाची).

[सारांश, मनोनिग्रहद्वारा इंद्रियनिग्रह हा सर्व साधनाचें मूळ होय. इंद्रियें विषयांत व्यग्र होऊन सैरावैरा धांवत असलीं ह्मणजे आत्मज्ञान प्राप्त करून घेण्याची (वासनात्मक) बुद्धिच होऊं शकत नाहीं. बुद्धि

या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी ।
यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः ॥ ६९ ॥
अपूर्यमाणमचलप्रतिष्ठं समुद्रमापः प्रविशन्ति यद्वत् ।
तद्वत्कामा यं प्रविशन्ति सर्वे स शान्तिमाप्नोति न कामकामी ॥ ७० ॥

नाहीं ह्मणजे त्याबद्दल दृढ उद्योगहि होत नाहीं, आणि मग शांति व सुखहि नाहीं असा अर्थ आहे तथापि इंद्रियनिग्रह ह्मणजे इंद्रियें अजीबात मारून सर्व कर्में अजीबात सोडणें असा अर्थ नसून, ६४ व्या श्लोकांत वर्णिल्याप्रमाणें निष्काम बुद्धिनें कर्में करावीं असा गीतेचा अभिप्राय आहे, हें गीतारहस्याच्या चवथ्या प्रकरणांत दाखविलें आहे. ]

(६९) सर्व लोकांना जी रात्र तेथें स्थितप्रज्ञ जागृत असतो आणि सर्व प्राणिमात्र जेथें जागृत असतात तेथें या ज्ञानवान् पुरुषास रात्र वाटत असते.

[ हें विरोधाभासात्मक वर्णन अलंकारिक आहे. अज्ञान ह्मणजे अंधकार आणि ज्ञान ह्मणजे प्रकाश होय (गी. १४. ११). अज्ञानी लोकांना जें नकोसें वाटतें ह्मणजे त्यांना जो अंधकार, तें ज्ञान्याला हवें असतें; आणि अज्ञानी लोक ज्यांत गुंतलेले असतात,–त्यांना जेथें उजेड–तेथें ज्ञान्याला अंधकार ह्म० तें ज्ञान्याला नको असतें, असा अर्थ आहे. उदाहरणार्थ ज्ञानी पुरुष काम्य कर्में तुच्छ मानितो तर त्यांतच सामान्य लोक राबत असतात; आणि ज्ञानी पुरुषाला जें निष्काम कर्म पाहिजे तें इतरांस नको असतें. ]

(७०) चोहोंकडून (पाण्यानें) भरत जात असतांहि ज्याची मर्यादा चळत नाहीं, अशा समुद्रांत सर्व पाणी ज्याप्रमाणें शिरत असतें तद्वत् ज्या पुरुषांत सर्व विषय (त्याची शान्ति न मोडितां) प्रवेश करितात, त्यालाच (खरी) शान्ति मिळते. विषयाची इच्छा धरणाऱ्याला (ही शान्ति मिळणें शक्य) नाहीं.

§§ विहाय कामान्यः सर्वान्पुमांश्चरति निःस्पृहः ।
निर्ममो निरहंकारः स शान्तिमधिगच्छति ॥ ७१ ॥

[ शान्ति मिळविण्यासाठीं कर्मे करूं नयेत असा या श्लोकाचा अर्थ नसून सामान्य लोकांचें मन फलाशेनें किंवा काम्य वासनेनें गांगरून जाऊन त्यांच्या कर्मांनीं त्यांच्या मनाची शान्ति बिघडते; पण जो सिद्धावस्थेस पोंचला त्याचें मन फलाशेनें क्षुब्ध न होतां, कितीहि कर्मे करावयाचीं असलीं तरी त्याच्या मनाची शान्ति न ढळतां समुद्रासारखा शान्त राहून तो तीं करीत असतो; व त्यामुळें त्याला सुखदुःखाची व्यथा लागत नाहीं असा भावार्थ आहे (वरील श्लोक ६४ व गी. ४. १९ पहा). आतां या विषयाचा समारोप करून स्थितप्रज्ञाच्या या स्थितीस काय नांव आहे तें सांगतात—]

(७१) सर्व काम ह्मणजे आसक्ति सोडून जो पुरुष निःस्पृह होऊन (व्यवहारांत) वागतो, व ज्याला ममत्व व अहंकार नाहीं त्यालाच शान्ति मिळते ?

[ 'चरति' (वागतो) या पदाचा संन्यासमार्गातील टीकाकार "भिक्षा मागत हिंडतो" असा अर्थ करितात. पण तो बरोबर नाहीं. मागें ६४ व ६७ व्या श्लोकांत 'चरन्' व 'चरतां' याचा जो अर्थ आहे तोच येथेंहि घेतला पाहिजे. स्थितप्रज्ञानें भिक्षा मागावी असा गीतेंत कोठेंहि उपदेश नाहीं. उलट ६४ व्या श्लोकांत त्यानें इंद्रियें ताब्यांत ठेवून "विषयामध्यें वागावें" असें स्पष्ट म्हटलें आहे. म्हणून 'चरति' म्हणजे 'वागतो,' 'जगाचे व्यवहार करितो,' असाच अर्थ केला पाहिजे. 'निःस्पृह' शहाणा पुरुष (स्थितप्रज्ञ) व्यवहारांत कसा वागत असतो याचें श्रीसमर्थांनीं दासबोधाच्या उत्तरार्धांत उत्तम वर्णन केलें असून, गीतारहस्याच्या चवदाव्या प्रकरणाचा विषयहि तोच आहे. ]

एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ नैनां प्राप्य विमुह्यति ।
स्थित्वास्यामंतकालेऽपि ब्रह्मनिर्वाणमृच्छति ॥ ७२ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुन-संवादे सांख्ययोगो नाम द्वितीयोऽध्यायः ॥ २ ॥

(७२) हे पार्था! ब्राह्मी स्थिति (म्हणतात ती) हीच. ही प्राप्त झाल्यावर कोणीहि मोहांत पडत नाहीं; आणि अंतकाळीं म्हणजे मरणाच्या वेळीं सुद्धां या स्थितीमध्यें राहून त्याला ब्रह्मनिर्वाण म्हणजे ब्रह्मांत मिळून जाण्याच्या स्वरूपाचा मोक्ष मिळतो.

[ब्राह्मी स्थिति ही कर्मयोगांतील शेवटची व अत्युत्तम स्थिति होय (गी. र. प्र. ९ पृ. २३० व २४७ पहा.); व ती प्राप्त झाली म्हणजे पुनः मोह होत नाहीं हा त्यांतील विशेष आहे. हा विशेष येथें सांगण्याचें कारण असें कीं, एखाद्या मनुष्याला एखादे दिवशीं घटकाभर ब्राह्मी स्थितीचा कदाचित् अनुभव येऊं शकला तरी त्यापासून कांहीं कायमचा फायदा होत नाहीं. कारण कोणत्याहि मनुष्याची मरतेवेळीं जर ही स्थिति नसेल, तर मरणसमयीं मनांत असलेल्या वासनेप्रमाणें पुढें पुनर्जन्म होणें टळत नाहीं (गीतारहस्य पृ. २८५ पहा). म्हणून ब्राह्मी अवस्थेचें वर्णन करितांना या श्लोकांत 'अन्तकालेऽपि'=अंतकालीं सुद्धां, स्थितप्रज्ञाची ही अवस्था कायम रहाव्ये असें मुद्दाम म्हटलेलें आहे. अंतकालीं मन शुद्ध असण्याची विशेष अवश्यकता उपनिषदांतून (छां. ३. १४.१; प्रश्न. ३. १०) आणि गीतेंतहि पुढें (गी. ८. ५-१०) वर्णिली आहे. वासनात्मक कर्म हें पुढें अनेक जन्म मिळण्याचें कारण असल्यामुळें निदान मरणसमयीं तरी वासना शून्य झाली पाहिजे हें उघड आहे. आणि ती मरणसमयीं शून्य होण्यास पूर्वी तसा अभ्यास पाहिजे हेंहि मग अर्थतःच प्राप्त होतें. कारण, वासना शून्य

# तृतीयोऽध्यायः ।

अर्जुन उवाच ।

ज्यायसी चेत्कर्मणस्ते मता बुद्धिर्जनार्दन ।

करण्याचें कर्म अत्यंत दुर्घट असून तें विशेष ईश्वरी अनुग्रहाखेरीज एकाएकीं कोणासहि साध्य होणें केवळ दुर्घट नव्हे तर अशक्य आहे. मरणसमयीं वासना शुद्ध असणें हें तत्त्व केवळ वैदिक धर्मांतच नव्हे, तर इतर धर्मांतहि स्वीकारलें आहे. गीतारहस्य पृ. ४३६ पहा. ]

याप्रमाणें श्रीभगवंतांनीं गाइलेल्या म्हणजे सांगितलेल्या उपनिषदांत ब्रह्मविद्यान्तर्गत योग–म्हणजे कर्मयोग–शास्त्रावरील श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या संवादांतील सांख्ययोग नांवाचा दुसरा अध्याय समाप्त झाला.

[ या अध्यायांत आरंभीं सांख्य किंवा संन्यास मार्गाचें विवेचन असल्यामुळें याला सांख्ययोग हें नांव दिलें आहे· परंतु तेवढ्यावरून सबंध अध्यायांत तोच विषय आहे असें समजूं नये. एकाच अध्यायांत प्रायः अनेक विषय असतात. त्यांतील आरंभींचा किंवा प्रमुख घेऊन विषय त्याप्रमाणें त्या अध्यायाला नांव दिलें जातें. गीतारहस्य प्रकरण १४ पृ. ४४३ पहा. ]

---

## अध्याय तिसरा.

[ भीष्मद्रोणादिकांना मी मारणार अशी जी अर्जुनास भीति पडली होती ती वेडेपणाची होय असें सांख्यमार्गाप्रमाणें आत्म्याच्या नित्यत्वावरून व अशोच्यत्वावरून सिद्ध करून, स्वधर्माचें थोडें विवेचन झाल्यावर गीतेंतील मुख्य विषय जो कर्मयोग त्यास दुसऱ्याच अध्यायांत सुरुवात झाली; व कर्मे करूनहि त्यांच्या पापपुण्याची बाधा न होण्यास तीं साम्यबुद्धिनें

तत्किं कर्मणि घोरे मां नियोजयसि केशव ॥ १ ॥
व्यामिश्रेणेव वाक्येन बुद्धिं मोहयसीव मे ।
तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम् ॥ २ ॥

श्रीभगवानुवाच ।

§§ लोकेऽस्मिन्द्विविधा निष्ठा पुरा प्रोक्ता मयानघ ।
ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेण योगिनाम् ॥ ३ ॥

करणें ही एकच युक्ति किंवा योग होय असें सांगून, अशा रीतीनें ज्याची बुद्धि सम झाली त्या कर्मयोगी स्थितप्रज्ञाचें अखेर वर्णनहि करण्यांत आलें. तथापि एवढ्यानें कर्मयोगाचें विवेचन पुरे होत नाहीं. कोणतेहि कर्म समबुद्धीनें केलें म्हणजे त्याचें पाप लागत नाहीं हें खरें. पण कर्मापेक्षां समबुद्धिच श्रेष्ठ हें जर निर्विवाद आहे ( गी. २. ४९ ), तर स्थितप्रज्ञाप्रमाणें बुद्धि सम केली म्हणजे झालें, कर्मे केलींच पाहिजेत, असें त्यामुळें सिद्ध होत नाहीं. म्हणून प्रश्नरूपानें अर्जुनाकडून हीच शंका उपस्थित झाल्यावर “ कर्मे केलींच पाहिजेत ” असें भगवान् या व पुढील अध्यायांत प्रतिपादन करितात. ]

अर्जुन म्हणाला–(१) हे जनार्दन ! कर्मापेक्षां (साम्य-) बुद्धिच श्रेष्ठ असें जर तुमचें मत आहे, तर हे केशवा ! मला ( युद्धाच्या ) घोर कर्मांत कां घालितां ? (२) दिसण्यांत व्यामिश्र म्हणजे दुटप्पी अशा भाषणानें माझ्या बुद्धीला मोह पाडल्यासारखें तुह्मी करीत आहां. तरी ज्यानें मी श्रय म्हणजे कल्याण पावेन, तेवढें एकच निश्चित मला सांगा.

श्रीभगवान् ह्मणाले–(३) हे निष्पाप अर्जुना ! पूर्वी ( ह्मणजे अध्यायांत ) ज्ञानयोगानें सांख्यांची आणि कर्मयोगानें योग्यांची अशी या लोकीं दोन प्रकारची निष्ठा आहे असें मीं सांगितलें.

[‘पुरा’=पूर्वी ह्मणजे दुसऱ्या अध्यायांत असा अर्थ आह्मीं केला असून तो सरळ आहे. कारण दुसऱ्या अध्यायांत प्रथम सांख्यनिष्ठेप्रमाणें ज्ञान

न कर्मणामनारंभान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते ।
न च संन्यसनादेव सिद्धिं समधिगच्छति ॥ ४ ॥
न हि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत् ।
कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः ॥ ५ ॥

सांगून नंतर कर्मनिष्ठेस सुरुवात केलेली आहे. पण 'पुरा' म्ह० सृष्टीच्या मूळारंभीं असाहि अर्थ होऊं शकेल. कारण महाभारतांत नारायणीय किंवा भागवत धर्माचें निरूपण आहे तेथें सांख्य व योग ( निवृत्ति व प्रवृत्ति ) या दोन निष्ठा स्वतंत्रपणें भगवंतांनीं जगाच्या आरंभी उत्पन्न केल्या आहेत असें वर्णन आहे ( शां. ३४० व ३४७ पहा ). 'निष्ठा' शब्दामागें 'मोक्ष' हा शब्द अध्याहृत असून ज्या मार्गानें गेलें असतां अखेर मोक्ष मिळतो तो मार्ग असा त्याचा अर्थ असून गीतेप्रमाणें अशा निष्ठा दोनच होत, व त्या दोन्हीहि स्वतंत्र आहेत, एक दुसऱ्यांचें अंग नव्हे, इत्यादि गोष्टींचें विस्तृत विवेचन गीतारहस्याच्या अकराव्या प्रकरणांत ( पृ. ३०१–३१३ ) केलें असल्यामुळें त्याची येथें पुनरुक्ति करीत नाहीं. या दोन निष्ठांमध्यें भेद काय तोहि कोष्टकरूपानें गीतारहस्याच्या ११ व्या प्रकरणाचे ( पृ. ३५१ ) अखेर दिला आहे. मोक्षाच्या दोन निष्ठा कोणत्या तें सांगितलें; आतां तदंगभूत जी अवश्य नैष्कर्म्य-सिद्धि तिचें स्वरूप स्पष्ट करून दाखवितात—]

( ४ ) ( पण ) कर्मांना प्रारंभ केला नाहीं म्हणजे पुरुषाला नैष्कर्म्य प्राप्त होतें असें नाहीं; आणि कर्मांचा संन्यास (त्याग) केला म्हणजे तेवढ्यानेंच सिद्धि मिळते असें नाहीं. (५) कारण कोणी झाला तरी ( कांहींना कांहीं ) कर्म केल्यावांचून क्षणभर देखील केव्हांहि रहात नाहीं. प्रकृतीचे गुण परतंत्र झालेल्या प्रत्येक इसमास ( नेहमीं कांहींना कांहीं तरी ) कर्म करण्यास लावीत असतात.

[ चवथ्या श्लोकाच्या पहिल्या चरणांत 'नैष्कर्म्य' ह्मणजे 'ज्ञान' असें मानून 'कर्मांना आरंभ न केल्यानें ज्ञान होत नाहीं, ह्मणजे कर्मानींच

कर्मेंद्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन् ।

ज्ञान होतें, कारण कर्म हें ज्ञानाचें साधन आहे," असा संन्यासमार्गीय टीकाकारांनीं या श्लोकाचा अर्थ आपल्या संप्रदायास अनुकूल करून घेतला आहे. पण हा अर्थ सरळ किंवा बरोबरहि नाहीं. नैष्कर्म्य हा शब्द वेदान्त व मीमांसा या दोन्ही शास्त्रांत पुष्कळदां येत असून सुरेश्वराचार्यांच्या 'नैष्कर्म्यसिद्धी' या नांवाचा याच विषयावर एक ग्रंथहि आहे. तथापि नैष्कर्म्याचीं हीं तत्त्वें नवीन नसून सुरेश्वराचार्यांच्याच काय, पण मीमांसा व वेदान्त यांवरील सूत्रें होण्याच्याहि पूर्वीपासून चालत आलेलीं आहेत कर्म ह्मटलें ह्मणजे तें बंधन असावयाचें हें सांगावयास नको. ह्मणून पाऱ्याचा उपयोग करण्यापूर्वी तो मारून ज्याप्रमाणें वैद्य शुद्ध करून घेतात तद्वत् कर्मे करण्यापूर्वी त्याचें बंधकत्व किंवा दोष जेणेकरून नाहींसा होईल असा उपाय करावा लागतो, व अशा युक्तीनें कर्मे करण्याची जी स्थिति तिला 'नैष्कर्म्य' असें म्हणतात. याप्रमाणें नांगी मोडलेलें कर्म मोक्षाला प्रतिबंधक होत नसल्यामुळें ही स्थिति कशी संपादन करावी हा मोक्षशास्त्रांतील एक महत्त्वाचा प्रश्न आहे, मीमांसकांचें याला असें उत्तर आहे कीं, नित्य व निमित्त घडल्यास नैमित्तिक, हीं कर्मे करावीं, आणि काम्य व निषिद्ध करूं नयेत, म्हणजे कर्माचें बंधकत्व न रहातां नैष्कर्म्यावस्था सुलभरीत्या प्राप्त होते. पण मीमांसकांची ही युक्ति चुकीची आहे असा वेदान्तशास्त्राचा सिद्धान्त असून त्याचें गीतारहस्याच्या दहाव्या प्रकरणांत (पृ. २७१) विवेचन केलें आहे. कर्मच केलें म्हणजे नाहीं त्याची बाधा तरी कशी लागणार ? ह्मणून नैष्कर्म्यावस्था प्राप्त होण्यास सर्व कर्मेच सोडून द्यावें, असें दुसरे कित्येक प्रतिपादन करीत असतात. यांच्या मतें 'नैष्कर्म्य' म्हणजे कर्मशून्यता होय. पण हें मत बरोबर नसून त्यानें सिद्धि म्ह० मोक्षहि मिळत नाहीं असें चवथ्या श्लोकांत सांगितलें असून, पांचव्या श्लोकांत त्याचें कारण दिलें आहे. कर्म सोडण्याचें मनांत आणिलें तरीहि देह आहे तोपर्यंत निजणें, बसणें इ० कर्मे कधींच बंद होत नसल्यामुळें

इंद्रियार्थान्विमूढात्मा मिथ्याचारः स उच्यते ॥ ६ ॥

( गी. ५. ९ व १८. ११ ), कोणीहि मनुष्य कधींच कर्मशून्य होऊं शकत नाहीं. म्हणून कर्मशून्यरूपी नैष्कर्म्यहि अशक्य होय सारांश, कर्माचा विंचू कधींच ठार मरत नाहीं. यासाठीं तो जेणेंकरून निर्विष होईल अशीच कांहीं तरी युक्ति काढिली पाहिजे. कर्माच्या ठिकाणीं असलेली आपली आसक्ति सोडणें हीच ती युक्ति होय असा गीतेचा सिद्धान्त असून, तो पुढें अनेक ठिकाणीं विस्तारानें वर्णिला आहे. पण यावरहि कोणी असा प्रश्न करील कीं, सर्व कर्में सोडणें हें जरी नैष्कर्म्य नव्हे, तरी संन्यासमार्गी लोक सर्व कर्मांचा संन्यास ह्मणजे त्याग करून ज्या अर्थी मोक्ष मिळवितात त्या अर्थी मोक्षप्राप्ति सिद्ध होण्यास कर्म सोडणें जरूर आहे. पण या कोटिक्रमास गीतेचें असें उत्तर आहे कीं, संन्यासमार्गीयांस मोक्ष मिळतो खरा, पण तो त्यांनीं कर्में सोडिल्यामुळें मिळत नसून, मोक्षसिद्धी हें त्यांच्या ज्ञानाचें फल होय; कर्में सोडून देण्यानेंच जर सिद्धि मिळेल तर दगडालाहि मुक्ति मिळाली पाहिजे म्हणून (१) नैष्कर्म्य म्हणजे कर्मशून्यता नव्हे, (२) कर्म सोडूं ह्मटलें तरीहि कोणाला तें सुटत नाहीं, आणि (३) कर्म सोडून देणें हा सिद्धि मिळविण्याचा उपाय नव्हे, अशा तीन गोष्टी सिद्ध होतात; आणि त्याच वरील श्लोकांत सांगितल्या आहेत. या तीन गोष्टी सिद्ध झाल्यावर आठव्या अध्यायांत ह्मटल्याप्रमाणें 'नैष्कर्म्यसिद्धि' (गी. १८. ४८ व ४९ पहा.) प्राप्त होण्यास कर्में न सोडितां ज्ञानानें आसक्तीचा क्षय करून कर्में सदैव करीत रहाणें हाच काय तो एक मार्ग शिल्लक राहतो. कारण ज्ञान हेंच जरी मोक्षाचें साधन असलें, तरी कर्मशून्य रहाणें कधींच शक्य नसल्यामुळें त्यांचें बंधकत्व नाहींसें होण्यास आसक्ति सोडून तीं करणें जरूर पडतें. यासच कर्मयोग ह्मणतात, व हाच ज्ञानकर्मसमुच्चयात्मक मार्ग विशेष योग्यतेचा ह्मणजे श्रेष्ठ असें आतां सांगतात—]

(६) (हस्तपादादि) कर्में आंवरून मनानें जो मूढ इंद्रियांच्यां विषयांचें चिंतन करीत राहतो, त्याला मिथ्याचार ह्मणजे दांभिक म्हणतात.

यस्त्विंद्रियाणि मनसा नियम्यारभतेऽर्जुन ।
कर्मेंद्रियैः कर्मयोगमसक्तः स विशिष्यते ॥ ७ ॥
नियतं कुरु कर्म त्वं ज्यायो ह्यकर्मणाः ।

(७) [पण मनानें इंद्रियांचें आकलन करून, (केवळ) कर्मेंद्रियांनीं अनासक्त बुद्धीनें जो 'कर्मयोगाचा' आरंभ करितो त्याची योग्यता हे अर्जुना ! विशेष आहे.

[कर्मयोगांत कर्मापेक्षां बुद्धि श्रेष्ठ ( गी. २. ४९ ) असें जें मागच्या अध्यायांत सांगितलें त्याचेंच या दोन श्लोकांत स्पष्टीकरण केलेलें आहे. मन शुद्ध नसतां केवळ लोकांच्या भीतीनें किंवा लोकांनीं बरें ह्मणावें ह्मणून फक्त बाह्येंद्रियांच्या व्यापारास आळा घालणारा पुरुष खरा सदाचरणी नव्हे, ढोंगी होय, असें या श्लोकांत स्पष्ट म्हटले आहे. " कालौ कर्ता च लिप्यते "–कलियुगांत दोष बुद्धींत नसून कर्मांत असतो–या वचनाचा आधार दाखवून बुद्धि कशीहि असो, कर्म वाईट असूं नये म्हणजे झालें, असें प्रतिपादन करितात त्यांनीं वरील श्लोकांत वर्णिलेलें गीतेंतील तत्त्व विशेषतः लक्षांत ठेविलें पाहिजे. निष्काम बुद्धीनें कर्में करण्याच्या योगा-सच 'कर्मयोग' हें नांव गीतेंत दिलें आहे हें सातव्या श्लोकांवरून उघड होतें. हा कर्मयोग सहाव्या श्लोकांत वर्णिलेल्या दांभिक मार्गापेक्षां श्रेष्ठ असला तरी संन्यासमार्गापेक्षां श्रेष्ठ नाहीं असा या श्लोकाचा कित्येक संन्यासमार्गीय अर्थ करितात. पण ही कोटि सांप्रदायिक आग्र-हाची आहे. कारण संन्यासमार्गापेक्षां कर्मयोग अधिक योग्यतेचा किंवा श्रेष्ठ आहे असें या श्लोकांतच नव्हे, तर पुनः पांचव्या अध्यायाच्या आरंभीं व इतरत्रहि स्पष्ट सांगितलें आहे ( गीतार. पृ. ३०४ व ३०५ पहा ). कर्मयोग याप्रमाणें श्रेष्ठ असल्यामुळें आतां अर्जुनास याचेंच आचरण करण्याचा उपदेश करितात–]

शरीरयात्रापि च ते न प्रसिद्ध्येदकर्मणः ॥ ८ ॥

(८) (तुझ्या धर्माप्रमाणें) नियत ह्मणजे नेमलेलें कर्म तूं कर. कारण कर्म न करण्यापेक्षां कर्म करणें हें अधिक चांगलें होय. खेरीज (असें पहा कीं) कर्म न केलेंस तर (खायाला न मिळतां) तुझा शरीरनिर्वाह सुद्धां चालावयाचा नाहीं.

[ 'खेरीज' व 'सुद्धां' (अपि च) या पदांनीं शरीरयात्रा हा किमानपक्षींचा हेतु सांगितला. आतां 'नियत' ह्मणजे 'नेमलेलें कर्म' कोणतें व तें दुसऱ्या कोणत्या महत्त्वाच्या कारणास्तव अवश्य केलें पाहिजे, हें दाखविण्यासाठीं यज्ञप्रकरणास सुरुवात करितात. यज्ञयागादि श्रौत धर्म सध्यां लुप्तप्राय झाला असल्यामुळें या विषयाचें हल्लींच्या वाचकांस विशेष महत्त्व वाटत नाहीं. पण गीतेच्या वेळीं हे यज्ञयाग पूर्ण प्रचारांत असल्यामुळें 'कर्म' शब्दानें यांचाच मुख्यत्वेंकरून बोध होत असे, व त्यामुळें हीं धर्मकृत्यें करावीं का न करावीं व करावीं ह्मटल्यास कशीं करावीं, याबद्दलचें विवेचन गीताधर्मांत करणें अवश्य होतें. शिवाय दुसरें असें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, यज्ञ ह्मणजे केवळ ज्योतिष्टोमादि श्रौतयज्ञ, किंवा अग्नींत कोणत्याहि द्रव्याचें हवन करणें, एवढाच अर्थ होत नाहीं (गी. ४. ३२ पहा ). सृष्टि निर्माण करून तिचा क्रम सुरळीत चालण्यासाठीं, म्हणजे लोकसंग्रहार्थ, सर्व प्रजेस ब्रह्मदेवानें चातुर्वर्ण्यविहित जीं जीं कर्में लावून दिलीं आहेत, त्या सर्वांचा 'यज्ञ' या शब्दांत समावेश होतो (म. भा. अनु. ४८. ३; व गी. र. पृ. २८६–२९२ पहा ); आणि हींच कर्में धर्मशास्त्रांत सांगितलीं असून तींच नियत म्हणजे नेमलेलें कर्म या शब्दांनीं येथें विवक्षित आहेत. ह्मणून श्रौत यज्ञयाग सध्यां लुप्तप्राय झाले असले, तरी यज्ञचक्राचें हें विवेचन सध्याहि निरर्थक नाहीं, असें ह्मटलें पाहिजे. असो; शास्त्राप्रमाणे पाहिलें तर हीं सर्व कर्में काम्य, ह्मणजे मनुष्याचें या जगांत

§§ यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबंधनः ।
तदर्थं कर्म कौंतेय मुक्तसंगः समाचार ॥ ९ ॥

कल्याण होऊन त्याला सुख व्हावें या हेतूनें सांगितलेलीं आहेत. पण मागें दुसऱ्या अध्यायांत ( गी. २. ४१–४४ ) मीमांसकांचीं हीं सहेतुक किंवा काम्य कर्में मोक्षाला प्रतिबंधक, अतएव हलक्या प्रतीचीं असा सिद्धान्त केला आहे. आणि आतां तर तींच कर्में करावीं असें प्राप्त झालें ह्मणून या कर्मांचा शुभाशुभ लेप किंवा बंधकत्व, नाहींशीं होऊन, तीं करीत असतांहि नैष्कर्म्यावस्था कशी प्राप्त होते याचें पुढील श्लोकांतून विस्तृत विवेचन केलें आहे, व तें सर्व भारतांत वर्णिलेल्या नारायणीय किंवा भागवत धर्मास अनुसरून आहे (म. भा. शां. ३४० पहा ).

(९) यज्ञासाठीं जें कर्म करितात त्याखेरीज इतर कर्मांनें हा लोक बांधिलेला आहे. तदर्थ म्ह० यज्ञार्थ ( करावयाचें ) कर्म ( देखील ) तूं आसक्ति किंवा फलाशा सोडून करीत जा.

[ या श्लोकाच्या पहिल्या चरणांत मीमांसकांचा व दुसऱ्यांत गीतेचा सिद्धान्त सांगितला आहे. मीमांसकांचें असें म्हणणें आहे कीं, यज्ञयागादि कर्में ज्या अर्थी वेदानेंच प्रत्येकाच्या मागें लावून दिलीं असून ईश्वरनिर्मित सृष्टीचे व्यवहार चालण्यास हें यज्ञचक्र अवश्य आहे, त्या अर्थी हीं कर्में कोणासहि सोडितां येत नाहींत; सोडील तर श्रौत धर्मास मुकला म्हणून समजावें. पण प्रत्येक कर्माचें फल मनुष्यास भोगणें जरूर आहे असा कर्मविपाकप्रक्रियेचा सिद्धान्त आहे; व त्याप्रमाणें यज्ञासाठीं जें जें कर्म करील त्याचेंहि बरेवाईट फल मनुष्यास भोगणें जरूर आहे असें प्राप्त होतें. मीमांसकांचें याला असें उत्तर आहे कीं, 'यज्ञ' करावे अशी वेदाचीच आज्ञा असल्यामुळें यज्ञार्थ जें जें कर्म करावें लागेल तें ईश्वरासच संमत असल्यामुळें तें कर्म कर्त्यास बंधक

सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः ।

होऊं शकत नाहीं. पण यज्ञाखेरिज इतर कामासाठीं, उदाहरणार्थ केवळ स्वतःच्या पोटींसाठीं मनुष्य जें कांहीं करील तें कर्म यज्ञार्थ होत नसून केवळ स्वतः पुरुषाच्याच फायद्याचें होतें. म्हणून मीमांसक त्यास 'पुरुषार्थ' कर्म असें म्हणतात, व अशा म्ह० यज्ञार्थाखेरीज दुसऱ्या, अर्थात् पुरुषार्थ कर्मांचें जें जें कांही बरेंवाईट फल असेल तें पुरुषाला भोगिलें पाहिजे, असें मीमांसकांनीं ठरविलें आहे; व हाच सिद्धान्त वरील श्लोकाच्या पहिल्या ओळींत दिला आहे ( गीतारहस्य प्र. ३ पृ. ५३–५६ पहा ). यज्ञ म्हणजे विष्णु असा गौण अर्थ करून यज्ञार्थ म्हणजे विष्णुप्रीत्यर्थ किंवा परमेश्वरार्पणपूर्वक असा जो अर्थ टीकाकार करितात तो आमच्या मतें ओढाताणीचा व क्लिष्ट आहे. परंतु यज्ञासाठीं जीं कर्में करावी लागतात त्यांखेरीज दुसरें कांहीं एक न केलें तर मनुष्य कर्मबंधांतून सुटला काय ? असा या ठिकाणीं प्रश्न उद्भवतो, कारण यज्ञ हें तरी कर्मच आहे व त्याचें स्वर्गप्राप्तिरूप जें शास्त्रोक्त फल आहे तें मिळाल्याखेरीज रहात नाही. पण स्वर्गप्राप्तिरूप हें फल मोक्षप्राप्तीला विरुद्ध आहे, असें गीतेच्या दुसऱ्याच अध्यायांत स्पष्ट सांगितलें आहे ( गी. २.४०–४४; व ९.२०,२१ पहा ). म्हणून यज्ञार्थ सुद्धां गृहस्थानें जें नियत कर्म करावयाचें तेंहि फलाशा सोडून म्हणजे केवळ कर्तव्य म्हणून करावें असें वरील श्लोकाच्या दुसऱ्या चरणांत पुनः विधान केलें आहे; व तोच अर्थ पुढें सात्त्विक यज्ञाची व्याख्या देतांना प्रतिपादिला आहे ( गी. १७. ११ व १८. ६ पहा ). अशा प्रकारें सर्व कर्में यज्ञार्थ, आणि तींहि फलाशा सोडून केलीं म्हणजे, ( १ ) तीं यज्ञार्थ केलीं असल्यामुळें मीमांसकांच्या न्यायानेंच इतर कोणत्याहि प्रकारें बंधक होत नाहींत; आणि ( २ ) फलाशा सोडून केलेलीं असल्यामुळें त्याचें स्वर्गप्राप्तिरूप शास्त्रोक्त पण अनित्य फलहि न मिळतां मोक्षप्राप्ति होते. असा या श्लोकाचा भावार्थ आहे; व तोच अर्थ पुढें १९ व्या श्लोकांत आणि ४ थ्या

अनेन प्रसविष्यध्वमेष वोऽस्त्विष्टकामधुक् ॥ १० ॥
देवान्भावयतानेन ते देवा भावयन्तु वः ।
परस्परं भावयन्तः श्रेयः परमवाप्स्यथ ॥ ११ ॥

अध्यायांतील २३ व्या श्लोकांत पुनः प्रतिपादन केला आहे. तात्पर्य "यज्ञार्थ कर्मे करावीं, कारण तीं बंधक होत नाहींत," या मीमांसकांच्या सिद्धान्तांताचा "यज्ञार्थ जीं कर्मे करावयाचीं तींहि फलाशा सोडून करावीं," अशी भगवद्गीतेनें जास्त भर घालून दुरुस्ती केली आहे. पण यावरहि अशी शंका येतें कीं, मीमांसकांच्या सिद्धान्तांत याप्रमाणें दुरुस्ती करण्याचा खटाटोप करून यज्ञयागादि गार्हस्थ्यवृत्ति चालू ठेवण्यापेक्षां कर्माच्या दगदगींतून सुटून मोक्षप्राप्ति होण्यास सर्व कर्मे सोडून संन्यास घेणें बरें नव्हे काय ? नाहीं; असें भगवद्गीतेचें या प्रश्नास साफ उत्तर आहे. कारण यज्ञचक्राशिवाय जगाचे व्यवहार चालावयाचे नाहींत. किंबहुना जगाच्या धारणपोषणार्थ हें चक्र ब्रह्मदेवानें प्रथम उत्पन्न केलें आहे; आणि जगाची सुस्थिति किंवा संग्रहच ज्या अर्थी भगवंतास इष्ट आहे, त्या अर्थी हें यज्ञचक्र कोणासहि सोडितां येत नाहीं आणि आतां हाच अर्थ पुढील श्लोकांतून वर्णिला आहे. 'यज्ञ' शब्द केवळ श्रौत यज्ञापुरताच या ठिकाणीं वापरला नसून त्यांत स्मार्त यज्ञांचा आणि चातुर्वर्ण्यादि यथाधिकार सर्व व्यावहारिक कर्मांचा समावेश होतो, हें या प्रकरणीं वाचकानें नेहमीं लक्षांत ठेविलें पाहिजे. ]

(१०) पूर्वी यज्ञासह प्रजा उत्पन्न करून ब्रह्मदेव (त्यांस) म्हणाला कीं, "या (यज्ञाच्या) योगानें तुम्ही वृद्धि पावा. हा तुमची कामधेनु म्ह० इच्छित मनोरथ पूर्ण करणारा होवो. (११) या यज्ञानें देवांची तुम्ही संभावना म्हणजे समृद्धि करीत जा; (व) ते देव (उलट) तुमची संभावना म्हणजे समृद्धि करोत. (याप्रमाणें) परस्परांची संभावना करीत होत्साते

इष्टान्भोगान्हि वो देवा दास्यन्ते यज्ञभाविताः ॥
तैर्दत्तानप्रदायैभ्यो यो भुंक्ते स्तेन एव सः ॥ १२ ॥

(दोघेहि) परम श्रेय ह्मणजे कल्याण प्राप्त करून घ्या." (१२) कारण, यज्ञानें संतुष्ट झालेले देव इच्छिलेले (सर्व) भोग तुम्हांला देतील. त्यांनीं दिलेलें त्यांना (परत) न देतां जो (केवळ स्वतःच) उपभोगितो तो खरोखरच चोर होय.

[ब्रह्मदेवानें ही सृष्टि म्हणजे देवादि सर्व लोक निर्माण केल्यावर या लोकांचें पुढें धारणपोषण कसें होईल अशी त्यास चिंता पडली. तेव्हां हजार वर्षें तप करून त्यानें भगवानास संतुष्ट केल्यावर भगवंतांनीं या लोकांच्या धारणासाठीं प्रवृत्तिपर यज्ञचक्र निर्माण केलें आणि देव व मनुष्यें या दोघांस त्याप्रमाणें वर्तन करून एकमेकांचें रक्षण करण्यास सांगितलें, असें महाभारतांतील नारायणीय धर्मांत वर्णन असून त्याचाच वरील श्लोकांत थोड्या फरकानें व शब्दभेदानें अनुवाद केलेला आहे (म. भा. शां. ३४०.३८ ते ६२ पहा). यावरून प्रवृत्तिपर भागवतधर्माचें तत्त्वच गीतेंत प्रतिपाद्य आहे, हा सिद्धान्त अधिक दृढ होतो. पण भागवतधर्मांत यज्ञातील हिंसा गर्ह्य मानिली असल्यामुळें (म. भा. शां. ३३६ व ३३७ पहा), पशुयज्ञाऐवजीं प्रथम द्रव्यमय यज्ञ सुरू होऊन, अखेर जपमय किंवा ज्ञानमय यज्ञच सर्वांत श्रेष्ठ, हें मत पुढें प्रचारांत आलेलें आहे (गी. ४. २३–३३). यज्ञ ह्म. चातुर्वर्ण्याची सर्व कर्में होत, आणि समाजाचें योग्य धारणपोषण होण्यास हीं यज्ञकर्में किंवा यज्ञचक्र नेहमीं सुरळीत चालू पाहिजे हें उघड आहे (मनु. १.८७ पहा). किंबहुना पुढें विसाव्या श्लोकांत वर्णिलेल्या लोकसंग्रहाचें यज्ञचक्र हें एक स्वरूप आहे. (गीतार. प्र. ११ पहा). म्हणून देवलोक व मनुष्यलोक या दोहोंच्याहि संग्रहार्थ भगवंतांनींच प्रथम निर्माण केलेलें

यज्ञशिष्टाशिनः सन्तो मुच्यन्ते सर्वकिल्बिषैः ।
भुंजते ते त्वघं पापा ये पचन्त्यात्मकारणात् ॥ १३ ॥
अन्नाद्भवन्ति भूतानि पर्जन्यादन्नसंभवः ।
यज्ञाद्भवति पर्जन्यो यज्ञः कर्मसमुद्भवः ॥ १४ ॥

हें लोकसंग्रहकारक कर्म मनुष्यांनीं पुढें चालू ठेवणें जरूर आहे असें स्मृतींतूनहि वर्णन असतें; आणि तोच अर्थ आतां पुढील श्लोकांत स्पष्ट करून दाखविला आहे—]

(१३) यज्ञ करून अवशिष्ट राहिलेल्या भागाचें ग्रहण करणारे सद्गृहस्थ सर्व पापांपासून मुक्त होतात. परंतु ( यज्ञ न करितां केवळ ) आपल्यासाठींच जे (अन्न) शिजविजात ते पापी लोक पाप भक्षण करीतात.

[ ऋग्वेद १०. ११७.६ या मंत्रांत हाच अर्थ असून "नार्यमणं पुष्यति नो सखायं केवलाघो भवति केवलादि"—जो अर्यमा किंवा सखा याचें पोषण करीत नाहीं, एकटाच भोजन करितो, तो केवळ पापी समजावा, असें त्यांत सांगितलें आहे. तसेंच मनुस्मृतींतहि " अघं स केवलं भुंक्ते यः पचत्यात्मकारणात् । यज्ञशिष्टाशनं ह्येतत्सतामन्नं विधीयते॥" (३. ११८)—जो आपल्याकरितांच (अन्न) शिजवितो तो केवळ पाप भक्षण करितो, यज्ञ करून जें शेष राहील त्यास 'अमृत' आणि इतर सर्व जेवून जें शेष राहील (भुक्तशेष) त्यास 'विघस' (मनु. ३. २८५) हें नांव असून, तेंच अन्न शिष्ट लोकांस विहित होय, असे श्लोक आहेत (गीं. ४. ३१ पहा). असो; यज्ञादि कर्मे केवळ तीळ तांदूळ अग्नींत जाळण्यासाठीं किंवा नुसत्या स्वर्गप्राप्तीसाठींहि नसून जगाचें धारणपोषण होण्यास त्यांची अवश्यकता कशी लागते, किंवा यज्ञावर सर्व जग कसें अवलंबून आहे, याचा आतां याहिपेक्षां अधिक खुलासा करितात—]

(१४) प्राणिमात्र अन्नापासून होतात; अन्न पर्जन्यापासून उद्भवतें; पर्जन्य यज्ञा पासून होतो; व यज्ञाचा उद्भव कर्मापासून होतो.

कर्म ब्रह्मोद्भवं विद्धि ब्रह्माक्षरसमुद्भवम् ।
तस्मात्सर्वगतं ब्रह्म नित्यं यज्ञे प्रतिष्ठितम् ॥ १५ ॥

[ मनुस्मृतींतहि याचप्रमाणें मनुष्याची व त्याच्या धारणास अवश्य लागणाऱ्या अन्नाची उत्पत्ति वर्णिली आहे. "यज्ञामधील अग्नींत दिलेली आहुति सूर्यास पोंचते व मग सूर्यापासून (ह्मणजे परंपरेनें यज्ञापासून पर्जन्य व पर्जन्यापासून अन्न व अन्नापासून प्रजा उत्पन्न होते," असा मनूचा श्लोक आहे (मनु. ३.७६); व तोच महाभारतांतहि आलेला आहे (म. भा. शां. २६२. ११ पहा). तैत्तिरीय उपनिषदांत (२.१) ही पूर्वपरंपरा याच्याहि मागें नेऊन "परमात्म्यापासून प्रथम आकाश व पुढें क्रमानें वायु, अग्नि, पाणी व पृथ्वी उत्पन्न होऊन पृथ्वीपासून ओषधि, ओषधींपासून अन्न व अन्नापासून पुरुष झाला," असा क्रम दिला आहे. यासाठीं त्याला अनुसरून प्राणीमात्राची कर्मापर्यंत सांगितलेली पूर्वपरंपरा त्याच्या प्रकृति व प्रकृतीच्या मागें अखेर थेट अक्षर ब्रह्मापर्यंत नेऊन आतां पुरी करितात—]

(१५) कर्माची उत्पत्ति ब्रह्मापासून म्हणजे प्रकृतीपासून ( आहे असें ) जाण, आणि हें ब्रह्म अक्षरापासून म्हणजे परमेश्वरापासून निघालें आहे. म्हणून सर्वगत ब्रह्मच नेहमीं यज्ञांत अधिष्ठित असतें ( असें समज ).

[ या श्लोकांत ब्रह्म या शब्दाचा अर्थ 'प्रकृति' असा न करितां कोणी 'वेद' असा करितात. "ब्रह्म म्हणजे वेद परमेश्वरापासून निघाले या अर्थानें हें वाक्य जरी खरें आहे, तरी "सर्वगत ब्रह्म यज्ञांत आहे" याचा अर्थ त्यानें नीट लागत नाहीं. म्हणून "मम योनिर्महत् ब्रह्म" (गी. १४. ३) या श्लोकांत 'ब्रह्म पदाचा 'प्रकृति' असा जो अर्थ आहे त्याला अनुसरून, 'ब्रह्म' शब्दानें येथेंहि जगाची मूलभूत जी प्रकृति तीच विवक्षित आहे, हा रामानुजभाष्यांतील अर्थ आह्मांस बरा वाटतो. शिवाय महाभारताच्या शांतिपर्वांत हेंच यज्ञाचें प्रकरण चालू

एवं प्रवर्तितं चक्रं नानुवर्तयतीह यः ।
अघायुरिंद्रियारामो मोघं पार्थ स जीवति ॥ १६ ॥

असतां " अनुयज्ञं जगत्सर्वं यज्ञश्चानुजगत्सदा " ( शां. २६७.३४ )— यज्ञामागून जग व जगामागोमाग यज्ञ—असें जें वर्णन आहे, त्याचीहि ब्रह्म म्हणजे प्रकृति असा अर्थ केल्यानें प्रस्तुत श्लोकाशीं एकवाक्यता होते. कारण जग म्हणजेच प्रकृति होय. परमेश्वरापासून प्रकृति आणि त्रिगुणात्मक प्रकृतीपासून जगांतील सर्व कर्म कसें निष्पन्न होतें, हें रहस्याच्या सातव्या व आठव्या प्रकरणांत सविस्तर सांगितलें आहे. तसेंच देवांनीं प्रथम यज्ञ करूनच सृष्टि निर्माण केली असें पुरुषसूक्तांतहि वर्णन आहे. ]

(१६) याप्रमाणें (जगाच्या धारणार्थ) सुरू केलेलें चक्र, (म्हणजे कर्माचें अगर यज्ञाचें रहाटगाडगें) या जगांत जो पुढें पुढें चालवीत नाहीं, त्याचें आयुष्य पापरूप असून या इंद्रियलंपटाचें (म्हणजे देवांना न देतां स्वतःच चैन करणाराचें) जिणें हे पार्था ! व्यर्थ होय.

[ ब्रह्मदेवानेंच——मनुष्यानें नव्हे—लोकांच्या धारणपोषणार्थ यज्ञमय कर्म किंवा चातुर्वर्ण्याची वृत्ति उत्पन्न केली असून, सृष्टिक्रम चालण्यास (श्लोक १४) व त्याबरोबरच स्वतःचा निर्वाह होण्यास (श्लोक ८) मिळून दोन्ही कारणासाठीं त्या वृत्तीची जरूर असल्यामुळें हें यज्ञचक्र अनासक्त बुद्धीनें या जगांत सतत चालू ठेविलें पाहिजे, असें यावरून सिद्ध झालें म्हणजे मीमांसकांचें किंवा त्रयीधर्मांतलें कर्मकांड (यज्ञचक्र) गीताधर्मांत अनासक्त बुद्धीच्या युक्तीनें कसें कायम ठेविलें आहे तें सांगितलें ( गीतार. प्र. ११ पृ. ३४२–३४४ पहा ). परंतु आत्मज्ञानी पुरुषास येथेंच मोक्ष प्राप्त होत असून जें काय मिळवावयाचें तें सर्व त्याला मिळालें असल्यामुळें त्याला या जगांत कोणतेंच कर्म करण्याची जरूर रहात नाहीं, व त्यानें करूंहि नये, अशी कित्येक संन्यासमार्गीय

§§ यस्त्वात्मरतिरेव स्यादात्मतृप्तश्च मानवः ।
आत्मन्येव च संतुष्टस्तस्य कार्यं न विद्यते ॥ १७ ॥
नैव तस्य कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन ।
न चास्य सर्वभूतेषु कश्चिदर्थव्यपाश्रयः ॥ १८ ॥

वेदान्ती यावर शंका काढीत असतात. यासाठीं तीवर गीतेचें उत्तर काय तें आतां पुढील तीन श्लोकांत सांगतात—]

(१७) परंतु जो मनुष्य केवळ आत्म्यांतच रत, आत्म्यांतच तृप्त, आणि आत्म्याचे ठायींच संतुष्ट झाला त्याला (स्वतःचें म्हणून) कांहीं (शिल्लक) रहात नसतें; (१८) तसेंच येथें म्हणजे या जगांत (एखादी गोष्ट केल्यानें त्याचा कांहीं नफा नसतो आणि न केल्यानेंहि नसतो, आणि सर्व भूतांचे ठायीं त्याचा (स्वतःचा म्हणून) कांहीं अर्थ गुंतून राहिलेला नसतो (१९) तस्मात् म्हणजे ज्ञानी पुरुष याप्रमाणें कसलीच अपेक्षा ठेवीत नसल्या मुळें तूंहि (फलाचे ठायीं) आसक्ति न ठेवितां (आपलें) कर्तव्यकर्म नेहमी करीत जा. कारण आसक्ति सोडून कर्म करीत असणाऱ्या पुरुषाला परमगति मिळते.

[१७ ते १९ या तीन श्लोकांचा टीकाकारांनीं फारच विपर्यास केला असल्यामुळें त्यांचा सरळ भावार्थ काय तो प्रथम सांगतों. तिन्ही श्लोक मिळून हेत्वनुमानयुक्त एक वाक्य आहे. पैकीं १७ व १८ व्या श्लोकांत ज्ञानी पुरुषानें कर्म न करण्याचीं जीं कारणें सामान्यतः दाखविण्यांत येतात त्यांचा प्रथम अनुवाद करून त्यावरून गीता जें अनुमान काढिते तें 'तस्मात्' हा कारणबोधक शब्द प्रथम घालून १९ व्या श्लोकांत दिलें आहे. निजणें, बसणें, उठणें, किंबहुना जिवंत रहाणें इ० कर्मे या जगांत सोडूं म्हटल्यानें सुटत नाहींत. म्हणून कर्मे सोडिल्यानें नैष्कर्म्य होत नसून सिद्धि मिळविण्याचाहि तो उपाय नव्हे. असें या अध्यायाच्या आरंभी चवथ्या व पांचव्या श्लोकांत स्पष्ट म्हटलें आहे.

तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचार।

परंतु यावर संन्यासमार्गीयांचा पुढें अशी कोटि आहे कीं, आह्मी सिद्धि मिळविण्यासाठीं कर्मे सोडितों असें नाहीं. कोणीहि झाला तरी या जगांत जें कांहीं करितो तें आपल्या किंवा दुसऱ्याच्या फायद्यासाठीं करितो. पण मनुष्याचें स्वतःचें परमसाध्य जी सिद्धावस्था किंवा मोक्ष तो ज्ञानी पुरुषास त्याच्या ज्ञानानें प्राप्त झालेला असतो; व त्यामुळें त्याला तदुत्तर दुसरें कांहीं मिळवावयाचें रहात नसून (श्लोक १७), कोणतीहि गोष्ट केली काय आणि न केली काय दोन्ही त्याला सारखींच असतात. बरें, लोकोपयोगार्थ त्यानें कर्में केली पाहि-जेत असें म्हणावें तर लोकांच्या ठायींहि त्याचें कांहीं अडलें नसतें (श्लो. १८). मग त्यानें कर्म करावें कशाला? गीतेचें याला असें उत्तर आहे कीं, कर्म केलें वा न केलें हीं दोन्ही जर तुला सारखींच तर कर्म न करण्याचा तरी तुझा आग्रह कशाला? जें जें शास्त्रतः प्राप्त होईल तें आग्रहशून्य बुद्धीनें करून मोकळा हो म्हणजे झालें. या जगांत कर्म कोणालाच सुटलें नाहीं; मग तो ज्ञानी असो वा अज्ञानी असो. कर्म तर चुकत नाहीं आणि ज्ञात्याला तें स्वतःसाठीं नको! दिसण्यांत ही एक मोठीच अडचण वाटते. पण गीतेला हें कोडें कठिण वाटत नसून गीता असें सांगते कीं, कर्म ज्या अर्थी चुकत नाहीं त्या अर्थी तें केलेंच पाहिजे. पण स्वार्थबुद्धि उरली नाहीं म्हणूनच आतां तें निःस्वार्थ म्हणजे निष्काम बुद्धीनें कर म्हणजे झालें. आणि ह्याच उपदेश 'तस्मात्' हें पद घालून १९ व्या श्लोकांत अर्जुनास केला असून त्याच्या दृढीकरणार्थ सर्वांत श्रेष्ठ ज्ञानी जे भगवान् त्यांस कांहीं कर्तव्य राहिलें नसतांहि ते कर्मच करितात, हा दृष्टान्त पुढें २२ व्या श्लोकांत दिला आहे. सारांश, ज्ञानी पुरुषाची जी स्थिति संन्यासमार्गीय लोक वर्णितात तीच खरी धरून, तीवरून कर्मसंन्यासपक्ष सिद्ध न होतां उलट सदैव निष्काम कर्में करण्याच्या पक्षासच जास्त बळकटी येते, असें गीतेचें म्हणणे आहे.

असक्तो ह्याचरन्कर्म परमाप्नोति पूरुषः ॥ १९ ॥

परंतु कर्मयोगांतील हा युक्तिवाद व सिद्धान्त संन्यासमार्गीय टीकाकारांस मान्य नसल्यामुळें वरील कार्यकारणभावास, किंवा एकंदर अर्थप्रवाहास अगर पुढें सांगितलेल्या भगवंताच्या दृष्टान्तासहि ( श्लोक ७. ८,९,२२, २५ व ३० पहा ) न जुमानतां, त्यांनीं हे तीन श्लोक फोडून स्वतंत्र मानिले आहेत; आणि त्यापैकीं पहिल्या दोन श्लोकांत "ज्ञानी पुरुषाला स्वतःचें कांहीं कर्तव्य रहात नाहीं" इ० जो निर्देश आहे तोच गीतेचा अखेरचा सिद्धान्त करून त्यावरून भगवान् ज्ञानी पुरुषास कर्में सोडण्यास सांगतात, असें प्रतिपादन केलें आहे ! पण मग तिसऱ्या म्हणजे एकोणिसाव्या श्लोकांत "आसक्ति सोडून कर्म कर" असा जो अर्जुनास लागलीच उपदेश केला आहे तो विलग पडून त्याची उपपत्ति लागत नाहीं. ही अडचण दूर होण्यासाठीं अर्जुनाला कर्म कर म्हणून जो उपदेश केला तो अर्जुन अज्ञानी म्हणून केला असें या टीकाकारांनीं आपलें समाधान करून घेतलें आहे ! पण इतकें झालें तरी १९ व्या श्लोकांतील 'तस्मात्' हें पद निरर्थक पडून याच अध्यायांतील पूर्वापर संदर्भास, आणि गीतेंत अनेक ठिकाणीं ज्ञानी पुरुषानेंहि आसक्ति सोडून कर्म करावें असे उल्लेख आहेत त्यांस, अगर भगवानांनीं पुढें दिलेल्या स्वतःच्या दृष्टान्तासहि हा अर्थ विरुद्ध पडतो तो पडतोच ( गी. २,४७; ३.७,२५; ४. २३;६.१;१८.६–९; आणि गी. र. प्र. ११ पृ. ३१९–३२२ पहा ). शिवाय कर्में करूनहि ज्यामुळें तीं बंधक होत नाहींत ( गी. २. ३९ ) त्या कर्मयोगाचेंच विवेचन या अध्यायांत चालू असतां त्यात मध्येंच उपटसुळासारखें "कर्में सोडणें उत्तम" असें कोणीहि समंजस मनुष्य सांगणार नाहीं. मग भगवानाची गोष्ट कशाला ? म्हणून निव्वळ सांप्रदायिक आग्रहाचें व ओढाताणीचे हे अर्थ ग्राह्य धरितां येत नाहींत जीवन्मुक्त ज्ञानी पुरुषानेंहि कर्में करावीं हा अर्थ योगवासिष्ठांत वर्णिला

§ § कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादयः ।

असून मुक्तानें तसें कां करावें याचें कारण मला सांगा या रामाच्या प्रश्नास वसिष्ठांनीं—

ज्ञस्य नार्थः कर्मत्यागैः नार्थः कर्मसमाश्रयैः ।
तेन स्थितं यथा यद्यत्तत्तथैव करोत्यसौ ॥

" ज्ञ म्हणजे ज्ञानी पुरुषाला कर्म सोडण्यापासून किंवा करण्यापासूनहि कांहीं फायदा मिळावयाचा नसतो, म्हणून (तेन) तो जें जसें प्राप्त होईल तसें करीत असतो, " (योग. ६. उ. १९९.४) असें उत्तर दिलें असून, पुनः या ग्रंथाच्या शेवटच्या उपसंहारांत—

मम नास्ति कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन ।
यथाप्राप्तेन तिष्ठामि ह्यकर्मणि क आग्रहः ॥

"मला कोणतीहि गोष्ट केली काय आणि न केली काय सारखीच" असें गीतेच्याच शब्दानीं प्रथम कारण दाखवून दोन्ही गोष्टी जर सारख्याच तर "कर्म न करण्याचा तरी आग्रह कशाला ? जें जें शास्त्रतः प्राप्त होईल. तें तें मी करीत आहें," असें दुसऱ्याच ओळींत ह्मटलें आहे (यो. ६ उ.२१६.१४). तसेंच याच्या पूर्वीं "नैव तस्य कृतेनार्थो॰" इ. गीतेंतील श्लोकच योगवासिष्ठांत शब्दशः घेतलेला असून पुढील श्लोकांत "यद्यथा नाम संपन्नं तत्तथाऽस्त्वितरेण किम्"–म्हणून जें प्राप्त होईल तेंच (जीवन्मुक्त) करीत असतो, दुसरें पहात बसत नाहीं— असें ह्मटलें आहे. (यो. ६ उ. १२५.४९.५०). योगवासिष्ठांतच नव्हे, तर गणेश गीतेंतहि ह्याच अर्थ प्रतिपाद्य असतां—

किंचिदस्य न साध्यं स्यात् सर्वजंतुषु सर्वदा ।
अतोऽसक्ततया भूप कर्तव्यं कर्म जंतुभिः ॥

"त्याचें इतर प्राणिमात्रांत कांहीं साध्य राहिलेलें नसतें; या कारणास्तव (अत;) हे राजा ! लोकांनीं आपापलें कर्तव्य असक्त बुद्धीनें केलें पाहिजे"–

लोकसंग्रहमेवापि संपश्यन्कर्तुमर्हसि ॥ २० ॥

असा श्लोक आहे (गणेशगीता २. १८) यावरून प्रकृतस्थलीं गीतेंतील तीन श्लोकांतला जो कार्यकारणसंबंध आम्ही वर दाखविला आहे तोच बरोबर आहे असें दिसून येईल. गीतेंतील तीन श्लोकांऐवजीं योगवासिष्ठांत सर्व अर्थ एकाच श्लोकांत वर्णिला असल्यामुळें त्यांतील कार्यकारणभावाबद्दल शंका घेण्यास कांहींच जागा रहात नाहीं. गीतेंतील हाच युक्तिवाद महायान पंथांतील बौद्ध ग्रंथकारांनींहि मागाहून उचललेला आहे ( गी. र. पृ. ५६३ व ५७७ पहा ) असो. ज्ञानी पुरुषास स्वार्थ राहिला नसतो याचमुळें त्यानें आपलें कर्तव्य निष्काम बुद्धीनें केलें पाहिजे, अशा प्रकारचें निष्काम कर्म मोक्षाच्या आड न येतां त्यानेंच सिद्धि मिळते, असें जें वर सांगितलें त्याच्या पुष्टीकरणार्थ आतां दाखला सांगतात—]

(२०) जनकादिकांनींहि याप्रमाणें कर्मानेंच सिद्धि मिळविली. तसेंच लोकसंग्रहाकडे दृष्टि देऊनहि तुला कर्म करणेंच उचित होय.

[निष्काम कर्मानीं सिद्धि मिळते त्याचा दाखला या श्लोकाच्या पहिल्या चरणांत सांगितला असून दुसऱ्या चरणापासून निराळ्या प्रकारच्या प्रतिपादनास सुरुवात झाली आहे. ज्ञानी पुरुषाचें लोकांचे ठायीं कांहीं अडलें नसलें तरीहि, ज्ञानी पुरुषास कर्म चुकत नाहीं म्हणून त्यानें निष्काम कर्म करावें असें सिद्ध केलें. पण कर्म करणें चुकत नाहीं म्हणून तें केलें पाहिजे, हा युक्तिवाद कायदेशीर असला तरी सामान्य मनुष्याची तेवढ्यानेंच व्हावी तितकी पूर्ण खात्री होत नाहीं. एकूण अपरिहार्य म्हणूनच कर्म करावयाचें, त्यांत दुसरें कांहीं साध्य नाहीं, अशी शंका मनांत येते. म्हणून आपल्या कर्मानें लोकसंग्रह करणें हें ज्ञानी पुरुषाचे एक अत्यंत महत्त्वाचें असें या जगांतील प्रत्यक्ष साध्य आहे, असें दाखविण्यास या श्लोकाच्या

यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः ।
स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ॥ २१ ॥

दुसऱ्या चरणापासून सुरुवात झाली आहे. "लोकसंग्रहमेवापि" यांतील 'एवापि' या पदांचें तात्पर्य हेंच असून यावरून निराळ्या प्रकारच्या प्रतिपादनास आतां सुरुवात झाली आहे असें स्पष्ट होतें. 'लोकसंग्रह' या शब्दांत 'लोक' याचा अर्थ व्यापक असून केवळ मनुष्यज्ञातिसच नव्हे, तर सर्व जगाला सन्मार्ग लावून, त्याचा नाश न होऊं देतां, संग्रह म्हणजे चांगल्या रीतीनें धारण, पोषण, पालन किंवा बचाव करणें, या सर्व गोष्टींचा लोकसंग्रह शब्दांत समावेश होतो, इत्यादि गोष्टींचा गीतारहस्याच्या अकराव्या प्रकरणांत (पृ. ३२६–३३४) आम्हीं सविस्तर विचार केला असल्यामुळें त्याची येथें पुनरुक्ति करीत नाहीं. लोकसंग्रह करण्याचें हें कर्तव्य किंवा अधिकार ज्ञानी पुरुषाकडे कां येतो तें प्रथम सांगतात—]

(२१) श्रेष्ठ (म्हणजे आत्मज्ञानी कर्मयोगी) पुरुष जें जें करितो तें तेंच इतर म्हणजे सामान्य लोक करीत असतात. तो जी गोष्ट प्रमाण म्हणून अंगीकारितो तिलाच लोक अनुसरतात.

[तैत्तिरीयोपनिषदांतहि प्रथम 'सत्यं वद,' 'धर्मं चर' इ० उपदेश केल्यावर अखेर—"संसारांत एखाद्या प्रसंगीं कसें वागावें याचा तुला संशय पडल्यास ज्ञानी, युक्त व धर्मिष्ठ ब्राह्मण त्या बाबतींत जसे वागत असतील त्याप्रमाणे वागत जा" असें सांगितलें आहे (तै. १. ११. ४); आणि याच अर्थाचा एक श्लोक नारायणीय धर्मांतहि आलेला आहे (म. भा. शां. ३४१. २५). मराठींत "जसा वर्तती लोककल्याणकारी । जगीं वर्तती सर्वही त्या प्रकारीं ॥" असा जो समर्थांचा श्लोक आहे तो याच श्लोकाचें भाषान्तर आहे. समर्थांचा हा लोककल्याणकारी पुरुष म्हणजेच गीतेंतील 'श्रेष्ठ' कर्मयोगी होय. श्रेष्ठ या शब्दाचा

न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किंचन ।
नानवाप्तमवाप्तव्यं वर्त एव च कर्मणि ॥ २२ ॥
यदि ह्यहं न वर्तेयं जातु कर्मण्यतंद्रितः ।
मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥ २३ ॥
उत्सीदेयुरिमे लोका न कुर्यां कर्म चेदहम् ।
संकरस्य च कर्ता स्यामुपहन्यामिमाः प्रजाः ॥ २४ ॥

'आत्मज्ञानी संन्यासी' असा अर्थ नाहीं ( गी. ५. २ पहा ). आत्मज्ञानी पुरुषाची स्वार्थबुद्धि सुटली तरी लोककल्याणाचीं कर्मे त्यास सुटत नाहींत हाच अर्थ स्वतःचें उदाहरण सांगून भगवान् आतां अधिक दृढ करितात—]

(२२) हे पार्था! ( असें पहा कीं, ) माझें ( म्हणून ) त्रिभुवनांत ( मला ) कांहीहि कर्तव्य ( उरलेलें ) नाहीं; किंवा अप्राप्त अशी एखादी वस्तु मिळवावयाची ( राहिलेली ) नाहीं: तथापि मी कर्मेंच करीत आहे ( २३ ) कारण, मी जर कदाचित् कर्मांच्या ठायीं आळस सोडून वर्तणार नाहीं तर सर्व मनुष्यें हे पार्था! सर्व प्रकारें माझ्याच मार्गाचें अनुकरण करतील. ( २४ ) मीं कर्म न केलें तर हे लोक उत्सन्न म्हणजे नष्ट होतील, मी संकर करणारा होईन व या प्रजाजनांचा माझ्या हातून घात होईल.

[ लोकसंग्रह म्हणजे उगाच कांहीं तरी थोतांड नव्हे, हें भगवंतांनीं स्वतःच्या उदाहरणानें या श्लोकांत फार चांगल्या रीतीनें स्पष्ट करून दाखविलें आहे. तसेंच ज्ञान प्राप्त झाल्यावर ज्ञात्याचें जरी कांहीं कर्तव्य उरलें नसलें तरीहि सर्व कर्म निष्काम बुद्धीनें त्यानें अवश्य केलें पाहिजे, असा जो आम्हीं १७ ते १९ श्लोकांचा वर अर्थ केला आहे तोहि भगवंताच्या स्वतःच्या या दृष्टान्तावरून पूर्णपणें सिद्ध होतो. किंबहुना एरवीं हा दृष्टान्तच विलग व निरर्थक होईल (गी. र. पृ. ३२० पहा ). यज्ञचक्र बुडून जगाचें कांहीं होवो

§§ सक्ताः कर्मण्यविद्वांसो यथा कुर्वन्ति भारत ।
कुर्याद्विद्वांस्तथाऽसक्तश्चिकीर्षुर्लोकसंग्रहम् ॥ २५ ॥
न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसंगिनाम् ।
जोषयेत्सर्वकर्माणि विद्वान्युक्तः समाचरन् ॥ २६ ॥

त्याची परवा न करितां सांख्यमार्गातील ज्ञानी पुरुष सर्व कर्में सोडून देतात; आणि कर्ममार्गातील ज्ञानी पुरुष स्वतःसाठीं जरूर नसली तरी लोकसंग्रह हें महत्त्वाचें व अवश्यक साध्य समजून त्यासाठीं स्वधर्माप्रमाणें आपलीं सर्व कामें चालू ठेवीत असतात, हा या दोन मार्गांत मोठा भेद आहे (गीतारहस्य प्रकरण ११. पृ. ३५१ पहा). भगवान् स्वतः काय करितात तें सांगितलें. आतां यापुढें ज्ञानी व अज्ञानी यांच्या कर्मांतील भेद दाखवून अज्ञान्यास सुधारण्यासाठीं ज्ञात्यानें काय करणें अवश्य आहे तें सांगतात—]

(२५) हे अर्जुना ! (म्हणून) लोकसंग्रह करूं इच्छिणाऱ्या ज्ञानी पुरुषानें (व्यावहारिक) कर्मांत आसक्त झालेले अज्ञानी लोक ज्याप्रमाणें वागतात त्याप्रमाणें पण आसक्ति सोडून वागलें पाहिजे. (२६) कर्माचे ठायीं आसक्त झालेल्या अडाणी लोकांच्या बुद्धीचा ज्ञानी पुरुषानें भेद करूं नये; (आपण स्वतः) युक्त म्हणजे योगयुक्त व सर्व कर्में करणारा होऊन लोकांना तीं खुषीनें करावयास लावावें.

[ अज्ञानी लोकांच्या बुद्धीचा भेद करूं नये असा या श्लोकाचा अर्थ असून तोच अर्थ पुढें २९ व्या श्लोकांतहि पुनः सांगितला आहे. परंतु याचा अर्थ लोकांना अज्ञानांत ठेवावें असा नाहीं. २५ व्या श्लोकांत ज्ञानी पुरुषानें लोकसंग्रह केला पाहिजे असें सांगितलें आणि लोकसंग्रह म्हणजेच लोकांना शहाणे करून सोडणें असा अर्थ आहे. पण यावर कोणी अशी शंका घेईल कीं, लोकसंग्रह जरी कर्तव्य असला तरी त्यासाठीं ज्ञानी पुरुषानें स्वतः कर्में करण्याची जरूर नाहीं. लोकांना ज्ञान सांगि

प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः ।

तलें म्हणजे भागण्यासारखें आहे. याला उत्तर म्हणून भगवान् असें सांगतात कीं, सदाचरणाची ज्या लोकांना दृढ संवय लागलेली नसते ( आणि सामान्य लोक याच वर्गांतले असतात ) त्यांना तोंडानें नुस्तें ज्ञानच सांगितलें तर हे लोक आपल्या गैर वर्तनाच्या समर्थनार्थच सदर ब्रह्मज्ञानाचा दुरुपयोग करितात, व उलट "अमुक ज्ञानी पुरुष असें म्हणतो" अशा नुस्त्या चावटपणाच्या गोष्टी सांगूं लागतात, असें नेहमीं दृष्टीस पडतें. तसेंच ज्ञानी पुरुषानें कर्में अजीबात सोडिलीं म्हणजे अज्ञानी लोकांना निरुद्योगी होण्यास तो एक दाखलाच होतो. लोक अशा रीतीनें तर्कटी, चावट किंवा निरुद्योगी होणें यालाच बुद्धिभेद असें ह्मटलें आहे; आणि लोकांच्या बुद्धीचा अशा प्रकारें भेद करणें ज्ञात्या पुरुषास योग्य नाहीं. म्हणून जो पुरुष ज्ञानी झाला त्यानें लोकसंग्रहार्थ म्हणजे लोकांना शहाणे व सदाचरणी करण्यासाठीं आपण स्वतः संसारांत राहून लोकांस निष्काम कर्मांचा म्हणजे सदाचरणाचा प्रत्यक्ष धडा घालून देणें व त्यांच्याकडून त्याप्रमाणें आचरण करविणें हें त्याचें या जगांतील महत्त्वाचें काम आहे असा गीतेंत सिद्धान्त केलेला आहे ( गीतार. पृ. ४० पहा ). परंतु गीतेचा हा अभिप्राय मनांत न घेतां "अडाणी लोकांनीं अडाणी राहूनच आपलीं कर्में करावीं म्हणून ज्ञानी पुरुषानें त्यांच्याप्रमाणें कर्में करण्याचें सोंग आणावें," असा कित्येक टीकाकार या श्लोकाचा विपरीत अर्थ करीत असतात ! जणूं काय गीता दंभाचरण शिकविण्यासाठीं किंवा लोकांना अडाणी ठेवून जनावराप्रमाणें त्यांच्याकडून कर्में करून घेण्यासाठींच प्रवृत्त झाली आहे ! ज्ञानी पुरुषानें कर्में करूं नयेत असा ज्यांच्या बुद्धीचा दृढनिश्चय आहे, त्यांना लोकसंग्रह, हें एक सोंग वाटणें स्वाभाविक आहे; पण गीतेचा खरा अभिप्राय तसा नाहीं. लोकसंग्रह हें ज्ञानी पुरुषाच्या कामांपैकीं एक महत्त्वाचें काम असून, लोकांना अडाणी

अहंकारविमूढात्मा कर्ताहमिति मन्यते ॥ २७ ॥
तत्त्ववित्तु महाबाहो गुणकर्मविभागयोः ।
गुणा गुणेषु वर्तन्त इति मत्वा न सज्जते ॥ २८ ॥
प्रकृतेर्गुणसंमूढाः सज्जन्ते गुणकर्मसु ।
तानकृत्स्नविदो मंदान्कृत्स्नविन्न विचालयेत् ॥ २९ ॥

ठेवण्याकरितां नव्हे तर उत्तम कित्ता घालून देऊन त्यांस सुधारण्यासाठीं ज्ञानी पुरुषानेंहि कर्मेंच केलीं पाहिजेत असें भगवान् सांगत आहेत ( गीतारहस्य प्र. ११, १२ पहा ) असो. लोकसंग्रहार्थं आत्मज्ञानी पुरुष याप्रमाणें सांसारिक कर्में करूं लागला तर तोहि अज्ञानीच बनला अशी शंका येण्याचा संभव आहे; म्हणून ज्ञानी व अज्ञानी दोघेहि संसारी बनले तरी त्यांच्या वर्तनांत फरक कोणता व अडाण्यानें त्यापासून काय शिकावयाचें तें आतां स्पष्ट करून सांगतात—]

(२७) प्रकृतीच्या ( सत्त्व, रज व तम या ) गुणांनीं सर्व प्रकारें कर्में होत असतां, अहंकारानें वेडावलेला ( अज्ञानी पुरुष ) मी कर्ता असें मानितो; ( २८ ) परंतु हे महाबाहो अर्जुना ! गुण आणि कर्में हीं दोन्ही आपल्याहून भिन्न आहेत हें तत्त्व जाणणारा ( ज्ञानी पुरुष ), गुणांचा हा आपआपसांत खेळ चालला आहे असें समजून, त्यांत आसक्त होत नाहीं. ( २९ ) प्रकृतीच्या गुणांनीं वेडे झालेले लोक गुण व कर्में यांतच आसक्त होत असतात; अशा असर्वज्ञ व मंद लोकांस सर्वज्ञ पुरुषानें ( आपल्या कर्मत्यागानें भलत्या मार्गास लावून ) बिघडवूं नये.

[ श्लोक २६ यांतील अर्थाचाच अनुवाद येथें केला आहे. प्रकृति निराळी आणि आत्मा निराळा, प्रकृति किंवा माया सर्व कांहीं करिते, आत्मा कांहीं करीत नाहीं, आणि हें ज्यानें ओळखिलें तोच बुद्ध किंवा ज्ञानी झाला, त्याला कर्मांचा बंध घडत नाहीं, इ० वरील श्लोकांत दिलेले सिद्धान्त मूळ कापिलसांख्यशास्त्रांतले असून त्यांचें पूर्ण विवेचन

§§ मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्याध्यात्मचेतसा ।
निराशीर्निर्ममो भूत्वा युद्ध्यस्व विगतज्वरः ॥ ३० ॥
§§ ये मे मतमिदं नित्यमनुतिष्ठन्ति मानवाः ।
श्रद्धावन्तोऽनसूयन्तो मुच्यन्ते तेऽपि कर्मभिः ॥ ३१ ॥
ये त्वेतदभ्यसूयन्तो नानुतिष्ठन्ति मे मतम् ।
सर्वज्ञानविमूढांस्तान्विद्धि नष्टानचेतसः ॥ ३२ ॥

गीतारहस्याच्या ७ व्या प्रकरणांत (पृ. १६२–१६४) केलें आहे तें पहा. २८ व्या श्लोकांत गुण म्हणजे इंद्रियें गुणांत म्ह० विषयांत वर्ततात असा अर्थ कित्येक घेतात. हा अर्थ कांहीं चुकीचा नाहीं; कारण, अकरा इंद्रियें व शब्दस्पर्शादि पांच विषय हे सांख्यशास्त्राप्रमाणें मूळ प्रकृतीच्या २३ गुणांपैकींच गुण होत. पण यापेक्षां प्रकृतीच्या एकंदर सर्व ह्म० चोवीस गुणांना उद्देशूनच “ गुणा गुणेषु वर्तन्ते ” हा सिद्धान्त केलेला आहे ( गी. १३. १९–२२; व १४.२३ पहा ). आम्हीं त्यांचें शब्दशः व व्यापकरीत्या भाषांतर दिलें आहे. ज्ञानी आणि अज्ञानी यांनीं एकच कर्म केलें तरी त्यांत याप्रमाणें बुद्धिदृष्ट्या मोठा भेद असतो ( गीतार. पृ. ३०८ व ३२६ ) असें सांगून, भगवान् या सर्व विवेचनाचें सार म्हणून आतां असा उपदेश करितात कीं—]

(३०) ( यासाठीं हे अर्जुना ! ) माझ्या ठायीं अध्यात्मबुद्धीनें सर्व कर्मांचा संन्यास म्हणजे अर्पण करून आणि ( फलाची ) आशा व ममत्व सोडून तूं बिनदिक्कत युद्ध कर !

[ या उपदेशाप्रमाणें वागलें तर फळ काय आणि न वागलें असतां काय गति होते तें आतां सांगतात—]

(३१) दोष काढीत न बसतां जे श्रद्धावान् ( पुरुष ) माझ्या या मताप्रमाणें नित्य वर्तन करितात, तेहि कर्मांपासून म्हणजे कर्मबंधापासून मुक्त होतात. (३२) परंतु दोषदृष्टीनें विकल्प काढून या माझ्या मताप्रमाणें

§§ सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि ।
प्रकृतिं यान्ति भूतानि निग्रहः किं करिष्यति ॥ ३३ ॥
इंद्रियस्येंद्रियस्यार्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ ।
तयोर्न वशमागच्छेत्तौ ह्यस्य परिपंथिनौ ॥ ३४ ॥

जे वर्तन करीत नाहींत, ते सर्वज्ञानविमूढ म्हणजे पक्के मूर्ख अविवेकी बुडाले म्हणून समज.

[ निष्काम बुद्धीनें सर्व कर्में करण्यास सांगणारा कर्मयोगच श्रेयस्कर याबद्दल वर अन्वयव्यतिरेकानें जी फलश्रुति सांगितली आहे, तीवरून गीतेंतील प्रतिपाद्य विषय काय तें पुरें व्यक्त होतें. याच कर्मयोगनिरूपणाच्या परिपूर्त्यर्थ भगवान् प्रकृतीच्या प्राबल्याचें व तन्निरोधार्थ इंद्रियनिग्रहाचें वर्णन करितात—

(३३) ज्ञानवान पुरुष सुद्धां आपल्या प्रकृतिस्वभावानुरूप वागतो. सर्व भूतें ( आपआपल्या ) प्रकृतीच्या वळणावर जातात; (तेथें) निग्रह म्हणजे जबरी काय करणार? (३४) इंद्रिय आणि ( शब्दस्पर्शादि ) विषय यांच्यामधील प्रीति व द्वेष (हीं दोन्हीं) व्यवस्थित म्हणजे मूळचींच ठरलेलीं आहेत. या प्रीतिद्वेषांच्या ताब्यांत आपण जाऊं नये; ( कारण ) ते मनुष्याचे (वाटमारे) शत्रु होत.

[ तेतिसाव्या श्लोकांत 'निग्रह' शब्दाचा 'नुस्तें संयमन' असा अर्थ नसून 'जबरी' किंवा 'हट्ट' असा अर्थ आहे. इंद्रियांचें योग्य संयमन गीतेस इष्ट आहे; पण हट्टानें किंवा जबरीनें इंद्रियांच्या स्वाभाविक वृत्तिहि अजीबात मारून टाकणें शक्य नाहीं असें येथें सांगणें आहे. उदाहरणार्थ, देह आहे तोंपर्यंत भूक तहान इ० धर्म प्रकृतिसिद्ध असल्यानें मनुष्य कितीहि ज्ञानी असला तरी भूक लागली म्हणजे भिक्षा मागावयास तरी तो बाहेर पडतो; म्हणून इंद्रियें

§§ श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात्।
स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः॥ ३५॥

जबरीनें अजीबात मारण्याचा वृथा हट्ट न धरितां योग्य संयमानें तीं आपल्या ताब्यांत ठेवून त्यांच्या स्वभावसिद्ध वृत्तींचा लोकसंग्रहार्थ उपयोग करून घेणें, हेंच शहाण्या पुरुषाचें कर्तव्य होय असा श्लोकाचा भावार्थ आहे. तसेंच सुख व दुःख हे दोन्ही विकार स्वतंत्र आहेत, एक दुसऱ्याचा अभाव नाहीं, हेंहि ३४ व्या श्लोकांतील 'व्यवस्थित' या पदावरून उघड होतें (गीतार. प्र. ४, पृ. १०० व १३३ पहा). प्रकृतीच्या म्हणजे सृष्टीच्या अखंड खटाटोपांत आपल्याला नकोत अशा गोष्टीहि कित्येकदां आपणांस करणें भाग पडतें (गी. १८.५९ पहा); नाहीं म्हणून चालत नाहीं. अशा वेळीं ज्ञानी पुरुष हीं कर्मे निरिच्छ बुद्धीनें केवळ कर्तव्य म्हणून करून त्यांच्या पापपुण्यापासून अलिप्त रहातो, आणि अडाणी यांतच आसक्ति ठेवून दुःख पावतो हा दोहोंमधला भासकवीनें वर्णिल्याप्रमाणें बुद्धिदृष्ट्या मोठा भेद आहे. परंतु आतां अशी शंका येते कीं इंद्रियें, जबरीनें मारून कर्मत्याग न करितां निःसंग बुद्धीनें सर्व कर्मे करावीं असें जरी सिद्ध झालें, तरी ज्ञानी पुरुषानें युद्धासारखें हिंसात्मक घोर कर्म करण्यापेक्षां शेती, व्यापार किंवा भिक्षा इत्यादि निरुपद्रवी व सौम्य कर्म करणें अधिक प्रशस्त नव्हे काय? भगवान् याचें हें उत्तर देतात कीं—]

(३५) परक्याचा धर्म सुखानें आचरितां आला तरी त्यापेक्षां आपला धर्म म्हणजे चातुर्वर्ण्यविहित कर्म विगुण म्हणजे सदोष असलें तरी तेंच अधिक श्रेयस्कर आहे. स्वधर्माप्रमाणें (वागत असतां) मरण आलें तरी त्यांत कल्याण आहे; (परंतु) परक्याचा धर्म भयंकर होय!

[स्वधर्म म्हणजे स्मृतिकारांच्या चातुर्वर्ण्यव्यवस्थेनें प्रत्येकाला शास्त्रानें लावून दिलेला धंदा असा अर्थ आहे; मोक्षधर्म असा अर्थ नव्हे. गुण-

अर्जुन उवाच ।

§§ अथ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पूरुषः ।

कर्मविभागानें चातुर्वर्ण्यव्यवस्था सर्वांच्या कल्याणाकरितांच (गी. १८.४१) शास्त्रकारांनीं प्रवृत्त केली असल्यामुळें ब्राह्मणक्षत्रियादि ज्ञानी झाले तरी त्यांनीं आपआपले धंदे करणें यांतच त्यांचें व समाजाचें कल्याण असून दरएक वेळीं या व्यवस्थेंत ढवळाढवळ करणें योग्य नव्हे असें भगवंताचें सांगणें आहे (गीतार. पृ. ३३२ व ४९२ पहा). "जेनुं काम तेना थी थाय । बीजो करे तो गोतां खाय" अशी जी एक गुजराती म्हण प्रचारांत आहे तिचा भावार्थहि हाच आहे. चातुर्वर्ण्य-व्यवस्था जेथें अमलांत नाहीं तेथेंहि, सर्व जन्म लष्करांत घातलेल्या मनुष्यानें वेळ येईल तेव्हां शिंप्याचा धंदा करण्यापेक्षां लष्करी शिपायाचा धंदा करणेंच सर्वांस श्रेयस्कर आहे, हें कोणीही कबूल करील; व तोच न्याय चातुर्वर्ण्यव्यवस्थेसहि लागू पडतो. चातुर्वर्ण्यव्यवस्था चांगली की वाईट, हा प्रश्न भिन्न असून तो येथें उपस्थितहि होत नाहीं. समाजाचें योग्य धारणपोषण होण्यास शेतीसारख्या निरुपद्रव व सौम्य धंद्याप्रमाणेंच इतर कर्मेंहि अवश्य आहेत, एवढी गोष्ट निर्विवाद आहे. म्हणून कोणताहि धंदा एकदां स्वीकारिला,—मग तो चातुर्वर्ण्यव्यवस्थेमुळें स्वीकारा किंवा खुषीनें स्वीकारा—म्हणजे तो धर्म झाला. मग प्रसंगविशेषीं पुढें त्यांत खोडया काढून आपलें कर्तव्यकर्म सोडून देणें चांगलें नाहीं, जरूर पडल्यास त्याच धंद्यांतच मेलें पाहिजे, असा या श्लोकांचा भावार्थ आहे. कोणताहि धंदा घेतला तरी त्यांत कांहींना कांहीं तरी दोष सहज काढतां येण्यासारखा असतो (गी. १८.४८ पहा). परंतु तेवढ्यामुळें आपलें नियत कर्तव्य सोडणें हा धर्म नव्हे. महाभारतांत ब्राह्मणव्याधसंवाद व तुलाधारजाजलिसंवाद या दोन्ही प्रकरणांत हेंच तत्त्व सांगितलें असून; ३५ व्या श्लोकाचें पूर्वार्ध मनुस्मृतींत (मनु.

अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजितः ॥ ३६ ॥

श्रीभगवानुवाच ।

काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः ।
महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम् ॥ ३७ ॥
धूमेनाव्रियते वह्निर्यथादर्शो मलेन च ।
यथोल्बेनावृतो गर्भस्तथा तेनेदमावृतम् ॥ ३८ ॥
आवृतं ज्ञानमेतेन ज्ञानिनो नित्यवैरिणा ।
कामरूपेण कौंतेय दुष्पूरेणानलेन च ॥ ३९ ॥

१०.९७) व गीतेंतहि पुढें (१८.४७) आलेलें आहे. "इंद्रियें मारण्याचा हट्टहि चालत नाहीं" असें जें ३३ व्या श्लोकांत सांगितलें, त्यावर असें कां व्हावें व मनुष्य आपली खुषी नसतांहि वाईट कृत्याकडे कां ओढिला जातो असा अर्जुनाचा आतां प्रश्न आहे.]

अर्जुन म्हणाला—(३६) हे वार्ष्णेया म्हणजे श्रीकृष्णा ! आतां (असें सांगा कीं) स्वतःची इच्छा नसतांहि बलात्कार केल्याप्रमाणें मनुष्य पाप करितो तें कोणाच्या प्रेरणेनें ? श्रीभगवान् म्हणाले–(३७) या बाबतींत रजोगुणापासून उत्पन्न झालेला मोठा अधाशी व मोठा पापी असा हा काम व हा क्रोध हाच शत्रु असें समज. (३८) धुरानें अग्नि किंवा धुळीनें आरसा ज्याप्रमाणें आच्छादिला असतो, अगर वारेनें गर्भ जसा वेष्टिला असतो, त्याप्रमाणें त्यानें हें सर्व गुरफटून टाकिलें आहे. (३९) कधींहि तृप्ति न पावणारा अग्निच असून ज्ञात्याचा जो हा कामरूपी नित्य वैरी त्यानें हे कौंतेया ! ज्ञान झांकून टाकिलें आहे.

[" न जातु कामः कामानामुपभोगेन शाम्यति । हविषा कृष्ण-वर्त्मेव भूय एवाभिवर्धते " (मनु. २.९४,–काम कामांच्या उपभोगानें कधींहि तृप्त होत नाहीं; इंधन घातलेल्या अग्नीप्रमाणें तो अधिकाधिकच

इंद्रियाणि मनो बुद्धिरस्याधिष्ठानमुच्यते ।
एतैर्विमोहयत्येष ज्ञानमावृत्य देहिनम् ॥ ४० ॥
तस्मात्वमिंद्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ ।
पाप्मानं प्रजहि ह्येनं ज्ञानविज्ञाननाशनम् ॥ ४१ ॥
§§ इंद्रियाणि पराण्याहुरिंद्रियेभ्यः परं मनः ।
मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धेः परतस्तु सः ॥ ४२ ॥
एवं बुद्धेः परं बुद्ध्वा संस्तभ्यात्मानमात्मना ।
जहि शत्रुं महाबाहो कामरूपं दुरासदम् ॥ ४३ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुन-संवादे कर्मयोग नाम तृतीयोऽध्यायः ॥ ३ ॥

---

वाढत जातो–असें जें मनूनें ह्मटलें आहे; त्याचाच हा अनुवाद आहे (गीतार. प्रकरण ५ पृ. १०५ पहा).]

(४०) इंद्रियें, मन आणि बुद्धि, हीं याचें अधिष्ठान म्हणजे घर किंवा किल्ला ह्मटलें आहे. यांच्या आश्रयाने दास्याला गुंडाळून ठेवून मनुष्याला हा भुरळ पाडीत असतो (४१) म्हणून, इंद्रियांचें प्रथम संयमन करून हे भरतश्रेष्ठा ! ज्ञान (अध्यात्म) आणि विज्ञान (विशिष्ट ज्ञान) यांचा नाश करणाऱ्या याच पाप्याला तूं ठार मारून टाक.

(४२) असें म्हणतात कीं, (स्थूल बाह्य पदार्थांच्या मानानें ते पदार्थ जाणणारीं) इंद्रियें पर म्हणजे पलीकडचीं, इंद्रियांच्या पलीकडचें मन, मनाच्याहि पलीकडे (व्यवसायात्मक) बुद्धि, आणि जो बुद्धीच्याही पलीकडे तो (आत्मा) आहे. (४३) याप्रमाणें बुद्धीच्या पलीकड-ल्याला ओळखून व आपणच आपल्याला आंवरून धरून, हे महाबाहो अर्जुना ! दुरासाध्य कामरूपी शत्रूला तूं मारून टाक.

# चतुर्थोऽध्यायः ।

श्रीभगवानुवाच ।

इमं विवस्वते योगं प्रोक्तवानहमव्ययम् ।

[ कामरूपी आसक्ति सोडून लोकसंग्रहार्थ सर्व कर्मे स्वधर्माप्रमाणें करण्याला इंद्रियें ताब्यांत पाहिजेत, व तेवढाच इंद्रियनिग्रह येथें विवक्षित आहे. इंद्रियेंच जबरीनें अजीबात मारून सर्व कर्मे सोड असा अर्थ नाहीं (गीतार. प्र. ५ पृ. ११३ पहा). "इंद्रियाणि पराण्याहुः०" इत्यादि ४२ वा श्लोक कठोपनिषदांतला असून त्याच उपनिषदांतून दुसरेहि चारपांच श्लोक गीतेंत घेतलेले आहेत हें गीतारहस्यांत ( परि. पृ. ५२२ ) दाखविलें आहे. इंद्रियांचें काम बाह्य पदार्थांचें संस्कार ग्रहण करण्याचें असून मनानें त्याची व्यवस्था लाविल्यावर बुद्धि त्याची निवडानिवड करिते आणि आत्मा यापलीकडचा व या सर्वांहून भिन्न आहे, हें क्षेत्रक्षेत्रज्ञविचाराचें तात्पर्य असून. याबद्दल सविस्तर विचार गीतारहस्याच्या सहाव्या प्रकरणाचे अखेर ( पृ. १३१-१४६ ) केला आहे तो पहा. मनुष्याची इच्छा नसतांहि कामक्रोधादि प्रवृत्तिधर्मांमुळें तो एखादें कर्म करण्यास कसा प्रवृत्त होतो, आणि आत्मस्वातंत्र्यामुळें इंद्रियनिग्रहरूप साधनानें यांतूनहि सुटका होण्याचा मार्ग कसा सांपडतो, इत्यादि कर्मविपाकांतील गूढ प्रश्नांचा विचार गीतारहस्याच्या दहाव्या प्रकरणांत ( पृ. २७४-२८२) केला असल्यामुळें, येथें त्याची द्विरुक्ति करून जागा अडवीत नाहीं. इंद्रियनिग्रह कसा करावा याचा विचार पुढें गीतेच्या सहाव्या अध्यायांत केलेला आहे. ]

याप्रमाणें श्रीभगवंतांनीं गाईलेल्या म्हणजे सांगितलेल्या उपनिषदांत ब्रह्मविद्यान्तर्गत योग-म्हणजे कर्मयोग-शास्त्रावरील श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या संवादांतील कर्मयोग नांवाचा तिसरा अध्याय समाप्त झाला.

---

विवस्वान्मनवे प्राह मनुरिक्ष्वाकवेऽब्रवीत् ।
एवं परंपराप्राप्तमिमं राजर्षयो विदुः ।
स कालेनेह महता योगो नष्टः परंतप ॥ २ ॥
स एवायं मया तेऽद्य योगः प्रोक्तः पुरातनः ।

## अध्याय चवथा.

[ कर्म कोणाला चुकत नाहीं म्हणून बुद्धि निष्काम झाली तरी कर्म केलेंच पाहिजे; कर्म म्हणजेच यज्ञयागादि कर्म; पण मीमांसकांचीं हीं कर्मे स्वर्गप्रद अतएव एक प्रकारें बंधक असल्यामुळें तीं आसक्ति सोडून केलीं पाहिजेत; ज्ञानानें स्वार्थबुद्धि सुटली तरी कर्म सुटत नाहीं म्हणून ज्ञात्यानेंहि निष्कामकर्म केलेंच पाहिजे; लोकसंग्रहार्थ तें अवश्य आहे;–इत्यादि प्रकारें कर्मयोगाचें आतांपर्यंत जें विवेचन केलें तेंच या अध्यायांत दृढ केलें आहे आयुष्यक्रमणाचा हा मार्ग म्हणजे निष्ठा अर्जुनाला युद्धास प्रवृत्त करण्या-साठीं नवी सांगितली अशी शंका येऊं नये, म्हणून या मार्गाची प्राचीन गुरुपरंपरा प्रथम सांगतात–]

श्रीभगवान् म्हणाले–( १ ) अव्यय म्हणजे कधींहि क्षीण न होणारा किंवा त्रिकालाबाधित व नित्य असा हा ( कर्म-)योग ( मार्ग ) मीं विवस्वानाला म्ह० सूर्याला सांगितला, विवस्वानानें ( आपला पुत्र ) मनु यास सांगितला, आणि मनूनें ( आपला पुत्र इक्ष्वाकु यास सांगितला. (२) अशा परंपरेनें प्राप्त झालेला हा ( योग ) राजर्षींना माहीत झाला. पण दीर्घकालानें तोच योग हे शत्रुतापना ( अर्जुना ) या लोकीं नष्ट झाला. (३) तोच हा पुरातन योग ( कर्मयोगमार्ग ), हें ( सर्व रहस्यांतील ) उत्तम रहस्य म्हणून 'मीं आज तुला' तूं माझा भक्त आणि सखा आहेस यासाठीं, सांगितला.

भक्तोऽसि मे सखा चेति रहस्यं ह्येतदुत्तमम् ॥ ३ ॥

[ या तिन्ही श्लोकांत 'योग' या एकेरी शब्दानें सांख्य आणि योग या दोन आयुष्यक्रमणाच्या मार्गांपैकीं योग म्हणजे कर्मयोग, अर्थात् साम्यबुद्धीनें कर्में करण्याचा मार्ग, हाच अर्थ अभिप्रेत आहे, असें गीतारहस्याच्या तिसऱ्या प्रकरणांत ( पृ. ५६–६५ ) आम्हीं सिद्ध केलें आहे. गीतेंतील या मार्गाची जी परंपरा वरील श्लोकांत सांगितली आहे ती या मार्गाचें मूळ समजण्यास अत्यंत महत्त्वाची असतांहि टीकाकारांनीं त्याची विशेष चर्चा केलेली दिसत नाहीं. महाभारतान्तर्गत नारायणीयोपाख्यानांत भागवतधर्माचें जें निरूपण आहे त्यांत हा धर्म प्रथम श्वेतद्वीपांत भगवानापासूनच—

नारदेन तु संप्राप्तः सरहस्यः ससंग्रहः ।
एष धर्मो जगन्नाथात् साक्षान्नारायणान्नृप ॥
एवमेष महान्धर्मः स ते पूर्वं नृपोत्तम ।
कथितो हरिगीतासु समासविधिकल्पितः ॥

" नारदास प्राप्त झाला असून, तोच महान् धर्म हे राजा ! तुला पूर्वीं हरिगीतेंत म्हणजे भगवद्गीतेंत समासविधिसहित सांगितला आहे, "– असें वैशंपायन जनमेजयास सांगत असून ( म. भा. शां. ३४६.९,१० ) पुढें " युद्धांत विमनस्क झालेल्या अर्जुनास हा धर्म सांगितलेला आहे " असें पुनः म्हटलें आहे ( म. भा. शां ३४८.८ ). यावरून गीतेंतला योग म्हणजे कर्मयोग भागवतधर्मांतला आहे हें उघड होतें ( गीतार. पृ. ९–११ ). विस्तारभयास्तव गीतेंत त्याची संप्रदाय परंपरा सृष्टीच्या मूळारंभापासून दिली नाहीं; विवस्वान्, मनु, इक्ष्वाकु या तिघांचाच उल्लेख केलेला आहे. पण याचा खरा अर्थ काय हें नारायणीय धर्माची सर्व परंपरा पाहिली म्हणजे स्पष्ट दिसून येतें. ब्रह्मदेवाचे एकंदर जन्म सात. त्यांपैकीं पहिल्या सहा जन्मांतील नारायणीय धर्माच्या परंपरेचे

अर्जुन उवाच ।

§§ अपरं भवतो जन्म परं जन्म विवस्वतः ।

वर्णन संपल्यावर, ब्रह्मदेवाच्या सातव्या म्हणजे प्रस्तुतच्या जन्मांतलें कृतयुग समाप्त होऊन—

त्रेतायुगादौ च ततो विवस्वान् मनवे ददौ ।
मनुश्च लोकभृत्यर्थं सुतायेक्ष्वाकवे ददौ ॥
इक्ष्वाकुणा च कथितो व्याप्य लोकानवस्थितः ।
गमिष्यति क्षयांते च पुनर्नारायणं नृप ॥
यतीनां चापि यो धर्मः स ते पूर्वं नृपोत्तम ।
कथितो हरिगीतासु समासविधिकल्पितः ॥

"त्रेतायुगारंभीं विवस्वानानें मनूस (हा धर्म) दिला, मनूनें लोकधारणार्थ तो आपल्या पुत्रास म्हणजे इक्ष्वाकूस दिला; आणि इक्ष्वाकूपासून पुढें सर्व लोकांत प्रसृत झाला. हे राजा ! सृष्टीचा क्षय झाला म्हणजे (हा धर्म) पुनः नारायणाकडे जाईल. हा धर्म आणि 'यतीनां चापि' म्हणजे त्याबरोबरच संन्यासधर्महि तुला पूर्वीं भगवद्गीतेंत वर्णिला आहे,"–असें नारायणीय धर्मांतच पुनः वैशंपायनानें जनमेजयास सांगितलें आहे (म. भा. शां. ३४८. ५१–५३). यावरून ज्या द्वापर युगाचे अखेरीस भारती युद्ध झालें त्याच्या पूर्वींच्या त्रेतायुगापुरतीच भागवत धर्माची परंपरा वर्णिली आहे, विस्तारभयास्तव जास्त वर्णन केलेलें नाहीं; असें दिसून येतें. हा भागवतधर्म म्हणजेच योग किंवा कर्मयोग होय, आणि मनूला कर्मयोगाचा उपदेश केल्याची ही कथा गीतेंतच आली आहे असें नाहीं, तर भागवतपुराणांत (भाग.८. २४.५५) या कथेचा उल्लेख असून मत्स्यपुराणाच्या ५२ व्या अध्यायांत मनूस उपदेशिलेल्या कर्मयोगाचें महत्त्वही वर्णिलें आहे. पण यांपैकीं कोणतीच माहिती नारायणीयोपाख्यानांतील माहिती इतकी पूर्ण नाहीं.

कथमेतद्विजानीयां त्वमादौ प्रोक्तवानिति ॥ ४ ॥

विवस्वान–मनु–इक्ष्वाकु ही परंपरा सांख्यमार्गास बिलकूल लागू होत नाहीं; आणि सांख्य व योग या दोहोंखेरीज तिसरी निष्ठा गीतेंत वर्णिलेली नाहीं, हें लक्षांत आणिलें म्हणजे कर्मयोगाचीच ही परंपरा आहे, असें दुसऱ्या रीतीनेंहि सिद्ध होतें (गी. २.३९). परंतु सांख्य व योग या दोन निष्ठांची परंपरा जरी एक नसली तरी कर्मयोगाच्या म्हणजे भागवतधर्माच्या निरूपणांतच सांख्य किंवा संन्यास निष्ठेच्या निरूपणाचा पर्यायानें समावेश होत असल्यामुळें (गीतार. प्र. १४ पृ. ४६५ पहा) भगवद्गीतेंत यतिधर्म म्हणजे संन्यासधर्महि वर्णिला आहे असें वैशंपायनानें म्हटलें आहे. मनुस्मृतींत चार आश्रमधर्मांचे जें वर्णन आहे त्यांत अखेर ६ व्या अध्यायांत प्रथम यतींचा म्हणजे संन्यासाश्रमाचा धर्म सांगितल्यावरून त्याचा विकल्प या नात्यानें "वेदसंन्यासिकांचा कर्मयोग" या नांवानें गीतेंतील किंवा भागवतधर्मांतील कर्मयोगाचें वर्णन असून "निःस्पृहपणानें स्वकार्य करीत रहाण्यानेंच शेवटीं परम सिद्धि मिळतें," असें स्पष्ट म्हटलें आहे (मनु. ६. ९६); व त्यावरून कर्मयोग मनूसहि ग्राह्य होता असें उघड दिसून येतें. त्याचप्रमाणें इतर स्मृतिकारांसहि हा मान्य होता याबद्दलचीं प्रमाणें गीतारहस्याच्या ११ व्या प्रकरणाच्या अखेर (पृ. ३६०–३६३) दिलीं आहेत. अर्जुनाची या परंपरेवर आतां शंका आहे कीं—]

अर्जुन म्हणाला—(४) तुमचा जन्म अलीकडचा व विवस्वानाचा पलीकडचा म्हणजे तत्पूर्वींचा; (असें असतां) तुम्हीं (हा योग) आदौ सांगितलात हें मीं कसें ओळखावें ?

[अर्जुनाच्या या प्रश्नास उत्तर देतांना, भगवान् आपलीं अवतारकृत्यें वर्णन करून "मीहि याप्रमाणें कर्मे करीत आलों आहे" असें आसक्तिविरहित कर्मयोगाचे किंवा भागवतधर्माचेंच आतां पुनः समर्थन करितात—]

श्रीभगवानुवाच ।

बहूनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन ।
तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परंतप ॥ ५ ॥
अजोऽपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोऽपि सन् ।
प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवाम्यात्ममायया ॥ ६ ॥

श्रीभगवान् म्हणाले–(५) हे अर्जुना ! माझे आणि तुझे पुष्कळ जन्म होऊन गेलेले आहेत. ते सर्व मी जाणितों; (आणि) हे परंतपा ! तूं जाणीत नाहींस (हा भेद आहे). (६) मी (सर्व) भूतांचा धनी व जन्मविरहित असून, माझें आत्मस्वरूप जरी कधींहि व्यय म्ह० विकार पावत नाहीं, तरी माझ्याच प्रकृतीच्या ठायीं अधिष्ठित होऊन, मी आपल्या मायेनें जन्म घेत असतों.

[ या श्लोकांतील अध्यात्मज्ञानांत कापिलसांख्य व वेदान्त या दोन मतांचीच जोड घातलेली आहे. प्रकृति आपण होऊनच सृष्टि निर्माण करिते असें सांख्यांचें मत आहे, पण वेदान्ती प्रकृति हें एक परमेश्वराचें स्वरूप समजून प्रकृतींत परमेश्वर अधिष्ठित झाला म्हणजे प्रकृतीपासून व्यक्त सृष्टि निर्माण होते असें मानितात. सर्व जग आपल्या अव्यक्त स्वरूपापासून निर्माण करण्याची परमेश्वराची जी ही अचिंत्य शक्ति तिलाच 'माया' हें नांव गीतेंत दिलें आहे; व त्याप्रमाणें श्वेताश्वतरोपनिषदांतहि "मायां तु प्रकृतिं विद्यान्मायिनं तु महेश्वरम्" म्हणजे "प्रकृति हीच माया आणि परमेश्वर हा त्या मायेचा मालक" (श्वे.४.१०), आणि 'अस्मान्मायी सृजते विश्वमेतत्'–यापासून मायेचा मालक सृष्टि उत्पन्न करितो (श्वे.४.९) असें वर्णन आहे. प्रकृतीला माया कां ह्मणतात, या मायेचें स्वरूप काय, आणि मायेनें सृष्टि उत्पन्न होते या म्हणण्याचा अर्थ काय, इत्यादि प्रश्नांचा जास्त खुलासा गीतारहस्याच्या ९ व्या प्रकरणांत केला आहे तो पहा. अव्यक्त परमेश्वर व्यक्त कसा

यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।
अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥ ७ ॥
परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।
धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥ ८ ॥

बनतो म्हणजे कर्म कसें उत्पन्न झालेले दिसते तें सांगून, आतां तो असें केव्हां व कशासाठीं करितो, याचा खुलासा करितात—]

(७) हे भारता ! जेव्हां जेव्हां धर्माची ग्लानि होऊन अधर्माचें प्राबल्य माजतें तेव्हां (तेव्हां) मी आपण स्वतःच जन्म (अवतार) घेत असतों. (८) साधूंच्या संरक्षणार्थ आणि दुष्टांचा नाश करण्यास युगीं युगीं धर्मसंस्थापनेसाठीं मी जन्म घेत असतों.

[ या दोन्ही श्लोकांत 'धर्म' शब्दाचा अर्थ केवळ पारलौकिक वैदिक धर्म असा नाहीं. चातुर्वर्ण्याचे धर्म; न्याय, नीति, वगैरे गोष्टींचाच त्यांत मुख्यत्वेंकरून समावेश होतो. जगांत अन्याय, अनीति, दुष्टपणा व बेबंदशाही माजून साधूंचा छल व दुष्टांचें वर्चस्व झालें म्हणजे, आपण निर्माण केलेल्या जगाची सुस्थिति कायम राहून त्याचें कल्याण व्हावें म्हणून, तेजस्वी व पराक्रमी पुरुषाच्या रूपानें (गी. १०.४१) अवतार घेऊन भगवान् समाजाची विस्खलित झालेली घडी पुनः नीट बसवून देत असतात, असें या श्लोकाचें तात्पर्य आहे. अशा रीतीनें अवतार घेऊन भगवान् जें काम करितात त्याचेंच 'लोकसंग्रह' हें दुसरें नांव आहे; व हेंच काम आत्मज्ञानी पुरुषांनींहि यथाशक्ति व यथाधिकार केलें पाहिजे; असें पूर्वीच्या अध्यायांत सांगितलें आहे (गी. ३. २०). परमेश्वर केव्हां व कशासाठीं अवतार घेतो तें सांगितलें. आतां हें तत्त्व ओळखून त्याप्रमाणे जे पुरुष वर्तन करितात त्यांस कोणती गति मिळते तें सांगतात—]

§§ जन्म कर्म च मे दिव्यमेवं यो वेत्ति तत्वतः ।
त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति मामेति सोऽर्जुन ॥ ९ ॥
वीतरागभयक्रोधा मन्मया मामुपाश्रिताः ।
बहवो ज्ञानतपसा पूता मद्भावमागताः ॥ १० ॥

(९) माझें या प्रकारें दिव्य जन्म व दिव्य कर्म यांतील तत्त्व जो जाणितो, तो देहत्यागानंतर पुनः जन्मास न येतां, हे अर्जुना ! मला येऊन मिळतो. (१०) प्रीति, भय व क्रोध सुटलेले, मत्परायण झालेले व माझ्या आश्रयास आलेले अनेक लोक ( याप्रमाणें ) ज्ञानरूप तपानें शुद्ध होत्साते मत्स्वरूपाला येऊन मिळालेले आहेत.

[ भगवंताचें दिव्य जन्म समजण्यास अव्यक्त परमेश्वर मायेनें सगुण कसा होतो हें कळावें लागतें, व हें कळलें म्हणजे अध्यात्मज्ञान होतें; आणि दिव्य कर्म कळलें म्हणजे कर्म करूनहि अलिप्त रहाण्याचें म्हणजे निष्काम कर्मांच्या तत्त्वाचें ज्ञान होतें. सारांश, परमेश्वराचें दिव्य जन्म व दिव्य कर्म पुरें कळलें म्हणजे अध्यात्मज्ञान आणि कर्मयोग या दोहोंचीहि पूर्ण ओळख होत्ये; व मोक्षप्राप्ती होण्यास हेंच लागत असल्यामुळें अशा मनुष्यास अखेर भगवत्प्राप्ती झाल्याखेरीज रहात नाहीं. अर्थात्, भगवंताचें दिव्य जन्म व दिव्य कर्म कळलें म्हणजे त्यांत सर्व कांहीं आलें; अध्यात्मज्ञान किंवा निष्काम कर्मयोग या दोहोंचेहि निराळें अध्ययन करावयास नको. म्हणून भगवंताच्या जन्माचा व कृत्याचा विचार करा, व त्यांतील तत्त्व ओळखून वागा म्हणजे भगवत्प्राप्ति होण्यास दुसरें कांहीं साधन नको, असें सांगणें आहे. भगवंताची खरी उपासना हीच होय. आतां यापेक्षां खालच्या उपासनांचें फल व उपयोग सांगतात—]

§§ ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम् ।
मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥ ११ ॥
कांक्षन्तः कर्मणां सिद्धिं यजन्त इह देवताः ।
क्षिप्रं हि मानुषे लोके सिद्धिर्भवति कर्मजा ॥ १२ ॥

(११ जे मला ज्या प्रकारें भजतात त्यांना मी त्याप्रमाणेंच फल देतों. हे पार्था ! कोणीकडून झालें तरी मनुष्यें माझ्याच मार्गाला येऊन मिळत असतात.

[ 'मम वर्त्मानुवर्तन्ते इ०' हें उत्तरार्ध पूर्वी ( ३.२३ ) थोड्या निराळ्या अर्थानें आलें आहे; व त्यावरून गीतेंत पूर्वापर संदर्भाप्रमाणें अर्थ कसा बदलतो हें लक्षांत येईल. असो; कोणत्याहि वाटेनें गेलें तरी परमेश्वराकडेच जातो हें जर खरें तर अनेक लोक अनेक मार्गांनीं कां जातात याचें कारण सांगतात—]

( १२ ) ( कर्मबंधनाशाची नव्हे, तर केवळ ) कर्मफलाची इच्छा करणारे लोक ( सदर ) कर्मफल ( या ) मनुष्यलोकीं लवकर प्राप्त होतें, म्हणून इहलोकीं देवतांची पूजा करीत असतात.

[ हेच विचार पुढें सातव्या अध्यायांत पुनः आले आहेत ( गी. ७. २१.२२ पहा ). परमेश्वराराधनाचें खरें फल मोक्ष असून तें कालान्तरानें व दीर्घ आणि एकान्त उपासनेनें जेव्हां कर्मबंधनाचा पूर्ण नाश होतो तेव्हांच प्राप्त होत असतें; पण इतके दूरदर्शी व दीर्घोद्योगी लोक फारच थोडे असतात. बहुतेकांस आपल्या उद्योगानें म्हणजे कर्मानें या लोकींच कांहींना कांहीं तरी मिळावयास पाहिजे असतें, व असले लोक देवतांच्या नादीं लागतात, असा या श्लोकाचा भावार्थ आहे ( गीतार. प्र. १३ पृ. ४२० पहा ). पण हें तरी पर्यायानें परमेश्वराचेंच पूजन होतें, व हा योग वाढत वाढत त्याचें पर्यवसान निष्काम भक्तींत होऊन अखेर मोक्ष प्राप्त होतो असेंहि पुढें गीतेचें सांगणें आहे ( गी. ७.१९ ). धर्मसंस्थापना करण्यास परमेश्वर अवतार घेतो असें पूर्वीं सांगितलें;

§§ चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः ।
तस्य कर्तारमपि मां विद्ध्यकर्तारमव्ययम् ॥ १३ ॥
न मां कर्माणि लिंपन्ति न मे कर्मफले स्पृहा ।
इति मां योऽभिजानाति कर्मभिर्न स बद्ध्यते ॥ १४ ॥

[आतां धर्मसंस्थापना करण्याला काय करावें लागतें तें थोडक्यांत सांगतात—]

(१३) (ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या प्रकारें) चार वर्णांची व्यवस्था गुण व कर्म यांच्या भेदाप्रमाणें मींच निर्माण केली आहे. मी तिचा कर्ताहि आहें, आणि अकर्ता म्हणजे ती न करणारा अव्यय (मीच) आहें, हें तूं लक्षांत ठेव.

[परमेश्वर कर्ता असला तरी पुढील श्लोकांत वर्णिल्याप्रमाणें तो नेहमींच निःसंग असल्यामुळें अकर्ताच होय असा अर्थ आहे (गीता. ५.१४ पहा). 'सर्वेंद्रियगुणाभासं सर्वेंद्रियविवर्जितं' अशीं दुसरींहि परमेश्वरस्वरूपाचीं पुढें (गी. १३.१४) विरोधाभासात्मक वर्णनें आहेत. चातुर्वर्ण्याच्या गुणभेदाचें निरूपण पुढें अठराव्या अध्यायांत (१८.४१–४९) केलें आहे तें पहा. आतां "करून न करणारा" असें जें भगवंतांनीं आपलें वर्णन केलें त्यांतील मर्म सांगतात—]

(१४) मला कर्मांचा लेप म्हणजे बाधा लागत नाहीं. (कारण) माझी कर्मांच्या फलाचे ठायीं इच्छा नाहीं. अशा प्रकारें जो मला जाणितो त्याला कर्मांची बाधा होत नाहीं.

[माझें जन्म व कर्म जाणितो तो मुक्त होतो असें जें वर नवव्या श्लोकांत सांगितलें त्यापैकींच 'कर्मा'च्या तत्त्वाचें या श्लोकांत स्पष्टीकरण केलें आहे. 'जाणितो' या शब्दानें "जाणून त्याप्रमाणें वागूं लागतो" एवढा अर्थ या ठिकाणीं विवक्षित आहे. भगवंतांना त्यांच्या

एवं ज्ञात्वा कृतं कर्म पूर्वैरपि मुमुक्षुभिः ।
कुरु कर्मैव तस्मात्त्वं पूर्वैः पूर्वतरं कृतम् ॥ १५ ॥
§§ किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः ।
तत्ते कर्म प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥ १६ ॥

कर्माची बाधा लागत नाहीं, याचें कारण ते फलाशा ठेवून कर्म करीत नाहींत हें होय; आणि हें जाणून त्याप्रमाणें जो वागतो त्यास कर्मांचा बंध लागूं शकत नाहीं असा एकंदर भावार्थ आहे. या श्लोकांतील सिद्धान्तच प्रत्यक्ष उदाहरणानें आतां दृढ करितात—]

(१५) हें जाणून पूर्वींच्या देखील मुमुक्षु लोकांनीं कर्म केलें; तस्मात् पूर्वींच्यांनीं पूर्वपूर्व केलेलें कर्मच तूं कर !

[ मोक्ष आणि कर्म यांचा याप्रमाणें विरोध नाहीं म्हणून तूं कर्म कर असा अर्जुनाला निश्चित उपदेश केला. परंतु मग "कर्में सोडिल्यानें म्हणजे अकर्मानेंच मोक्ष मिळतो" असें जें संन्यासमार्गीयांचें मत यांतील बीज काय ही शंका येत्ये; म्हणून कर्म कोणतें यांच्या विवेचनास आतां सुरुवात करून अकर्म म्हणजे कर्मत्याग नव्हे, निष्काम कर्मालाच अकर्म म्हणावयाचें, असा अखेर तेविसाव्या श्लोकांत सिद्धान्त करितात. ]

(१६) कर्म कोणतें व अकर्म कोणतें, या बाबतींत शहाण्या पुरुषांना देखील भ्रम पडत असतो; (म्हणून) जें जाणिल्यानें पापापासून मुक्त होशील अशा रीतीचें कर्म कोणतें तें तुला सांगतों.

[ 'अकर्म' हा नञ् समास आहे व त्यांतील अ=नञ् या शब्दाचा व्याकरणरीत्या 'अभाव' किंवा 'अप्राशस्त्य' असे दोन्ही अर्थ होऊं शकतात,

कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोधव्यं च विकर्मणः ।
अकर्मणश्च बोद्धव्यं गहना कर्मणो गतिः ॥ १७ ॥

व ते दोन्हीहि या ठिकाणीं विवक्षित नसतील असें म्हणतां येत नाहीं. तथापि पुढील श्लोकांत 'विकर्म' म्हणून कर्माचा तिसरा एक भेद केला असल्यामुळें, या श्लोकांत अकर्म शब्दानें संन्यासमार्गीय लोक ज्याला 'कर्माचा स्वरूपतः त्याग' असें म्हणतात तो कर्मत्याग विशेषेंकरून उद्दिष्ट आहे. किंबहुना संन्यासमार्गीय लोक म्हणतात त्याप्रमाणें कर्माचा सर्वस्वीं त्याग करण्याची जरूर नाहीं, अशा प्रकारचा कर्मत्याग खरें 'अकर्म' नसून त्यांतील बीज निराळेंच आहे, हें दाखविण्यासाठीं प्रस्तुत विवेचन केलें आहे, असें पुढल्या म्हणजे १८ व्या श्लोकावरील टीपेवरून दिसून येईल. ]

(१७) कर्माची गति गहन आहे; (म्हणून) कर्म म्हणजे काय हेंहि जाणिलें पाहिजे, व विकर्म (विपरीत कर्म) म्हणजे काय हें समजलें पाहिजे आणि अकर्म (कर्म न करणें) म्हणजे काय हेंहि कळावयास पाहिजे. (१८) कर्माचे ठायीं अकर्म आणि अकर्माचे ठायीं कर्म ज्याचे नजरेस येतें तो पुरुष सर्व मनुष्यांत ज्ञानी, आणि तोच युक्त ह्मणजे योगयुक्त व सर्व कर्में करणारा होय.

[ या व पुढील पांच श्लोकांत कर्म, अकर्म व विकर्म यांचा खुलासा केलेला असून यांत जें कांहीं उणें आहे तें पुढें अठराव्या अध्यायांत कर्मत्याग, कर्म आणि कर्ता यांच्या त्रिविध भेदांचें जें वर्णन केलें आहे त्यांत भरून काढिलें आहे. (गी. १८. ४–७; २३–२५; १८.२६–२८). दोन्ही ठिकाणच्या या कर्मकर्मविवेचनावरून कर्माविकर्मासंबंधानें गीतेचे काय सिद्धान्त आहेत ते येथें थोडक्यांत स्पष्टपणें सांगणें जरूर आहे. कारण टीकाकारांनीं याबद्दल फारच घोटाळा केलेला आहे. संन्यास-मार्गीयांस सर्व कर्माचा स्वरूपतः त्याग इष्ट, म्हणून ते गीतेंतील

कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः ।

'अकर्म' पदाचा अर्थ ओढाताणीनें आपल्या मार्गाकडे आणण्यास पहा-तात; आणि मीमांसकांस यज्ञयागादि काम्य कर्म इष्ट असून त्याखेरीज इतर सर्व 'विकर्म' वाटत असतें. शिवाय मीमांसकांचे नित्यनैमित्तिकादि कर्मभेदहि त्यांतच येतात, व धर्मशास्त्री पुनः त्यांतच आपलें घोडें ढकलूं पहात असतात. सारांश, चोहोंकडून अशी ओढाताण झाल्यामुळें गीता 'अकर्म' कशाला ह्मणत्ये आणि 'विकर्म' कशाला ह्मणत्ये हें अखेर कळेनासें होतें. ह्मणून पहिल्यानें ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं गीतेंत ज्या तात्विक दृष्टीनें या प्रश्नाचा विचार केला आहे ती दृष्टि निष्काम कर्में करणाऱ्या कर्मयोग्याची आहे, काम्य कर्में करणाऱ्या मीमांसकांची नव्हे किंवा कर्में सोडणाऱ्या संन्यासमार्गीयांचीहि नव्हे. गीतेची ही दृष्टि स्वीकारिली ह्मणजे 'कर्मशून्यता' या अर्थी 'अकर्म' या जगांत कोठेंच असणें शक्य नाहीं, किंवा कोणीहि मनुष्य कधींही कर्मशून्य असूं शकत नाहीं, असें प्रथमतः प्राप्त होतें. (गी. ३.५; १८.११). कारण निजणें, बसणें, निदान्पक्षीं जिवंत रहाणें तरी कोणा-लाच सुटत नाहीं. आणि कर्मशून्य होणें तर शक्य नाहीं, तर अकर्म कशाला ह्मणावयाचें हें ठरवावें लागतें. गीतेचें याला असें उत्तर आहे कीं, कर्म म्हणजे नुस्ती क्रिया असें न समजतां त्यापासून पुढें शुभा-शुभादि जे परिणाम उत्पन्न होतात त्यांचा विचार करून कर्माचें कर्मत्व वा अकर्मत्व ठरवा. सृष्टी म्हणजेच जर कर्म, तर मनुष्य जोंपर्यंत सृष्टींत आहे तोंपर्यंत त्याला कर्म चुकत नाहीं म्हणून कर्माकर्माचा जो विचार करावयाचा तो मनुष्याला तें कर्म कितपत बाधेल एवढ्याच दृष्टीनें केला पाहिजे. जें कर्म करूनही आपल्याला बाधत नाहीं त्याचें कर्मत्व म्हणजे बंधकत्व गेलें असेंच म्हटलें पाहिजे; आणि कोणत्याहि कर्माचें बंधकत्व अर्थात कर्मत्व जर याप्रमाणें नाहींसें झालें तर तें कर्म

स बुद्धिमान्मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत् ॥ १८ ॥

अकर्मच झालें. अकर्म म्हणजे कर्मशून्यता असा लौकिकांत अर्थ आहे खरा; पण शास्त्रीयदृष्ट्या विचार करतां तो येथें जुळत नाहीं. कारण स्वस्थ बसणें म्हणजे कर्म न करणेंहि कित्येकदां कर्मच होतें, असें आपल्या नजरेस येतें. उदाहरणार्थ, आपल्या आईबापांस कोणी मारहाण करीत असतां त्यांचें निवारण न करितां स्वस्थ बसणें, हें तत्कालीं लौकिकदृष्ट्या अकर्म म्हणजे कर्मशून्यत्व असलें तरी तें कर्मच,–किंबहुना विकर्म,–असून कर्मविपाकदृष्ट्या त्याचे अशुभ परिणाम आपल्याला भोगावे लागल्याखेरीज रहात नाहींत. म्हणून गीता या श्लोकांत विरोधभासरीत्या मोठ्या खुबीनें असें सांगत आहे कीं, अकर्माच्या ठिकाणीं सुद्धां (कधीं कधीं भयंकरहि) कर्म होतें, आणि कर्म करूनहि तें कर्मविपाकदृष्ट्या मेल्यासारखें म्हणजे अकर्म होतें, हें ज्यानें ओळखिलें तो ज्ञानी होय; व हाच अर्थ पुढील श्लोकांत निरानिराळ्या प्रकारें वर्णिला आहे. कर्माच्या फलाचें बंधन न लागण्यास तें कर्म निःसंगबुद्धीनें म्हणजे फलाशा सोडून निष्काम बुद्धीनें करणें एवढें एकच गीताशास्त्राप्रमाणें खरें साधन आहे. (गीतारहस्य प्र. ५ पृ. १०९–११४; प्र. १० पृ. २८२ पहा). म्हणून या साधनाचा उपयोग करून म्हणजे निःसंगबुद्धीनें जें कर्म केलें तेंच गीतेप्रमाणें प्रशस्त म्हणजे सात्त्विक कर्म असून (गी. १८.९), गीतेप्रमाणें तेंच खरें 'अकर्म' होय. कारण त्याचें कर्मत्व म्हणजे कर्मविपाकप्रक्रियेप्रमाणें बंधकत्व गेलेलें असतें. मनुष्यें जें कांहीं करितात (आणि 'करितात' या पदांत स्वस्थ बसण्याचाहि समावेश करावयाचा) त्यांतून वरील प्रकारचा म्हणजे 'सात्त्विक कर्म,' किंवा गीतेप्रमाणें 'अकर्म' वजा केलीं म्हणजे बाकी जीं कर्में शिल्लक राहतात त्यांचे दोन वर्ग होऊं शकतात; एक राजस व दुसरा तामस. पैकीं तामस कर्में मोहानें व अज्ञानानें होत असतात; म्हणून तीं विकर्में या सदरांतच यावयाचीं. मग मोहानें कर्म सोडिलें

यस्य सर्वे समारंभाः कामसंकल्पवर्जिताः ।
ज्ञानाग्निदग्धकर्माणं तमाहुः पंडितं बुधाः ॥ १९ ॥

तरी तें विकर्मच, अकर्म नव्हे (गी. १८. ७). रहातां रहातां राजस कर्मे शिल्लक राहिलीं. हीं कर्मे पाहिल्या प्रतीचीं म्हणजे सात्विक नव्हेत किंवा गीता ज्याला खरोखरी 'अकर्म' म्हणत्ये तेंही नव्हे. गीता याला 'राजस' कर्म म्हणत्ये; पण कोणास पाहिजे असल्यास अशा राजस कर्मांना 'कर्म' हा एकेरी शब्द लावण्यास कांहीं हरकत नाहीं. तात्पर्य, कर्म कीं अकर्म हें सदर कर्माच्या बंधकत्वावरून ठरवावयाचें आहे; क्रियात्मक स्वरूपावरून नव्हे, किंवा कोरड्या धर्मशास्त्रावरूनहि नव्हे. अष्टावक्रगीता सन्यासमार्गीय आहे; तथापि तींतहि—

निवृत्तिरपि मूढस्य प्रवृत्तिरुपजायते ।
प्रवृत्तिरपि धीरस्य निवृत्तिफलभागिनी ॥

म्हणजे मूर्ख लोकांची जी निवृत्ति अथवा हट्टानें किंवा मोहानें कर्मापासून पराङ्मुखता तीच वस्तुतः प्रवृत्ति म्हणजे कर्म होते; आणि शहाण्या लोकांची जी प्रवृत्ति म्हणजे निष्काम कर्म त्यानेंच निवृत्तिचें म्हणजे कर्मत्यागाचें फल मिळतें असें म्हटलें आहे. (अष्टा. १८.६१) गीतेंतील वरील श्लोकांत हाच अर्थ विरोधाभासरूपी अलंकाररीत्या मजेनें वर्णिला असून, अकर्माचें हें गीतेंतलें लक्षण नीट लक्षांत ठेविल्याखेरीज गीतेंतील कर्माकर्मविवेचनाचें मम कधींहि लक्षांत यावयाचें नाहीं. हाच अर्थ आतां पुढील श्लोकांतून अधिक व्यक्त करून सांगतात— ]

(१९) ज्याचे सर्व समारंभ म्हणजे उद्योग फलेच्छाविरहित असतात, यालाच ज्ञानाग्नीनें कर्मे दग्ध झालेला पंडित, असें ज्ञाते पुरुष म्हणत असतात.

[ ज्ञानानें कर्मे भस्म होतात याचा अर्थ कर्मे सोडणें असा नसून फलेच्छा सोडून कर्मे करणें असा समजावयाचा हें यावरून उघड

त्यक्त्वा कर्मफलासंगं नित्यतृप्तो निराश्रयः ।
कर्मण्यभिप्रवृत्तोऽपि नैव किंचित्करोति सः ॥ २० ॥
निराशीर्यतचित्तात्मा त्यक्तसर्वपरिग्रहः ।
शारीरं केवलं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥ २१ ॥

होतें ( गीतारहस्य प्र. १०, पृ. २८२–२८६ पहा). तसेंच पुढें 'सर्वारंभ-परित्यागी '–सर्व आरंभ किंवा उद्योग सोडणारा–असें जें भगवद्भक्ताचें वर्णन आलें आहे ( गी. १२.१६; १४.२५ ) त्याचाहि अर्थ काय याचा यानें निर्णय होतो. आतां ह्याच अर्थ अधिक व्यक्त करितात—]

(२०) कर्मफलाची आसक्ति सोडून सदा तृप्त व निराश्रय म्हणजे अमक्यातमक्यासाठीं अमुक करितों अशी कर्मफलाच्या साधनाला आश्रयीभूत झालेली बुद्धि न ठेवणारा ( पुरुष ), कर्मे करण्यांत गढलेला असला तरी तो कांहींच करीत नाहीं ( असें म्हणावयाचें ). ( २१ ) आशीः ह्मणजे फलवासना सोडणारा, चित्ताचें नियमन करणारा, व सर्वसंगमुक्त झालेला पुरुष केवळ शारीर म्हणजे शरीरानें किंवा कर्मेंद्रियांनींच कर्म करीत असतां त्याला पाप लागत नाहीं.

[ विसाव्या श्लोकांतील निराश्रय शब्दाचा अर्थ घरदार न करणारा ( संन्यासी ) असा कित्येक करीत असतात; पण तो बरोबर नाहीं. आश्रय म्हणजे घर किंवा बिऱ्हाड म्हणतां येईल; पण प्रकृत स्थलीं कर्त्यांचें स्वतः रहावयाचें बिऱ्हाड विवक्षित नसून तो जें कर्म करितो त्याचें हेतुरूप बिऱ्हाड कोठें दिसूं नये असा अर्थ आहे; व तोच अर्थ गीता ६. १ या श्लोकांत 'अनाश्रितः कर्मफलं' या शब्दांनीं स्पष्ट व्यक्त केलेला असून, वामन पंडितांनीं आपल्या गीतेवरील यथार्थदीपिका नांवाच्या मराठी टीकेंत स्वीकारला आहे. तसेंच २१ व्या श्लोकांत 'शारीर' म्हणजे शरीरपोषणापुरतें भिक्षाटनादिक कर्म असाहि अर्थ नाहीं. "योगी म्हणजे कर्मयोगी आसक्ति किंवा काम्य बुद्धि मनांत न

यदृच्छालाभसंतुष्टो द्वंद्वातीतो विमत्सरः ।
समः सिद्धावसिद्धौ च कृत्वापि न निबद्ध्यते ॥ २२ ॥
गतसंगस्य मुक्तस्य ज्ञानावस्थितचेतसः ।
यज्ञायाचरतः कर्म समग्रं प्रविलीयते ॥ २३ ॥

ठेवितां केवळ इंद्रियांनीं कर्मे करीत असतात" असें जें पुढें ५ व्या अध्यायांत (५.११) वर्णन आहे त्याशीं समानार्थकच "केवलं शारीरं कर्म" या पदांचा खरा अर्थ आहे. इंद्रियें कर्मे करितात खरीं, पण बुद्धि सम असल्यानें त्या कर्मांचें पाप अगर पुण्य कर्त्यास लागत नाहीं.]

(२२) यदृच्छेनें जें प्राप्त होईल त्यांत संतुष्ट, (हर्षशोकादि) द्वंद्वांपासून मुक्त, निर्मत्सर, आणि (कर्माची) सिद्धि होवो वा न होवो सारखेंच मानणारा, पुरुष (कर्मे) करूनहि (त्यांच्या पापपुण्यानें) बांधला जात नाहीं. (२३) आसंगरहित, (रागद्वेषांपासून) मुक्त, (साम्यबुद्धिरूप) ज्ञानाचे ठिकाणीं स्थिरचित्त झालेला आणि (केवळ) यज्ञासाठीं म्हणून (जो) करणारा त्या पुरुषाचें कर्म समग्र लयास जातें !

[मागें तिसऱ्या अध्यायांत (३.९) यज्ञार्थ केलेलें कर्म मीमांसकमतें बंधक होत नाहीं, व तेंच आसक्ति सोडून केलें म्हणजे स्वर्गप्रद न होतां मोक्षप्रद होतें, असा जो अर्थ वर्णिला आहे तोच या श्लोकांत सांगितला आहे. "समग्र लयाला जातें" यांत 'समग्र' पद महत्त्वाचें आहे. मीमांसक स्वर्गसुख हेंच परमसाध्य मानितात, व त्यांच्या दृष्टीनें स्वर्गसुख प्राप्त करून देणारें कर्म बंधक होत नाहीं. पण गीतेची दृष्टि स्वर्गापलीकडे म्हणजे मोक्षावर आहे; व या दृष्टीनें स्वर्गप्रद कर्मेंहि बंधकच होत म्हणून यज्ञार्थ कर्मेंहि अनासक्त बुद्धीनें केल्यास 'समग्र' लय पावतें म्ह० स्वर्गप्रदहि न होतां मोक्षप्रद होतें असें म्हटलें आहे. तथापि या अध्यायांतील यज्ञप्रकरणाच्या प्रतिपादनांत एक मोठाच भेद आहे. तिसऱ्या अध्यायांत श्रौतस्मार्त अनादि यज्ञचक्र

§§ ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम् ।
ब्रह्मैव तेन गंतव्यं ब्रह्मकर्मसमाधिना ॥ २४ ॥

म्हणजे साक्षात् तेच यज्ञ कायम ठेविले पाहिजेत असें म्हटलें आहे. पण भगवान आतां असें सांगतात कीं. यज्ञ म्हणजे केवळ देवतोद्देशानें अग्नींत तीळतांदूळ किंवा पशु यांचें हवन करणें, अगर चातुर्वर्ण्याचीं कर्मे स्वधर्माप्रमाणें पण काम्य बुद्धीनें करणें, एवढाच संकुचित अर्थ समजूं नका. अग्नींत आहुति टाकितांना अखेरीस 'इदं न मम'–हें माझें नव्हे–असे जे शब्द उच्चारितात त्यांतील स्वार्थ-त्यागरूप निर्ममत्वाचें जें तत्त्व तोच यज्ञांतील प्रधान भाग होय; आणि अशा रीतीनें "न मम" म्हणजे ममत्वबुद्धि सोडून ब्रह्मार्पणपूर्वक आयुष्यांतील सर्व व्यवहार करणें हाहि एक मोठा यज्ञ किंवा होमच होत असून, या यज्ञानें सर्व देवतांची देवता जो परमेश्वर किंवा ब्रह्म त्याचें यजन घडत असतें. अर्थात् मीमांसकांचे द्रव्ययज्ञाबद्दल जे सिद्धान्त आहेत ते या बड्या यज्ञासहि लागू पडून, आसक्तिविरहित जगांतील कर्मे लोकसंग्रहार्थ करणारा पुरुष कर्मांच्या 'समग्र' फलापासून मुक्त होत्साता अखेर मोक्ष पावतो. (गीतार. प्र. ११ पृ. ३४२–३४५ पहा). हा ब्रह्मार्पणरूपी बडा यज्ञच पुढील श्लोकांत प्रथम वर्णिला आहे; आणि नंतर त्यापेक्षां कमी योग्यतेच्या अनेक लाक्षणिक यज्ञांचें स्वरूप सांगून, पुनः अशा प्रकारचा 'ज्ञानयज्ञच सर्वांत श्रेष्ठ', असा एकंदर प्रकरणाचा ३३ व्या श्लोकांत उपसंहार केला आहे.]

(२४) अर्पण म्हणजे हवन करण्याची क्रिया ब्रह्म, हवि म्हणजे अर्पण करावयाचें द्रव्य ब्रह्म, ब्रह्माग्नींत ब्रह्मानें हवन केलें; (सर्वच) कर्म (याप्रमाणें) ब्रह्म अशी ज्याची बुद्धि झाली त्याला ब्रह्मच मिळावयाचें.

['अर्पण' या शब्दाचा अर्थ "अर्पण करण्याचें साधन म्हणजे पळी इत्यादि" असा शांकर भाष्यांत केला आहे. पण तो जरा क्लिष्ट आहे.

दैवमेवापरे यज्ञं योगिनः पर्युपासते ।
ब्रह्माग्नावपरे यज्ञं यज्ञेनैवोपजुह्वति ॥ २५ ॥

यापेक्षा अर्पण म्हणजें अर्पण किंवा हवन करण्याची क्रिया असा अर्थ करणें अधिक सरळ होय. ब्रह्मार्पण म्हणजे निष्काम बुद्धीनें यज्ञ करणारांचें हें वर्णन झालें. आतां देवतोद्देशानें अर्थात् काम्य बुद्धीनें केलेल्या यज्ञाचें स्वरूप सांगतात—]

(२५) कित्येक (कर्म-) योगी (ब्रह्मबुद्धीच्या ऐवजीं) देवादिकांच्या उद्देशानें यजन करितात; आणि कित्येक ब्रह्माग्नींत यज्ञानेंच यज्ञाचें यजन करितात.

[ पुरुषसूक्तांत विराटरूपी यज्ञपुरुषाचें देवांनीं यजन केलें–" यज्ञेन यज्ञमयजन्त देवाः "–इत्यादि जें वर्णन आहे ( ऋ. १०.९०.१६ ), त्याला अनुलक्षून या श्लोकाचा उत्तरार्ध असून 'यज्ञं यज्ञेनैवोपजुह्वति' हीं पदें ऋग्वेदांतील 'यज्ञेन यज्ञमयजन्त' यांशीं समानार्थक म्हणून योजिलेलीं दिसतात. सृष्टीच्या आरंभीं झालेल्या या यज्ञांत ज्या विराटरूपी पशूचें हवन केलें तो पशु व ज्या देवाचें यजन केलें तो देव हे ब्रह्मरूपच असले पाहिजेत हें उघड आहे. सारांश, सृष्टींतील सर्व पदार्थांत नेहमींच ब्रह्म भरलेलें असल्यामुळें निरिच्छ बुद्धीनें सर्व व्यवहार करीत असतां ब्रह्मानेंच नेहमीं ब्रह्माचें यजन होत असतें, असें जें २४ व्या श्लोकांत वर्णन आहे तेंच तत्वदृष्ट्या खरें होय; बुद्धि मात्र तशी झाली पाहिजे. पुरुषसूक्ताला अनुलक्षून गीतेंत हा एकच श्लोक नसून पुढें दहाव्या अध्यायांतहि (१०.४२) या सूक्ताला अनुसरून वर्णन आहे. देवतोद्देशानें केलेले यज्ञ सांगितले, आतां अग्नि, हवि इत्यादि शब्दांचे लाक्षणिक अर्थ घेऊन प्राणायामादि पातंजल योगांतील क्रिया किंवा तपाचरणहि एक प्रकारचा यज्ञ कसा होतो, तें सांगतात—]

श्रोत्रादीनींद्रियाण्यन्ये संयमाग्निषु जुह्वति ।
शब्दादीन्विषयानन्य इंद्रियाग्निषु जुह्वति ॥ २६ ॥
सर्वाणींद्रियकर्माणि प्राणकर्माणि चापरे ।
आत्मसंयमयोगाग्नौ जुह्वति ज्ञानदीपिते ॥ २७ ॥

(२६) दुसरे कोणी श्रोत्रादि (कान, डोळे इत्यादि) इंद्रियांचा संयमरूप अग्नींत होम करितात; आणि कांहीं इंद्रीयरूप अग्नींत (इंद्रीयांच्या) शब्दादि विषयांचा होम करितात. (२७) दुसरे कांहीं लोक इंद्रियांची व प्राणांचीं सर्व कर्मे म्ह० व्यापार ज्ञानानें प्रज्वलित झालेल्या आत्मसंयमनरूप योगाच्या अग्नींत हवन करीत असतात.

[दोनतीन प्रकारचे लाक्षणिक यज्ञ वरील श्लोकांत वर्णिले आहेत. (१) इंद्रियांचें संयमन करणें म्हणजे त्यांस योग्य मर्यादेच्या आंत आपआपले व्यवहार करूं देणें; (२) इंद्रियांचे विषय म्हणजे उपभोग्य पदार्थ सर्वस्वीं सोडून देऊन, इंद्रियें अजीबात मारून टाकणें; (३) इंद्रियांचेच नव्हे, तर प्राणाचेहि व्यापार बंद ठेवून म्हणजे पुरी समाधी लावून केवळ आत्मानंदांतच गढून रहाणें. आतां यज्ञाची उपमा यांस लागू केली म्हणजे पहिल्या प्रकारांत इंद्रियांस घालून दिलेली मर्यादा (संयमन) हा अग्नी झाला. कारण दृष्टान्तानें या मर्यादेच्या जें आंत आलें त्याचें त्यांत हवन केलें असें म्हणतां येतें. दुसऱ्या प्रकारांत याचप्रमाणें साक्षात् इंद्रियें आणि तिसऱ्यांत इंद्रियें व प्राण मिळून दोन्ही होम करावयाचीं द्रव्यें होऊन आत्मसंयमन हा अग्नी होतो. याखेरीज नुसता प्राणायामच करणारे कित्येक असतात; व त्यांचें वर्णन पुढें २९ व्या श्लोकांत आहे. 'यज्ञ' शब्दाचा द्रव्यात्मक यज्ञ हा मूळचा अर्थ लक्षणेनें विस्तृत व व्यापक करून तप, संन्यास, समाधी, प्राणायाम वगैरे भगवत्प्राप्तीच्या सर्व प्रकारच्या साधनांचा 'यज्ञ' या एका सदरांतच समावेश करण्याची ही कल्पना भगवद्गीतेंतच

द्रव्ययज्ञास्तपोयज्ञा योगयज्ञास्तथापरे ।
स्वाध्यायज्ञानयज्ञाश्च यतयः संशितव्रताः ॥ २८ ॥
अपाने जुह्वति प्राणं प्राणेपानं तथापरे ।

अपूर्व सांगितलेली आहे असें नाहीं. मनुस्मृतीच्या ४ थ्या अध्यायांत गृहस्थाश्रमाचें वर्णन चालू असतां प्रथम ऋषियज्ञ, देवयज्ञ, भूतयज्ञ, मनुष्ययज्ञ व पितृयज्ञ, हे स्मार्त पंचमहायज्ञ प्रत्येक गृहस्थानें सोडूं नयेत असें सांगितल्यावर, याऐवजीं कित्येक "इंद्रियांत वाचेचें, किंवा वाचेंत प्राणाचें हवन करून अगर अखेर ज्ञानयज्ञानेंहि परमेश्वराचें यजन करितात," असें म्हटलें आहे (मनु. २१–२४ पहा.). इतिहासदृष्ट्या पाहिलें तर इंद्र, वरूण, वगैरे देवतोद्देशानें जे द्रव्यमय यज्ञ श्रौत ग्रंथांत सांगितले आहेत ते मागें पडत जाऊन पातंजल योगानें, संन्यासानें किंवा आध्यात्मिक ज्ञानानें परमेश्वरप्राप्ति करून घेण्याचे मार्ग जेव्हां अधिकाधिक प्रचारांत येऊं लागले, तेव्हां 'यज्ञ' शब्दाचा अर्थ विस्तृत करून त्यांतच सर्व मोक्षोपायांचा लक्षणेनें समावेश करण्यांस सुरुवात झाली असावी असें दिसून येतें. पूर्वीं धर्मदृष्ट्या रूढ झालेले शब्दच पुढील धर्ममार्गांस लावावयाचे हें यांतील बीज होय. कसेंहि असो; गीतेच्या पूर्वीं किंवा निदान तत्कालीं तरी ही कल्पना सर्वमान्य झालेली होती एवढें मनुस्मृतींतील विवेचनावरून स्पष्ट होतें.

(२८) याप्रमणें तीक्ष्ण व्रताचरण करणारे यति म्हणजे संयमनशील पुरुष कोणी द्रव्यरूप, कोणी तपोरूप, कोणी योगरूप, स्वाध्याय म्हणजे नित्य स्वकर्मानुष्ठानरूप आणि कोणी ज्ञानरूप यज्ञ करीत असतात. (२९) प्राणायामाचें ठायीं तत्पर होत्साते प्राण व अपान यांच्या गतीचा निरोध करून, कित्येक प्राणवायूचा अपानांत, तर दुसरे अपानवायूचा प्राणांत होम करितात.

प्राणापानगती रुद्ध्वा प्राणायामपरायणाः ॥ २९ ॥
अपरे नियताहाराः प्राणान्प्राणेषु जुह्वति ।
सर्वेऽप्येते यज्ञविदो यज्ञक्षपितकल्मषाः ॥ ३० ॥

[ पातंजल योगाप्रमाणें प्राणायाम करणें हा तरी एक यज्ञच होय असें या श्लोकांचें तात्पर्य आहे. हा पातंजलयोगरूप यज्ञ २९ व्या श्लोकांत सांगितला असल्यामुळें "योगरूप यज्ञ" या २८ व्या श्लोकांतील पदाचा अर्थ कर्मयोगरूपी यज्ञ असा केला पाहिजे. प्राणायाम शब्दांत प्राण या शब्दानें श्वास व उच्छ्वास या दोन्ही क्रिया दाखविल्या जातात; पण प्राण आणि अपान असा जेव्हां भेद करितात, तेव्हां प्राण म्हणजे पुढें जाणारा म्हणजे उच्छ्वास वायु आणि अपान म्हणजे आंत येणारा श्वास, असा अर्थ घेत असतात (वे. सू. शां. भा. २.४.१२; व छांदोग्य. शां. भा. १.३.३. पहा). प्राण व अपान यांचे अर्थ नेहमींच्या प्रचारांतील अर्थांहून भिन्न आहेत हें येथें लक्षांत ठेविलें पाहिजे. या अर्थी अपानांत आंत ओढून घेतलेल्या श्वासांत प्राणाचा म्हणजे उच्छ्वासाचा होम केला म्हणजे पूरक नांवाचा प्राणायाम होतो; आणि उलटपक्षीं प्राणांत अपानाचा होम केला ह्मणजे प्राणायाम रेचक ह्मणावयाचा. प्राण व अपान या दोहोंचाहि निरोध झाला ह्मणजे तोच प्राणायाम कुंभक होय. आतां याखेरीज व्यान, उदान व समान असे तीन वायु शिल्लक राहिले. पैकीं व्यान हा प्राण व अपान यांच्या संधिस्थानीं राहून, धनुष्य ओढणें, ओझें उचलणें इत्यादी दम छाटून किंवा अर्धवट श्वास आंवरून जोराचीं कर्में जेव्हां करावीं लागतात तेव्हां व्यक्त होतो (छां १.३ ६.) उदान ह्मणजे मरणसमयीं निघून जाणारा (प्रश्न ३.५), व समान ह्मणजे अन्नरस शरीरांत सर्व ठिकाणीं एकसारखा पोचविणारा वायु (प्रश्न ३.५) असे या वायूंचे वेदान्तशास्त्रांतले सामान्य अर्थ होत. परंतु कांहीं ठिकाणीं यांपेक्षां निराळे

यज्ञशिष्टामृतभुजो यान्ति ब्रह्म सनातनम् ।
नायं लोकोऽस्त्ययज्ञस्य कुतोऽन्यः कुरुसत्तम ॥ ३१ ॥

अर्थ अभिप्रेत असतात; उदाहरणार्थ, महाभारत, वनपर्व, अध्याय २१२ यांत प्राणादि वायूंचीं निराळींच लक्षणें दिलीं असून त्यांत प्राण म्हणजे डोक्यांतला व अपान म्हणजे खालीं सरकणारा वायु असें म्हटलें आहे (प्रश्न ३.५ व मैत्र्यु. २.६ पहा). यापैकीं ज्या वायूचा निरोध करितात त्याचा इतर वायूंत होम होतो, असा वरील श्लोकांतील वर्णनाचा अर्थ आहे. ]

(३०) दुसरे कित्येक आहार नियमित करून प्राणांचाच प्राणाच्या ठायीं होम करितात हे सर्वच यज्ञानें क्षीणपाप झालेले, यज्ञवेत्ते, (३१) ( आणि ) अमृत यज्ञवेत्ते, ( ३१ ) ( आणि ) अमृत म्हणजे यज्ञ करून जें शेष रहातें, त्याचा उपभोग घेणारे असून सनातन ब्रह्माप्रत पोंचतात. यज्ञ न करणारास इहलोक ( सिद्ध होत ) नाहीं; मग हे कुरुश्रेष्ठा ! परलोक कोठून ( मिळणार ) ?

[ सारांश, यज्ञ करणें जरी वेदाज्ञेप्रमाणें मनुष्याचें कर्तव्य आहे तरी हा यज्ञ एक प्रकारचा असतो असें नाहीं. प्राणायाम करा, तप करा, वेदाध्ययन करा, अग्निष्टोम करा, पशुयज्ञ करा, तीळतांदूळ किंवा तूप यांचें हवन करा, वेदाध्ययन करा, पूजा करा किंवा नैवेद्यवैश्वदेवादि पांच गृहयज्ञ करा, फलासक्ति सुटलेली असली म्हणजे हे सर्व व्यापक अर्थानें यज्ञच होतात; आणि मग यज्ञशेषभक्षणासंबंधानें मीमांसकांचे जे सिद्धान्त आहेत. ते सर्व यांपैकीं प्रत्येक यज्ञास लागू पडतात. पैकीं पहिला नियम म्हटला म्हणजे " यज्ञार्थ केलेलें कर्म बंधक होत नाहीं " हा होय, व तो पूर्वीं २३ व्या श्लोकांत सांगितला ( गी. ३.९ वरील टीका पहा ). आतां दुसरा नियम असा आहे कीं, प्रत्येक गृहस्थानें पंचमहायज्ञ करून अतिथि वगैरे जेवल्यावर मग आपल्या पत्नी-

एवं बहुविधा यज्ञा वितता ब्रह्मणो मुखे ।

सह भोजन करावें; आणि याप्रमाणें वर्तन केलें म्हणजे गृहस्थाश्रम सफल होऊन सद्गतिप्रद होतो. " विघसं भुक्तशेषं तु यज्ञशेषमथामृतम् " ( मनु. ३.२८५ )—अतिथि वगैरे जेवून उरेल तें 'विघस' व यज्ञ करून शेष राहील तें 'अमृत'—अशा व्याख्या देऊन प्रत्येक गृहस्थानें नित्य विघसाशी व अमृताशी असावें असें मनुस्मृतींत व इतर स्मृतींतहि म्हटलें आहे ( गी. ३.१३ व गीतारहस्य पृ. २८८ पहा ). भगवान आतां असें सांगतात कीं, हा जो सामान्य गृहयज्ञास लागू होणारा सिद्धान्त तोच वरील सर्व प्रकारच्या यज्ञांस लागू पडतो. यज्ञार्थ केलेलें कोणतेंहि कर्म बंधक होत नाहीं इतकेंच नव्हे, तर त्या कर्मांपैकीं अवशिष्ट कर्मे आपल्या स्वतःच्या उपयोगाला लागलीं तरीहि तीं बंधक होत नाहींत ( गीतार. प्र. १२ पृ. ३८३ पहा ). "यज्ञाखेरीज इहलोकहि सिद्ध होत नाहीं" हें शेवटचें वाक्य मार्मिक असून महत्त्वाचें आहे. यज्ञाखेरीज पाऊस पडत नाहीं व पाऊस न पडला म्हणजे इहलोकींची यात्रा चालत नाहीं एवढाच त्याचा अर्थ नाहीं. तर 'यज्ञ' शब्दाचा व्यापक अर्थ घेऊन, आपल्याला प्रिय झालेल्या कांहीं गोष्टी प्रत्येकानें सोडून दिल्याखेरीज सर्वांना सारखीच सवलत मिळून जगाचे व्यवहार चालणें शक्य नाहीं, या सामाजिक तत्त्वाचाहि त्यांत पर्यायानें समावेश झालेला आहे. उदाहरणार्थ, प्रत्येकानें आपल्या स्वातंत्र्याला आळा घातल्याखेरीज इतरांस सारखेंच स्वातंत्र्य मिळणें शक्य नाहीं, असा पाश्चिमात्य समाजशास्त्रकार जो सिद्धान्त सांगतात तोच या तत्त्वाचें एक उदाहरण आहे; आणि गीतेच्या परिभाषेनेंच हाच अर्थ सांगावयाचा असल्यास " प्रत्येकानें आपल्या स्वातंत्र्याचा अंशतः तरी यज्ञ केल्याखेरीज इहलोकींचे व्यवहार चालावयाचे नाहींत, " अशी यज्ञपर भाषाच या ठिकाणीं योजावी लागेल अशा प्रकारच्या व्यापक व विस्तृत अर्थानें यज्ञ हाच सर्व समाजरचनेचा

कर्मजान्विद्धि तान्सर्वानेवं ज्ञात्वा विमोक्ष्यसे ॥ ३२ ॥
श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परंतप ।
सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते ॥ ३३ ॥

पाया ठरल्यावर केवळ कर्तव्य म्हणून हे 'यज्ञ' करण्यास प्रत्येक मनुष्य शिकल्याखेरीज समाजव्यवस्था नीट रहावयाची नाहीं, हें सांगावयास नको. ]

( ३२ ) याप्रमाणें अनेक प्रकारचे यज्ञ ब्रह्माचे (च) मुखांत चालू आहेत ते सर्व कर्मापासून निष्पन्न होतात असें जाण. हे ज्ञान झालें म्हणजे तूं मुक्त होशील.

[ ज्योतिष्टोमादि द्रव्यमय श्रौतयज्ञ अग्नींत हवन करून करितात; व अग्नि हें देवांचें मुख असल्यामुळें हे यज्ञ त्या त्या देवतांस पोंचतात असें शास्त्रांत सांगितलें आहे. पण देवांचें मुख जो अग्नि त्यांत वर सांगितलेले लाक्षणिक यज्ञ होत नसल्यामुळें, या लाक्षणिक यज्ञांनीं श्रेयःप्राप्ति कशी होणार, अशी कदाचित् कोणी शंका घेईल, तर ती दूर करण्यासाठीं हे यज्ञ साक्षात् ब्रह्माच्याच मुखांत होतात असें आतां म्हटलें आहे. यज्ञविधींचें हे व्यापक स्वरूप—केवळ मीमांसकांचा संकुचित अर्थच नव्हे—ज्या पुरुषानें जाणिले त्याची बुद्धि कोती न रहातां ब्रह्मस्वरूप ओळखण्यास तो अधिकारी होतो, असा दुसऱ्या चरणाचा भावार्थ आहे. आतां या सर्व प्रकारच्या यज्ञांत श्रेष्ठ कोणता तें सांगतात—]

(३३) हे परंतपा ! द्रव्यमय यज्ञापेक्षां ज्ञानमय यज्ञ श्रेष्ठ. कारण हे पार्था ! सर्व प्रकारच्या सर्व कर्मांचें पर्यवसान ज्ञानांत होत असतें.

[ 'ज्ञानयज्ञ' हा शब्द गीतेंत पुढेंहि दोनदां आलेला आहे ( गी.९. १५ व १८. ७० ). आपण द्रव्यमय यज्ञ करितों तो परमेश्वरप्राप्त्यर्थ करीत असतो. पण परमेश्वराची प्राप्ति त्याच्या स्वरूपाचें ज्ञान झाल्या-

§§ तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ।
उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः ॥ ३४ ॥
यज्ज्ञात्वा न पुनर्मोहमेवं यास्यसि पांडव ।
येनभूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि ॥ ३५ ॥

खेरीज होत नाहीं. म्हणून परमेश्वरस्वरूपाचें ज्ञान करून घेऊन त्या ज्ञानाला अनुरूप अशा आचरणानें परमेश्वराची प्राप्ति करून घेणें या मार्गास किंवा साधनास 'ज्ञानयज्ञ' असें म्हणतात. हा यज्ञ मानस व बुद्धिसाध्य असून द्रव्यमय यज्ञापेक्षां याची योग्यता अर्थात् अधिक समजतात. ज्ञानयज्ञांतील हें ज्ञानच मोक्षशास्त्रांत मुख्य असून या ज्ञानानेंच सर्व कर्मांचा क्षय होतो, कांहीं झालें तरी शेवटीं परमेश्वराचें ज्ञान झालें पाहिजे. ज्ञानाखेरीज मोक्ष नाहीं, हा गीतेचा कायम सिद्धान्त आहे. तथापि "कर्मांचें पर्यवसान ज्ञानांत होतें" या वचनाचा ज्ञानोत्तर कर्में सोडून द्यावयाचीं असा अर्थ नाहीं हें गीतारहस्याच्या १० व्या व ११ व्या प्रकरणांत सविस्तर प्रतिपादन केलें आहे. स्वतःसाठीं नको तरी लोकसंग्रहार्थ कर्तव्य म्हणून सर्व कर्में केलींच पाहिजेत; आणि तीं ज्या अर्थी ज्ञानानें व समबुद्धीनें केलेलीं असतात त्या अर्थी त्यांच्या पापपुण्याची बाधा कर्त्यास न लागतां (पुढें श्लोक ३७ पहा) हा ज्ञानयज्ञ मोक्षप्रद होतो. म्हणून यज्ञ करा, पण ते ज्ञानपूर्वक निष्काम बुद्धीनें करा, असा गीतेचा सर्वांस उपदेश आहे. ]

(३४) ध्यानांत ठेव कीं, तें ज्ञान प्रणिपातानें, प्रश्नानें आणि सेवेनें तत्त्ववेत्ते ज्ञानी पुरुष तुला उपदेशितील; (३५) जें ज्ञान प्राप्त झाल्यावर हे पांडवा ! पुनः तुला या प्रकारें मोह होणार नाहीं, आणि ज्या ज्ञानाच्या योगानें यच्चावत् सर्व भूतें तुझ्या स्वतःचे ठायीं, आणि मग माझ्या ठायीं, आहेत असें तुला दिसून येईल.

[ सर्व भूतें आपल्यांत आणि आपण सर्व भूतांत असें जें सर्वभूता-

अपि चेदसि पापेभ्यः सर्वेभ्यः पापकृत्तमः ।
सर्वं ज्ञानप्लवेनैव वृजिनं संतरिष्यसि ॥ ३६ ॥
यथैधांसि समिद्धोऽग्निर्भस्मसात्कुरुतेऽर्जुन ।
ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात्कुरुते तथा ॥ ३७ ॥
§§ न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।
तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विंदति ॥ ३८ ॥

त्मैक्यज्ञान पुढें वर्णिलें आहे: (गी. ६. २९), त्याचाच येथें उल्लेख केलेला आहे. आत्मा आणि भगवान् हे दोन्ही मूळांत एकरूप असल्यामुळें, आत्म्यांत सर्व भूतांचा समावेश होतो म्हणजे पुढें अर्थातच भगवंताच्या ठायींहि त्यांचा समावेश होऊन, आत्मा (आपण), इतर भूतें व भगवान् हा त्रिविध भेद नाहींसा होतो. यासाठीं भागवतपुराणांत भगवद्भक्ताचें लक्षण देतांना "सर्व भूतें भगवंतांत व आपणांत जो पहातो तो उत्तम भागवत म्हणावा" असें सांगितलें आहे. (भाग. ११.२.४५). या महत्त्वाच्या गीतातत्त्वाचा जास्त खुलासा गीतारहस्याच्या १२ व्या (पृ. ३८८-३९६) व भक्तिदृष्ट्या १३ व्या (पृ. ४२८) प्रकरणांत केला आहे तो पहा.]

(३६) सर्व पापी लोकांपेक्षां जरी अधिक पाप करणारा असलास तरी (या) ज्ञाननौकेनेंच सर्व पाप तूं तरून जाशील. (३७) ज्याप्रमाणें प्रज्वलित केलेला अग्नि (सर्व) काष्टें भस्म करून टाकितो त्याप्रमाणें हे अर्जुना! (हा) ज्ञानरूप अग्नि सर्व कर्मांचें (शुभाशुभ बंधन) भस्म करून टाकितो.

[ज्ञानाची महती काय ती सांगितली. आतां हें ज्ञान कोणत्या उपायांनीं संपादन होतें तें सांगतात—]

(३८) ज्ञानासारखें पवित्र या लोकीं खरोखरच दुसरें कांहीं नाहीं. तें ज्ञान कालानें ज्यास योग म्हणजे कर्मयोग सिद्ध झाला तो स्वतःच आपल्या ठायीं प्राप्त करून घेतो.

श्रद्धावांल्लभते ज्ञानं तत्परः संयतेंद्रियः ।
ज्ञानं लब्ध्वा परां शान्तिमचिरेणाधिगच्छति ॥ ३९ ॥
अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति ।
नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः ॥ ४० ॥
§§ योगसंन्यस्तकर्माणं ज्ञानसंछिन्नसंशयम् ।
आत्मवन्तं न कर्माणि निबध्नन्ति धनंजय ॥ ४१ ॥

[ ३७ व्या श्लोकांत 'कर्में' याचा अर्थ 'कर्मांचें बंधन' असा आहे (गी. ४.१९ पहा). स्वतःच्या बुद्धीनें आरंभिलेल्या निष्काम कर्मांनीं ज्ञानप्राप्ति करून घेणें हा ज्ञानप्राप्तीचा मुख्य किंवा बुद्धिगम्य मार्ग होय. पण ज्याला स्वतः आपल्या बुद्धीनें याप्रमाणें ज्ञान प्राप्त करून घेतां येत नाहीं त्याच्याकरितां श्रद्धेचा दुसरा मार्ग आतां सांगतात—]

(३९) हें ज्ञान जो श्रद्धावान् पुरुष इंद्रियसंयमन करून त्याच्याच पाठीस लागला त्याला (-हि) मिळतें; आणि ज्ञान प्राप्त झालें म्हणजे लागलीच त्याला परम शान्ति प्राप्त होत्ये.

[ सारांश, बुद्धीनें जें ज्ञान व शान्ति प्राप्त होणार तीच श्रद्धेनेंहि मिळत्ये (गी. १३. २५ पहा). परंतु ज्याला स्वतः बुद्धि नाहीं आणि श्रद्धाहि नाहीं तो—]

(४०) पण ज्याला स्वतः ज्ञान नाहीं आणि श्रद्धाहि नाहीं असा संशयखोर मनुष्य नाश पावतो. संशयखोराला हा लोक नाहीं, परलोक नाहीं आणि सुखहि नाहीं.

[ ज्ञानप्राप्तीचे स्वतःची बुद्धि आणि श्रद्धा हे दोन मार्ग सांगितले. आतां ज्ञान व कर्मयोग यांचे पृथक् उपयोग दाखवून सर्व विषयांचा उपसंहार करितात—]

(४१) हे धनंजया ! (कर्म-) योगाच्या आश्रयानें ज्यानें कर्में म्हणजे

तस्मादज्ञानसंभूतं हृत्स्थं ज्ञानासिनात्मनः ।
छित्त्वैनं संशयं योगमातिष्ठोत्तिष्ठ भारत ॥ ४२ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे ज्ञानकर्मसंन्यासयोगो नाम चतुर्थोऽध्यायः ॥ ३ ॥

---

कर्मबंधनें टाकिलीं, आणि ज्ञानामुळें ज्याचे संशय छिन्न झाले, अशा आत्मज्ञानी पुरुषाला कर्में बाधूं शकत नाहींत. (४२) तस्मात् आपल्या हृदयांत अज्ञानानें उत्पन्न झालेला हा संशय ज्ञानरूप तरवारीनें छाटून टाकून, (कर्म-) योगाचा आश्रय कर. (आणि) हे भारता! (युद्धाला) उभा रहा!

[ ईशावास्योपनिषदांत 'विद्या' आणि 'अविद्या' यांचे पृथक् उपयोग दाखवून ज्याप्रमाणें दोन्ही न सोडितां आचरण करण्यास सांगितलें आहे (ईश. ११; गीतार. प्र. ११ पृ. ३५७ पहा), त्याचप्रमाणें गीतेच्या या दोन श्लोकांत ज्ञान आणि (कर्म-) यांचे पृथक् उपयोग दाखवून त्यांच्या म्ह० ज्ञान व योग यांच्या समुच्चयानें कर्में करण्याबद्दल अर्जुनास उपदेश आहे. निष्काम बुद्धियोगानें कर्में केलीं म्हणजे कर्मांचीं बंधनें तुटून जाऊन तीं मोक्षाला प्रतिबंधक होत नाहींत, आणि ज्ञानानें मनांतले संशय फिटून मोक्ष मिळतो, असा या दोहोंचा पृथक् पृथक् उपयोग आहे. म्हणून एकटें कर्म अगर एकटें ज्ञान न स्वीकारितां ज्ञानकर्मसमुच्चयात्मक आश्रय करून युद्ध कर, असा अखेर उपदेश आहे. योगाचा आश्रय करून युद्धाला उभें रहावयाचें असल्यामुळें योग शब्दाचा 'कर्मयोग' असाच येथें अर्थ घेणें जरूर पडतें, हें गीतारहस्य प्र. ३ पृ. ५९ मध्यें दाखविलें आहे. ज्ञान आणि योग यांचा हा मिलाफच " ज्ञानयोग व्यवस्थितिः " या पदानें पुढें (गी. १६.१) दैवी संपत्तीच्या लक्षणांत पुनः सांगितला आहे. ]

याप्रमाणें श्रीभगवंतांनीं गाईलेल्या म्हणजे सांगितलेल्या उपनिषदांत ब्रह्मविद्यान्तर्गत योग–म्हणजे कर्मयोग–शास्त्रावरील श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या संवादांतील ज्ञानकर्मसंन्यासयोग नांवाचा चवथा अध्याय समाप्त झाला.

[ 'ज्ञानकर्मसंन्यास' या पदांत 'संन्यास' शब्दाचा अर्थ स्वरूपतः 'कर्मत्याग' नसून निष्काम बुद्धीनें परमेश्वराचे ठायीं कर्मांचा संन्यास म्हणजे 'अर्पण' करणें असा अर्थ आहे हें लक्षांत ठेविलें पाहिजे; व तोच खुलासा पुढें १८ व्या अध्यायाचे आरंभीं केला आहे. ]

---

## पंचमोऽध्यायः ।

अर्जुन उवाच ।

संन्यासं कर्मणां कृष्ण पुनर्योगं च शंससि ।
यच्छ्रेय एतयोरेकं तन्मे ब्रूहि सुनिश्चितम् ॥ १ ॥

श्रीभगवानुवाच ।

संन्यासः कर्मयोगश्च निःश्रेयसकरावुभौ ।

## अध्याय पांचवा.

[ चवथ्या अध्यायांतील सिद्धान्तावर संन्यासमार्गीय लोकांची जी शंका येण्याचा संभव आहे तीच अर्जुनाचे मुखांतून प्रश्नरूपानें वदवून तिचें स्पष्ट उत्तर या अध्यायांत भगवंतांनीं दिलें आहे. ज्ञान हें सर्व कर्मांचें पर्यवसान नसून (४.३३) ज्ञानानेंच जर सर्व कर्में भस्म होतात (४.३७) व द्रव्यमय यज्ञापेक्षां ज्ञानमय यज्ञच जर श्रेष्ठ (४.४३), तर दुसऱ्याच अध्या-

तयोस्तु कर्मसंन्यासात्कर्मयोगो विशिष्यते ॥ २ ॥

यांत " धर्म्य असें जें युद्ध तेंच करणें क्षत्रियाला श्रेयस्कर होय " (२.३१) असें सांगून, " म्हणून तूं कर्मयोगाचा आश्रय करून युद्धाला उठ " (४४.२) असा चवथ्या अध्यायाचा उपसंहार कां केला? गीतेचें या प्रश्नास असें उत्तर आहे कीं, सर्व संशय दूर होऊन मोक्ष मिळविण्याकरितां ज्ञान, आणि मोक्षाकरितां नको असलीं तरी कधीं न सुटणारीं असल्यामुळें लोकसंग्रहार्थ कर्में, मिळून दोहोंच्याहि समुच्चयाची नित्य अपेक्षा आहे (४.४१) परंतु यावरहि अशी शंका निघते कीं, कर्मयोग आणि सांख्य असे दोन्ही मार्ग जर शास्त्रांत विहित आहेत, तर त्यांपैकीं आपल्या खुषी-प्रमाणें सांख्य मार्ग पत्करून कर्मांचा त्याग करण्यास हरकत कोणती? अर्थात् या दोन मार्गांपैकीं श्रेष्ठ कोणता याचाहि पुरा निर्णय केला पाहिजे; व अर्जुनाचे मनांत तीच शंका येऊन पूर्वी तिसऱ्या अध्यायाचे आरंभीं त्यानें ज्याप्रमाणें प्रश्न केला होता तद्वत् आतांहि पुनः तो असें विचारितो कीं—]

(१) अर्जुन ह्मणाला—हे कृष्णा! एकदां संन्यास तर पुनः कर्मांचा योग (ह्मणजे कर्में करीत रहाण्याचा मार्गच) उत्तम असें सांगतां; तरी या दोहोंपैकीं खरोखरीच जें श्रेय ह्मणजे अधिक प्रशस्त तें एकच निश्चित-पणें मला सांगा. (२) श्रीभगवान् ह्मणाले—कर्मसंन्यास व कर्मयोग हे दोन्ही (मार्ग किंवा निष्ठा) निःश्रेयस्कर म्ह० मोक्ष प्राप्त करून देणारे आहेत; पण (ह्मणजे मोक्षदृष्ट्या दोन्ही सारख्याच योग्यतेचे असले तरी) या दोहोंत कर्मसंन्यासापेक्षां कर्मयोगाची योग्यता किंवा मातब्बरी विशेष आहे.

[वरील प्रश्न व उत्तर दोन्ही निःसंदिग्ध व स्पष्ट आहेत. पहिल्या श्लोकांतील 'श्रेय' शब्दाचा व्याकरणांत अधिक प्रशस्य, अधिक चांगलें, असा अर्थ असून दोन मार्गांतील तारतम्यभावाबद्दलच्या अर्जु-नाच्या प्रश्नास 'कर्मयोगो विशिष्यते—कर्मयोगाची मातब्बरी विशेष

§§ ज्ञेयः स नित्यसंन्यासी यो न द्वेष्टि न कांक्षति ।

—हें उत्तर आहे. तथापि हा सिद्धान्त ज्ञानोत्तर सर्व कर्मांचा स्वरूपतः संन्यासच केला पाहिजे, या सांख्य मार्गास इष्ट नसल्यामुळें या स्पष्टार्थक प्रश्नोत्तरांची कित्येकांनीं फुकट ओढाताण करूनहि जेव्हां निभाव लागेना तेव्हां 'विशिष्यते' (योग्यता किंवा मातब्बरी विशेष) या पदानें भगवंतांनीं कर्मयोगाची अर्थवादात्मक ह्मणजे पोकळ स्तुती केली आहे, भगवंतांचा खरा अभिप्राय तसा नव्हे, असा शेरा मारून कसें तरी आपलें समाधान करून घेतलें आहे! ज्ञानोत्तर कर्में नकोत असें जर भगवंतांचें मत असतें तर अर्जुनाला "या दोहोंपैकीं संन्यास श्रेष्ठ" असें उत्तर भगवंतांस देतां येत नव्हतें काय? पण तसें न करितां "कर्में करणें व कर्में सोडणें हे दोन्ही मार्ग सारखेच मोक्षप्रद आहेत" असें दुसऱ्या श्लोकाच्या पहिल्या चरणांत सांगितल्यावर पुढें 'तु' ह्मणजे 'पण' हें पद घालून 'तयोः' ह्मणजे या दोन मार्गांपैकीं कर्में सोडण्याच्या मार्गापेक्षां कर्में करण्याचा पक्षच अधिक प्रशस्त (श्रेय) होय, असें ज्या अर्थी भगवंतांचें निःसंदिग्ध विधान आहे, त्या अर्थी साधनावस्थेंत ज्ञानप्राप्तीसाठीं जीं निष्काम कर्में करावयाचीं तींच पुढें सिद्धावस्थेंतहि लोकसंग्रहार्थ ज्ञात्यानें आमरणान्त कर्तव्य म्हणून चालू ठेविलीं पाहिजेत हेंच मत भगवंतास ग्राह्य आहे असें पूर्ण सिद्ध होतें. गीता ३.७ यांत हाच अर्थ वर्णिला असून 'विशिष्यते' हेंच पद तेथेंहि आहे, व त्याच्या पुढील श्लोकांत म्हणजे गीता ३.८ यांत "अकर्मापेक्षां कर्म श्रेष्ठ" असेहि पुनः स्पष्ट शब्द आहेत. आतां हें खरें आहे कीं, उपनिषदांतून कित्येक ठिकाणीं (बृ. ४.४.२२) ज्ञानी पुरुष लोकैषणा, पुत्रैषणा वगैरे न ठेवितां भिक्षा मागत हिंडत असतात असें वर्णन आहे. पण ज्ञानोत्तर हा एकच मार्ग आहे, दुसरा नाहीं, असें उपनिषदांतहि म्हटलेलें नाहीं म्हणून केवळ वरील

निर्द्वंद्वो हि महाबाहो सुखं बंधात्प्रमुच्यते ॥ ३ ॥
सांख्ययोगौ पृथग्बालाः प्रवदन्ति न पंडिताः ।
एकमप्यास्थितः सम्यगुभयोर्विंदते फलम् ॥ ४ ॥
यत्सांख्यैः प्राप्यते स्थानं तद्योगैरपि गम्यते ।

उपनिषद्वाक्याशींच गीतेची एकवाक्यता करणें युक्त नाहीं. उपनिषदांत वर्णिलेला हा संन्यासमार्ग मोक्षप्रद नव्हे असें गीतेचें म्हणणें नाहीं. पण कर्मयोग व संन्यास हे दोन्ही मार्ग जरी सारखेच मोक्षप्रद आहेत, तरी म्ह० मोक्षदृष्ट्या दोहोंचें फल एकच असतांहि, जगाच्या व्यवहाराचा विचार करितां ज्ञानोत्तरहि निष्काम बुद्धीनें कर्में करीत रहाणें, हाच मार्ग अधिक प्रशस्त किंवा श्रेष्ठ होय असें गीतेचें ठाम मत आहे. आम्हीं लाविलेला हा अर्थ गीतेवरील बहुतेक टीकाकारांस मान्य नसून त्यांनीं कर्मयोग गौण ठरविला आहे. पण आमच्या मतें हे अर्थ सरळ नव्हेत; व गीतारहस्याच्या अकराव्या प्रकरणांत (विशेषतः पृ. ३०१–२०९) याच्या कारणांचें सविस्तर विवेचन केलें असल्यामुळें येथें जास्त सांगून जागा अडवीत नाहीं. दोहोंपैकीं अधिक प्रशस्त मार्ग कोणता याचा निर्णय याप्रमाणें सांगितल्यावर व्यवहरांत लोकांस हे दोन मार्ग जरी भिन्न दिसले तरी तत्त्वतः ते दोन नाहींत असें आतां सिद्ध करून दाखवितात—]

(३) जो (कशाचाहि) द्वेष करीत नाहीं आणि (कशाचीही) इच्छा करीत नाहीं, तो पुरुष (कर्में) करूनहि नित्यसंन्यासी समजावयाचा; कारण, हे महाबाहो अर्जुना ! (सुखदुःखादि) द्वंद्वांपासून मुक्त झाला तो अनायासेंच (कर्मांच्या सर्व) बंधांपासून मुक्त होतो. (४) सांख्य (कर्मसंन्यास) आणि योग (कर्मयोग) हे भिन्न आहेत असें मूर्ख लोक म्हणतात; पंडित तसें म्हणत नाहींत. कोणताहि एक मार्ग चांगल्या तऱ्हेनें आचरिल्यास दोहोंचें फल

एकं साख्यं च योगं च यः पश्यति स पश्यति ॥ ५ ॥
संन्यासस्तु महाबाहो दुःखमाप्तुमयोगतः ।
योगयुक्तो मुनिर्ब्रह्म न चिरेणाधिगच्छति ॥ ६ ॥

मिळतें. (५) ज्या (मोक्ष–) स्थानीं सांख्य (मार्गांतले लोक) पोंचतात, तेथेंच योगी म्हणजे कर्मयोगीहि जातात. सांख्य आणि योग हे (दोन मार्ग अशा रीतीनें) एकच आहेत हें ज्यानें पाहिले त्यानेंच (खरें तत्व) ओळखिलें म्हणावयाचें. (६) संन्यास झाला तरी हे महाबाहो! तो योगाखेरीज म्हणजे कर्माखेरीज प्राप्त होणें दुर्घट होय. जो मुनि कर्मयोगयुक्त झाला त्याला ब्रह्माची प्राप्ति होण्यास उशीर लागत नाहीं.

[सांख्यमार्गानें जो मोक्ष मिळतो तोच कर्मयोगानें म्हणजे कर्मं न सोडितां कसा मिळतो याचें सविस्तर निरूपण पुढें ७ व्या अध्यायापासून १७ व्या अध्यायापर्यंत केलेलें आहे. सध्यां एवढेंच सांगणें आहे कीं, मोक्षदृष्टया दोहोंत कांहीं फरक नसल्यामुळें अनादि कालापासून चालत आलेल्या या दोन मार्गांतील भेद फुगवून दाखवून त्याकरितां तंटे करीत बसणें योग्य नव्हे; आणि पुढेंहि हाच युक्तिवाद पुनःपुनः आलेला आहे (गी. ६.२ व १८. १, २ व त्यावरील टीका पहा). "एकं सांख्यं च योगं च यः पश्यति स पश्यति" हाच श्लोक थोड्या शब्दभेदानें महाभारतांतहि दोनदां आला आहे (शां. ३०५. १९; ३१६. ४) संन्यासमार्गांत ज्ञान प्रधान मानिलें तरी त्या ज्ञानाची सिद्धि कर्में केल्याखेरीज होत नाहीं, आणि कर्ममार्गांत कर्में करीत असतात तरी तीं ज्ञानपूर्वक असल्यामुळें ब्रह्मप्राप्ति व्हावयाची रहात नाहीं (गी ६. २); मग दोन मार्ग निरनिराळे आहेत, असें बंड माजविण्यांत काय हंशील? कर्में करणेंच बंधक म्हणावें तर तो आक्षेपहि निष्काम कर्मास लागू होत नाहीं असें आतां सांगतात—]

§§ योगयुक्तो विशुद्धात्मा विजितात्मा जितेंद्रियः ।
सर्वभूतात्मभूतात्मा कुर्वन्नपि न लिप्यते ॥ ७ ॥
नैव किंचित्करोमीति युक्तो मन्येत तत्त्ववित् ।
पश्यन्शृण्वन्स्पृशञ्जिघ्रन्नश्नन्गच्छन्स्वपन्श्वसन् ॥ ८ ॥
प्रलपन्विसृजन्गृह्णन्नुन्मिषन्निमिषन्नपि ।
इंद्रियाणींद्रियार्थेषु वर्तन्त इति धारयन् ॥ ९ ॥

(७) जो (कर्म-) योगयुक्त झाला, ज्याचें अंतःकरण शुद्ध, ज्यानें आपलें मन आणि इंद्रियें जिंकलीं, व सर्व भूतांचा आत्मा हाच ज्याचा आत्मा झाला, तो (सर्व कर्में) करीत असतांहि (कर्मांच्या पापपुण्यापासून) अलिप्त असतो. (८) योगयुक्त तत्त्ववेत्त्या पुरुषानें "मी कांहींच करीत नाहीं" असें समजावें; (आणि) पाहतांना, ऐकतांना, स्पर्श करितांना, वास घेतांना, खातांना, चालतांना, निजतांना, श्वासोच्छ्वास करितांना, (९) बोलतांना, विसर्जन करितांना, घेतांना, डोळ्यांच्या पापण्या उघडतांना व मिटतांनाहि (केवळ) इंद्रियें आपआपल्या विषयांचे ठायीं वर्तत आहेत अशी बुद्धि ठेवून (वागावें).

[शेवटचे दोन श्लोक मिळून एकच वाक्य असून त्यांत सांगितलेलीं सर्व कर्में निरनिराळ्या इंद्रियांचे व्यापार आहेत; उदाहरणार्थ, विसर्जन करणें गुदाचा, घेणें हाताचा, पापण्या हालविणें प्राणवायूचा, पहाणें डोळ्यांचा इ०. "मी कांहींच करीत नाहीं" याचा अर्थ इंद्रियांना हवें तें करूं द्यावें असा नाहीं; तर 'मी' ही अहंकारबुद्धि सुटली म्हणजे अचेतन इंद्रियें आपण होऊन कांहीं वाईट काम करूं शकत नाहींत, व आत्म्याच्या ताब्यांत रहातात, असा अर्थ आहे. सारांश, पुरुष ज्ञानी झाला तरी श्वासोच्छ्वासादि इंद्रियांचीं कर्में इंद्रियें करणारच. किंबहुना क्षणभर जिवंत रहाणें हें देखील कर्मच. मग संन्यासमार्गी ज्ञानी पुरुष कर्में सोडितो व कर्मयोगी करितो हा भेद राहिला कोठें? कर्में करणें

ब्रह्मण्याधाय कर्माणि संगं त्यक्त्वा करोति यः ।
लिप्यते न स पापेन पद्मपत्रमिवांभसा ॥ १० ॥
कायेन मनसा बुद्ध्या केवलैरिंद्रियैरपि ।
योगिनः कर्म कुर्वन्ति संगं त्यक्त्वाऽऽत्मशुद्धये ॥ ११ ॥

दोघांसहि प्राप्त आहे. पण अहंकारयुक्त आसक्ति सुटली म्हणजे तींच कर्में बंधक होत नसल्यामुळें आसक्ति सोडणें हेंच काय तें यांतील मुख्य तत्त्व होय; व त्याचेंच आतां जास्त निरूपण करितात—]

( १० ) ब्रह्माचे ठायीं अर्पण करून आसक्तिविरहित जो कर्मे करितो त्याला कमळाच्या पानाला जसें पाणी त्याप्रमाणें पाप चिकटत ( लागत ) नाहीं. ( ११ ) म्हणून कर्मयोगी ( मी करितों अशी अहंकारबुद्धि न ठेवितां केवळ ) शरीरानें, ( केवळ ) मनानें ( केवळ ) बुद्धीनें आणि केवळ इंद्रियांनींहि आसक्ति सोडून आत्मशुद्ध्यर्थ कर्में करीत असतात.

[ कायिक वाचिक मानसिक इत्यादि कर्मांचे जे भेद आहेत त्यांना अनुलक्षून शरीर, मन व बुद्धि हे शब्द या श्लोकांत आले आहेत. ' केवलैः ' हें विशेषण मूळांत जरी ' इंद्रियैः ' या शब्दामागें आहे तरी तें शरीर, मन व बुद्धि यांसहि लागू आहे ( गी. २.४१ पहा ) म्हणून भाषांतरांत तें ' शरीर ' शब्दाप्रमाणें इतर शब्दांच्याहि मागें घातलें आहे. वर ८ व्या श्लोकांत वर्णन केल्याप्रमाणें अहंकारबुद्धि आणि फलाशेच्या ठायीं आसक्ति सोडून केवळ कायिक, वाचिक अगर केवळ मानसिक कोणतेंहि कर्म केलें तरी कर्त्यास त्याचा दोष लागत नाहीं असा अर्थ आहे. ( गीता ३.२७; १३.२९ व १८.१६ पहा ). अहंकार नसला म्हणजे जीं कर्में होतात तीं नुसत्या इंद्रियांचीं होतात व मन आदिकरून सर्व इंद्रियें प्रकृतीचेच विकार असल्यामुळें असल्या कर्मांचें बंधन कर्त्यास लागत नाहीं, हा अर्थ शास्त्राप्रमाणें आतां सिद्ध करितात—]

युक्तः कर्मफलं त्यक्त्वा शान्तिमाप्नोति नैष्ठिकीम् ।
अयुक्तः कामकारेण फले सक्तो निबध्यते ॥ १२ ॥
सर्वकर्माणि मनसा सन्न्यास्यास्ते सुखं वशी ।
नवद्वारे पुरे देही नैव कुर्वन्न कारयन् ॥ १३ ॥
§§ न कर्तृत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभुः ।
न कर्मफलसंयोगं स्वभावस्तु प्रवर्तते ॥ १४ ॥
नादत्ते कस्यचित्पापं न चैव सुकृतं विभुः ।
अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जंतवः ॥ १५ ॥

(१२) जो युक्त म्हणजे योगयुक्त झाला तो कर्मफल सोडून देऊन अखेरची पूर्ण शान्ति मिळवितो; आणि अयुक्त म्हणजे जो योगयुक्त नाहीं तो कामाच्या म्हणजे वासनेच्या योगानें फलाच्या ठायीं सक्त होऊन (पापपुण्यानें) बांधला जातो. (१३) सर्व कर्मांचा मनानें (साक्षात् नव्हे) संन्यास करून, जितेंद्रिय देहवान् (पुरुष) नऊ द्वारांच्या या (देहरूपी) नगरांत कांहीं न करितां व न करवितां आनंदानें पडला रहातो.

[म्हणजे आत्मा हा अकर्ता असून सर्व खेळ प्रकृतीचा आहे हें तो जाणतो, आणि त्यामुळें स्वस्थ किंवा उदासीन पडला रहातो (गीता १३. २० व १८. ५९ पहा). दोन डोळे, दोन कान नाकपुड्या, तोंड, मूत्रेंद्रिय व गुद हीं शरीराचीं नऊ द्वारें किंवा दरवाजे समजतात. असो कर्मयोगी कर्में करूनहि युक्त कसा रहातो याची अध्यात्मदृष्ट्या हीच उपपत्ति सांगतात—

(१४) प्रभु म्हणजे आत्मा किंवा परमेश्वर लोकांचें कर्तृत्व, त्यांचीं कर्में, (किंवा त्यांना प्राप्त होणारी) कर्मफलाची जोडहि निर्माण करीत नाहीं. स्वभाव म्ह० प्रकृतिच (सर्व कांहीं) करीत असते. (१५) विभु म्ह० सर्वव्यापी आत्मा किंवा परमेश्वर कोणाचें पाप व कोणाचें पुण्यहि घेत नाहीं.

§§ ज्ञानेन तु तदज्ञानं येषां नाशितमात्मनः ।
तेषामादित्यवज्ज्ञानं प्रकाशयति तत्परम् ॥ १६ ॥
तद्बुद्धयस्तदात्मानस्तन्निष्ठास्तत्परायणाः ।
गच्छन्त्यपुनरावृत्तिं ज्ञाननिर्धूतकल्मषाः ॥ १७ ॥

ज्ञानावर अज्ञानाचें पांघरून पडलें असल्यामुळें ( म्ह० मायेनें ) प्राणी मोह पावतात.

[ या दोन श्लोकांतलें तत्त्व मूळचें सांख्यशास्त्रांतलें असून ( गीतार पृ. १६१, १६२ पहा, वेदान्त्यांच्या मतें आत्मा=परमेश्वर असल्यामुळें आत्मा अकर्ता हें तत्त्व वेदान्ती परमेश्वरासहि लावितात. सांख्य प्रकृति व पुरुष अशीं दोन मूलतत्त्वें मानून सर्व कर्तृत्व प्रकृतीचें व आत्मा उदासीन मानितात. पण वेदान्ती त्याच्या पलीकडे जाऊन या दोहोंचेंहि मूळ एक निर्गुण परमेश्वर असून तो सांख्यांच्या आत्म्याप्रमाणें उदासीन व अकर्ता आहे, आणि सर्व कर्तृत्व मायेचें ( म्हणजे प्रकृतीचें) आहे, असें मानितात ( गीतार. पृ. २६४ ). सामान्य मनुष्यास या गोष्टी अज्ञानामुळें कळत नाहींत. पण कर्मयोगी कर्तृत्वाकर्तृत्वाचा हा भेद जाणणारा असल्यामुळें तो कर्में करूनहि अलिप्तच रहातो, असें आतां सांगतात—]

(१६) पण ज्यांच्या स्वतःचें हें अज्ञान ज्ञानानें नष्ट झालें त्यांना सूर्याप्रमाणें त्याचें ज्ञान परमार्थतत्त्व प्रकाशित करून देतें. ( १७ ) आणि त्या परमार्थतत्त्वांतच ज्यांची बुद्धि रंगली, तेथेंच ज्यांचें अंतःकरण रमलें व तन्निष्ठ व तत्परायण झालें, त्यांचें पाप ज्ञानानें निःशेष धुऊन ते पुनः जन्मास येत नाहींत.

[ याप्रमाणें ज्यांचें अज्ञान नष्ट झालें त्या कर्मयोग्याच्या (संन्याश्याच्या नव्हे ) ब्रह्मभूत किंवा जीवन्मुक्त अवस्थेचें आतां अधिक वर्णन करितात—

§§ विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि ।
शुनि चैव श्वपाके च पंडिताः समदर्शिनः ॥ १८ ॥
इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः ।
निर्दोषं हि समं ब्रह्म तस्माद्ब्रह्मणि ते स्थिताः ॥ १९ ॥

(१८) जे पंडित म्हणजे ज्ञानी झाले त्यांची दृष्टि विद्याविनययुक्त ब्राह्मण, गाय, हत्ती, तसेंच कुत्रा आणि चांडाल, या सर्वांच्या ठायीं समान असते ! (१९) याप्रमाणें ज्यांचें मन साम्यावस्थेंत स्थिर झालें ते तेथल्या-तेथेंच म्हणजे मरणाची वाट न पहातां मृत्युलोक जिंकितात, कारण ब्रह्म हें निर्दोष व सम आहे, म्हणून ( साम्यबुद्धीचे ) हे पुरुष ( नेहमींच ) ब्रह्माच्या ठायीं स्थित म्हणजे येथल्यायेथेंच ब्रह्मभूत झालेले असतात.

[आत्मास्वरूपी परमेश्वर अकर्ता व सर्व खेळ प्रकृतीचा हें ज्यानें ओळखिलें तो ' ब्रह्मसंस्थ ' झाला व त्यालाच मोक्ष मिळतो–' ब्रह्मसंस्थोमृतत्वमेति ' ( छां २.२३.१ )–असें उपनिषदांतून जें वर्णन आहे, त्याचाच हा अनुवाद आहे. तथापि या अवस्थेंतहि कर्मे सुटत नाहींत असा गीतेचा अभिप्राय आहे हें वरील श्लोक १ ते १२ वरून उघड होतें छांदोग्योपनिषदांतील वाक्याचा शंकराचार्यांनीं संन्यासपर अर्थ लाविला आहे. पण मूळ उपनिषदांतील पूर्वापर संदर्भ पाहिला तर ' ब्रह्मसंस्थ ' झाल्यावरहि तीन आश्रमांचीं कर्मे करणारास उद्देशूनच हें वाक्य असण्याचा अधिक संभव आहे असें दिसून येईल; व हाच अर्थ या उपनिषदाच्या शेवटीं स्पष्ट निरूपिला आहे ( छां. ८.१५.१ पहा ). ब्रह्मज्ञान झाल्यावर ही अवस्था जिवंतपणींच प्राप्त होत असल्यामुळें यालाच जीवान्मुक्तावस्था असें म्हणतात ( गीतार. प्र. १० पृ. २९५ पहा). हीच अध्यात्मविद्येची पराकाष्ठा होय व चित्तवृत्तिनिरोधरूपी ज्या योगसाधनांनीं ही अवस्था प्राप्त होऊं शकते तीं पुढील अध्यायांत सविस्तर सांगितलीं आहेत. या अध्यायांत आतां फक्त या अवस्थेचें जास्त वर्णन केलें आहे.]

न प्रहृष्येत्प्रियं प्राप्य नोद्विजेत्प्राप्य चाप्रियम् ।
स्थिरबुद्धिरसंमूढो ब्रह्मविद् ब्रह्मणि स्थितः ॥ २० ॥
बाह्यस्पर्शेष्वसक्तात्मा विंदत्यात्मनि यत्सुखम् ।
स ब्रह्मयोगयुक्तात्मा सुखमक्षय्यमश्नुते २१ ॥
ये हि संस्पर्शजा भोगा दुःखयोनय एव ते ।
आद्यंतवंतः कौंतेय न तेषु रमते बुधः ॥ २२ ॥
शक्नोतीहैव यः सोढुं प्राक् शरीरविमोक्षणात् ।
कामक्रोधोद्भवं वेगं स युक्तः स सुखी नरः ॥ २३ ॥

(२०) प्रिय म्हणजे इष्ट वस्तु प्राप्त झाली असतां आनंदून जाऊं नये, आणि अप्रिय प्राप्त झालें असतां खिन्नहि होऊं नये. (याप्रमाणें) ज्याची बुद्धि स्थिर, व जो मोह पावत नाहीं, तोच ब्रह्मवेत्ता ब्रह्माचे ठायीं स्थिर झाला ( म्हणावयाचा ). (२१) बाह्य पदार्थांच्या ( इंद्रियांशीं होणाऱ्या ) संयोगांत म्हणजे विषयोपभोगांत ज्याचें मन आसक्त नाहीं, त्याला (च) आत्म्यामध्यें जें (काय) सुख आहे तें मिळतें; व ब्रह्माशीं मिळून युक्त झालेला तो पुरुष अक्षय सुखाचा अनुभव घेतो. ( २२ ) ( बाह्य पदार्थांच्या ) संयोगामुळेंच उत्पन्न होणारे जे भोग त्यांस आदि व अंत असल्यामुळें ते दुःखाचेंच कारण होत; त्यांचे ठायीं शहाणा पुरुष हे कौंतेया ! रत होत नाहीं. ( २३ ) शरीर सुटण्यापूर्वी अर्थात आमरणान्त कामक्रोधामुळें होणारा वेग इहलोकींच सहन करण्यास ( इंद्रियसंयमनानें ) जो समर्थ होतो, तोच युक्त आणि तोच ( खरा ) सुखी पुरुष होय.

[ गीतेच्या दुसऱ्या अध्यायांत सुखदुःखें तुला सोशिलीं पाहिजेत असें जें भगवंतांनीं म्हटलें आहे ( गी. २.१४ ) त्याचाच हा विस्तार व निरूपण आहे. गीता २.१४ यांत सुखदुःखांस 'आगमापायिनः' हें

§§ योऽन्तःसुखोऽन्तरारामस्तथांतर्ज्योतिरेव यः ।
स योगी ब्रह्मनिर्वाणं ब्रह्मभूतोऽधिगच्छति ॥ २४ ॥
लभन्ते ब्रह्मनिर्वाणमृषयः क्षीणकल्मषाः ।
छिन्नद्वैधा यतात्मानः सर्वभूतहिते रताः ॥ २५ ॥
कामक्रोधवियुक्तानां यतीनां यतचेतसाम् ।
अभितो ब्रह्मनिर्वाणं वर्तते विदितात्मनाम् ॥ २६ ॥
स्पर्शान्कृत्वा बहिर्बाह्यांश्चक्षुश्चैवांतरे भ्रुवोः ।
प्राणापानौ समौ कृत्वा नासाभ्यंतरचारिणौ ॥ २७ ॥

विशेषण दिलें आहे, तर येथें २२ व्या श्लोकांत 'आद्यन्तवन्तः' असें म्हटलें असून 'मात्रा' शब्दाऐवजीं 'बाह्य' शब्द आला आहे; 'युक्त' कोणास म्हणावें याची व्याख्याहि यांतच आली आहे. सुखदुःखांचा त्याग न करितां समबुद्धीनें तीं सोसणें हेंच युक्तपणाचें खरें लक्षण होय. गीता २. ६१ वरील टीका पहा.]

(२४) याप्रमाणें (बाह्य सुखदुःखांची अपेक्षा न ठेवितां) जो अंतःसुखी म्हणजे अंतःकरणांत सुखी झाला, जो अंतरांतच आराम पावूं लागला, आणि तसेंच ज्याला (हा) अंतःप्रकाश मिळाला, तो (कर्म-) योगी ब्रह्मरूप होऊन त्यालाच ब्रह्मनिर्वाण म्हणजे ब्रह्मांत मिळून जाण्याचा मोक्ष प्राप्त होतो. (२५) ज्या ऋषींची द्वंद्वबुद्धि सुटली म्हणजे सर्व ठिकाणीं एकच परमेश्वर आहे हें तत्त्व ज्यांनीं जाणिलें, ज्यांचीं पापें नाहींशीं झालीं, आणि जे आत्मसंयमनानें सर्व भूतांचें हित करण्यांत रत झाले त्यांना हा ब्रह्मनिर्वाणरूप मोक्ष मिळत असतो. (२६) कामक्रोधविरहित, आत्मसंयमी व आत्मज्ञानसंपन्न असे जे यति त्यांना अभितः म्हणजे सभोंवार अगर समोर ठेविल्याप्रमाणें (अर्थात् बसल्या ठिकाणींच) ब्रह्मनिर्वाणरूप मोक्ष मिळतो. (२७) बाह्य पदार्थांशीं (इंद्रियांचे सुखदुःखद) संयोग बाहेरच्या बाहेर ठेवून, दृष्टि दोन भुवयांच्या मध्यें राखून आणि नाकांतून वहाणारे प्राण

यतेंद्रियमनोबुद्धिर्मुनिर्मोक्षपरायणः ।
विगतेच्छाभयक्रोधो यः सदा मुक्त एव सः ॥ २८ ॥
§§ भोक्तारं यज्ञतपसां सर्वलोकमहेश्वरम् ।
सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शान्तिमृच्छति ॥ २९ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां श्रीकृष्णार्जुन-संवादे संन्यासयोगो नाम पंचमोऽध्यायः ॥ ५ ॥

---

आणि अपान सम करून, ( २८ ) इंद्रिये मन व बुद्धि यांचें ज्यानें संयमन केलें, आणि इच्छा, भय व क्रोध हीं ज्याला सुटलीं, तो मोक्षपरायण मुनि सदासर्वदा मुक्तच म्हणावयाचा.

[ हें वर्णन जीवन्मुक्तावस्थेचें आहे असें गीतारहस्याच्या नवव्या ( पृ. २३०, २४७ ) व दहाव्या ( पृ २९६ ) प्रकरणावरून दिसून येईल. पण तें संन्यासमार्गातील पुरुषांचें आहे असें टीकाकारांचें जें म्हणणें आहे तें मात्र आमच्या मतें बरोबर नाहीं. संन्यास व कर्मयोग या दोन्ही मार्गांत शान्ति एकच असल्ये, व तेवढ्यापुरतें हें वर्णन संन्यास-मार्गास लागू पडेल; नाहीं असें नाहीं. पण या अध्यायाच्या आरंभीं कर्मयोग श्रेष्ठ ठरवून नंतर पुनः २५ व्या श्लोकांत ज्ञानी पुरुष सर्व भूतांचें हित करण्यांत प्रत्यक्ष गढलेले असतात असें म्हटलें आहें, त्यावरून हें सर्व वर्णन कर्मयोगी जीवन्मुक्ताचेंच आहे, संन्याश्याचें नव्हे, असें उघड सिद्ध होतें ( गीता. र. पृ. ३७१ पहा ). असो; कर्ममार्गांतहि सर्वभूतान्तर्गत परमेश्वर ओळखणें हेंच परमसाध्य असल्या-मुळें भगवान् अखेर असें सांगतात कीं—]

( २९ ) ( सर्व ) यज्ञ व तप यांचा भोक्ता, ( स्वर्गादि ) सर्व लोकांचा मोठा धनी, आणि अवघ्या भूतांचा सखा, असा जो मी त्या मला ( याप्रमाणें ) ओळखिलें म्हणजे शान्ति पावतो.

याप्रमाणें श्रीभगवंतांनीं गाइलेल्या म्हणजे सांगितलेल्या उपनिषदांत ब्रह्मविद्यान्तर्गत योग-म्हणजे कर्मयोग-शास्त्रावरील श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या संवादांतील संन्यासयोग नांवाचा पांचवा अध्याय समाप्त झाला.

---

## षष्ठोऽध्यायः।

श्रीभगवानुवाच।

अनाश्रितः कर्मफलं कार्यं कर्म करोति यः।

## अध्याय सहावा.

[ मोक्ष प्राप्त होण्यास ज्ञानाखेरीज दुसऱ्या कशाचीही अपेक्षा नसली तरी लोकसंग्रहाचे दृष्टीनें ज्ञानी पुरुषानें ज्ञानोत्तरहि कर्मे केलीं पाहिजेत, पण तीं बंधक होऊं नयेत म्हणून फलाशा सोडून समबुद्धीनें करावीं, यालाच कर्मयोग म्हणतात, आणि कर्मसंन्यासमार्गापेक्षां हा अधिक श्रेयस्कर एवढें सिद्ध झालें. तथापि एवढ्यानें कर्मयोगाचें प्रतिपादन संपत नाहीं. तिसऱ्याच अध्यायांत कामक्रोधादिकांचे वर्णन करितांना हे शत्रु मनुष्यांचीं इंद्रियें, मन आणि बुद्धि यांत बिऱ्हाड करून त्याच्या ज्ञानविज्ञानाचा नाश करितात (३.४०), म्हणून इंद्रियनिग्रहानें यांचा तूं आधीं जय कर असें भगवंतांनीं अर्जुनास सांगितलें आहे. हा उपदेश पुरा होण्यास (१) इंद्रियनिग्रह कसा करावा, आणि (२) ज्ञानविज्ञान म्हणजे काय, या दोन प्रश्नांचा खुलासा करणें जरूर होतें; परंतु मध्यंतरीं अर्जुनाच्या प्रश्नांवरून कर्मसंन्यास आणि कर्मयोग या दोहोंत अधिक चांगला मार्ग कोणता हें सांगून, या दोन मार्गांची शक्य तेवढी एकवाक्यताहि करून दाखविली, आणि कर्में न सोडितांहि तींच निःसंग बुद्धीनें केल्यानें ब्रह्मनिर्वाणरूपी मोक्ष कसा प्राप्त होतो इत्यादि प्रतिपादन केलें. आतां कर्मयोगासहि अवश्य लागणारी जी ही निःसंग किंवा ब्रह्मनिष्ठ स्थिति

स संन्यासी च योगी च न निरग्निर्न चाक्रियः ॥ १ ॥
यं संन्यासमिति प्राहुर्योगं तं विद्धि पांडव ।

ती ज्या साधनांनीं प्राप्त होऊं शकते त्यांच्या निरूपणास या अध्यायांत सुरवात केली आहे. तथापि हें निरूपण देखील पांतजलयोग स्वतंत्ररीत्या उपदेशिण्याकरितां केलेलें नाहीं, हें लक्षांत यावें ह्मणून खरा संन्यासी म्हणजे फलाशा सोडून कर्में करणारा पुरुष समजावयाचा, कर्में सोडणारा नव्हे (५.३), इत्यादी पूर्वीच्या अध्यायांत जें प्रतिपादन केलें आहे त्याचाच प्रथम येथें अनुवाद करितात—]

(१) कर्मफलाचा आश्रय न करितां (ह्मणजे फलाशेचें मनांत बिऱ्हाड न ठेवतां) जो (शास्त्राप्रमाणें आपलें विहित) कर्तव्यकर्म करितो, तोच संन्यासी व तोच कर्मयोगी ह्मणावयाचा. निरग्नी म्हणजे अग्निहोत्रादिक कर्में सोडून देणारा किंवा अक्रिय ह्मणजे कोणतेंच कर्म न करितां स्वस्थ बसणारा (खरा संन्यासी व खरा योगी) नव्हे. (२) हे पांडवा! ज्याला संन्यास असें म्हणतात तोच (कर्म-) योग समज. कारण संकल्पाचा म्हणजे काम्यबुद्धिरूप फलाशेचा संन्यास (=त्याग) केल्याखेरीज कोणीहि (कर्म) योगी होत नाहीं.

[ मागील अध्यायांत "एकं सांख्यं च योगं च" (५. ५), अगर "योगाखेरीज संन्यास नाहीं" (५.६), किंवा "ज्ञेयः स नित्यसंन्यासी" (५.३), असें जें ह्मटलें आहे त्याचाच हा अनुवाद असून पुढें अठराव्या अध्यायांत (१८.२) एकंदर विषयांचा उपसंहार करितांना हाच अर्थ पुनः वर्णिला आहे. गृहस्थाश्रमांत अग्निहोत्र राखून यज्ञयागादि करावे लागतात; पण जो संन्यासाश्रमी झाला त्याला याप्रमाणें अग्नि पाळण्याची जरूर नसल्यामुळें त्यानें 'निरग्नि' व्हावें व अरण्यांत राहून भिक्षेनें उदरनिर्वाह करावा, जगाच्या व्यवहारांत

**न ह्यसंन्यस्तसंकल्पो योगी भवति कश्चन ॥ २ ॥**

पडूं नये, असें मनुस्मृतीनें ह्मटलें आहे ( मनु. ६. २५ इ. ). मनूच्या या मताचाच पहिल्या श्लोकांत उल्लेख केलेला असून त्यावर भगवंतांचें असें ह्मणणें आहे कीं, निरग्नि व निष्क्रिय होणें हें कांहीं खऱ्या संन्यासाचें लक्षण नव्हे. काम्यबुद्धीचा किंवा फलाशेचा त्याग करणें हाच खरा संन्यास होय. संन्यास बुद्धींत आहे, अग्नि किंवा कर्में सोडणें या बाह्य क्रियेंत नाहीं. म्हणून फलाशेचा किंवा संकल्पाचा त्याग करून कर्तव्यकर्म करणारासच खरा संन्यासी ह्मटलें पाहिजे. हा गीतेचा सिद्धान्त स्मृतिकारांच्या सिद्धान्ताहून भिन्न असून त्याची स्मार्त मार्गाशीं गीता एकवाक्यता कशी करित्ये हें गीतारहस्याच्या ११ व्या प्रकरणांत ( पृ. ३४४–३४७ ) स्पष्ट करून दाखविलें आहे तें पहा. खरा संन्यास कोणता तें याप्रमाणें सांगून आतां ज्ञान होण्याच्या पूर्वीं म्हणजे साधनावस्थेंत जीं कर्में करितात त्यांत, व ज्ञानोत्तर म्हणजे सिद्धावस्थेंत फलाशा सोडून जीं कर्में करावयाचीं त्यांत, भेद कोणता तें सांगतात—]

(३) जो (कर्म-) योगारूढ होऊं इच्छितो त्या मुनीस कर्म हें (शमाचें) कारण म्हणजे साधन म्हटलें आहे; आणि तोच पुरुष योगारूढ म्हणजे पूर्ण योगी झाला म्हणजे त्यास (पुढें) शम हें (कर्माचें) कारण होतें, असें म्हणतात.

[ या श्लोकाच्या अर्थाचा टीकाकारांनीं अनर्थ करून टाकला आहे. श्लोकाच्या पूर्वार्धांत योग म्हणजे कर्मयोग हाच अर्थ असून तो सिद्ध होण्यास प्रथम कर्मच कारण होतें ही गोष्ट सर्वांस मान्य आहे. पण "योगारूढ झाल्यावर त्यासच शम हें कारण होतें." याचा अर्थ टीकाकारांनीं संन्यासपर लाविला आहे. त्यांचें असें ह्मणणें आहे कीं, 'शम' ह्मणजे कर्माचा 'उपशम' व ज्याला योग सिद्ध झाला त्यानें कर्में सोडून दिलीं पाहिजेत ! कारण त्यांच्या मतें कर्मयोग

§§ आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते ।

हा संन्यासाचें अंग म्ह० पूर्वसाधन आहे. पण हा अर्थ सांप्रदायिक आग्रहाचा होय; खरा नव्हे. कारण (१) कर्मफलाचा आश्रय न करितां 'कर्तव्यकर्म करणारा' पुरुषच खरा योगी म्हणजे योगारूढ होय, कर्में न करणारा (अक्रिय) खरा योगी नव्हे, असें या अध्यायाच्या पहिल्याच श्लोकांत जर भगवंतांनीं सांगितलें आहे, तर तिसऱ्या श्लोकांत योगारूढ पुरुषाला कर्मांचा शम करण्यास, किंवा कर्में सोडण्यास भगवान सांगतील असें मानणें सर्वथैव अन्याय्य होय. शान्ति मिळाल्यावर योगारूढानें कर्में करूं नयेत असें संन्यासमार्गाचें जरी मत असलें, तरी गीतेस हें मत मान्य नसून कर्मयोग्यानें सिद्धावस्थेंतहि यावज्जीव भगवंतांप्रमाणें निष्कामबुद्धीनें सर्व कर्में केवळ कर्तव्यें म्हणून करीत राहिलें पाहिजे, असा गीतेंत अनेक ठिकाणीं स्पष्ट उपदेश केला आहे (गी. २ ७१; ३. ७ व १९; ४. १९–२१; ५. ७–१२; १२. १२; १८. ५६, ५७; आणि गीतार. प्र. ११ व १२ पहा). (२) दुसरें कारण असें कीं, 'शम' या शब्दाचा 'कर्मांचा शम' हा अर्थ कोठून आला? 'शम' हा शब्द भगवद्गीतेंत दोनचारदां आला असून (गी. १०. ४; १८. ४२) तेथें व प्रचारांतहि त्याचा अर्थ 'मनाची शांति' असा आहे. मग याच श्लोकांत 'कर्मांची शांति' असा अर्थ कां घ्यावयाचा? ही अडचण दूर करण्यासाठीं गीतेवरील पैशाचभाष्यांत 'योगारूढस्य तस्यैव' यांतील 'तस्यैव' या दर्शक सर्वनामाचा संबंध 'योगारूढस्य' याशीं न लावितां, 'तस्य नपुसकलिंगी षष्ठी समजून "तस्यैव कर्मणः शमः" (तस्य म्हणजे पूर्वार्धातल्या कर्मांचा शम) असा अर्थ केला आहे! पण हा अन्वयहि सरळ नाहीं. कारण योगाभ्यास करणाऱ्या ज्या पुरुषाचें वर्णन या श्लोकाच्या पूर्वार्धांत केलें आहे त्याचीच पुढें म्हणजे अभ्यास पुरा झाल्यावर काय स्थिति होते ती सांगण्यासाठीं उत्तरार्धाचा आरंभ झाला आहे याबद्दल शंका नाहीं;

योगारूढस्य तस्यैव शमः कारणमुच्यते ॥ ३ ॥

म्हणून ‘ तस्यैव ’ या पदांनीं ‘ कर्मणः एव ’ हा अर्थ घेतां येत नाहीं; किंवा घेतलाच तर त्याचा संबंध ‘ शमः ’ याशीं न जोडितां “ कारणमुच्यते ” याशीं जोडावा म्हणजे “ शमः योगारूढस्य तस्यैव कर्मणः कारणमुच्यते ” असा अन्वय लागून त्याचा “ शम हें योगारूढाच्या कर्मांचेंच आतां कारण होतें ” असा गीतेच्या एकंदर उपदेशास अनुसरून नीट अर्थ लागेल. (३) टीकाकारांचा अर्थ त्याज्य मानण्याचें तिसरें कारण असें कीं, संन्यासमार्गाप्रमाणें योगारूढ पुरुषास पुढें कांहींच करावयाचें रहात नाहीं, शमांतच त्याच्या सर्व कर्मांचा शेवट होतो, आणि हें जर खरें तर ‘ योगारूढाला शम कारण होतें ’ या वाक्यांतील ‘ कारण ’ हा शब्द अगदींच निरर्थक पडतो. ’ कारण ’ हा शब्द नेहमींच सापेक्ष आहे. ‘ कारण ’ म्हटलें म्हणजे त्याला कांहीं तरी ‘ कार्य ’ पाहिजे; व संन्यासमार्गाप्रमाणें योगारूढाला तर कोणतेंच ‘ कार्य ’ शिल्लक राहिलेलें नसतें. शम हें मोक्षाचें ‘ कारण ’ म्हणजे साधन म्हणावें, तर तें जुळत नाहीं. कारण मोक्षाचें साधन ज्ञान आहे शम नव्हे. बरें शम हें ज्ञानप्राप्तीचें ‘ कारण ’ म्हणजे साधन म्हणावें, तर योगारूढ झालेल्याचें म्हणजे पूर्णावस्थेस पोंचलेल्याचें हें वर्णन असल्यामुळें त्याला ज्ञानप्राप्ति कर्मांच्या साधनानें पूर्वींच झालेली असते. मग शम हें ‘ कारण ’ कशाचें? संन्यासमार्गीय टीकाकारांस या प्रश्नाचें कांहींच समाधानकारक उत्तर देतां येत नाहीं. पण त्यांचा हा अर्थ सोडून देऊन विचार करूं लागलें म्हणजे उत्तरार्धाचा अर्थ करितांना पूर्वार्धांतील ‘ कर्म ’ हें पद सान्निध्यसामर्थ्यानें सहज मनांत येतें; आणि मग योगारूढाला स्वार्थ राहिला नसला तरी लोकसंग्रहकारक कर्म सुटत नसल्यामुळें ( गी. ३, १७–१९ पहा ) तें करण्यास ‘ शम ’ हें त्याला आतां ‘ कारण ’ म्हणजे साधन होतें असा अर्थ

यदा हि नेंद्रियार्थेषु न कर्मस्वनुषज्यते ।

निष्पन्न होतो. 'युक्तः कर्मफलं त्यक्त्वा शान्तिमाप्नोति नैष्ठिकीम्'' (गी. ५–१२)–योगी कर्मफलाचा त्याग करून पूर्ण शान्ति मिळवितो –असें जें मागील अध्यायांत वचन आहे, त्यावरूनहि हाच अर्थ सिद्ध होतो. कारण त्यांत शान्तीचा संबंध कर्मत्यागाशीं न जोडितां फक्त फलाशा-त्यागाशींच वर्णिला असून, तेथेंच योग्यानें जो कर्मसंन्यास करावयाचा तो 'मनसा' म्हणजे मनानें करावयाचा (गी. ५. १३), शरीरानें किंवा केवळ इंद्रियद्वारा त्यानें कर्में केलींच पाहिजेत, असें स्पष्ट म्हटलें आहे. आमचें तर असें मत आहे कीं, अलंकारशास्त्रांत ज्याला अन्योन्यालंकार म्हणतात, तशा प्रकारची अर्थचमत्कृति किंवा सौरस्य प्रस्तुतच्या श्लोकांत साधलें असून, पूर्वार्धांत 'कर्म' हें 'शमाचें' केव्हां कारण होतें तें सांगितल्यावर, उलटपक्षीं 'शम' हें 'कर्माचें' केव्हां कारण होतें, याचें उत्तरार्धांत वर्णन केलें आहे. भगवान् असें सांगतात कीं, प्रथम साधनावस्थेंत 'कर्म' हेंच शमाचें म्हणजे योगसिद्धीचें कारण होतें. म्हणजे यथाशक्ति निष्काम कर्में करितां करितांच चित्त शान्त होऊन तद्द्वारा अखेर पूर्ण योगसिद्धि होते. पण योगी योगारूढ होऊन सिद्धावस्थेस पोंचला म्हणजे कर्म व शम यांचा हा कार्यकारणभाव बदलून कर्म शमाचें कारण न होतां, शमच कर्माचें कारण बनतें; म्हणजे योगारूढ आपलीं सर्व कर्में आतां कर्तव्य म्हणून फलाशा न ठेवितां शान्त चित्तानें करीत असतो. सारांश सिद्धावस्थेंत कर्में सुटतात असा या श्लोकाचा भावार्थ नसून, 'कर्म' आणि 'शम यांच्या-मधील साधनावस्थेंतला कार्यकारणभाव मात्र सिद्धावस्थेंत बदलतो, असें गीतेचें सांगणें आहे (गीतारहस्य प्रकरण ११ पृ. ३२२, ३२३ पहा). कर्मयोग्यानें अखेर कर्में सोडिलीं पाहिजेत असें गीतेंत कोठेंहि सांगितलें नाहीं, तसें सांगण्याचा उद्देशहि नाहीं. म्हणून संधि

सर्वसंकल्पसंन्यासी योगारूढस्तदोच्यते ॥ ४॥

§§ उद्धरेदात्मनाऽऽत्मानं नात्मानमवसादयेत् ।
आत्मैवह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः ॥ ५ ॥

सांपडेल तेथें कांहीं तरी क्लृप्तीनें गीतेंतील मधल्याच एखाद्या श्लोकाचा संन्यासपर अर्थ लावणें योग्य नव्हे. गीता हल्लीं पुष्कळांस दुर्बोध झाली आहे याचें कारणहि हेंच होय. योगारूढानें कर्में केलीं पाहिजेत हाच अर्थ पुढील श्लोकांतील व्याख्येवरूनहि व्यक्त होतो. तो श्लोक असा—]

(४) कारण, जेव्हां इंद्रियांच्या (शब्दस्पर्शादि) विषयांचे ठायीं व कर्मांच्या ठायीं अनुषक्त होत नाहीं, आणि सर्व संकल्पाचा म्हणजे काम्य-बुद्धिरूप फलाशेचा (साक्षात् कर्मांचा नव्हे) संन्यास करितो तेव्हां त्याला योगारूढ म्हणतात.

[हा श्लोक मागल्या किंबहुना पूर्वींच्या तीन श्लोकांनाहि जोडून आहे म्हटलें तरी चालेल. यावरून योगारूढानें कर्में न सोडितां फलाशा किंवा काम्य बुद्धि सोडून शान्त चित्तानें निष्काम कर्में करावयाचीं असा गीतेचा अभिप्राय स्पष्ट होतो. ‘संकल्पाचा’ संन्यास’ हे शब्द वर दुसऱ्या श्लोकांत आलेले असून तेथें त्यांचा जो अर्थ आहे तोच या श्लोकांतहि घेतला पाहिजे. कर्मयोगांतच फलाशात्यागरूपी संन्यासाचा समावेश होत असून फलाशा सोडून कर्में करणारा पुरुषच खरा संन्यासी व योगी म्हणजे योगारूढ म्हणावयाचा. आतां अशा प्रकारचा निष्काम कर्मयोग किंवा फलाशासंन्यास सिद्ध होणें ही गोष्ट प्रत्येक मनुष्याच्या ताब्यांतील आहे, स्वतः होऊन प्रयत्न करील तर त्यास ती प्राप्त होणें अशक्य नाहीं, असें सांगतात—]

(५) (मनुष्यानें) आपण होऊन आपला उद्धार करावा. आपण आपल्या स्वतःला (कधींहि) खचवूं नये. कारण (प्रत्येक मनुष्य) आप-

बंधुरात्माऽऽत्मनस्तस्य येनात्मैवात्मना जितः ।
अनात्मनस्तु शत्रुत्वे वर्तेतात्मैव शत्रुवत् ॥ ६ ॥
§§ जितात्मनः प्रशान्तस्य परमात्मा समाहितः ।
शीतोष्णसुखदुःखेषु तथा मानापमानयोः ॥ ७ ॥

णच आपल्या स्वतःचा बंधु (ह्मणजे मदत करणारा), किंवा आपणच आपला शत्रु (म्हटला आहे). (६) ज्यानें आपणच आपल्याला जिंकिलें तो आपल्या स्वतःचा बंधु होतो; पण जो आपल्याला ओळखीत नाहीं त्याचें तो स्वतः-च शत्रूप्रमाणें वैर करितो.

[या दोन श्लोकांत आत्मस्वातंत्र्याचें वर्णन असून ज्यानें त्यानें आपला उद्धार आपणच करून घेतला पाहिजे, व प्रकृति कितीहि बलवत्तर झाली तरी तिचा जय करून आत्मोन्नति करणें ही ज्याच्या त्याच्या स्वाधीनची गोष्ट आहे, हें तत्त्व प्रतिपादिलें आहे (गीतार. प्र. १० पृ. २७४–२७९ पहा). हें तत्त्व मनांत चांगलें ठसावें म्हणून एकदां अन्वयानें म्हणजे आत्मा आपलाच मित्र केव्हां होतो तें आणि पुनः व्यतिरेकानें म्हणजे आत्मा आपला शत्रु केव्हां म्हणावा तें सांगून, दोन्हीं रीतींनीं वर्णिलें आहे; व हेंच तत्त्व पुनः १३.२८ श्लोकांतहि आलें आहे. संस्कृतांत 'आत्मा' या शब्दाचे (१) अंत-रात्मा, (२) आपण स्वतः, आणि (३) अंतःकरण किंवा मन, असे तिन्ही अर्थ असल्यामुळें आत्मा हा शब्द या व पुढील श्लोकांतून अनेक वेळीं आला आहे. आतां आत्मा ताब्यांत आणिल्यानें काय फल मिळतें तें सांगतात—]

(७) ज्यानें आपला आत्मा ह्मणजे अंतःकरण जिंकिलें व ज्याला शान्ति प्राप्त झाली त्याचा 'परमात्मा' शीतोष्ण, सुखदुःख आणि माना-पमान यांच्या ठिकाणीं समाहित ह्मणजे सम व स्थिर रहातो.

[या श्लोकांत 'परमात्मा' हा शब्द आत्म्यालाच लाविला आहे.

ज्ञानविज्ञानतृप्तात्मा कूटस्थो विजितेंद्रियः ।
युक्त इत्युच्यते योगी समलोष्टाश्मकांचनः ॥ ८ ॥

[देहातील आत्मा हा सामान्यतः सुखदुःखोपाधींत मग्न झालेला आहे. पण इंद्रियसंयमनानें उपाधींचा जय केल्यावर हाच आत्मा प्रसन्न होऊन परमात्मरूपी किंवा परमेश्वरस्वरूपी बनत असतो. परमात्मा ह्मणून आत्म्याहून निराळ्या स्वरूपाचा पदार्थ नसून मनुष्याच्या शरीरांतील आत्माच तत्त्वतः परमात्मा आहे असें गीतेंतच पुढें (गी. १३. २२ व ३१) ह्मटलें असून महाभारतांतहि—

आत्मा क्षेत्रज्ञ इत्युक्तः संयुक्तः प्राकृतैर्गुणैः ।
तैरेव तु विनिर्मुक्तः परमात्मेत्युदाहृतः ॥

"आत्माच प्राकृत ह्मणजे प्रकृतीच्या गुणांनीं (सुखदुःखादिक विकारांनीं बद्ध झालेला असला ह्मणजे त्याला क्षेत्रज्ञ अथवा शरीरांतील जीवात्मा असें ह्मणतात; आणि या गुणांपासून त्याची सुटका झाली ह्मणजे तोच परमात्मा होतो" असें वर्णन आहे (म. भा. शां. १८७, २४). अद्वैत वेदान्ताचा सिद्धान्तहि हाच आहे हें गीतारहस्याच्या ९ व्या प्रकरणावरून कळून येईल. गीतेंत अद्वैत मत प्रतिपादन केलेलं नसून विशिष्टाद्वैत किंवा शुद्ध द्वैतच गीतेस ग्राह्य आहे असें ज्यांचें ह्मणणें आहे ते 'परमात्मा' हें एक पद न घेतां 'परं' आणि 'आत्मा' अशीं दोन पदें करून 'परं' हें 'समाहितः' याचें क्रियाविशेषण समजतात! हा अर्थ क्लिष्ट आहे; परंतु या उदाहरणावरून सांप्रदायिक टीकाकार आपल्या मताप्रमाणें गीतेची कशी ओढाताण करीत असतात हें लक्ष्यांत येईल.]

(८) ज्याचा आत्मा ज्ञानानें आणि विज्ञानानें म्हणजे विविध ज्ञानानें तृप्त झाला, ज्यानें आपलीं इंद्रियें जिंकलीं, तो कूटस्थ म्हणजे मूळास जाऊन पोचला आणि माती, दगड व सोनें सारखेंच मानूं लागला, अशा (कर्म-) योगी पुरुषास (-च) 'युक्त–' सिद्धावस्थेस पोचलेला असें

सुहृन्मित्रार्युदासीनमध्यस्थद्वेष्यबंधुषु ।
साधुष्वपि च पापेषु समबुद्धिर्विशिष्यते ॥ ९ ॥
§§ योगी युंजीत सततमात्मानं रहसि स्थितः ।
एकाकी यतचित्तात्मा निराशीरपरिग्रहः ॥ १० ॥

म्हणतात. (९) सुहृद्, मित्र, शत्रु, उदासीन, मध्यस्थ, द्वेष करण्यास योग्य व बांधव यांच्या ठायीं आणि साधूंच्या व दुष्टांच्या ठायींहि ज्याची बुद्धि सम झाली तोच ( पुरुष ) विशेष योग्यतेचा म्हणावयाचा.

[ सुहृद् म्हणजे उलट उपकाराची इच्छा न ठेवितां मदत करणारा स्नेही, उदासीन ह्मणजे दोन पक्ष झाले असतां कोणाचेंच बरें वाईट न इच्छिणारा; मध्यस्थ म्हणजे दोन्ही पक्षांचें बरें इच्छिणारा, आणि बंधु म्हणजे संबंधी, असे अर्थ टीकाकारांनीं दिले आहेत. परंतु हेच अर्थ न घेतां थोडे निराळे घेतले तरी चालतील. कारण हे शब्द प्रत्येकीं भिन्न अर्थ दाखविण्यास योजिलेले नसून, सर्वांच्या मिलाफानें व्यापक अर्थाचा बोध व्हावा, त्यांत कांहीं कमी पडूं नये, एवढ्याचसाठीं अनेक शब्दांची ही योजना करीत असतात. याप्रमाणें योगी, योगारूढ किंवा युक्त कोणाला म्हणावें ( गी. २. ६१; ४. १८; व ५. २३ पहा. ) तें संक्षेपानें सांगून हा कर्मयोग सिद्ध करून घेण्यास प्रत्येक मनुष्य स्वतंत्र आहे, त्यासाठीं दुसऱ्याचे तोंडाकडे पहाण्याची कोणालाच जरूर नाहीं, असेंहि सांगितलें. आतां हा कर्मयोग सिद्ध होण्यास साधन कोणतें याचें निरूपण करितात—]

(१०) जो योगी म्हणजे कर्मयोगी आहे, त्यानें एकांतांत एकटें राहून चित्त व आत्मा आंवरून, कोणतीहि काम्यवासना न ठेवितां, परिग्रह ह्मणजे पाश सोडून, सतत आपल्या योगाभ्यासास लागावें.

[ ‘ युंजीत ’ या पदानें पातंजलसूत्रांतील योग या ठिकाणीं विवक्षित आहे हें पुढील श्लोकांवरून स्पष्ट होतें. तथापि कर्मयोग प्राप्त करून घेऊं

शुचौ देशे प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मनः ।
नात्युच्छ्रितं नातिनीचं चैलाजिनकुशोत्तरम् ॥ ११ ॥
तत्रैकाग्रं मनः कृत्वा यतचित्तेंद्रियक्रियः ।
उपविश्यासने युंज्याद्योगमात्मविशुद्धये ॥ १२ ॥
समं कायशिरोग्रीवं धारयन्नचलं स्थिरः ।
संप्रेक्ष्य नासिकाग्रं स्वं दिशश्चानवलोकयन् ॥ १३ ॥
प्रशान्तात्मा विगतभीर्ब्रह्मचारिव्रते स्थितः ।
मनः संयम्य मच्चित्तो युक्त आसीत मत्परः ॥ १४ ॥

इच्छिणाऱ्या पुरुषानें आपलें सर्व आयुष्य पातंजल योगांत घालवावें असा याचा अर्थ नाहीं. कर्मयोगांत लागणारी साम्यबुद्धि संपादन करण्यास साधन म्हणून पातंजल योग या अध्यायांत वर्णिला आहे; व एकान्तवासहि तेवढ्यापुरताच होय. प्रकृतिस्वभावामुळें पातंजल योगांतील समाधि कित्येकांस एकाच जन्मांत साध्य होणें शक्य नसतें. अशा पुरुषानें सर्व आयुष्य पातंजल योगांतच न घालवितां बुद्धि शक्य तेवढी स्थिर करून कर्मयोगाचें आचरण करीत जावें, त्यानेंच अनेक जन्मांनीं अखेर सिद्धि मिळत्ये, असें याच अध्यायाच्या शेवटीं भगवंतांनीं सांगितलें आहे. ( गीतार. प्र. १० पृ. २७९-२८२ पहा )—]

( ११ ) प्रथम दर्भ, त्यावर मृगाचे कातडें; आणि त्याच्याहि वर वस्त्र घातलेलें, फार उंच नाहीं आणि फार सखलहि नाहीं असें आपलें आसन शुद्ध जागीं अढळ मांडून, ( १२ ) तेथें चित्त व इंद्रियें यांचे व्यापार आंवरून धरून आणि मन एकाग्र करून आत्मशुद्ध्यर्थ आसनावर बसून योगाचा अभ्यास करावा. (१३) काय म्हणजे पाठ, डोकें व मान हीं सम म्हणजे उभीं सरळ रेषेंत निश्चल धारण करून स्थिर होत्साता दिशांकडे म्ह० सभोंवार न बघतां आपल्या नाकाच्या शेंड्यावर नजर ठेवून, (१४) भीति न बाळगितां, शान्त अंतःकरणानें, ब्रह्मचर्यव्रत पाळून व मनाचें संयमन

युंजन्नेवं सदाऽऽत्मानं योगी नियतमानसः ।
शान्तिं निर्वाणपरमां मत्संस्थामधिगच्छति ॥ १५ ॥

करून, चित्त माझ्याच ठिकाणीं लावून मत्परायण होत्साता युक्त होऊन बसावें.

[ 'शुद्ध जागीं' व 'शरीर, मान व डोकें सम करून' हे शब्द श्वेताश्वतरोपनिषदांतील आहेत ( श्वे. २.८ व १० पहा ); आणि वरील एकंदर वर्णनहि हठयोगांतील नसून जुन्या उपनिषदांतील योगाच्या वर्णनांशीं अधिक जुळतें आहे. हठयोगांत इंद्रियाचा निग्रह बलात्कारानें करीत असतात; पण तसें न करितां "मनसैव इंद्रियग्रामं विनियम्य" –मनानेंच इंद्रियें आंवरावीं–असें याच अध्यायांत पुढें २४ व्या श्लोकांत ह्मटलें आहे. यावरून हठयोग गीतेंत विवक्षित नाहीं हें उघड होतें. तसेंच जन्मच्या जन्म योगाभ्यासांत घालवावा असा या वर्णनाचा हेतु नाहीं हें याच अध्यायांत शेवटीं सांगितलें आहे. सध्या याच योगाभ्यासाचें फल जास्त निरूपण करितात—]

(१५) याप्रमाणें सदा आपला योगाभ्यास चालू ठेविल्यानें मन ताब्यांत येऊन (कर्म-) योग्यास माझ्या ठायीं असणारी व शेवटीं निर्वाणप्रद ह्मणजे माझ्या स्वरूपांत लय करवून देणारी शान्ति प्राप्त होत्ये.

[ या श्लोकांत 'सदा' या पदानें दररोज २४ तास असा अर्थ घ्यावयाचा नाहीं. रोज घटका घटका यथाशक्ति हा अभ्यास करावा एवढाच अर्थ विवक्षित आहे ( श्लोक १० वरील टीका पहा ). याप्रमाणें योगाभ्यास करीत असतां 'मच्चित्त' व 'मत्परायण' हो, असें म्हटलें आहे याचें कारण असें कीं, पातंजल योग ह्मणजे मनाचा विरोध करण्याची एक युक्ति किंवा क्रिया होय. या कसरतीनें मन ताब्यांत आलें तरी तें एकाग्र मन भगवंताचे ठायीं न लावितां दुसऱ्या गोष्टीकडेहि लावितां येईल. पण एकाग्र चित्ताचा असा दुरुपयोग न करितां, मनाची

नात्यश्नतस्तु योगोऽस्ति न चैकांतमनश्नतः ।
न चातिस्वप्नशीलस्य जाग्रतो नैव चार्जुन ।। १६ ।।
युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु ।
युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा ॥ १७ ॥

ही एकाग्रता अगर समाधि परमेश्वराच्या स्वरूपाचें ज्ञान होण्याकडे लाविली पाहिजे, व तसें झालें ह्मणजेच हा योग सुखकारक होतो, एरवीं हे नुस्ते क्लेश होत, असें गीतेचें ह्मणणें आहे; व हाच अर्थ पुढें २९, ३० व अध्यायाचे अखेरीस ४७ व्या श्लोकांत पुनः आलेला आहे. परमेश्वराचे ठिकाणीं निष्ठा नसतां केवळ इंद्रियनिग्रहाचा योग अगर तालीम ज्यांनी केली ते जारण, मारण अगर वशीकरण वगैरे लोकांना त्रास देणारीं कर्में करण्यांत मात्र प्रवीण बनतात. ही अवस्था गीतेसच काय पण कोणत्यादि मोक्षमार्गास इष्ट नाहीं. आतां पुनः या योगक्रियेचाच जास्त खुलासा करितात–]

(१६) अतिशय खाणारास किंवा मुळींच कांहीं न खाणारास, आणि अति झोपाळूस किंवा जागरण करणाऱ्यास (हा) योग, हे अर्जुना! सिद्ध होत नाहीं. (१७) ज्याचा आहारविहार माफक, कर्माचरण बेताचें आणि झोंप व जागरण परिमित त्याला (हा) योग दुःखघातक ह्मणजे सुखावह होतो.

[या श्लोकांत 'योग' ह्मणजे पातंजल योगाची क्रिया व 'युक्त' ह्मणजे माफक बेताची किंवा परिमित असे अर्थ आहेत; व पुढेंहि एकदोन ठिकाणीं योग म्हणजे पातंजल योग असाच अर्थ आहे. तथापि तेवढ्यानें या अध्ययांत पातंजल योगच स्वतंत्र प्रतिपाद्य आहे असें होत नाहीं. कर्मयोग सिद्ध करून घेणें हें आयुष्यांतील प्रधान कर्तव्य असून त्याला साधनीभूत ह्मणून तेवढ्यापुरतें पातंजल योगाचें हें वर्णन आहे असें पूर्वी स्पष्ट सांगितलें असून, या श्लोकांतील "कर्माचें योग्य आचरण" या शब्दांनींहि इतर कर्में न सोडितां हा योगाभ्यास करा.

§§ यदा विनियतं चित्तमात्मन्येवावतिष्ठते ।
निःस्पृहः सर्वकामेभ्यो युक्त इत्युच्यते तदा ॥ १८ ॥
यथा दीपो निवातस्थो नेंगते सोपमा स्मृता ।
योगिनो यतचित्तस्य युंजतो योगमात्मनः ॥ १९ ॥

वयाचा हें उघड होतें. आतां योग्याचें थोडें वर्णन करून नंतर समाधि सुखाचें स्वरूप सांगतात—]

(१८) आंवरून धरिलेलें मन जेव्हां आत्म्याच्याच ठिकाणीं स्थिर होतें, आणि कोणत्याहि उपभोगाची इच्छा रहात नाहीं, तेव्हां तो युक्त झाला असे म्हणतात. (१९) निर्वात जागीं ठेविलेला दिवा म्हणजे दिव्याची ज्योत जशी निश्चल रहात्ये तीच उपमा चित्त आंवरून आपला योगाभ्यास करणाऱ्या योग्यास दिलेली आहे.

[या उपमेशिवाय महाभारतांत (शान्ति. ३०० ३१,३४) "तेलानें भरलेलें पात्र जिन्यावरून नेतांना, किंवा वादळांत नावेचा बचाव करितांना मनुष्य जसा 'युक्त' किंवा एकाग्र होतो तसें योग्यानें मन एकाग्र होत असतें" असे दृष्टांत आले आहेत. सारथी व रथाचे घोडे हा कठोपनिषदांतील दृष्टान्त तर प्रसिद्धच आहे; व गीतेंत स्पष्ट आला नाहीं तरी दुसऱ्या अध्यायांतील ६७ व ६८ आणि याच अध्यायांतील २५ वा हे श्लोक तो दृष्टांत मनांत ठेवून सांगितले आहेत. योग ह्मणजे कर्मयोग असा जरी गीतेंतला पारिभाषिक अर्थ असला, तरी त्या शब्दाचे इतर अर्थहि गीतेंत आले आहेत. उदाहरणार्थ, ९. ५ व १०. ७ या श्लोकांत योग म्हणजे "अलौकिक किंवा वाटेल तें करण्याची शक्ति" असा अर्थ आहे. किंबहुना योग शब्दाचे अनेक अर्थ असल्यामुळेंच गीतेंत पातंजल योग किंवा सांख्यमार्ग प्रतिपाद्य आहे असें म्हणण्यास त्या त्या संप्रदायांतील लोकांस सवड झाली आहे असें म्हटलें तरी चालेल. असो; १९ व्या श्लोकांत सांगितलेल्या चित्तनिरोधरूपी पातंजल योगांतील समाधीचेंच स्वरूप आतां विस्तारानें सांगतात—]

यत्रोपरमते चित्तं निरुद्धं योगसेवया ।
यत्र चैवात्मनाऽऽत्मानं पश्यन्नात्मनि तुष्यति ॥ २० ॥
सुखमात्यंतिकं यत्तद्बुद्धिग्राह्यमतींद्रियम् ।
वेत्ति यत्र न चैवायं स्थितश्चलति तत्त्वतः ॥ २१ ॥
यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः ।
यस्मिन्स्थितो न दुःखेन गुरुणापि विचाल्यते ॥ २२ ॥
तं विद्याद्दुःखसंयोगवियोगं योगसंज्ञितम् ॥
स निश्चयेन योक्तव्यो योगोऽनिर्विण्णचेतसा ॥ २३ ॥

(२०) योगानुष्ठानानें निरोध होऊन चित्त ज्या ठिकाणीं रममाण होतें, आणि जेथें आपण आत्म्याला पाहून आत्म्यांतच संतुष्ट होऊन रहातों, (२१) जेथें (केवळ) बुद्धिगम्य व इंद्रियांना अगोचर असें जें अत्यंत सुख त्याचा त्याला अनुभव घडतो; आणि जेथें तो (एकदां) स्थिरावला म्हणजे तत्त्वापासून केव्हांहि ढळत नाहीं, (२२) तसेंच जी स्थिति प्राप्त झाली म्हणजे त्यापेक्षां दुसरा कोणताही लाभ त्यास अधिक वाटत नाहीं, आणि जेथें स्थिरावला म्हणजे कितीहि मोठें दुःख असलें तरी तें (त्याला) तेथून चाळवूं शकत नाहीं, (२३) त्याला दुःखाच्या स्पर्शापासून वियोग म्हणजे 'योग' या नांवाची स्थिति समजतात; आणि हा 'योग' मन कंटाळूं न देतां निश्चयानें आचरिला पाहिजे.

[ हे चार श्लोक मिळून एकच वाक्य आहे. 'त्याला' (तं) या २३ व्या श्लोकाच्या आरंभींच्या दर्शक सर्वनामानें पूर्वींच्या तीन श्लोकांतील वर्णन उद्दिष्ट आहे; आणि चारी श्लोक मिळून 'समाधी'चें वर्णन पुरें केलें आहे. पातंजल योगसूत्रांत " योगश्चित्तवृत्तिनिरोधः " योग म्हणजे चित्तवृत्तींचा निरोध असें जें योगाचें लक्षण दिलें आहे, तत्सदृश्य २० व्या श्लोकाच्या आरंभीचे शब्द आहेत. या चित्तवृत्तिनिरोधाचीच समाधी ही पूर्णावस्था होय, व त्यालाच 'योग' ही संज्ञा आहे, असें

§§ संकल्पप्रभावान्कामांस्त्यक्त्वा सर्वानशेषतः ।
मनसैवेंद्रियग्रामं विनियम्य समंततः ॥ २४ ॥
शनैः शनैरुपरमेद्बुद्ध्या धृतिगृहीतया ।
आत्मसंस्थं मनःकृत्वा न किंचिदपि चिंतयेत् ॥ २५ ॥
यतो यतो निश्चरति मनश्चंचलमस्थिरम् ।
ततस्ततो नियम्यैतदात्मन्येव वशं नयेत् ॥ २६ ॥

'योग' या शब्दाचें आतां नवीन लक्षण मुद्दाम दिलें आहे. निग्रही व उद्योगी मनुष्यास सामान्यतः हा योग सहा महिन्यांनीं सिद्ध होतो असें उपनिषदांत व महाभारतांत सांगितलें आहे. (मैत्र्यु० ६. २८; अमृतनाद. २९; म. भा. अश्व. अनुगीता १९. ९९). तथापि पातंजल योगांतील समाधीनें प्राप्त होणारें हें सुख केवळ चित्तनिरोधानें नव्हे, तर चित्तनिरोधानें आपण आपल्या आत्म्याची ओळख करून घेतल्या-नंतर होत असलें असें पूर्वीं २० व्या व पुढें २८ व्या श्लोकांत स्पष्ट म्हटलें आहे. या दुःखविरहित स्थितीसच 'ब्रह्मानंद' किंवा 'आत्म-प्रसादज सुख' अगर 'आत्मानंद' म्हणतात (गी. १८ ३७, व गीतार. प्र. ९ पृ.२३० पहा); आत्मज्ञान होण्यास लागणारी चित्ताची ही समता केवळ पातंजल योगानेंच उत्पन्न होते असें नाहीं, तर चित्त शुद्धीचा हाच परिणाम ज्ञान व भक्ति यांनींही घडून येतो असें पुढील अध्यायांतून वर्णिलें असून तोच मार्ग अधिक प्रशस्त व सुलभ समजतात. समाधीचें लक्षण सांगितलें; आतां ती कशी लावावी हें सांगतात—]

(२४) संकल्पापासून उत्पन्न होणाऱ्या सर्व कामांचा म्हणजे वास-नांचा निःशेष त्याग करून, आणि सर्व इंद्रियांचें मनानेंच चोहोंकडून नियमन करून, (२५) धैर्ययुक्त बुद्धीनें हळूहळू शान्त होत जावें, आणि मन आत्म्याच्या ठिकाणीं स्थिर करून कोणताहि विचार मनांत येऊं देऊं नये. (२६) (अशा रीतीनें चित्त एकाग्र करीत असतां) चंचल व अस्थिर मन

§§ प्रशान्तमनसं ह्येनं योगिनं सुखमुत्तमम् ।
उपैति शान्तरजसं ब्रह्मभूतमकल्मषम् ॥ २७ ॥
युंजन्नेवं सदाऽऽत्मानं योगी विगतकल्मषः ।
सुखेन ब्रह्मसंस्पर्शमत्यंतं सुखमश्नुते ॥ २८ ॥

जिकडून जिकडून बाहेर फुटूं लागेल तिकडून तिकडून निरोध करून तें आत्म्याच्याच ताब्यांत आणावें.

[ मनाची समाधी करण्याच्या क्रियेचें हें वर्णन कठोपनिषदांतील रथोपमेनें ( कठ. १.३.३ ) चांगलें व्यक्त होतें. रथाचे घोडे इकडेतिकडे जाऊं न देतां उत्तम सारथी ज्याप्रमाणें त्यांना सरळ रस्त्यानें घेऊन जातो त्यासारखाच प्रयत्न मनुष्याला समाधीसाठीं करावा लागतो. मन कोणत्याही विषयावर स्थिर करण्याचाज्याला अभ्यास आहे त्याला वरील श्लोकांतील मर्म तावडतोब कळेल. मन एकीकडून आंव-रावयाला जावें तों दुसरीकडे फुटत असतें; व हें बंद पडल्याखेरीज समाधी लागणें शक्य नाहीं. याप्रमाणें योगाभ्यासानें मन स्थिर केलें ह्मणजे जें फल मिळतें त्याचें आतां वर्णन कारितात—]

(२७) या प्रकारें शान्तचित्त, रजोविरहित, निष्पाप व ब्रह्मभूत झालेल्या ( कर्म- ) योग्याला उत्तम सुख प्राप्त होतें. (२८) याप्रमाणें सतत आपला योगाभ्यास करणारा ( कर्म- ) योगी पापांपासून सुटून ब्रह्मसंयो-गापासून प्राप्त होणाऱ्या अत्यंत सुखाचा सुखानें उपभोग घेतो.

[ या दोन श्लोकांत योगी म्हणजे कर्मयोगी असा आम्हीं अर्थ केला आहे. कारण पातंजल योग तरी कर्मयोगाचें साधन म्हणून सांगितला असल्यामुळें पातंजल योगाचा अभ्यास करणारा हा पुरुष कर्मयोगीच विवक्षित आहे. तथापि योगी ह्मणजे समाधि लावून बसलेला पुरुष असा अर्थ घेतला तरी चालेल. गीतेंतील प्रतिपाद्य मार्ग मात्र या पलीकडला आहे हें विसरलें नाहीं

§§ सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि ।
ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः ॥ २९ ॥
यो मां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति ।
तस्याहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति ॥ ३० ॥

म्हणजे झालें. हाच न्याय पुढील दोनतीन श्लोकांसहि लागू आहे. निर्वाण ब्रह्म सुखाचा याप्रमाणें अनुभव आल्यावर सर्वांभूतीं जी आत्मौपम्यदृष्टि उत्पन्न होते तिचें आतां वर्णन करितात—]

(२९) ज्याचा आत्मा (याप्रमाणें) योगयुक्त झाला त्याची दृष्टि सर्वत्र सम होऊन सर्व भूतांच्या ठायीं आपण आणि आपल्या ठायीं सर्व भूतें (आहेत) असें त्याला दिसूं लागतें. (३०) मी (परमेश्वर परमात्मा) सर्व ठिकाणीं (आहे) असें जो पहातो, आणि माझ्या ठायीं सर्व अशी ज्याची दृष्टि झाली, त्याला मी कधीं अंतरत नाहीं. आणि तोहि मला कधीं अंतरत नाहीं.

[या दोन श्लोकांपैकीं पहिलें वर्णन 'आत्मा' हा शब्द घालून अव्यक्त म्ह० अध्यात्मदृष्ट्या, व दुसरें प्रथमपुरुषदर्शक 'मी' हें पद घालून व्यक्त म्ह० भक्तिदृष्ट्या केलेलं आहे. पण दोहोंचा अर्थ एकच आहे (गीतार. प्र. १३ पृ. ४२७–४३० पहा). ही ब्रह्मात्मैक्यदृष्टिच मोक्ष व कर्मयोग या दोहोंचाहि पाया होय. २९ व्या श्लोकाचें पहिलें अर्ध थोड्या फरकानें मनुस्मृतींत (मनु. १२.९१) महाभारतांत (शां. २३८. २१ व २६८. २२), व उपनिषदांतहि (कैव. १.१०; ईश. ६) आलें आहे. किंबहुना सर्वभूतात्मैक्यज्ञान हेंच सर्व अध्यात्मधार्मे व कर्मयोगाचें मूळ होय, असें गीतारहस्याच्या १२ व्या प्रकरणांत आम्हीं सविस्तर दाखविलें आहे (पृ. ३८४ वगैरे पहा). इंद्रियनिग्रह सिद्ध झाला तरी हें ज्ञान असल्याखेरीज तो फुकट आहे; व म्हणून परमेश्वराचें ज्ञान सांगण्यास पुढच्या अध्यायापासून सुरवात केली आहे.]

सर्वभूतस्थितं यो मां भजत्येकत्वमास्थितः ।
सर्वथा वर्तमानोऽपि स योगी मयि वर्तते ॥ ३१ ॥
आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन ।
सुखं वा यदि वा दुःखं स योगी परमो मतः ॥ ३२ ॥

अर्जुन उवाच ।

§§ योऽयं योगस्त्वया प्रोक्तः साम्येन मधुसूदन ।

(३१) एकत्वबुद्धि म्हणजे सर्वभूतात्मैक्यबुद्धि मनांत ठेवून सर्व भूतांत असणाऱ्या मला (परमेश्वराला) जो भजतो, तो (कर्म-) योगी सर्व प्रकारें वागत असतांहि मजमध्यें असतो. (३२) हे अर्जुना ! सुख असो वा दुःख असो, आपल्याप्रमाणें इतरांना अशा (आत्मौपम्य-) दृष्टीनें जो सर्वत्र सारखें पाहूं लागला तो (कर्म-) योगी परम म्हणजे उत्कृष्ट मानिला जातो.

[ सर्वभूतीं एक आत्मा ही दृष्टि सांख्य आणि कर्मयोग या दोन्हीं मार्गांत सारखीच आहे; तसेंच पातंजल योगांतहि समाधी लागून परमेश्वराची ओळख झाल्यावर हीच साम्यावस्था प्राप्त होते. परंतु सांख्य आणि पातंजलयोगी या दोघांसहि सर्व कर्मांचा त्याग इष्ट असल्यामुळें या साम्यबुद्धीचा व्यवहारांत उपयोग करण्याचा प्रसंगच ते आणीत नाहींत; आणि गीतेंतील कर्मयोगी तसें न करितां अध्यात्मज्ञानानें प्राप्त झालेल्या या साम्य बुद्धीचा व्यवहारांतहि नित्य उपयोग करून जगाचीं सर्व कामें लोकसंग्रहार्थ करीत असतो हा या दोहोंत मोठा भेद आहे, आणि म्हणूनच तपस्वी म्हणजे पातंजलयोगी व ज्ञानी म्हणजे सांख्यमार्गी या दोहोंपेक्षां कर्मयोगी श्रेष्ठ असें या अध्यायाचे अखेर (श्लोक ४६) स्पष्ट म्हटलें आहे. हें साम्ययोगवर्णन ऐकून त्यावर अर्जुन आतां अशी शंका घेतो कीं— ]

एतस्याहं न पश्यामि चंचलत्वास्थितिं स्थिराम् ॥ ३३ ॥
चंचलं हि मनः कृष्ण प्रमाथि बलवद्दृढम् ।
तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करम् ॥ ३४ ॥

श्रीभगवानुवाच ।

असंशयं महाबाहो मनो दुर्निग्रहं चलम् ।
अभ्यासेन तु कौंतेय वैराग्येण च गृह्यते ॥ ३५ ॥
असंयतात्मना योगो दुष्प्राप इति मे मतिः ।
वश्यात्मना तु यतता शक्योऽवाप्तुमुपायतः ॥ ३६ ॥

अर्जुन म्हणाला–( ३३ ) हे मधुसूदना ! साम्यानें म्हणजे साम्य-बुद्धिनें प्राप्त होणारा जो हा योग म्ह० कर्मयोग तुम्हीं सांगितला तो (मनाच्या) चंचलपणामुळें कायम टिकेल असें मला दिसत नाहीं. ( ३४ ) कारण हे कृष्णा ! मन हें चंचल, दांडगें बालिष्ठ व दृढ म्हणजे वळविण्यास कठिण आहे. वाऱ्याप्रमाणें म्हणजे वाऱ्याची मोट बांधण्या-प्रमाणें याचा निग्रह करणें मला अत्यंत दुष्कर दिसतें.

[ ३३ व्या श्लोकांत 'साम्यानें' किंवा 'साम्य बुद्धीनें' प्राप्त होणारा या विशेषणानें योग ह्या शब्दाचा या ठिकाणीं कर्मयोग असाच अर्थ होतो. पातंजल योगांतील समाधीचें जरी पूर्वीं वर्णन आलें असलें तरी 'योग' शब्दानें पातंजल योग या श्लोकांतून विवक्षित नाहीं. कारण दुसऱ्या अध्यायांत "समत्वं योग उच्यते" (२. ४८)–"बुद्धीचा सारखेपणा किंवा समत्व यालाच योग म्हणतात"–अशी कर्मयोगाची भगवंतांनींच व्याख्या दिली आहे. असो; अर्जुनाची अडचण कबूल करून भगवान् आतां असें सांगतात कीं—]

श्रीभगवान् म्हणाले–( ३५ ) हे महाबाहो अर्जुना ! मन हें चंचल असून त्याचा निग्रह करणें दुर्घट, याबद्दल कांहींच शंका नाहीं; पण अभ्यासानें आणि वैराग्यानें हे कौंतेया ! तें स्वाधीन ठेवितां येतें. ( ३६ ) अंतःकरण ज्याच्या

अर्जुन उवाच ।

§§ अयतिः श्रद्धयोपेतो योगाच्चलितमानसः ।

ताब्यांत नाहीं त्याला ( हा साम्यबुद्धिरूप ) योग प्राप्त होणें कठिण असें माझें मत आहे; पण अंतःकरण ताब्यांत आणून प्रयत्न करीत गेल्यास उपायानें ( हा योग ) प्राप्त होणें शक्य आहे.

[ तात्पर्य, प्रथम जें दुर्घट दिसतें तेंच संवयीनें आणि दीर्घोद्योगानें अखेर सिद्ध होतें. ' अभ्यास ' म्हणजे कोणतीहि गोष्ट पुनः पुनः करणें, आणि ' वैराग्य ' म्हणजे राग किंवा प्रीति नसणें, अर्थात् निरिच्छपणा. पातंजल योगसूत्रांत आरंभीच " योगश्चित्तवृत्तिनिरोधः "–चित्तवृत्तीचा निरोध करणें याचें नांव योग–असें योगाचें लक्षण देऊन ( याच अध्यायांतील २० पहा ) पुढील सूत्रांत " अभ्यासवैराग्याभ्यां तन्निरोधः "–अभ्यास व वैराग्य यांनीं चित्तवृत्तीचा निरोध होतो असें म्हटलें आहे. गीतेंत हे शब्द आले असून अभिप्रायहि तोच आहे; पण तेवढ्यावरून गीतेंत हे शब्द पातंजल सूत्रांतून घेतले आहेत असें मात्र म्हणतां येत नाहीं (गीतार. पृ. ५२६ पहा ). मनोनिग्रह करून समाधि लावणें जरी याप्रमाणें शक्य असलें आणि कांहीं निग्रही पुरुषांना ही सिद्धि सहा महिन्यांच्या अभ्यासानें जरी प्राप्त होण्यासारखी असली, तरी यावर आतां दुसरी अशी शंका येते कीं, प्रकृतिस्वभावामुळें कर्मयोगाची ही परमावस्था अनेक लोकांस एकदोन जन्मांतहि साध्य होणें शक्य नसतें. अशा लोकांनीं ही सिद्धि कशी मिळवावी ? कारण एका जन्मांत शक्य तेवढा इंद्रियनिग्रहाचा अभ्यास करून कर्मयोग आचरूं लागलें तरी मरणसमयीं तो अपूर्णच रहाणार, आणि पुढच्या जन्मींहि पुनः पहिल्यापासून सुरवात करावयाची म्हटली म्हणजे पुनः पुढच्या जन्मीहि तोच प्रकार घडून यावयाचा. सबब अशा प्रकारच्या पुरुषांनीं काय करावें असा अर्जुनाचा दुसरा प्रश्न आहे—]

अप्राप्य योगसंसिद्धिं कां गतिं कृष्ण गच्छति ॥ ३७ ॥
कच्चिन्नोभयविभ्रष्टश्छिन्नाभ्रमिव नश्यति ।
अप्रतिष्ठो महाबाहो विमूढो ब्रह्मणः पथि ॥ ३८ ॥
एतन्मे संशयं कृष्ण छेत्तुमर्हस्यशेषतः ।
त्वदन्यः संशयस्यास्य छेत्ता न ह्युपपद्यते ॥ ३९ ॥

अर्जुन म्हणाला–( ३७ ) हे कृष्णा ! श्रद्धा आहे पण अयति म्ह० ( प्रकृतिस्वभावामुळें ) पुरासा प्रयत्न किंवा संयमन होत नाहीं, म्हणून ज्याचें मन ( साम्यबुद्धिरूप कर्म- ) योगापासून चलित झालें, तो योगसिद्धि न पावतां कोणत्या गतीला जातो ? ( ३८ ) हे महाबाहो श्रीकृष्णा ! मोहग्रस्त होऊन ब्रह्मप्राप्तीच्या मार्गांत स्थिर न झाल्यानें दोहों-कडून भ्रष्ट म्हणजे सुटलेला हा पुरुष फुटलेल्या ढगाप्रमाणें (मधल्यामध्येंच) नाश तर पावत नाहीं ना ? ( ३९ ) हे कृष्णा ? माझा हा संशय तुम्हींच निःशेष दूर केला पाहिजे; या संशयाचें निरसन करणारा तुम्हां-वांचून दुसरा कोणी मिळणार नाहीं.

[ नञ् समासांत आरंभींच्या नञ् (अ) या पदाचा ‘ अभाव ’ असा जरी सामान्य अर्थ असला तरी अल्पार्थींहि पुष्कळदां त्याचा प्रयोग होत असल्यामुळें ३७ व्या श्लोकांतील ‘ अयति ’ या शब्दाचा अर्थ “ अल्प म्हणजे अपुरा प्रयत्न किंवा संयमन करणारा ” असा होतो. ३८ व्या श्लोकांत “ दोहोंकडचा आश्रय सुटलेला ” किंवा “ इतो भ्रष्टस्ततो भ्रष्टः ” असें जें म्हटलें आहे त्याचा अर्थहि कर्मयोगपरच केला पाहिजे. काम्य बुद्धीनें पण शास्त्राज्ञेप्रमाणें कर्म केलें तर स्वर्गप्राप्ति होते आणि निष्काम बुद्धीनें केलें तर त्याचें बंधन न लागतां मोक्षप्राप्ति होते, अशीं कर्माचीं दोन फलें आहे. परंतु या अर्ध-वट मनुष्यास कर्माचें स्वर्गादि काम्य फल मिळत नाहीं, कारण तसा हेतु नसतो; आणि साम्यबुद्धि पूर्णतेस आलेली नसल्यामुळें त्यास मोक्ष

श्रीभगवानुवाच ।

पार्थ नैवेह नामुत्र विनाशस्तस्य विद्यते ॥
न हि कल्याणकृत्कश्चिद्दुर्गतिं तात गच्छति ॥ ४० ॥
प्राप्य पुण्यकृतां लोकानुषित्वा शाश्वतीः समाः ।
शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते ॥ ४१ ॥
अथवा योगिनामेव कुले भवति धीमताम् ।
एतद्धि दुर्लभतरं लोके जन्म यदीदृशम् ॥ ४२ ॥

मिळणेंहि शक्य नसतें. म्हणून स्वर्ग गेला आणि मोक्षहि गेला–तेल गेलें, तूप गेलें आणि धुपाटणें हातीं आलें–अशी उभयभ्र मुकल्याप्रमाणें त्याची स्थिती होते कीं काय, असा अर्जुनाचा प्रश्न आहे. हा प्रश्न केवळ पातंजलयोगरूपी कर्मयोगाच्या साधनासच लागतो असें नाहीं. कर्मयोगसिद्धयर्थ लागणारी साम्यबुद्धि कधीं पातंजल योगानें तर कधीं भक्तीनें आणि कधीं ज्ञानानें प्राप्त होते, असें पुढील अध्यायांतून वर्णन आहे; आणि पातंजल योग हें साधन एकाच जन्मांत अपुरें रहाण्याचा जसा संभव आहे, तसेंच कोणी भक्ति किंवा ज्ञान या साधनांचा अंगीकार केल्यास तींहि एक जन्मांत अपुरीं रहाण्याचा संभव आहे. म्हणून अर्जुनाच्या वरील प्रश्नास भगवंतांनीं दिलेलें उत्तर कर्मयोगमार्गांतील सर्वच साधनांस सामान्यतःच लागू आहे असें म्हटलें पाहिजे.]

श्रीभगवान् म्हणाले–(४०) हे पार्था ! इहलोकीं काय आणि परलोकीं काय अशा पुरुषाचा कधींच विनाश होत नाहीं. कारण कल्याणकारक कर्में करणाऱ्या कोणत्याहि पुरुषास बाबा ! दुर्गति मिळत नाहीं. (४१) पुण्यकर्में करणाऱ्या पुरुषांना मिळणाऱ्या ( स्वर्गादि ) लोकांप्रत पोंचून व (तेथें) पुष्कळ वर्षें वास करून मग हा योगभ्रष्ट म्ह० कर्मयोगापासून भ्रष्ट झालेला पुरुष शुचिर्भूत श्रीमान् लोकांच्या घरीं जन्म घेतो. (४२) किंवा

तत्र तं बुद्धीसंयोगं लभते पौर्वदेहिकम् ।
यतते च ततो भूयःसंसिद्धौ कुरुनंदन ॥ ४३ ॥
पूर्वाभ्यासेन तेनैव ह्रियते ह्यवशोऽपि सः ।
जिज्ञासुरपि योगस्य शब्दब्रह्मातिवर्तते ॥ ४४ ॥
प्रयत्नाद्यतमानस्तु योगी संशुद्धकिल्बिषः ।
अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम् ॥ ४५ ॥

बुद्धिमान् अशा (कर्म-) योग्यांच्याच कुळांत जन्म पावतो. अशा प्रकारचें जें जन्म तें (या) लोकीं मोठें दुर्लभ होय. (४३) यांत म्हणजे अशा प्रकारें प्राप्त झालेल्या जन्मांत पूर्वजन्मांतला तो बुद्धिसंस्कार त्याला प्राप्त होतो; आणि हे कुरुनंदना! तो त्याहून भूयः म्ह० अधिक (योग-) सिद्धि मिळविण्याचा प्रयत्न करतो. (४४) पूर्वजन्मींच्या त्याच्या त्या अभ्यासानेंच अवश्य म्हणजे स्वतः इच्छा नसली तरी तो (पूर्ण सिद्धीकडे) ओढला जातो. ज्याला (कर्म-) योगाची जिज्ञासा म्हणजे ज्ञान व्हावें अशी इच्छा झाली, तो देखील शब्दब्रह्माच्या पलीकडे जातो. (४५) (याप्रमाणें) प्रयत्नानें उद्योग करितां करितां पापापासून शुद्ध होत्साता (कर्म-) योगी अनेक जन्मांनंतर सिद्धि पावून अखेर उत्तम गतीस पोंचतो!

[या श्लोकांतून योग, योगभ्रष्ट व योगी हे शब्द कर्मयोग, कर्मयोगापासून भ्रष्ट झालेला व कर्मयोगी या अर्थीच वापरलेले आहेत. कारण श्रीमान् कुळांत जन्मणें ही स्थिति इतरांस इष्ट असणें संभवनीय नाहीं. भगवान् असें सांगतात कीं, पहिल्यानें शक्य असेल तेवढ्या शुद्ध बुद्धीनें कर्मयोग आचरण्यास सुरुवात करावी. थोडेंच कां होईना पण अशा रीतीनें जें कर्म करण्यांत येईल तेंच या जन्मांत नाहीं तर पुढच्या याप्रमाणें जास्त जास्त सिद्धि मिळण्यास उत्तरोत्तर कारणीभूत होऊन त्यानेंच अखेरीस पूर्ण सद्गति मिळते. "हा धर्म थोडा जरी आचरिला तरी तो मोठ्या भयापासून तारतो" (गी. २.४०), आणि "अनेक जन्मांनंतर

§§ तपस्विभ्योऽधिको योगी ज्ञानिभ्योऽपि मतोऽधिकः ।

वासुदेवाची प्राप्ति होत्ये "( ७. १९ ), हे श्लोक याच सिद्धान्ताचे पूरक होत. जास्त विवेचन गीतारहस्य प्र. १० पृ. २७९–२८२ यांत केलें आहे तें पहा. ४४ व्या श्लोकांत शब्दब्रह्म याचा अर्थ 'वैदिक यज्ञयागादि काम्य कर्मे' असा आहे. कारण हीं कर्मे वेदविहित असून वेदांवर श्रद्धा ठेऊनच तीं करीत असतात; आणि वेद ह्मणजे सर्व सृष्टीच्या पूर्वी असणारा शब्द म्हणजे शब्दब्रह्म होय. कोणीहि झाला तरी प्रथम सर्व कर्मे काम्य बुद्धीनेंच करीत असतो; पण या कर्मांनें जसजशी चित्तशुद्धि होते त्याप्रमाणें पुढें निष्काम बुद्धीनें कर्में करण्याची इच्छा होते. म्हणून—

द्वे ब्रह्मणी वेदितव्ये शब्दब्रह्म परं च यत् ।
शब्दब्रह्मणि निष्णातः परं ब्रह्माधिगच्छति ॥

"ब्रह्म दोन प्रकारचें आहे हें कळलें पाहिजे; एक शब्दब्रह्म आणि दुसरें त्यापलीकडचें ( निर्गुण ). शब्दब्रह्मांत निष्णात झाला ह्मणजे मग त्यापलीकडचें (निर्गुण) ब्रह्म प्राप्त होतें "–असें उपनिषदांत, व महाभारतांतहि वर्णन आहे ( मैत्र्यु. ६.२२; अमृतबिंदु १७; म. भा. शां. २३१ ६३;२६९.१). शब्दब्रह्मांतील काम्य कर्मांचा कंटाळा येऊन अखेर तींच कर्में लोकसंग्रहार्थ करावयास सांगणाऱ्या कर्मयोगाची इच्छा होते आणि मग या निष्काम कर्मयोगाचें थोडें तरी प्रथम आचरण घडतें. नंतर 'स्वल्पारंभाः क्षेमकराः' या न्यायानें हेंच स्वल्पाचरण त्या मनुष्याला या मार्गांत पुढें पुढें ओढीत नेऊन क्रमाक्रमानें पूर्ण सिद्धि मिळवून देतें "कर्मयोगाचें ज्ञान होण्याची इच्छा झाली तरी देखील तो शब्दब्रह्मापलीकडे जातो" असें जें ४४ व्या श्लोकांत सांगितलें आहे त्याचें तात्पर्य हेंच होय. कारण सदर जिज्ञासा कर्मयोगरूपी चरकाचें तोंड आहे; आणि एकदां का या चरकाच्या तोंडांत सांपडलें म्हणजे या जन्मीं नाहीं तर पुढच्या पण केव्हांना केव्हां तरी पूर्ण सिद्धि मिळून शब्द-

कर्मिभ्यश्चाधिको योगी तस्माद्योगी भवार्जुन ॥ ४६ ॥

[ब्रह्माच्या पलीकडच्या ब्रह्मास पोंचल्याखेरीज रहात नाहीं. जनकादिकांस ही सिद्धि एकाच जन्मांत मिळाली असें सकृद्दर्शनीं वाटतें खरें; पण तत्त्वतः पहातां त्यांनाहि हें फल जन्मोजन्मींच्या पूर्वसंस्कारानेंच मिळालें असलें पाहिजे, हें विसरतां कामा नये. असो; कर्मयोगाचें थोडेंसें आचरण, किंबहुना जिज्ञासा देखील, अशा रीतीनें नेहमींच कल्याणकारक असून शिवाय त्यानेंच अखेरीस मोक्षप्राप्तिहि निःसंशय होत असल्यामुळें भगवान् आतां अर्जुनास असें सांगतात कीं—]

(४६) तपस्वी लोकांपेक्षां (कर्म-) योगी श्रेष्ठ, ज्ञानी पुरुषांपेक्षांहि श्रेष्ठ, आणि कर्मठापेक्षांहि श्रेष्ठ समजतात; तस्मात् हे अर्जुना! तूं योगी म्हणजे कर्मयोगी हो.

या श्लोकांत तपस्वी म्हणजे अरण्यांत जाऊन उपोषणादि कायक्लेशकर व्रतांनीं किंवा हठयोगांतील साधनांनीं सिद्धि मिळविणारे लोक असा अर्थ असून सामान्यतःहि या शब्दाचा अर्थ हाच आहे. ज्ञानी म्हणजे अर्थातच "ज्ञानयोगेन सांख्यानां०" (गी. ३.३.) यांत वर्णिलेले ज्ञानानें ह्मणजे सांख्यमार्गानें कर्में सोडून सिद्धि मिळविणारे सांख्यनिष्ट लोक होत. तसेंच कर्मी ह्मणजे गी. २.४२–४४ आणि ९. २०.२१ यांत वर्णिलेले नुसतीं काम्य कर्में करणारे स्वर्गपरायण कर्मठ मिमांसक होत. या तीन पंथांपैकीं प्रत्येकजण आपआपल्या मार्गानेंच सिद्धि मिळल्ये असें म्हणत असतो. पण गीता आतां असें सांगत आहे कीं, तपस्वी घ्या, कर्मठ मिमांसक घ्या, किंवा ज्ञाननिष्ट घ्या, या प्रत्येकापेक्षां कर्मयोगी—अर्थात् कर्मयोग हा मार्गहि—श्रेष्ट आहे. आणि तोच सिद्धान्त पूर्वीं "अकर्मापेक्षां कर्म श्रेष्ट०" (गी. ३.८) आणि "कर्मसंन्यासापेक्षां कर्मयोग विशेष०" (गी. ५.२). इत्यादी श्लोकांत वर्णिला आहे (गीतारहस्य प्रकरण ११ पृ. ३०४,३०५ पहा). किंबहुना तपस्वी,

योगिनामपि सर्वेषां मद्गतेनांतरात्मना।

मीमांसक, किंवा ज्ञानमार्गी या प्रत्येकापेक्षां कर्मयोगी श्रेष्ठ आहे. 'म्हणून'च मागें 'योगस्थ होऊन कर्में कर' (गी, २.४८; गीतार. पृ. ६८), किंवा "योगाचा आश्रय करून ऊठ" (४.४२). असा ज्याप्रमाणें अर्जुनास उपदेश केला आहे, तद्वत् येथेंहि "तूं (कर्म) योगी हो" असा पुनः स्पष्ट उपदेश आहे. आणि कर्मयोग याप्रमाणें श्रेष्ठ न मानिला तर "तस्मात् तुं योगी हो" या उपदेशांतील 'तस्मात्=म्हणून' हें पद निरर्थक होईल. पण संन्यासमार्गीय टीकाकारांस हा सिद्धांत कसा खपणार? म्हणून 'ज्ञानी' या पदाचा अर्थ फिरवून ज्ञानी म्हणजे केवळ शब्दज्ञान किंवा पुस्तकी ज्ञान झालेले लोक असा त्यांनीं अर्थ केला आहे. पण हा अर्थ निवळ सांप्रदायिक आग्रहाचा होय. कर्में सोडणारा ज्ञानमार्ग गीता कमी समजत्ये असा गीतेचा अर्थ या टिकाकारांस नको आहे. कारण त्यामुळें त्यांच्या संप्रदायास गौणत्व येतें. आणि याचसाठीं 'कर्मयोगी विशिष्यते' (गी. ५ २) याचाहि अर्थ त्यांनीं फिरविला आहे. पण याचा पूर्ण विचार गीतारहस्याच्या ११ व्या प्रकरणांत (पृ. ३०४ वगैरे) केला असल्यामुळें या श्लोकाच्या आरंभीं दिलेल्या अर्थाबद्दल येथें जास्त चर्चा करीत नाहीं) कर्मयोग हाच मार्ग गीतेप्रमाणें सर्वांत श्रेष्ठ होय एवढें आमच्या मतें निर्विवाद आहे आतां कर्मयोग्यांतहि कोणता तारतम्यभाव पहावा लागतो हें पुढील श्लोकांत सांगतात––]

(४७) तथापि सर्व (कर्म–) योगांमध्येंहि जो माझ्या ठिकाणीं अंतःकरण ठेवून श्रद्धेनें मला भजतो, त्यालाच मी सर्वांत उत्तम युक्त म्हणजे उत्तम सिद्ध झालेला कर्मयोगी समजतों.

श्रद्धावान्भजते यो मां स मे युक्ततमो मतः ॥ ४७ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे ध्यानयोगो नाम षष्ठोऽध्यायः ॥ ६ ॥

---

[ कर्मयोगांतहि भक्तीच्या प्रेमळपणाची भर पडल्यास दुधांत साखर पडल्याप्रमाणें तो योगी भगवंतास अत्यंत प्रिय होतो असें या श्लोकाचें तात्पर्य आहे. निष्काम कर्मयोगापेक्षांहि भक्ति श्रेष्ठ असा अर्थ नाहीं. कारण पुढें बाराव्या अध्यायांत ध्यानापेक्षां कर्मफलत्याग श्रेष्ठ असें भगवंतांनींच स्पष्ट ह्मटलें आहे. ( गी. १२.२२ ) निष्काम कर्म व भक्ति यांचा समुच्चय श्रेष्ठ हें ह्मणणें निराळें, आणि सर्व निष्काम कर्मयोग व्यर्थ असून भक्ति श्रेष्ठ हे ह्मणणें निराळें. गीतेचा सिद्धान्त पहिल्या प्रकारचा असून भागवतपुराणाचा पक्ष दुसऱ्या प्रकारचा आहे. सर्व प्रकारचे क्रियायोग आत्मज्ञानविघातक ( भाग. १. ५, ३४ ) करवून—

नैष्कर्म्यमप्यच्युतभाववर्जितं न शोभते ज्ञानमलं निरंजनम् ।

नैष्कर्म्य ह्मणजे निष्काम कर्महि ( भाग. ११.३.४६ ) भगवद्भक्तीवांचून शोभत नाहीं, फुकट आहे ( भाग. १.५.१२ व १२.१२.५२ ), असें भागवताच्या पहिल्या व शेवटच्या स्कंधांतहि पुनः म्हटलें आहे. भागवतकारांचा कटाक्ष केवळ भक्तीवरच असल्यामुळें प्रसंगविशेषीं भगवद्गीतेच्याहि पुढें ते कशी धांव घेत असतात हें यावरून व्यक्त होईल. महाभारतांत, व अर्थात् गीतेंतहि, भक्तीचें वर्णन व्हावयास पाहिजे तसें झालें नाहीं अशा समजुतीनें जें पुराण निरूपिलें गेलें, त्यांत वरच्यासारखीं दुसरींहि कांहीं विधानें सांपडल्यास त्यांत कांहीं नवल नाहीं. पण आह्मांला गीतेचें तात्पर्य काय हें पहावयाचें आहे, भागवत काय सांगतें तें पहावयाचें नाहीं. दोहोंचें प्रयोजन व कालहि

भिन्न आहेत; यासाठीं त्यांची सर्वस्वीं एकवाक्यता करणें युक्त नव्हे. असो; कर्मयोगांतील साम्यबुद्धि संपादन करण्यास जीं साधनें लागतात त्यांपैकीं पातंजल योगांतील साधनांचें या अध्यायांत निरूपण केलें. ज्ञान व भक्ति हीं दुसरीं साधनें होत व पुढील अध्यायापासून त्यांच्या निरूपणास सुरवात होईल. ]

याप्रमाणें श्रीभगवंतांनीं गाइलेल्या ह्मणजे सांगितलेल्या उपनिषदांत ब्रह्मविद्यान्तर्गत योग–ह्मणजे कर्मयोग शास्त्रावरील श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या संवादांतील ध्यानयोग नांवाचा सहावा अध्याय समाप्त झाला.

---

# सप्तमोऽध्यायः।

## अध्याय सातवा.

[ कर्मयोग सांख्यमार्गाइतकाच मोक्षप्रद, पण स्वतंत्र व त्याहून श्रेष्ठ आहे, आणि या मार्गाचें स्वल्पाचरण जरी घडलें तरी तें फुकट जात नाहीं, असें प्रतिपादन करून, या मार्गाच्या सिद्धयर्थ लागणारा इंद्रियनिग्रह कोणत्या प्रकारें करावा याचें निरूपण करण्यांत आलें. पण इंद्रियनिग्रह म्हणजे केवळ बाह्य क्रिया असून ज्यासाठीं इंद्रियांची ही कसरत करावयाची त्याचा विचार अद्याप झाला नाहीं. "कामक्रोधादिक शत्रु इंद्रियांचे ठायीं ठाणें देऊन ज्ञानविज्ञानाचा नाश करितात" (३. ४०, ४१), म्हणून प्रथम तूं इंद्रियनिग्रह करून या शत्रूंना ठार कर, असें भगवंतांनींच इंद्रियनिग्रहाचें प्रयोजन तिसऱ्याच अध्यायांत अर्जुनास सांगितलें आहे. आणि मागच्या अध्यायांतहि इंद्रियनिग्रह करून "ज्ञान विज्ञानानें तृप्त झालेला" (६. ८), योगयुक्त पुरुष "परमेश्वर सर्व भूतांत आणि भूतें परमेश्वरांत पहातो (६. २९), असें त्याचें वर्णन केलें आहे. ह्मणून इंद्रियनिग्रह कसा करावा हें सांगितल्यावर

श्रीभगवानुवाच ।

मय्यासक्तमनाः पार्थ योगं युंजन्मदाश्रयः ।
असंशयं समग्रं मां यथा ज्ञास्यसि तच्छृणु ॥ १ ॥

'ज्ञान' व 'विज्ञान' ह्मणजे काय आणि परमेश्वराचें पूर्ण ज्ञान होऊन कर्मे न सोडितांहि कर्मयोगमार्गांतील ज्या विधींनीं अखेर निःसंशय मोक्ष मिळतो ते विधीहि सांगणें, आतां ओघानेंच प्राप्त झालें; आणि तोच विषय सातव्या अध्यायापासून सतराव्या अध्यायाचे अखेर अकरा अध्यायांत वर्णिला असून, शेवटच्या ह्मणजे १८ व्या अध्यायांत सर्व कर्मयोगाचा उपसंहार केलेला आहे. सृष्टींत अनेक प्रकारचे जे अनेक विनाशी पदार्थ आहेत त्या सर्वांत एकच अविनाशी परमेश्वर भरून राहिला आहे हें समजणें याचें नांव 'ज्ञान' आणि एकाच नित्य परमेश्वरापासून विविध नाशवंत पदार्थ कसे होतात हें समजणें याचें नांव 'विज्ञान' होय (गी. १३.३०) व यासच क्षराक्षरविचार असें म्हणतात. परंतु याखेरीज स्वतःच्या शरीरांत म्हणजे क्षेत्रांत ज्याला आत्मा असें म्हणतात त्याचें खरें स्वरूप काय हें जाणिल्यानेहि परमेश्वरस्वरूपाचा बोध होतो. अशा प्रकारच्या विचारास क्षेत्रक्षेत्रज्ञविचार असें म्हणतात. पैकीं क्षराक्षरविचारास प्रथम सुरुवात करून पुढें क्षेत्रक्षेत्रज्ञविचार तेराव्या अध्यायांत वर्णिला आहे. पण परमेश्वर एक असला तरी त्याचें अव्यक्त स्वरूप केवळ बुद्धिग्राह्य तर व्यक्त प्रत्यक्षावगम्य असेंहि उपासनेच्या दृष्टीनें त्यांत दोन भेद होतात. ह्मणून बुद्धीनें परमेश्वर कसा ओळखावा, आणि श्रद्धेनें अगर भक्तीनें व्यक्त स्वरूपाची उपासना करून तद्द्वारा अव्यक्ताचें ज्ञान कसें होतें, हे दोन्ही मार्ग किंवा विधि याच निरूपणांत सांगावे लागतात. तेव्हां या सर्व विवेचनास अकरा अध्याय लागले तर त्यांत कांहीं नवल नाहीं. शिवाय या दोन मार्गांनीं परमेश्वराच्या ज्ञानाबरोबरच इंद्रियनिग्रहहि आपोआपच होत असल्यामुळें केवळ इंद्रियनिग्रह प्राप्त करून देणाऱ्या पातंजल योगमार्गापेक्षां ज्ञान व भक्ति या

ज्ञानं तेऽहं सविज्ञानमिदं वक्ष्याम्यशेषतः ।
यज्ज्ञात्वा नेह भूयोऽन्यज्ज्ञातव्यमवशिष्यते ॥ २ ॥

दोन मार्गांची योग्यताहि मोक्षधर्मांत अधिक मानितात. तथापि हें सर्व विवेचन कर्मयोगमार्गाच्या उपपादनाचा पोटभाग आहे, स्वतंत्र नव्हे, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. अर्थात् गीतेच्या पहिल्या सहा अध्यायांत कर्म, दुसऱ्या षट्कांत भक्ति आणि तिसऱ्या षडध्यायींत ज्ञान असे गीतेचे जे तीन स्वतंत्र विभाग करितात ते तत्त्वतः खरे नव्हेत. स्थूलमानानें पाहतां हे तिन्ही विषय गीतेंत आले आहेत, परंतु ते स्वतंत्र नसून कर्मयोगाचीं अंगें ह्मणून त्याचें विवेचन केलें आहे, हें आह्मी गीतारहस्याच्या १४ व्या प्रकरणांत ( पृ. ४५१–४५५ ) प्रतिपादिलें आहे. ह्मणून येथें त्याची पुनरावृत्ति न करितां सातव्या अध्यायास भगवान कशी सुरुवात करितात तें पाहूं. ]

श्रीभगवान् ह्मणाले–(१) हे पार्था ! माझ्या ठिकाणीं चित्त ठेवून, व माझाच आश्रय करून (कर्म-) योग आचरीत असतां तुला माझें यथार्थ ह्मणजे ज्या प्रकारें अथवा विधीनें पूर्ण व निःसंशय ज्ञान होईल तें ऐक. (२) विज्ञानासहित हें ज्ञान कांहीं शेष न ठेवितां मी तुला सांगतों; जें जाणिल्यानें या लोकीं पुनः दुसरें कांहींहि जाणावयाचें शिल्लक रहात नाहीं.

[ पहिल्या श्लोकांत "माझाच आश्रय करून" असे शब्द आहेत त्यांवरून व विशेषतः 'योग' या शब्दावरून पूर्वीच्या अध्यायांतून वर्णिलेल्या सिद्ध्यर्थच पुढील ज्ञानविज्ञान सांगितलें आहे. स्वतंत्र ह्मणून नव्हे, हें उघड होतें ( गीतार. प्र. १४ पृ. ४५३ पहा ). या श्लोकांतच नव्हे तर गीतेंत इतरत्रहि 'मद्योगमाश्रितः' ( गी. १२.११ ), 'मत्परः' ( गी. १८.५७ व ११.५५ ), हे शब्द कर्मयोगाला अनुलक्षून आलेले आहेत, व त्यामुळें परमेश्वराचा आश्रय करून जो योग गीता आचरावयास

मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये ।

सांगते तो गेल्या अध्यायांत प्रतिपादिलेला कर्मयोगच होय याबद्दल कांहीं शंका रहात नाहीं. विज्ञान याचा अर्थ अनुभविक ब्रह्मज्ञान किंवा ब्रह्मसाक्षात्कार असा कित्येक करितात. पण वर सांगितल्याप्रमाणें परमेश्वरज्ञानाचेच समष्टिरूप ( ज्ञान ) आणि व्यष्टिरूप ( विज्ञान ) दोन भेद असल्यामुळें तेच ज्ञानविज्ञान शब्दांनेंहि अभिप्रेत आहेत असें आह्मांस वाटतें ( गी. १३. ३० व १८. २० पहा ). दुसऱ्या श्लोकांतील " पुनः दुसरें कांहीं जाणावयाचें शिल्लक रहात नाहीं " हे शब्द उपनिषदाच्या आधारें घेतलेले आहेत. छांदोग्योपनिषदांत श्वेतकेतूला त्याच्या बापानें " येन...अविज्ञातं विज्ञातं भवति " " जें एक जाणिल्यानें सर्व जाणिलें जातें तें काय ? " असा प्रश्न करून पुढें " यथा सोम्यैकेन मृत्पिंडेन सर्वं मृण्मयं विज्ञातं स्याद्वाचारंभणं विकारो नामधेयं मृत्तिकेत्येव सत्यम् ( छां. ६.१.४ )—ज्याप्रमाणें बाबा ! एका मातीच्या गोळ्यांत काय आहे तें कळलें म्हणजे बाकी मृण्मय पदार्थ त्या मृत्तिकेचेच निरनिराळीं नामरूपें धारण करणारे विकार होत दुसरें कांहीं नाहीं "—त्याप्रमाणें ब्रह्म जाणिल्यानें दुसरें कांहीं जाणावयाचें रहात नाहीं—अशी त्याची फोड केली आहे; आणि मुंडकोपनिषदांतहि ( मु. १. १. ३ ) " कस्मिन्नु भगवो विज्ञाते सर्वमिदं विज्ञातं भवति "—कशाचें ज्ञान झालें ह्मणजे इतर सर्व वस्तूंचें ज्ञान होतें ?— असा आरंभींच प्रश्न आहे, यावरून एका परमेश्वराचें ज्ञानविज्ञान झालें ह्मणजे या जगांत दुसरें कांहीं जाणावयाचें शिल्लक रहात नाहीं, कारण या जगांतील मूलतत्त्व एकच असून तेंच नामरूपभेदानें सर्वत्र भरलें आहे, त्याखेरीज दुसरी वस्तु जगांत नाहीं, असें जें अद्वैत वेदान्ताचें तत्त्व तेंच येथेंहि अभिप्रेत आहे असें दिसून येतें; एरवीं दुसऱ्या श्लोकांतील प्रतिज्ञा सार्थ होत नाहीं. ]

यततामपि सिद्धानां कश्चिन्मांवेत्ति तत्त्वतः ॥ ३ ॥
§§ भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च ।
अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ॥ ४ ॥
अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम् ।
जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत् ॥ ५ ॥
एतद्योनीनि भूतानि सर्वाणीत्युपधारय ।
अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा ॥ ६ ॥
मत्तः परतरं नान्यत्किंचिदस्ति धनंजय ।
मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव ॥ ७ ॥

(३) हजारों मनुष्यांत एखादाच सिद्धि मिळविण्याचा यत्न करितो; आणि प्रयत्न करणाऱ्या या (अनेक) सिद्ध पुरुषांपैकीं एखाद्यासच माझें खरें ज्ञान होतें.

[प्रयत्न करणाऱ्या पुरुषांना जरी सिद्धपुरुष असें या ठिकाणीं ह्मटलें आहे, तथापि परमेश्वराचें ज्ञान झाल्यावरच त्यांना सिद्धि प्राप्त होत्ये, एरवीं नाहीं, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. या परमेश्वरज्ञानाचें क्षराक्षर-विचार व क्षेत्रक्षेत्रज्ञविचार असे जे दोन विभाग त्यांपैकीं क्षराक्षरविचारास आतां सुरवात करितात—]

(४) पृथ्वी, पाणी, अग्नि, वायु, आकाश (हीं पांच सुक्ष्म भूतें) मन, बुद्धि आणि अहंकार मिळून आठ प्रकारें विभागलेली ही माझी प्रकृति आहे. (५) ही अपरा ह्मणजे खालच्या प्रतीची (प्रकृति) झाली. हे महाबाहो, अर्जुना ! याशिवाय जिनें या जगाचें धारण होतें अशी परा म्हणजे श्रेष्ठ प्रतीची जीवस्वरूपी माझी दुसरी प्रकृति आहे असें समज. (६) या दोहों-पासून सर्व भूतें उत्पन्न होतात हें लक्षांत असूं दे. मीच सर्व जगताचें प्रभव म्ह० मूळ व प्रलय म्ह० शेवट आहें. (७) माझ्याहून पलीकडचें

§§ रसोऽहमप्सु कौंतेय प्रभास्मि शशिसूर्ययोः ।

हे धनंजया ! दुसरें कांहींहि नाहीं. दोऱ्यांत अनेक मणि ओंवावे त्याप्रमाणें माझ्या ठायीं हें सर्व ओंवलेलें आहे.

[या चार श्लोकांमध्यें सर्व क्षराक्षरज्ञानाचें सार आलें आहे; व याचाच विस्तार पुढील श्लोकांतून केला आहे. सांख्यशास्त्रांत अचेतन म्हणजे जड प्रकृति आणि सचेतन पुरुष अशीं सर्व सृष्टीचीं दोन स्वतंत्र तत्त्वें सांगून, या दोन तत्त्वांपासून पुढें सर्व पदार्थ उत्पन्न झाले, या दोहोंपलीकडे तिसरें तत्त्व नाहीं, असें प्रतिपादन केलें आहे. पण गीतेस हें द्वैत कबूल नसल्यामुळें, एकाच परमेश्वराच्या प्रकृति व पुरुष या दोन विभूति मानून त्यांत जडप्रकृति ही कनिष्ठ पायरीची आणि जीव ह्मणजे पुरुष ही श्रेष्ठ पायरीची विभूती होय असें ४ व ५ व्या श्लोकांत वर्णन असून या दोहोंपासून सर्व स्थावर जंगम सृष्टि उत्पन्न होत्ये असें ह्मटलें आहे (गी. १३. २६ पहा). पैकीं जीवभूत श्रेष्ठ प्रकृतीचा सविस्तरविचार क्षेत्रज्ञ या दृष्टीनें पुढें १३ व्या अध्ययांत केला आहे. बाकी राहिली जडप्रकृति. ही स्वतंत्र नसून परमेश्वराच्या अध्यक्षतेखालीं हिच्यापासून सर्व सृष्टि निर्माण होते, असा गीतेचा सिद्धान्त आहे (गी. ९. १० पहा), तथापि प्रकृति गीतेंत जरी स्वतंत्र मानलेली नाहीं तरी सांख्यशास्त्रांत प्रकृतीचे जे भेद आहेत तेच थोड्याशा फरकानें गीतेंत ग्राह्य धरिले आहेत (गीतार, प्र. ८ पृ. १७७–१८०); आणि परमेश्वरापासून मायेनें जडप्रकृति उत्पन्न झाल्यावर (गी. ७. १४) प्रकृतीपासून पुढें सर्व पदार्थ कसे निर्माण झाले याचें सांख्यांनीं केलेलें प्रतिपादन ह्मणजे गुणोत्कर्षाचें तत्त्वहि गीतेस मान्य आहे. (गीतार प्र. ९ पृ. २४० पहा). प्रकृति व पुरुष मिळून एकंदर पंचवीस तत्त्वें आहेत असें सांख्य म्हणतात. पैकी प्रकृतीपासून पुढें तेवीस तत्त्वें निपजतात. या तेविसां-

प्रणवः सर्ववेदेषु शब्दः खे पौरुषं नृषु ॥ ८ ॥

पैकीं पांच स्थूल भूतें, व दहा इंद्रियें व मन हीं सोळा बाकी राहिलेल्या सात तत्त्वांपासून निघालेलीं म्ह० त्यांचे विकार होत. म्हणून "मूळ तत्त्वें" किती याचा विचार करतेवेळीं हीं सोळा तत्त्वें सोडून देतात; व तीं सोडून दिलीं म्हणजे बुद्धि (महान्) अहंकार व पंचतन्मात्रें (सूक्ष्म भूतें) मिळून सातच मूळ तत्त्वें शिल्लक रहातात. या सातांसच सांख्यशास्त्रांत 'प्रकृति–विकृति' अशी संज्ञा आहे. या सात प्रकृति–विकृति व मूळ प्रकृति मिळून आतां आठच प्रकारची प्रकृति होत्ये; व महाभारतांत (शां ३१०. १०–१५) यासच अष्टधा प्रकृति असें म्हटलें आहे. पण सात प्रकृति–विकृतींबरोबरच मूळ प्रकृतीची गणना करणें गीतेस योग्य वाटलें नाहीं. कारण तसें केलें तर एक मूळ व त्याचे सात विकार हा भेद दाखविला जात नाहीं. म्हणून सात प्रकृति–विकृति व मन मिळून अष्टधा मूळ प्रकृति होय असा गीतेच्या वर्गीकरणांत व महाभारतांतल्या वर्गीकरणांत थोडा भेद केलेला आहे (गीतार. पृ. १८०). सारांश, सांख्यांची स्वतंत्र प्रकृति गीतेस कबूल नाहीं, तरी पुढील विस्ताराचें निरूपण दोहोंकडे वस्तुत: एकच आहे हें लक्षांत ठेविलें पाहिजे. गीतेप्रमाणें उपनिषदांतहि परब्रह्मापासूनच सामान्यतः—

एतस्माज्जायते प्राणो मनः सर्वेंद्रियाणि च ।
खं वायुर्ज्योतिरापः पृथिवी विश्वस्य धारिणी ॥

"या (परपुरषा-)पासून प्राण, मन, सर्व इंद्रियें, आकाश, वायु, अग्नि, पाणी व विश्वाला धारण करणारी पृथ्वी हीं (सर्व) उत्पन्न होतात"– असें वर्णन आहे (मुंड. २.१.३; कै. १.१५, प्रश्न. ६.४). जास्त माहितीसाठीं गीतारहस्य प्रकरण ८ पहा. पृथ्वी, आप, वगैरे पंचतत्त्वें मीच

पुण्यो गंधः पृथिव्यां च तेजश्चास्मि विभावसौ ।
जीवनं सर्वभूतेषु तपश्चास्मि तपस्विषु ॥ ९ ॥
बीजं मां सर्वभूतानां विद्धि पार्थ सनातनम् ।
बुद्धिर्बुद्धिमतामस्मि तेजस्तेजस्विनामहम् ॥ १० ॥
बलं बलवतामस्मि कामरागविवर्जितम् ।
धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ ॥ ११ ॥
ये चैव सात्त्विका भावा राजसास्तामसाश्च ये ।
मत्त एवेति तान्विद्धि न त्वहं तेषु ते मयि ॥ १२ ॥

आहें असें चवथ्या श्लोकांत सांगितलें; आतां या तत्त्वांत जे गुण आहेत तेहि मीच आहे, असें सांगून हे सर्व पदार्थ दोऱ्यांत मण्यासारखे ओंवलेले आहेत असें जें वर म्हटलें आहे, त्याचेंच स्पष्टीकरण करितात—]

(८) पाण्यामध्यें रस मी, हे कौंतेया ! चंद्रसूर्यांमधली प्रभा मी, सर्व वेदांमधला प्रणव म्हणजे ॐकार मी, आकाशांत शब्द मी, आणि सर्व पुरुषांतलें पौरुष्यहि मी आहें. (९) आणि पृथ्वीच्या ठिकाणीं पुण्यगंध म्हणजे सुवास मी व अग्नीमधलें तेज मी आहें. सर्व भूतांतील जीवनशक्ति, व तपस्यांमधलें तप मी आहें. (१०) हे पार्था ! सर्व भूतांचें सनातन बीज मीं असें समजं. बुद्धिमान् लोकांची बुद्धि मी व तेजस्व्यांचें तेजहि मी आहें. (११) काम (वासना) आणि राग म्हणजे विषयासक्ति ( ही दोन्ही ) वर्ज्य करून बलवान् लोकांचें बल मी आहे; आणि हे भरतश्रेष्ठा ! धर्माला विरुद्ध न जाणारा असा भूतांच्या ठायीं कामहि मी आहें, ( १२ ) आणि जे कांहीं सात्त्विक व जे कांहीं राजस किंवा तामस भाव म्हणजे पदार्थ आहेत, ते सर्व माझ्याचपासून असें समज. पण ते माझ्यांत आहेत. मी त्यांच्यांत नाहीं.

[ " ते माझ्यांत आहेत मी त्यांच्यांत नाहीं " याचा अर्थ बराच खोल आहे. पहिला म्हणजे उत्तान अर्थ असा आहे कीं सर्व पदार्थ

§§ त्रिभिर्गुणमयैर्भावैरेभिः सर्वमिदं जगत् ।
मोहितं नाभिजानाति मामेभ्यः परमव्ययम् ॥ १३ ॥

परमेश्वरापासून निघाले असून मण्यांतल्या दोऱ्याप्रमाणें या पदार्थांतील गुणधर्मेंहि जरी परमेश्वरच आहे तरी परमेश्वराची व्याप्ति तेवढ्यानें न संपतां त्यांना व्यापून पलीकडेहि तोच परमेश्वर आहे असें समजलें पाहिजे; आणि हाच अर्थ पुढें "हें सर्व जग मी एकांशानें व्यापून राहिलों आहे" (गी. १०, ४२) या श्लोकांत वर्णिला आहे. पण या अर्थाखेरीज दुसराहि अर्थ नेहमींच विवक्षित असतो. तो हा कीं, त्रिगुणात्मक जगांतील नानात्व जरी मजपासून निर्माण झालेलें दिसतें, तरी तें नानात्व माझ्या निर्गुण स्वरूपांत रहात नाहीं; आणि हा दुसरा अर्थ मनांत आणून "भूतभृत् न च भूतस्थः" (९. ४ व ५) इत्यादि परमेश्वराच्या अलौकिक शक्तीचीं पुढें वर्णनें आहेत (गी. १३.१४-१६). परमेश्वराची व्याप्ति याप्रमाणें जर सर्व जगाहूनहि अधिक आहे, तर खरें परमेश्वरस्वरूप ओळखण्यास या मायिक जगाच्याहि पलीकडे गेलें पाहिजे हें उघड होतें; व तोच अर्थ आतां स्पष्टपणें प्रतिपादन करितात—

(१३) (सत्त्व, रज व तम या) तीन गुणात्मक भावांनीं म्ह० पदार्थांनीं मोहित होऊन हें सर्व जग, यांच्या पलीकडचा (अर्थात् निर्गुण) जो मी अव्यय (परमेश्वर) त्या मला, जाणीत नाहीं.

[ माया किंवा अज्ञान हें त्रिगुणात्मक देहेंद्रियाचा धर्म आहे, आत्म्याचा नाहीं, आत्मा ज्ञानमय व नित्य असून त्याला इंद्रियें भ्रमांत पाडतात, असा जो मायेसंबंधानें गीतारहस्याच्या ९ व्या प्रकरणांत सिद्धान्त दिला आहे तोच अद्वैती सिद्धान्त वरील श्लोकांत सांगितला आहे. गीता ७. २४ व गीतार. प्र. ९ पृ. २३४-२४५ पहा. ]

दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया ।
मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते ॥ १४ ॥
न मां दुष्कृतिनो मूढाः प्रपद्यन्ते नराधमाः ।
माययापहृतज्ञाना आसुरं भावमाश्रिताः ॥ १५ ॥
§§ चतुर्विधा भजन्ते मां जनाः सुकृतिनोऽर्जुन ।
आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ ॥ १६ ॥

(१४) गुणात्मक अशी ही माझी दिव्य माया दुस्तर आहे. म्हणून जे मलाच शरण येतात ते या मायेला तरून जातात.

[ सांख्यशास्त्रांतील त्रिगुणात्मक प्रकृतीसच गीतेंत भगवान् आपली माया म्हणतात हें यावरून उघड होतें. महाभारताच्या नारायणीयोपाख्यनांत असें सांगितलें आहे कीं, भगवान् नारदास विश्वरूप दाखवून—

माया ह्येषा मया सृष्टा यन्मां पश्यसि नारद ।
सर्वभूतगुणैर्युक्तं नैव त्वं ज्ञातुमर्हसि ॥

" नारदा ! तुं पहातोस ही मी उत्पन्न केलेली माया आहे. सर्व भूतांच्या गुणांनीं मी युक्त आहें, असें तुं समजूं नकोस "–असें अखेरीस म्हणाले ( शां. ३३९. ४४ ) तोच सिद्धान्त आतां येथेंहि सांगितला आहे. माया म्हणजे काय याचें निरूपण गीतारहस्य प्रकरण ९ व १० यांत केलें आहे तें पहा. ]

(१५) मायेनें ज्यांचें ज्ञान नष्ट केलें, ते मूढ व दुष्कर्मी नराधम आसुरी बुद्धींत पडून मला शरण येत नाहींत.

[ मायेंत गढून जाणारे लोक परमेश्वराला विसरतात व नाश पावतात हें सांगितलें. आतां असें न करणारे म्हणजे परमेश्वराला शरण जाऊन त्याची भक्ति करणारे जे लोक त्यांचें वर्णन करितात—]

(१६) हे भरतश्रेष्ठा अर्जुना ! चार प्रकारचे पुण्यवान लोक माझी भक्ति करीत असतात. आर्त म्ह० रोगानें पीडलेले, जिज्ञासु म्ह० ज्ञान

तेषां ज्ञानी नित्ययुक्त एकभक्तिर्विशिष्यते ।
प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रियः ॥ १७ ॥
उदाराः सर्व एवैते ज्ञानी त्वात्मैव मे मतम् ।
आस्थितः स हि युक्तात्मा मामेवानुत्तमां गतिम् ॥ १८ ॥
बहूनां जन्मनामंते ज्ञानवान्मां प्रपद्यते ।
वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः ॥ १९ ॥

प्राप्त करून घेण्याची इच्छा बाळगणारे, अर्थार्थी म्ह० द्रव्यादिक काम्य वासना मनांत ठेवणारे, आणि ज्ञानी म्हणजे परमेश्वराचें ज्ञान होऊन कृतार्थ झाल्यामुळें पुढें कांहीं मिळवावयाचें नसलें तरी निष्काम बुद्धीनें भक्ति करणारे. (१७) यांपैकीं एकभक्ति म्हणजे अनन्यभावें माझी भक्ति करणारा व नेहमीच युक्त ह्मणजे निष्कामबुद्धीनें वागणारा, असा जो ज्ञानी त्याची योग्यता विशेष होय ! ज्ञान्याला मी अत्यंत प्रिय, व ज्ञानी मला (अत्यंत) प्रिय आहे. (१८) सर्वच हे भक्त उदार ह्मणजे चांगले होत; पण ( त्यांतल्या त्यांत ) ज्ञानी म्हणजे मीच असें माझें मत आहे. कारण युक्त-चित्त होत्साता ( सर्वांची ) उत्तमोत्तम गति जो मी त्या माझ्याच ठायीं तो स्थिरावलेला असतो. (१९) अनेक जन्मांनंतर " जें कांहीं आहे तें वासुदेव आहे " असें अनुभवास येऊन ज्ञानवान् मला येऊन पोंचत असतो, असा महात्मा अत्यंत दुर्मिळ होय.

[ प्रकृति व पुरुष हीं दोन्ही माझींच रूपें व मीच चोहोंकडें एकत्वानें भरलेला आहे असें आपल्या स्वरूपाचें क्षराक्षरदृष्ट्या ज्ञान सांगून, त्याबरोबरच या स्वरूपाची भक्ति केल्यानें परमेश्वराची ओळख होते असें जें भगवंतांनीं वर सांगितलें त्यांतील तात्पर्य नीट लक्षांत घेतलें पाहिजे. उपासना सर्वांसच पाहिजे; मग ती व्यक्ताची करा अगर अव्यक्ताची करा; पण या दोहोंत व्यक्तोपासना सुलभ असल्यामुळें तिचेंच येथें वर्णन आहे; व तिलाच भक्ति असें नांव आहे. तथापि स्वार्थबुद्धि मनांत ठेवून

§§ कामैस्तैस्तैर्हृतज्ञानाः प्रपद्यन्तेऽन्यदेवताः ।

कांहीं विशिष्ट हेतूस्तव परमेश्वराची भक्ति करणें, ही भक्तिची पायरी कनिष्ट असुन, परमेश्वराचें ज्ञान व्हावें अशा हेतुनें भक्ति करणारे (जिज्ञासु) देखील कच्चेच समजले पाहिजेत; कारण त्यांचें ज्ञान अद्याप परिपूर्ण नसतें, हें त्यांच्या जिज्ञासुत्वावस्थेवरूनच व्यक्त होतें. तथापि हे सर्व भक्ति करणारे असल्यामुळें सर्वच उदार म्हणजे चांगल्या मार्गानें जाणारे, असें म्हटलें आहे (श्लोक. १८). पण याच्याहि पुढें जाऊन म्हणजे ज्ञानप्राप्तीनें कृतार्थ होऊन या जगांत ज्यांना करावयाचें किंवा मिळवावयाचें शिल्लक उरलें नाहीं (गी. ३. १७–१९), ते ज्ञानी पुरुष निष्काम बुद्धीनें जी भक्ति करितात (भाग. १.७.१०) ती सर्वांत श्रेष्ठ होय असें पहिल्या तीन श्लोकांचें तात्पर्य आहे. प्रल्हादनारदादिकांची भक्ति याच श्रेष्ठ वर्गांत पडत्ये आणि याचमुळें "भक्तियोग म्हणजे परमेश्वराची निर्हेतुक व निरंतर भक्ति" असें भागवतांत भक्तीचें लक्षण केलें आहे (भाग. ३.२९.१२; व गीतार. प्र. १३ पृ. ४०८ पहा.). 'एकभक्तिः' व 'वासुदेवः' अशीं जीं १७ व्या व १९ व्या श्लोकांत पदें आहेत तीं भागवतधर्मांतलि आहेत किंबहुना भक्ताचे वरील सर्व वर्णन भागवतधर्मांतलेंच आहे, असें म्हणण्याला हरकत नाहीं. कारण महाभारतांत या धर्माचें वर्णन चालू असतां—

चतुर्विधा मम जना भक्ता एवं हि मे श्रुतम् ।
तेषामेकान्तिनः श्रेष्ठा ये चैवानन्यदेवताः ॥
अहमेव गतिस्तेषां निराशीः कर्मकारिणाम् ॥
ये च शिष्टास्त्रयो भक्ताः फलकामा हि ते मताः ।
सर्वे च्यवनधर्मास्ते प्रतिबुद्धस्तु श्रेष्ठभाक् ॥

याप्रमाणें (म. भा. शां. ३४१.३३–३५) चतुर्विध भक्तांचा प्रथम उल्लेख करून नंतर अनन्यदैवत व एकांति ज्याप्रमाणें निराशीः म्ह० फलाशारहित कर्म करितो तसें इतर तीन भक्त न करितां कांहीं तरी

तं तं नियममास्थाय प्रकृत्या नियतः स्वया ॥ २० ॥
यो यो यां यां तनुं भक्तः श्रद्धयार्चितुमिच्छति ।
तस्य तस्याचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम् ॥ २१ ॥
स तया श्रद्धया युक्तस्तस्या राधनमीहते ।
लभते च ततः कामान्मयैव विहितान्हि तान् ॥ २२ ॥
अंतवत्तु फलं तेषां तद्भवत्यल्पमेधसाम् ।
देवान्देवयजो यान्ति मद्भक्ता यान्ति मामपि ॥ २३ ॥

हेतु मनांत ठेवून भक्ति करितात म्हणून ते च्यवनशील, व एकांती प्रतिबुद्ध ( म्ह० जाणते ) श्रेष्ठ असें म्हटलें आहे. आणि पुढें " सर्वभूताधिवासश्च वासुदेवस्ततो ह्यहम् " सर्व भूतांचे ठायीं मी वास करितों म्हणून मला वासुदेव म्हणतात "–अशी ' वासुदेव ' शब्दाची आध्यात्मिक व्युत्पत्ति केली आहे ( शां. ३४१.४० ). असो; सर्व ठिकाणीं जर एकच परमेश्वर आहे तर निरनिराळ्या देवतांची लोक कां उपासना करितात, आणि अशा उपासकांस फल काय मिळतें याचें आतां वर्णन करितात,

( २० ) आपआपल्या प्रकृतिनियमाप्रमाणें त्या त्या ( स्वर्गादिक फलांच्या ) कामवासनांनीं वेडावलेले लोक तो तो ( उपासनेचा ) नियम पाळून दुसऱ्या ( निरनिराळ्या ) देवतांच्या भजनीं लागत असतात. ( २१ ) जो जो भक्त ज्या ज्या रूपाची म्हणजे देवतेची श्रद्धेनें उपासना करूं इच्छितो त्याची त्याची ती श्रद्धा मी स्थिर करितों. ( २२ ) मग त्या श्रद्धेनें युक्त होत्साता, तो त्या देवतेचें राधन म्हणजे आराधना करूं लागतो; आणि मग मींच निर्मिलेलीं तीं कामफलें त्याला मिळतात. ( २३ ) पण ( या ) अल्पबुद्धि लोकांना मिळणारें हें फल नाशवंत असतें ( मोक्षासारखें कायमचें टिकणारें नव्हे ). देवाचें भजन करणारे देवांकडे जातात, आणि माझे भक्त मजकडे येतात.

§§ अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यन्ते मामबुद्धयः ।

[ सामान्य लोकांची अशी समजूत असते कीं, परमेश्वर जरी मोक्षदाता असला तरी संसारांत लागणाऱ्या ज्या अनेक इच्छित वस्तु त्या देण्याची शक्ति देवतांनाच असते; व त्यासाठीं या देवतांचीच उपासना केली पाहिजे. देवतांची उपासना याप्रमाणें प्राप्त झाल्यावर जन्मतः ज्याची जशी श्रद्धा असेल त्याप्रमाणें ( गी १७.१–६ पहा ) कोणी म्हसोबाच्या, तर कोणी शनिवार करून शनीच्या, नादीं कसे लागतात याचें वरील श्लोकांतून सुंदर वर्णन केलें आहे. यांत पहिली लक्षांत घेण्यासारखी गोष्ट ही कीं, निरनिराळया देवतांच्या आराधनेनें जें फल प्राप्त होतें, तें त्या त्या देवता देतात असें जरी आपण मानीत असलों, तरी पर्यायानें तें परमेश्वराचें आराधन होऊन (गी. ९.२३) तात्त्विकदृष्टया तें फलहि परमेश्वरच देत असतो ( श्लो. २२ ); इतकेंच नव्हे, तर या देवतेचें आराधन करण्याची बुद्धिहि मनुष्याच्या पूर्वकर्मानुसार परमेश्वरच देत असतो ( श्लोक २१ ). कारण या जगांत परमेश्वराखेरीज दुसरें कांहीं नाहीं. वेदान्तसूत्रांत ( ३.२.३८–४१ ) व उपनिषदांतहि हाच सिद्धान्त दिला आहे ( कौषी. ३.८ ) या निरनिराळ्या देवतांची भक्ति करितां करितां बुद्धि स्थिर व शुद्ध होऊन अखेर एक व नित्य परमेश्वराचें ज्ञान होतें हा या भिन्नभिन्न उपासनांचा उपयोग आहे. पण तत्पूर्वीं जीं फलें मिळतात तीं सर्व अनित्य होत म्हणून या फलांच्या आशेंत न गुंततां ‘ ज्ञानी ’ भक्त होण्याची उमेद प्रत्येकानें ठेवावी असा भगवंतांचा उपदेश आहे. भगवान् सर्व गोष्टी करणारे व सर्व फलें देणारे असले तरी भगवान् ज्याच्या त्याच्या कर्माप्रमाणें फल देत असल्यानें ( गी. ४.११ ) तात्विकदृष्टया ते आपण होऊन कांहींच करीत नाहींत असेंहि म्हणतात ( गी. ५.१४ ) गीतारहस्याच्या १० व्या ( पृ. २६४ ) व १३ ( पृ. ४२५ ) प्रकरणांत याबद्दल ज्यास्त खुलासा केला आहे तो पहा. आतां देवताराधनेचें

परं भावमजानन्तो ममाव्ययमनुत्तमम् ॥ २४ ॥
नाहं प्रकाशः सर्वस्य योगमायासमावृतः ।
मूढोऽयं नाभिजानाति लोको मामजमव्ययम् ॥ २५ ॥

फलहि परमेश्वरच देत असतो, हें विसरून प्रकृतिस्वभावाप्रमाणें लोक या देवतांच्या नादीं लागतात, असें जें वर वर्णन केलें त्याचें स्पष्टीकरण करितात— ]

(२४) अबुद्धि म्ह० मूढ लोक, माझें पर म्हणजे श्रेष्ठ, उत्तमोत्तम आणि अव्यय रूप न जाणितां अव्यक्त अशा मला व्यक्त झालेला मानितात. (२५) मी आपल्या योगरूप मायेनें आच्छादित असल्यामुळें सर्वांना (स्वस्वरूपानें) प्रकट (दिसत) नाहीं. मी अज व अव्यय आहें हें मूढ लोक जाणीत नाहींत.

[योग म्हणजे अव्यक्त स्वरूप सोडून व्यक्त स्वरूप धारण करण्याची युक्ति (गी. ४. ६; ७. १९; ९. ७ पहा). हिलाच वेदान्ती माया असें म्हणतात, व या योगमायेनें परमेश्वर आच्छादिला असला म्हणजे तो व्यक्तस्वरूपधारी होतो. सारांश, व्यक्त सृष्टि मायिक किंवा अनित्य व परमेश्वर खरा किंवा नित्य असा या श्लोकाचा भावार्थ आहे. परंतु या ठिकाणीं व अन्य स्थलींहि 'माया' शब्दाचा अलौकिक किंवा विलक्षण शक्ति असा अर्थ धरून कित्येक लोक ही माया खोटी नव्हे, परमेश्वरासारखीच नित्य आहे, असें प्रतिपादन करितात. मायेच्या स्वरूपाचा गीतारहस्याच्या ९ व्या प्रकरणांत सविस्तर विचार केला असल्यामुळें येथें एवढेंच सांगतों कीं, माया ही परमेश्वराचीच कांहीं तरी विलक्षण व अनादि लीला आहे हें अद्वैत वेदान्तासहि मान्य आहे. कारण, माया ही जरी इंद्रियांनीं उत्पन्न केलेला देखावा आहे, तरी इंद्रियें हीं परमेश्वराच्या सत्तेनेंच हें काम करीत असल्यामुळें माया ही अखेर परमेश्वराचीच लीला म्हणावी लागते. ही माया तत्त्वतः सत्य का मिथ्या एवढाच काय तो वाद आहे;

वेदाहं समतीतानि वर्तमानानि चार्जुन ।
भविष्याणि च भूतानि मां तु वेद न कश्चन ॥ २६ ॥
इच्छाद्वेषसमुत्थेन द्वंद्वमोहेन भारत ।
सर्वभूतानि संमोहं सर्गे यान्ति परंतप ॥ २७ ॥

आणि या बाबतींत ज्या नामरूपात्मक मायेनें अव्यक्त परमेश्वर व्यक्त मानिला जातो ती माया,–मग तिला अलौकिक शक्ति म्हणा किंवा दुसरें कांहीं म्हणा–‘ अज्ञानानें ’ उत्पन्न झालेली दिखाऊ वस्तु अगर ‘ मोह ’ असून खरें परमेश्वरतत्त्व त्याहून निराळें आहे, असा अद्वैत वेदान्ताप्रमाणेंच गीतेचाहि सिद्धान्त आहे, हें वरील श्लोकावरून उघड होतें. एरवीं ‘अबुद्धि’ किंवा ‘मूढ’ हीं पदें घालण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं. सारांश माया सत्य नसुन एक परमेश्वरच सत्य होय. पण या मायेनें भुलून गेल्यामुळें लोक अनेक देवतांच्या नादीं लागत असतात असें गीतेचें ह्मणणें आहे. बृहदारण्यकोपनिषदांत (बृ. १. १. ४.१०) याचप्रमाणें वर्णन असून, जे लोक आत्मा व ब्रह्म एकच आहे हें न ओळखितां भेदभावानें भिन्न देवतांच्या नादीं लागतात ते ‘ देवांचे पशु ’ होत, म्हणजे गवादि पशूं पासून मनुष्यास जसा फायदा होतो तसा या अज्ञानी भक्तांपासून देवतांचा मात्र फायदा होतो, त्यांच्या भक्तांस मोक्ष मिळत नाहीं, असें ह्मटलें आहे. मायेंत गुंतून अनेक देवतांची भेदभावानें उपासना करणारांचें हें वर्णन झालें; आतां या मायेंतून सुटका कशी होत्ये तें सांगतात—]

(२६) भूत, वर्तमान व भविष्य (काळीं झालेलीं, असणारीं व होणारीं) सर्व भूतें म्हणजे प्राणी मी जाणितों; पण हे अर्जुना ! मला कोणीहि जाणीत नाहीं. (२७) कारण हे भारता ! (इंद्रियांच्या) इच्छा व द्वेष यांपासून उद्भवणाऱ्या (सुखदुःखादि) द्वंद्वांच्या मोहानें सर्व भूतें परंतपा !

येषां त्वंतगतं पापं जनानां पुण्यकर्मणाम् ।
ते द्वंद्वमोहनिर्मुक्ता भजन्ते मां दृढव्रताः ॥ २८ ॥
§§ जरामरणमोक्षाय मामाश्रित्य यतन्ति ये ।
ते ब्रह्म तद्विदुः कृत्स्नमध्यात्मं कर्म चाखिलम् ॥ २९ ॥
साधिभूताधिदैवं मां साधियज्ञं च ये विदुः ।
प्रयाणकालेऽपि च मां ते विदुर्युक्तचेतसः ॥ ३० ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे ज्ञानविज्ञानयोगो नाम सप्तमोऽध्यायः ॥ ७ ॥

---

या सृष्टींत भ्रम पावत असतात. (२८) पण ज्या पुण्यकर्मी लोकांचें पाप संपलें (ते सुखदुःखादि) द्वंद्वाच्या मोहांतून सुटून दृढव्रत होत्साचे माझी भक्ति करितात.

[ याप्रमाणें मायेंतून सुटका झाल्यावर त्यांची पुढें जी स्थिति होते ती सांगतात—]

(२९) जे (याप्रमाणें) माझा आश्रय करून जरामरणांतून म्हणजे पुनर्जन्माच्या फेऱ्यांतून सुटका होण्यासाठीं प्रयत्न करितात ते तें (सर्व) ब्रह्म (सर्व) अध्यात्म आणि सर्व कर्म (म्हणजे काय तें) जाणितात. (३०) आणि अधिभूत, अधिदैव व अधियज्ञ यांच्यासह (म्हणजे हें सर्व मीच आहें अशा प्रकारें) मला जे जाणितात ते युक्तचित्त (असल्यामुळें) मरणसमयीं देखील मला जाणितात.

[ अध्यात्म, अधिभूत, अधिदैव व अधियज्ञ म्हणजे काय याचें निरूपण पुढील अध्यायांत केलें आहे तें पहा. मरणसमयीं मनुष्याचे मनांत जी बुद्धि प्रबळ असत्ये त्याप्रमाणें त्याला पुढें जन्म मिळतो असा जो धर्मशास्त्राचा व उपनिषदांचा सिद्धान्त त्याला अनुलक्षून " मरणसमयीं

देखील " हे शेवटच्या श्लोकांतील शब्द आहेत; तथापि मरणापूर्वी परमेश्वराचें पूर्ण ज्ञान झालेलें असल्याखेरीज केवळ अंतकाळींच हें ज्ञान होणें शक्य नाहीं हें शेवटच्या श्लोकांतील 'देखील' या पदानें स्पष्ट होतें (गी. २. ७२ पहा). ज्यास्त खुलासा पुढील अध्यायांत केलेला आहे. अधिभूतादि शब्दांनीं पुढील अध्यायाची प्रस्तावनाच या दोन श्लोकांत केलेली आहे असें म्हटलें तरी चालेल ]

याप्रमाणें श्रीभगवंतांनीं गाइलेल्या म्हणजे सांगितलेल्या उपनिषदांत ब्रह्मविद्यान्तर्गत योग–म्हणजे कर्मयोग–शास्त्रावरील श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या संवादांतील ज्ञानविज्ञानयोग नांवाचा सातवा अध्याय समाप्त झाला.

---

# अष्टमोऽध्यायः ।

## अध्याय आठवा.

[ कर्मयोगान्तर्गत ज्ञानविज्ञानाचें निरूपण या अध्यायांत पुढें चालू असून, ब्रह्म, अध्यात्म, कर्म, अधिभूत, अधिदैव आणि अधियज्ञ असे जे मागील अध्यायाच्या शेवटीं परमेश्वरस्वरूपाचे विविध प्रकार सांगितले त्यांचा अर्थ सांगून त्यांतील तथ्य काय याचें प्रथम विवेचन आहे. परंतु हें विवेचन सदर शब्दांच्या केवळ व्याख्या देऊन म्हणजे अत्यंत संक्षिप्त रीतीनें केलेलें असल्यामुळें या विषयाचा या अवतरणांत थोडा ज्यास्त खुलासा करणें जरूर आहे. बाह्य सृष्टीच्या अवलोकनावरून सृष्टीच्या कर्त्याची कल्पना अनेक लोक अनेक रीतींनीं करीत असतात. कोणी असें म्हणतात कीं, सृष्टींतील सर्व पदार्थ पंचमहाभूतांचेंच विकार असून या पंचमहाभूतांखेरीज मूळांत दुसरें कोणतेंहि तत्त्व नाहीं. दुसरे कित्येक असें प्रतिपादन करितात कीं, गीतेच्या चवथ्या अध्यायांत वर्णिल्याप्रमाणें हें सर्व जग यज्ञापासून झालेलें आहे, म्हणून परमेश्वर यज्ञनारायणरूपी असून यज्ञानेंच त्याचें

अर्जुन उवाच ।

किं तद्ब्रह्म किमध्यात्मं किं कर्म पुरुषोत्तम।

पूजन होतें. तिसरे असें म्हणतात कीं, सृष्टींतील व्यापार जड पदार्थ स्वतः करीत नाहींत; तर त्यांपैकीं प्रत्येकांत कोणी तरी सचेतन पुरुष किंवा देवता वास करीत असून, त्या देवता हे व्यवहार करीत असतात, आणि त्यामुळें त्या देवतांचें आराधन आपणांस केलें पाहिजे. उदाहरणार्थ, सूर्य या जड पांचभौतिक गोळयांत सूर्य या नांवाचा जो पुरुष तोच प्रकाश देण्याचें वगैरे काम करीत असून तोच उपास्य होय. चवथ्या पक्षाचें म्हणणें असें आहे कीं, प्रत्येक पदार्थांत त्या पदार्थाहून भिन्न अशी देवता वास करीत असते असें मानणें युक्त नाहीं. मनुष्याचे शरीरांत जसा आत्मा त्याप्रमाणें प्रत्येक वस्तूच्या ठायीं त्याच वस्तूचें कांही तरी सूक्ष्म रूप म्हणजे आत्म्यासारखी सूक्ष्म शक्ति वास करीत असून तेंच त्या वस्तूचें मूळांतलें व खरें स्वरूप होय. उदाहरणार्थ, पंच स्थूल महाभूतांत पंच सूक्ष्म तन्मात्रें, आणि हस्तपादादि स्थूलेंद्रियांत सूक्ष्म इंद्रियें मूलभूत असतात. प्रत्येक मनुष्याचा आत्माहि निरनिराळा असून पुरुष असंख्य आहेत असें जें सांख्यांचें मत तें याच चवथ्या तत्त्वावर अवलंबून आहे; पण प्रकृतस्थलीं या सांख्यमताचा 'अधिदेह' या वर्गांत समावेश केलेला दिसतो. या चार पक्षांसच अनुक्रमें अधिभूत, अधियज्ञ, अधिदैवत व अध्यात्मक अशीं नांवें आहेत. 'अधि' हा उपसर्ग कोणत्याहि शब्दांच्या मागें असला म्हणजे 'तमधिकृत्य,' 'तद्विषयक,' 'त्या बाबतींतलें,' किंवा 'त्याचे ठायीं असणारें,' असा अर्थ होतो. या अर्थाप्रमाणें अधिदैवत म्हणजे अनेक देवतांचे ठायीं असणारें तत्व होय. अध्यात्म याचा सामान्य अर्थ "एकच आत्मा सर्व ठिकाणीं आहे असें प्रतिपादन करणारें शास्त्र" असा आहे. पण हा अर्थ सिद्धान्तपक्षाचा आहे. म्हणजे अनेक वस्तूंत किंवा मनुष्यांतहि अनेक आत्मे आहेत असा जो पूर्वपक्ष त्याची शहानिशा होऊन वेदान्तशास्त्रानें आत्मै-

अधिभूतं च किं प्रोक्तमधिदैवं किमुच्यते ॥ १ ॥

क्याचा हा सिद्धान्त ठरविला आहे. ह्मणून पूर्वपक्षाचा जेव्हां विचार करावयाचा असतो तेव्हां प्रत्येक पदार्थाचें सुक्ष्म स्वरूप किंवा आत्मा निरनिराळा आहे असें मानितात; आणि हाच अर्थ प्रकृतस्थलीं अध्यात्म शब्दानें अभिप्रेत आहे. अध्यात्म, अधिदैवत व आधिभूत-दृष्ट्या एकाच विवेचनाचें याप्रमाणें भिन्नभिन्न प्रकार कसे होतात, हें महाभारतांत मनुष्यांच्या इंद्रियांचें उदाहरण देऊन स्पष्ट केलें आहे म. भा. शां. ३१३; व अश्व. ४१ पहा ). महाभारतकार असें ह्मणतात कीं, मनुष्याच्या इंद्रियांचें विवेचन अधिभूत अध्यात्म व अधिदैवत, असें तीन प्रकारें करितां येतें. या इंद्रियांनीं प्राह्य जे विषय—उदाहरणार्थ, हातानें जें घ्यावयाचें, कानानें जें ऐकावयाचें, डोळ्यांनीं जें पहावयाचें किंवा मनानें ज्याचें चिंतन करावयाचें,=तें सर्व अधिभूत; आणि हस्तपादादिकांचे ( सांख्यशास्त्रोक्त ) जे सूक्ष्म स्वभाव ह्मणजे सूक्ष्म इंद्रियें, तीं सदर इंद्रियांचीं अध्यात्में होत. पण या दोन्हीं दृष्टि सोडून अधिदैवत दृष्टीनें विचार केला ह्मणजे हातांची देवता इंद्र, पायांची विष्णु, गुदाची मित्र, उपस्थाची प्रजापति, वाणीची अग्नि, डोळ्यांची सूर्य, कानाची दिशा किंवा आकाश, जिव्हेची पाणी, नाकाची पृथ्वी, त्वचेची वायु, मनाची चंद्र, अहंकाराची बुद्धि; आणि बुद्धीची देवता पुरुष, असें मानून याच देवता त्या त्या इंद्रियांचे व्यापार चालवितात, असें म्हणत असतात. उपनिषदांतहि उपासनेसाठीं ब्रह्मस्वरूपाचीं जीं प्रतीकें वर्णिलीं आहेत त्यांत मन हें अध्यात्म आणि सूर्य किंवा आकाश हें अधिदैवत हा प्रतीक होय, असें म्हटलें आहे ( छां. ३.१८.१ ). अध्यात्म व अधिदैवत हा भेद केवळ उपासनेसाठींच केलेला आहे असें नाहीं; तर वाणी, चक्षु, श्रोत्र इत्यादि इंद्रियें व प्राण यांपैकीं श्रेष्ठ कोण या प्रश्नाचा विचार एकदां वाणी, चक्षु व श्रोत्र हीं सूक्ष्मेंद्रियें घेऊन अध्यात्म दृष्ट्या, आणि एकदां त्या इंद्रियांच्याच अग्नि, सूर्य व आकाश या देवता घेऊन अधिदैवतदृष्ट्या उपनिषदांतून केलेला आहे ( बृ. १.५.२१–२३; छां. १. २–३; कौषी.

अधियज्ञः कथं कोऽत्र देहेऽस्मिन्मधुसूदन ।
प्रयाणकाले च कथं ज्ञेयोऽसि नियतात्मभिः ॥ २ ॥

४.१२,१३ ). सारांश, अधिदैवत, अधिभूत, अध्यात्म इ० भेद प्राचीन काळापासून चालत आलेले आहेत, आणि परमेश्वरस्वरूपाच्या या निरनिराळया कल्पनांपैकीं खरी कोणती अगर त्यांतील तथ्य काय हा प्रश्नहि तेव्हांच निघालेला असून सर्व भूतांत, सर्व देवतांत, सर्व आध्यात्मांत, सर्व लोकांत, सर्व यज्ञांत सर्व देहांत अंतर्यामीं व्यापून राहून त्यांना न समजतांहि त्यांना खेळविणारा एकच परमात्मा आहे असें बृहदारण्यकोपनिषदांत याज्ञवल्क्यानें उद्दालक आरुणीस सांगितलें आहे (बृ. ३.४) उपनिषदांचा हाच सिद्धान्त वेदान्तसूत्रांच्या अंतर्याम्यधिकरणांत स्वीकारिला असून ( वे. सू. १. २. १८–२० ), तेथेंच सर्वान्तर्यामीं असणारें हें तत्त्व, सांख्यांची प्रकृति अगर जीवात्मा नसून परमात्मा आहे असें सिद्ध केलें आहे. याच सिद्धान्ताच्या अनुरोधानें मनुष्याच्या देहांत, सर्व भूतांत ( अधिभूत ), सर्व यज्ञांत ( अधियज्ञ, सर्व देवतांत ( अधिदैवत ), सर्व कर्मांत, आणि सर्व वस्तूंच्या सुक्ष्म (म्हणजे अध्यात्म ) स्वरूपांत, एकच परमेश्वर भरला असून देवता, यज्ञ इत्यादि नानात्व किंवा विविध प्रकारचें ज्ञान खरें नाहीं, असें भगवान् आतां अर्जुनास सांगत आहेत. सातव्या अध्यायाच्या अखेर अधिभूतादि जे शब्द भगवंतांनीं उच्चारिले, त्यांवरून अर्जुनास त्यांचा अर्थ जाणण्याची इच्छा होऊन तो प्रथम असें विचारतो कीं—]

अर्जुन म्हणाला—(१) हे पुरुषोत्तमा ! तें ब्रह्म ह्मणजे काय ? अध्यात्म म्हणजे काय ? कर्म म्हणजे काय ? अधिभूत कशाला म्हणावयाचें ? आणि अधिदैवत कशाला ह्मणतात ? (२) अधियज्ञ कसा असतो ? आणि या देहांत हे मधुसूदना ! कोण ( अधिदेह ) आहे ? आणि इंद्रियनिग्रह करणारे अंतकाळीं तुम्हांस कसें ओळखतात ? ( हें मला सांगा ).

श्रीभगवानुवाच ।

अक्षरं ब्रह्म परमं स्वभावोऽध्यात्ममुच्यते ।
भूतभावोद्भवकरो विसर्गः कर्मसंज्ञितः ॥ ३ ॥
अधिभूतं क्षरो भावः पुरुषश्चाधिदैवतम् ।
अधियज्ञोऽहमेवात्र देहे देहभृतां वर ॥ ४ ॥

[ ब्रह्म, अध्यात्म, कर्म, अधिभूत आणि अधियज्ञ हे शब्द मागच्या अध्यायांत आहेत; पण आतां अर्जुनानें त्यांखेरीज अधिदेह कोण हा नवीन प्रश्न केला आहे हें लक्षांत ठेविलें ह्मणजे पुढील उत्तराचा अर्थ ध्यानांत येण्यास अडचण पडणार नाहीं.]

श्रीभगवान् ह्मणाले—(३) (सर्वांहून) परम असें जें अक्षर ह्मणजे कधींहि नाश न पावणारें तत्त्व तें ब्रह्म, (व) प्रत्येक वस्तूचा स्वतःचा जो मूळ भाव (स्व–भाव) त्यास अध्यात्म असें ह्मणतात. (अक्षरब्रह्मापासून) भूतमात्रादि (चराचर) पदार्थांची उत्पत्ति करणारा जो विसर्ग ह्मणजे सृष्टिव्यापार त्याचें नांव कर्म. (४) (उत्पन्न झालेल्या सर्व भूतांची) क्षर म्हणजे नामरूपात्मक किंवा नाशवंत अशी जी स्थिति तें अधिभूत; आणि (या पदार्थांत) जो पुरुष ह्मणजे सचेतन अधिष्ठाता तो अधिदैवतः (ज्याला) अधियज्ञ (म्हणजे सर्व यज्ञांचा अधिपति म्हणतात तो) मीच. हे देहधाऱ्यांत श्रेष्ठा ! या देहाच्या ठायीं (अधिदेह) आहे.

[ तिसऱ्या श्लोकांतील 'परम' हा शब्द ब्रह्माचें विशेषण नसून अक्षराचें विशेषण आहे. सांख्य शास्त्रांत अव्यक्त प्रकृतीलाहि 'अक्षर' असें म्हणतात (गी. १५.१६). पण वेदान्त्यांचें ब्रह्म या अव्यक्त व अक्षर प्रकृतीच्याहि पलीकडचें आहे (याच अध्यायांतील श्लोक २० व २१ पहा); व त्यामुळें नुसता 'अक्षर' शब्द वापरला तर सांख्यांची प्रकृति किंवा ब्रह्म असे दोन्ही अर्थ होऊं शकतात. हा संशय राहूं नये

§§ अंतकाले च मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरम् ।

'म्हणून' 'अक्षर' शब्दापुढें 'परम' हें विशेषण घालून ब्रह्माची व्याख्या दिली आहे ( गीतार. प्र. ९ पृ. १९८ व १९९ पहा ). 'स्वभाव' या शब्दाचा अर्थ महाभारतांतील वर दिलेल्या उदाहरणांना अनुसरून कोणत्याहि पदार्थाचें 'सुक्ष्म स्वरूप' असा आम्हीं केला आहे. नासदीय सुक्तांत दृश्य जग हें परब्रह्माची विसृष्टि ( विसर्ग ) होय असें म्हटलें आहे ( गी. र. पृ. २५२ ); व विसर्ग शब्दाचा तोच अर्थ येथें घेतला पाहिजे. विसर्ग म्हणजे यज्ञांतील हविरुत्सर्ग असा अर्थ करण्याची जरूर नाहीं. या दृश्य सृष्टीलाच कर्म कां म्हणतात याचें विवेचन गीतारहस्याच्या दहाव्या प्रकरणांत ( पृ. २५९ ) सविस्तर केलें आहे तें पहा. 'क्षर' ह्मणजे पदार्थमात्राचें नामरूपात्मक विनाशी स्वरूप होय; आणि यापलीकडचें जें अक्षर तत्त्व तें ब्रह्म समजावयाचें. 'पुरुष' या शब्दानें सूर्यांतला पुरुष, पाण्याची देवता किंवा वरुणपुरुष, इत्यादि सचेतन सूक्ष्मदेहधारी देवता विवक्षित असून हिरण्यगर्भाचाहि त्यांतच समावेश होतो. 'अधियज्ञ' शब्दाची व्याख्या भगवंतांनीं येथें दिली नाहीं. कारण, यज्ञाबद्दल मागें तिसऱ्या व चवथ्या अध्यायांत सविस्तर वर्णन असून "मीच सर्व यज्ञांचा प्रभु व भोक्ता आहें" असें पुन; पुढेंहि सांगितलें आहे (गी. ९. २४; ५. २९; आणि म. भा. शां. २४० पहा ). अध्यात्मादिकांचीं याप्रमाणें लक्षणें सांगितल्यावर शेवटीं 'अधियज्ञ' ( ज्याला ह्मणतात ) तोच मी या देहांत आहें, ह्मणजे मनुष्यदेहांतील अधिदेव व अधियज्ञहि मीच आहें असें संक्षेपानें म्हटलें आहे. सांख्य प्रत्येक देहांत निराळा आत्मा (पुरुष) मानून ते असंख्य आहेत असें म्हणतात. पण वेदान्तशास्त्राला हें मत मान्य नसून देह अनेक असले तरी सर्वांत एकच आत्मा आहे असें त्यांनीं ठरविलें आहे (गीतार. प्र. ७. पृ. १६३ ). हाच सिद्धान्त 'अधिदेह मीच' या वाक्यांत येथें दर्शविला आहे. तथापि या वाक्यांतील 'मीच आहें' हे शब्द

यः प्रयाति स मद्भावं याति नास्त्यत्र संशयः ॥ ५ ॥

केवळ अधियज्ञास किंवा अधिदेहासच उद्देशून नसून अध्यात्मादि पूर्वपदांशींहि त्यांचा संबंध विवक्षित आहे. म्हणून एकंदर अर्थ असा होतो कीं, निरनिराळे यज्ञ घ्या, अनेक पदार्थांतील अनेक देवता घ्या, विनाशी पंचमहाभूतें घ्या, पदार्थमात्रांचे सूक्ष्म भाग किंवा भिन्नभिन्न आत्मे घ्या, ब्रह्म घ्या, कर्म घ्या किंवा निरनिराळया मनुष्यांचे देह घ्या, सर्वत्र 'मीच' म्हणजे एकच परमेश्वरतत्त्व आहे. कित्येकांचें असें ह्मणणें आहे कीं, 'अधिदेह' स्वरूपाचे या ठिकाणीं स्वतंत्र वर्णन नसून अधियज्ञाची व्याख्या करितांना त्यांत अधिदेहाचा पर्यायानें उल्लेख आलेला आहे. पण आम्हांस हा अर्थ बरोबर वाटत नाहीं. कारण गीतेंतच नव्हे, तर उपनिषदांत व वेदान्तसूत्रांत (बृ ३. ७; वे. सु. १. २. २०) हा विषय जेथें आलेला आहे तेथें अधिभूतादि स्वरूपाबरोबरच शारीर आत्म्याचाहि विचार केला असून, सर्वत्र एकच परमात्मा आहे असा सिद्धान्त केला आहे. तसेंच गीतेंत अधिदेहाबद्दल पूर्वी पश्नहि असल्यामुळें येथें त्याचा पृथक् उल्लेखच विवक्षित आहे, असें मानणें सयुक्तिक होय जें कांहीं आहे तें सर्वच जर परब्रह्म, तर अधिभूतादि त्याचीं स्वरूपें सांगतांना त्यांत परब्रह्माचीही गणना करण्याची जरूर नव्हती, असें सकृद्दर्शनीं वाटण्याचा संभव आहे. परंतु ब्रह्म निराळें, आत्मा निराळा, देवता निराळया, यज्ञनारायण निराळा, अशा रीतीनें अनेक भेद करून नानाप्रकारच्या उपासनेंत गुंतलेल्या लोकांस अनुलक्षून नानात्वाचें हें वर्णन असल्यामुळें त्या लोकांच्या समजुतीप्रमाणें होणाऱ्या भेदाचीं लक्षणें सांगून नंतर "हें सर्व मीच आहें" असा सिद्धान्त केला आहे, हें लक्षांत आणिलें म्हणजे त्यांत कोणतीच शंका रहात नाहीं, असो; अधिभूत, अधिदैवत, अध्यात्म, अधियज्ञ, अधिदेह इत्यादी प्रकारें उपासनेसाठीं जरी अनेक भेद केले तरी हें नानात्व खरें नसून वस्तुतः एकच परमेश्वर सर्व व्यापून राहिला आहे असें या भेदा-

यं यं वापि स्मरन्भावं त्यजत्यंते कलेवरम् ।
तं तमेवैति कौंतेय सदा तद्भावभावितः ॥ ६ ॥

तील तथ्य सांगून, आतां अंतःकाळीं या सर्व सर्वव्यापी भगवंताला कसा ओळखतात असा जो अर्जुनाचा शेवटचा प्रश्न त्याचें उत्तर सांगतात––]

(५) आणि जो अंतकाळीं माझेंच स्मरण करीत देह सोडितो तो ाझ्या स्वरूपाला येऊन पोंचतो, यांत संशय नाहीं. (६) अथवा हे कौंतेया! ादा म्हणजे जन्मभर त्यांतच रंगून गेल्यामुळें मनुष्य ज्या ज्या भावाचें मरण करीत अखेरीस देह सोडितो, त्या त्याच ( भावाला ) तो ( पुढें ) ाऊन पोंचतो.

[ पांचव्या श्लोकांत मरणसमयीं परमेश्वराचें स्मरण करण्याची अवश्यकता व फल सांगितलें. पण तेवढ्यावरून केवळ मरणकालीं हें स्मरण केल्यानें भागतें अशी कोणाची गैरसमजूत होण्याचा संभव आहे. यासाठीं सहाव्या श्लोकांत, जन्मभर जें मनांत असतें तें मरणकालींहि सुटत नाहीं असें सांगून मरणकालींच नव्हे तर जन्मभरहि परमेश्वराचें स्मरण व उपासना करण्याची अवश्यकता सिद्ध केली आहे ( गीतार. प्र. १० पृ. २८५ ). हा सिद्धान्त स्वीकारिला म्हणजे अंतकालीं परमेश्वराला भजणारे परमेश्वराला पोंचतात व देवतांचें स्मरण करणारे देवतांना पोंचतात हेंहि आपोआप सिद्ध होतें ( गी. ७. २३; ८. १३ व ९. २५ पहा ). कारण छांदोग्योपनिषदांत म्हटल्याप्रमाणें "यथाक्रतुरस्मिंल्लोके पुरुषो भवति तथेतः प्रेत्य भवति" ( छां. ३. १४. १ )—ज्याप्रमाणें या लोकीं मनुष्याचा क्रतु ह्मणजे संकल्प असतो त्याप्रमाणें मेल्यावर त्याला गति मिळत असते. छांदोग्याप्रमाणें इतर उपनिषदांतूनहि याचसारखीं वाक्यें आहेत ( प्रश्न. ३. १०; मैत्र्यु. ४. ६ ), परंतु गीता आतां असें सांगत आहे कीं, सर्व जन्मभर एकाच भावनेंत मन रंगून गेल्याखेरीज अंत-

तस्मात्सर्वेषु कालेषु मामनुस्मर युद्ध च ।
मय्यर्पितमनोबुद्धिर्मामेवैष्यस्यसंशयम् ॥ ७ ॥
अभ्यासयोगयुक्तेन चेतसा नान्यगामिना ।
परमं पुरुषं दिव्यं याति पार्थानुचिंतयन् ॥ ८ ॥

कालच्या यातनेंत तीच भावना होणें शक्य नाहीं. म्हणून आमरणान्त म्हणजे सर्व आयुष्यभर परमेश्वराचें ध्यान करणें जरूर आहे ( वे. सू. ( ४. १. १२ ), या सिद्धान्ताला अनुसरून भगवान् अर्जुनास असें सांगतात कीं--]

(७) म्हणून सव कालीं म्हणजे नेहमींच माझें स्मरण करीत जा, आणि युद्ध कर. माझ्या ठायीं मन व बुद्धि अर्पण केलीस म्हणजे ( लढाई करूनहि ) मलाच येऊन पोंचशील, यांत संशय नाहीं. (८) हे पार्था ! चित्त दुसरीकडे जाऊं न देतां अभ्यासाच्या साहाय्यानें स्थिर करून दिव्य परमपुरुषाचें ध्यान करीत असलें म्हणजे त्याच पुरुषास जाऊन पोंचतो.

[ भगवद्गीतेंत संसार सोडून केवळ भक्तिच प्रतिपाद्य आहे असें म्हणणारांनीं सातव्या श्लोकांतील सिध्दान्ताकडे अवश्य लक्ष पुरवावें. मोक्ष मिळणें तो परमेश्वराच्या ज्ञानयुक्त भक्तीनें मिळतो व मरणसमयीं देखील तीच भावना कायम रहाण्यास जन्मभर तोच अभ्यास पाहिजे हें विर्विवाद आहे. पण त्यासाठीं कर्में सोडिलीं पाहिजेत असा गीतेचा अभिप्राय नाहीं; उलट भगवद्भक्तानें हीं स्वधर्माप्रमाणें प्राप्त झालेलीं सर्व कर्में निष्काम बुद्धीनें केलींच पाहिजेत असा गीताशास्त्राचा सिद्धान्त आहे, व तोच " माझें नेहमीं चिंतन कर, आणि युद्ध कर" या शब्दांनीं व्यक्त केला आहे. असो; अंतकालीं देखील दिव्य परमपुरुषाचें जें चिंतन करावयाचें तें परमेश्वरार्पणबुद्धीनें जन्मभर निष्काम कर्म करणारे कर्मयोगी कोणत्या प्रकारें करितात, याचें आतां वर्णन करितात— ]

§§ कविं पुराणमनुशासितारमणोरणीयांसमनुस्मरेद्यः।
सर्वस्य धातारमचिंत्यरूपमादित्यवर्णं तमसः परस्तात् ॥ ९ ॥
प्रयाणकाले मनसाचलेन भक्त्या युक्तो योगबलेन चैव।
भ्रुवोर्मध्ये प्राणमावेश्य सम्यक् स तं परं पुरुषमुपैति दिव्यम्॥१०॥
यदक्षरं वेदविदो वदन्ति विशन्ति यद्यतयो वितरागाः।
यदिच्छन्तो ब्रह्मचर्यं चरन्ति तत्ते पदं संग्रहेण प्रवक्ष्ये ॥ ११ ॥
सर्वद्वाराणि संयम्य मनो हृदि निरुद्ध्य च।
मूर्ध्न्याधायात्मनः प्राणमास्थितो योगधारणाम् ॥ १२ ॥
ॐ इत्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन्।
यः प्रयाति त्यजन्देहं स याति परमां गतिम् ॥ १३ ॥

(९) कवि म्हणजे सर्वज्ञ, पुरातन, शास्ता, अणूपेक्षांहि धाकटा, सर्वांचा धाता म्हणजे आधार किंवा कर्ता, अचिंत्यस्वरूप, व अंधकारापलीकडचा सूर्याप्रमाणें देदीप्यमान अशा पुरुषाचें जो (मनुष्य) स्मरण, (१०) अंतकालीं (इंद्रियनिग्रहरूप) योगाच्या सामर्थ्यानें व भक्तीनें युक्त होत्साता मन स्थिर करून आणि प्राण दोन्ही भुवयांचे मध्यें नीट ठेवून करील तो (मनुष्य) त्याच दिव्य परमपुरुषाप्रत जाऊन पोंचतो. (११) वेदवेत्ते जें अक्षर म्हणतात, वीतराग होऊन यति ज्यांत प्रवेश करीतात, आणि ज्याची इच्छा करून ब्रह्मचर्यव्रताचें आचरण करितात, तें पद म्हणजे ॐकारब्रह्म तुला संक्षेपानें सांगतों. (१२) सर्व (इंद्रियरूपी) द्वारांचें संयमन करून आणि मनाचा हृदयांत निरोध करून, आपला प्राण मस्तकांत नेऊन समाधियोगांत स्थिर झालेला, (१३) ॐ या एकाक्षरब्रह्माचा जप करीत व माझें स्मरण करीत जो देह सोडून जातो त्याला उत्तम गति मिळते.

[ श्लोक ९-११ यांत परमेश्वरस्वरूपाचें जें वर्णन आहे तें उपनिषदांतून घेतलेलें आहे. नवव्या श्लोकांतील "अणोरणीयान्" हीं पदें व

§§ अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः ।
तस्याहं सुलभः पार्थ नित्ययुक्तस्य योगिनः ॥ १४ ॥
मामुपेत्य पुनर्जन्म दुःखालयमशाश्वतम् ।
नाप्नुवन्ति महात्मानः संसिद्धिं परमां गताः ॥ १५ ॥
आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन ।
मामुपेत्य तु कौंतेय पुनर्जन्म न विद्यते ॥ १६ ॥

शेवटचा चरण श्वेताश्वतर उपनिषदांतला ( श्वे. ३. ८ व ९ ) असून, अकराव्या श्लोकाचें पूर्वार्ध अर्थतः व उत्तरार्ध शब्दशः कठोपनिषदांतलें आहे ( कठ. २. १५ ). कठोपनिषदांत "तत्ते पदं संग्रहेण ब्रवीमि" या चरणापुढें "ओमित्येतत्" असें स्पष्ट म्हटलें आहे, यावरून ११ व्या श्लोकांतील 'अक्षर' व 'पद' या शब्दांचा अर्थ ॐ हें वर्णाक्षररूपी ब्रह्म किंवा ॐ हा शब्द असा घेतला पाहिजे; आणि तेराव्या श्लोकावरूनहि ॐकारोपासनाच येथें उद्दिष्ट आहे हें उघड होतें ( प्रश्न. ५ पहा ). तथापि 'अक्षर' म्ह० अविनाशी ब्रह्म, आणि 'पद' म्ह० परमस्थान, हे अर्थहि भगवंतांचे मनांत नसतील असें म्हणतां येत नाहीं. कारण, ॐ हें वर्णमालेंतील एक अक्षर असून शिवाय ब्रह्माचें प्रतीक म्हणून अविनाशीहि आहे असें म्हणतां येईल ( पुढें २१ वा श्लोक पहा ). यासाठीं ११ व्या श्लोकाच्या भाषांतरांत 'अक्षर' व 'पद' हे दुहेरी अर्थाचे मूळचे शब्दच आम्हीं राखिले आहेत. या उपासनेनें जी उत्तम गति मिळते तिचेंच आतां जास्त निरूपण करितात— ]

(१४) हे पार्था ! अनन्यभावानें सदासर्वदा जो माझें नित्यशः स्मरण करितो त्या नित्ययुक्त (कर्म-) योग्यास मी म्हणजे माझी प्राप्ति सुलभ रीतीनें होते. (१५) मला येऊन मिळाल्यावर परमसिद्धि पावलेल्या महात्म्यास दुःखाचें घर व अशाश्वत असा पुनर्जन्म प्राप्त होत नाहीं. ( १६ ) हे अर्जुना ! ब्रह्मलोकासुद्धां (स्वर्गादि) जे लोक आहेत तेथून ( केव्हां ना

§§ सहस्रयुगपर्यंतमहर्यद्ब्रह्मणो विदुः।
रात्रिं युगसहस्रांतां तेऽहोरात्रविदो जनाः॥ १७॥

केव्हां तरी या लोकीं ) पुनरावर्तन म्हणजे परत फिरणें ( भाग ) आहे. पण हे कौंतेया ! मला येऊन मिळालें म्हणजे पुनर्जन्म नाहीं.

[ सोळाव्या श्लोकांत ' पुनरावर्तन ' या शब्दाचा अर्थ पुण्य संपल्यावर भूलोकीं परत येणें असा आहे ( गी. ९.२. म. भा. वन. २६. पहा). यज्ञ, देवताराधान, वेदाध्ययन वगैरे कर्मांनीं इंद्रलोक, सूर्यलोक किंबहुना ब्रह्मलोक जरी प्राप्त झाला तरी पुण्यांश सरल्यावर तेथून पुनः मागें फिरून इहलोकीं जन्म घ्यावा लागतो ( बृ. ४.४. ६), किंवा निदानपक्षीं ब्रह्मलोकाचा नाश झाल्यावर तरी पुनर्जन्मचक्रांत पडणें जरूर पडतें. म्हणून या सर्व गति हलक्या प्रतीच्या होत, आणि परमेश्वराच्या ज्ञानानेंच पुनर्जन्म नष्ट होत असल्यामुळें ती गति सर्वांत श्रेष्ठ असा १६ व्या श्लोकाचा भावार्थ आहे ( गी. ९.२०.२१ ). ब्रह्मलोकप्राप्तिहि अनित्य असें जें शेवटीं सांगितलें तत्समर्थनार्थ ब्रह्मलोकासुद्धां सर्व सृष्टीची उत्पत्ति व लय पुनः पुनः कसा होत असतो तें आतां सांगतात—]

(१७) अहोरात्र म्हणजे काय हें (तत्वतः) जाणणारे पुरुष (कृत, त्रेता द्वापर व कलि हीं चार युगें मिळून एक महायुग, व अशा ) हजार ( महा- ) युगांचा जो काल तो ब्रह्मदेवाचा एक दिवस, आणि ( तसल्याच ) हजार युगांची ( त्याची ) एक रात्र होते, असें समजतात.

[ हा श्लोक यापूर्वीचें युगमानाचें कोष्टक न देतां गीतेंत आला आहे; व त्याचा अर्थ अन्यत्र दिलेल्या कोष्टकावरून केला पाहिजे. हें कोष्टक व गीतेंतला हा श्लोकहि भारतांत ( शां २३१. ३१ ) आणि मनुस्मृतींत ( मनु. १.७३ ) आलेला असून यास्काच्या निरुक्तांतहि तोच

अव्यक्ताद्व्यक्तयः सर्वाः प्रभवन्त्यहरागमे ।
राज्यागमे प्रलीयन्ते तत्रैवाव्यक्तसंज्ञके ॥ १८ ॥
भूतग्रामः स एवायं भूत्वा भूत्वा प्रलीयते ।
राज्यागमेऽवशः पार्थ प्रभवत्यहरागमे ॥ १९ ॥

§§ परस्तस्मात्तु भावोऽन्योऽव्यक्तोऽव्यक्तात्सनातनः ।

अर्थ वर्णिला आहे ( निरुक्त. १४.९ ). ब्रह्मदेवाच्या दिवसासच कल्प असें म्हणतात. अव्यक्त म्हणजे सांख्यशास्त्रांतील अव्यक्त प्रकृति असा पुढील श्लोकांत अर्थ आहे, अव्यक्त म्हणजे परब्रह्म नव्हे; कारण ब्रह्मरूपी अव्यक्त या श्लोकांत वर्णिलेल्या अव्यक्तापलीकडचें व भिन्न आहे असें पुढें २० व्या श्लोकांत स्पष्ट सांगितलें आहे. अव्यक्तापासून व्यक्त सृष्टि कशी होत्ये याचा पूर्ण खुलासा व कल्पाच्या कालमानाचें कोष्टक हीं गीतारहस्याच्या आठव्या प्रकरणांत ( पृ. १९० ) दिलीं आहेत तीं पहा. ]

(१८) हा (ब्रह्मदेवाचा) दिवस सुरू झाला म्हणजे अव्यक्तापासून सर्व व्यक्त (पदार्थ) निर्माण होतात आणि रात्र सुरू झाली म्हणजें त्याच पूर्वोक्त अव्यक्तांत लय पावतात. ( १९ ) भूतांचा तोच हा समुदाय ( याप्रमाणें ) पुनःपुनः जन्मून अवश होत्साता, म्हणजे स्वतः इच्छा असो वा नसो, ( यंत्रांत घातल्याप्रमाणें ) रात्र सुरू झाली कीं लय पावतो, आणि हे पार्था ! दिवस सुरू झाला कीं (पुनः) जन्मतो.

[अर्थात् पुण्यकर्मांनीं नित्य ब्रह्मलोकास जरी प्राप्त झाला तरीहि प्रलयकालीं ब्रह्मलोकाचाहि नाश होत असल्यामुळें प्राण्यांना पुनः नव्या कल्पाच्या आरंभीं जन्म घेणें चुकत नाहीं, तो चुकविण्यास जो एकच मार्ग आहे तो आतां सांगतात—]

यः स सर्वेषु भूतेषु नश्यत्सु न विनश्यति ॥ २० ॥
अव्यक्तोऽक्षर इत्युक्तस्तमाहुः परमां गतिम् ।
यं प्राप्य न निवर्तन्ते तद्धाम परमं मम ॥ २१ ॥
पुरुषः स परः पार्थ भक्त्या लभ्यस्त्वनन्यया ।
यस्यांतःस्थानि भूतानि येन सर्वमिदं ततम् ॥ २२ ॥
§§ यत्र काले त्वनावृत्तिमावृत्तिं चैव योगिनः ।

(२०) पण या वर सांगितलेल्या अव्यक्तापलीडचा दुसरा सनातन अव्यक्त पदार्थ, जो सर्व भूतें नाहींशीं झालीं तरीहि नाहींसा होत नाहीं, (२१) ज्या अव्यक्ताला ‘ अक्षर ’ असें (-हि) म्हणतात, तोच परम म्हणजे उत्कृष्ट किंवा अखेरची गति म्हटली आहे; (व) ज्याला जाऊन पोंचलें असतां फिरून ( जन्मास ) येत नाहीं ( असें ) माझें परमस्थान (-ही) तेंच होय. (२२) हे पार्था ! ज्याच्या आंत ( सर्व ) भूतें आहेत व ज्यानें हें सर्व विस्तारिलें किंवा व्यापिलें आहे तो पर म्हणजे श्रेष्ठ पुरुष अनन्यभक्तीनेंच लभ्य होय.

[ वीस व एकवीस श्लोक मिळून एक वाक्य आहे, पैकीं विसाव्या श्लोकांतील ‘ अव्यक्त ’ हा शब्द प्रथम सांख्याच्या प्रकृतीस, म्हणजे १८ व्या श्लोकांतील अव्यक्त द्रव्यास अनुलक्षून योजिला असून तोच पुढें सांख्याच्या प्रकृतिपलीकडच्या परब्रह्मासहि लाविला आहे. आणि या दुसऱ्या अव्यक्तासच ‘अक्षर’ असेंहि म्हणतात असें २१ व्या श्लोकांत म्हटलें आहे; तसेंच अध्यायाच्या आरंभींहि “ अक्षरं ब्रह्म परमं ” असें वर्णन आहे. सारांश, ‘ अव्यक्त ’ या शब्दाप्रमाणेंच ‘ अक्षर ’ शब्दाचाहि गीतेंत दोन प्रकारें उपयोग केलेला आहे. सांख्यांची प्रकृतिच अव्यक्त व अक्षर आहे असें नाहीं, तर “ सर्व भूतें नाहींशी झाली तरीहि जो नाहींसा होत नाहीं” तो परमेश्वर किंवा ब्रह्महि अक्षर व अव्यक्त आहे. पंधराव्या अध्यायांत पुरुषोत्तमलक्षण सांगतांना तो क्षर व अक्षर यांपलीकडचा आहे असें जें वर्णन आहे त्यांतील ‘अक्षर’

प्रयाता यान्ति तं कालं वक्ष्यामि भरतर्षभ ॥ २३ ॥
अग्निर्ज्योतिरहः शुक्लः षण्मासा उत्तरायणम् ।
तत्र प्रयाता गच्छन्ति ब्रह्म ब्रह्मविदो जनाः ॥ २४ ॥
धूमो रात्रिस्तथा कृष्णः षण्मासा दक्षिणायनम् ।
तत्र चांद्रमसं ज्योतिर्योगी प्राप्य निवर्तते ॥ २५ ॥
शुक्लकृष्णे गती ह्येते जगतः शाश्वते मते ।

शब्द सांख्यांच्या प्रकृतीस उद्देशून आहे असेंहि यावरून उघड होतें (गी १५.१६–१८ पहा). तात्पर्य, 'अव्यक्त' व 'अक्षर' हीं दोन्ही विशेषणें कधीं सांख्यांच्या प्रकृतीस, तर कधीं या प्रकृतीच्या पलीकडल्या परब्रह्मास उद्देशून गीतेंत योजिलेली असतात हें लक्षांत ठेविलें पाहिजे ( गीतार. पृ १९८ व १९९ पहा ). व्यक्त आणि अव्यक्त यांच्या पलीकडल्या परब्रह्माचें स्वरूप गीतारहस्याच्या ९ व्या प्रकरणांत स्पष्ट केलें आहे तें पहा. 'अक्षर ब्रह्म' म्हणजे ज्या स्थानीं पोंचलें असतां मनुष्य पुनर्जन्माच्या तडाक्यातून सुटतो त्याचें वर्णन झालें. आतां मेल्यावर ज्यांना अनावृत्ति म्हणजे परत फिरावें लागत नाहीं, आणि ज्यांना आवृत्ति म्हणजे स्वर्गाहून माघारें येऊन पुनः जन्म घ्यावा लागतो, त्यांच्यामधील कालाचा व गतीचा भेद सांगतात—]

(२३) आतां (कर्म) योगी ज्या कालीं मेले असतां परत (या लोकीं जन्मास) येत नाहीत, आणि (ज्या कालीं मेले असतां परत येतात, तो काल हे भरतश्रेष्ठा ! तुला सांगतों. (२४) अग्नि, ज्योति म्हणजे ज्वाळा, दिवस, शुक्लपक्ष, उत्तरायणाचे सहा महिने, यांत मेलेले ब्रह्मवेत्ते लोक मेल्यावर ब्रह्मास पोंचतात ( परत येत नाहींत ). (२५) (अग्नि) धूर, रात्र, तसेंच कृष्णपक्ष, दक्षिणायनाचे सहा महिने, यांत (मेलेला) (कर्म-) योगी चंद्राच्या तेजास म्हणजे चंद्रलोकास जाऊन ( पुण्यांश सरल्यावर ) परत

एकया यात्यनावृत्तिमन्ययावर्तते पुनः ॥ २६ ॥

§§ नैते सृती पार्थ जानन् योगी मुह्यति कश्चन ।

तस्मात्सर्वेषु कालेषु योगयुक्तो भवार्जुन ॥ २७ ॥

वेदेषु यज्ञेषु तपःसु चैव दानेषु यत्पुण्यफलं प्रदिष्टम् ।

येतो. (२६) याप्रमाणें शुक्ल व कृष्ण म्हणजे प्रकाशमय व अंधकारमय अशा जगताच्या दोन शाश्वत गति म्हणजे कायमचे मार्ग मानिले आहेत. एका मार्गानें गेलें म्हणजे परत फिरत नाहीं, व दुसऱ्यानें पुनः परत येतो.

[ या दोन गतींस देवयान (शुक्ल) व पितृयाण (कृष्ण), किंवा अर्चिरादि मार्ग आणि धूम्रादि मार्ग, अशीं उपनिषदांतून नांवें असून ऋग्वेदांतहि या मार्गांचा उल्लेख केलेला आहे. मेलेल्या मनुष्याच्या देहास अग्नि दिल्यानंतर म्हणजे अग्नी पासूनच या दोन्ही मार्गांस सुरुवात होते; म्हणून पंचविसाव्या श्लोकांत 'अग्नि' हें पद पूर्वीच्या श्लोकांतून अध्याहृत घेतलें पाहिजे. पूर्वीच्या श्लोकांत वर्णिलेल्या मार्गांत व दुसऱ्या मार्गांत भेद कोठें होतो तेवढेंच सांगण्याचा पंचविसाव्या श्लोकाचा हेतु असल्यामुळें 'अग्नि' या शब्दाची पुनरावृत्ति त्यांत केलेली नाहीं. यासंबंधानें जास्त माहिती गीतारहस्याच्या दहाव्या प्रकरणाचे अखेर ( पृ. २९२–२९५ ) दिली आहे ती पहा. त्यावरून वरील श्लोकाचा भावार्थ स्पष्ट कळून येईल. आतां या दोन मार्गांतील तत्त्व ओळखिल्यानें काय फल मिळतें तें सांगतात—]

(२७) हे पार्था ! या दोन सृति म्हणजे मार्ग (तत्त्वतः) जाणणारा कोणताहि (कर्म-) योगी मोह पावत नाहीं; म्हणून हे अर्जुना ! तूं सर्वकाल (कर्म-) योगयुक्त हो. (२८) हें ( वर सांगितलेलें तत्त्व ) जाणिलें म्हणजे वेदांमध्यें, यज्ञामध्यें, तपामध्यें आणि दानामध्यें जें पुण्यफल सांगितलें आहे

अत्येति तत्सर्वमिदं विदित्वा योगी परं स्थानमुपैति चाद्यम् ॥२८॥

इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे अक्षरब्रह्मयोगो नाम अष्टमोऽध्यायः ॥ ८ ॥

---

तें सर्व (कर्म-) योगी मार्ग टाकितो आणि त्याच्या पलीकडच्या आद्यस्थानाला जाऊन पोंचतो.

[ ज्या मनुष्यानें देवयान आणि पितृयाण या दोन मार्गांतील तत्त्व ओळखिलें ह्मणजे देवयानमार्गानें मोक्ष मिळून पुनर्जन्म प्राप्त होत नाहीं आणि पितृयाण मार्ग स्वर्गप्रद असला तरी मोक्षप्रद नाहीं असें जाणिलें, तो अर्थातच यांपैकीं आपल्या खऱ्या कल्याणाचा मार्ग स्वीकारील, मोहानें खालच्या पायरीच्या मार्गांत पडणार नाहीं हें उघड आहे; आणि याच गोष्टीस अनलक्षून "या दोन सृती ह्मणजे मार्ग (तत्त्वतः) जाणणारा" हे शब्द पहिल्या श्लोकांत आले आहेत. देवयान आणि पितृयाण या दोन वाटांपैकीं कोणती कोठें जाते हें कर्मयोग्याला कळत असतें, व त्यामुळें कोणती वाट उत्तम तीच तो स्वभावतः स्वीकारितो आणि स्वर्गाच्या येरजाऱ्या टाळून त्यापलीकडच्या मोक्षपदाची प्राप्ति करून घेत असतो असा या श्लोकांचा भावार्थ आहे; आणि २७ व्या श्लोकांत अर्जुनाला त्याप्रमाणें वागण्याचा उपदेशहि केला आहे. ]

याप्रमाणें श्रीभगवंतांनीं गाइलेल्या म्हणजे सांगितलेल्या उपनिषदांत ब्रह्मविद्यान्तर्गत योग--म्हणजे कर्मयोग-शास्त्रावरील श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या संवादांतील अक्षरब्रह्मयोग नांवाचा आठवा अध्याय समाप्त झाला.

---

# नवमोऽध्यायः ।

श्रीभगवानुवाच ।

इदं तु ते गुह्यतमं प्रवक्ष्याम्यनसूयवे ।
ज्ञानं विज्ञानसहितं यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥ १ ॥

## अध्याय नववा.

कर्मयोगाचें आचरण करणाऱ्या पुरुषास परमेश्वराचें पूर्ण ज्ञान होऊन मनाची शांति किंवा मुक्तावस्था कशी प्राप्त होते हें दाखविण्या-साठीं ज्ञानविज्ञानाच्या निरूपणाला सातव्या अध्यायांत सुरुवात करून अक्षर आणि अव्यक्त पुरुषाचें स्वरूप सांगितलें, आणि अंतकालींहि तें स्वरूप मनांत कायम रहावें म्हणून पातंजल योगानें समाधि लावून ॐकारोपासना शेवटीं कशी करावी याचेंहि गेल्या अध्यायांत वर्णन केलें. परंतु अक्षर ब्रह्माचें ज्ञान होणेंच आधीं कठिण, आणि त्यांतहि समाधि पाहिजे असें म्हटलें म्हणजे सामान्य लोकांस हा मार्ग सोडून द्यावा लाग-णार ! ही अडचण लक्षांत आणून सर्व लोकांस जेणेंकरून परमेश्वराचें ज्ञान सुलभ होईल असा राजमार्ग भगवान् आतां सांगतात. यासच भक्तिमार्ग असें म्हणतात, व त्याचें सविस्तर विवेचन गीतारहस्याच्या तेराव्या प्रकरणांत आम्हीं केलें आहे. या मार्गांत परमेश्वराचें स्वरूप प्रेमगम्य व व्यक्त म्हणजे प्रत्यक्ष कळणारें असतें; आणि त्या व्यक्त स्वरूपाचेंच नऊ, दहा, अकरा व बारा या चार अध्यायांत विस्तृत निरूपण केलें आहे. तथापि हा भक्तिमार्गहि स्वतंत्र नसून सातव्या अध्यायांत कर्मयोगसिद्ध्यर्थ आरंभिलेल्या ज्ञानविज्ञानाचाच एक भाग आहे हें विसरतां कामा नये; आणि या अध्यायाचा आरंभ मागील ज्ञानविज्ञानाचें अंग या दृष्टीनेंच केला आहे. ]

श्रीभगवान् म्हणाले–(१) आतां तूं दोषदर्शी नाहींस म्हणून गुह्यांतलें गुह्य असें विज्ञानसहित ज्ञान, जें जाणिल्यानें पापापासून मुक्त

राजविद्या राजगुह्यं पवित्रमिदमुत्तमम् ।
प्रत्यक्षावगमं धर्म्यं सुसुखं कर्तुमव्ययम् ॥ २ ॥
अश्रद्दधानाः पुरुषा धर्मस्यास्य परंतप ।
अप्राप्य मां निवर्तन्ते मृत्युसंसारवर्त्मनि ॥ ३ ॥

होशील, तें हें मी तुला सांगतों ( ऐक ). ( २ ) हें ( ज्ञान ) सर्व गुह्यांत राजा म्हणजे श्रेष्ठ, राजविद्या म्हणजे सर्व विद्यांमध्यें श्रेष्ठ, पवित्र, उत्तम, प्रत्यक्ष बोध होणारें, आचरण्यास सुखकारक, अव्यय आणि धर्म्य आहे. (३) या धर्मावर श्रद्धा न ठेवणारे पुरुष हे परंतपा ! मला येऊन न मिळतां मृत्युयुक्त संसाराच्या मार्गांत परत येतात; ( म्ह० त्यांना मोक्ष मिळत नाहीं ).

[ दुसऱ्या श्लोकांतील 'राजविद्या,' 'राजगुह्य,' 'प्रत्यक्षावगम,' या पदांच्या अर्थांचा विचार गीतारहस्याच्या तेराव्या प्रकरणांत ( पृ. ४१०–४१४ ) केला आहे तो पहा. ईश्वरप्राप्तीच्या साधनांस उपनिषदांतून 'विद्या' असें म्हणतात व त्या गुप्त ठेवण्याचा प्रघात होता. भक्तिमार्ग किंवा व्यक्ताची उपासना ही विद्या या सर्व गुह्य विद्यांत श्रेष्ठ किंवा राजा असून, शिवाय हा धर्म प्रत्यक्ष डोळ्यापुढें दिसणारा अतएव आचरण्यास सुलभ आहे असें म्हटलें आहे. तथापि इक्ष्वाकु वगैरे राजांच्या परंपरेनेंच हा योग प्रचारांत आला असल्यामुळें ( गी. ४.२ ) या मार्गास राजांची म्हणजे थोर पुरुषांची विद्या या अर्थानेंहि राजविद्या असें म्हणतां येईल. कोणताहि अर्थ घेतला तरी अक्षर किंवा अव्यक्त ब्रह्माच्या ज्ञानास अनुलक्षून हें वर्णन नसून, या राजविद्या या शब्दानें भक्तिमार्गच या ठिकाणीं विवक्षित आहे, हें उघड आहे. असो; याप्रमाणें आरंभींच या मार्गाची प्रशंसा करून भगवान् आतां त्याचें विस्तारानें वर्णन करितात—]

§§ मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना ।
मत्स्थानि सर्वभूतानि न चाहं तेष्ववस्थितः ॥ ४ ॥
न च मत्स्थानि भूतानि पश्य मे योगमैश्वरम्
भूतभृन्न च भूतस्थो ममात्मा भूतभावनः ॥ ५ ॥
यथाकाशस्थितो नित्यं वायुः सर्वत्रगो महान् ।
तथा सर्वाणि भूतानि मत्स्थानीत्युपधारय ॥ ६ ॥

(४) मीं आपल्या अव्यक्त स्वरूपानें हें सर्व जग विस्तारिलें किंवा व्यापिलें आहे. माझ्या ठायीं सर्व भूतें आहेत, मी त्यांच्या ठायीं नाहीं. (५) आणि माझ्या ठायीं सर्व भूतेंहि नाहींत ! पहा (कशी ही) माझी ईश्वरी करणी किंवा योगसामर्थ्य ! भूतें उत्पन्न करणारा माझा आत्मा भूतें धारण करूनहि (पुनः) भूतांत नाहीं ! (६) सर्वत्र वावरणारा महान् वायु ज्याप्रमाणें सर्वदा आकाशाच्या ठायीं, त्याप्रमाणें सर्व भूतें माझ्या ठायीं आहेत असें समज.

[ परमेश्वर निर्गुण व सगुण असल्यामुळें हा विरोधाभास होतो ( सातव्या अध्यायांतील श्लोक १२ वरील टीका, आणि गीतारहस्य प्रकरण ९ पृ. २०२, २०९ व २०६ पहा ). याप्रमाणें स्वतःच्या स्वरूपाचें आश्चर्यकारक वर्णन करून अर्जुनाची जिज्ञासा जागृत केल्यावर, आतां आपल्यापासून व्यक्त सृष्टि कशी होते व आपलीं व्यक्त रूपें कोणती याचें पूर्वीं ( गी. ७.४–१८; ८.१७–२० ) सातव्या व आठव्या अध्यायांत जें वर्णन केलें आहे तेंच थोड्या फरकानें प्रसंगानुसार भगवान् पुनः करितात. ‘योग’ या शब्दाचा अर्थ अलौकिक सामर्थ्य किंवा युक्ति असा जरी केला, तरी अव्यक्ताचें व्यक्त बनण्याचा हा योग किंवा युक्ति म्हणजेच माया होय, हें गीता ७.२५ वरील टीकेंत व रहस्याच्या नवव्या प्रकरणांत ( पृ. २३४—२३७ ) प्रतिपादन केलें आहे. हा ‘योग’ परमेश्वरास अत्यंत सुलभ किंबहुना परमेश्वराचा दास असल्यामुळें

§§ सर्वभूतानि कौंतेय प्रकृतिं यान्ति मामिकाम् ।
कल्पक्षये पुनस्तानि कल्पादौ विसृजाम्यहम् ॥ ७ ॥
प्रकृतिं स्वामवष्टभ्य विसृजामि पुनः पुनः ।
भूतग्राममिमं कृत्स्नमवशं प्रकृतेर्वशात् ॥ ८ ॥
न च मां तानि कर्माणि निबध्नन्ति धनंजय ।
उदासीनवदासीनमसक्तं तेषु कर्मसु ॥ ९ ॥
मयाध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम् ।
हेतुनानेन कौंतेय जगद्विपरिवर्तते ॥ १० ॥

परमेश्वरास योगेश्वर ( गी. १८. ७५ ) असें म्हणतात. या योगसामर्थ्यानें जगाची घडामोड कशी चालते तें आतां सांगतात—]

(७) कल्पान्तीं सर्व भूतें हे कौंतेया ! माझ्या प्रकृतीस येऊन मिळतात, आणि कल्पारंभीं ( म्हणजे ब्रह्मदेवाच्या दिवसाच्या आरंभीं ) मीच त्यांना पुनः निर्माण करितों. ( ८ ) मी आपल्या प्रकृतीला हातीं धरून ( त्या ) प्रकृतीच्या ताब्यांत गेल्यानें अवश म्हणजे परतंत्र (अर्थात् ज्याच्या त्याच्या कर्मानें बद्ध) झालेला हा भूतांचा सर्व समुदाय पुनः पुनः निर्माण करितों. (९) (पण) हे धनंजया ! ( या सृष्टि निर्माण करण्याच्या ) कर्मांत माझी आसक्ति नसून मी उदासीनासारखा रहात असल्यामुळें तीं कर्में मला बंधक होत नाहींत. (१०) मी अध्यक्ष होऊन प्रकृतीकडून सर्व चराचर सृष्टि प्रसवितों. या कारणामुळें हे कौंतेया ! जगाची ही घडामोड चालली आहे.

ब्रह्मदेवाच्या दिवसास (कल्पास) आरंभ झाला म्हणजे अव्यक्त प्रकृतीपासून व्यक्त सृष्टि निर्माण होऊं लागते हें पूर्वीच्या अध्यायांत सांगितलें (८.१८) पण परमेश्वर प्रत्येकाच्या कर्माप्रमाणेंच त्याला बरावाईट जन्म देत असल्यानें स्वतः या कर्मांपासून अलिप्त आहे इ० खुलासा येथें अधिक सांगितला आहे. शास्त्रीय प्रतिपादनांत हीं सर्व

§§ अवजानन्ति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम् ।
परं भावमजानन्तो मम भूतमहेश्वरम् ॥ ११ ॥
मोघाशा मोघकर्माणो मोघज्ञाना विचेतसः ।
राक्षसीमासुरीं चैव प्रकृतिं मोहिनीं श्रिताः ॥ १२ ॥
§§ महात्मानस्तु मां पार्थ दैवीं प्रकृतिमाश्रिताः ।
भजन्त्यनन्यमनसो ज्ञात्वा भूतादिमव्ययम् ॥ १३ ॥

तत्त्वें एकाच ठिकाणीं सांगण्यांत येतात. गीतेतील पद्धत संवादात्मक असल्यामुळें एकच विषय प्रसंगानुसार थोडा एक ठिकाणीं तर थोडा दुसऱ्या ठिकाणीं सांगितला आहे. दहाव्या श्लोकांत ' जगद्विपरिवर्तते ' अशीं जीं पदें आहेत, तीं विवर्तवादास अनुलक्षून आहेत अशी कोटी कित्येकांनीं काढिलेली आहे. पण 'जगाची घडामोड चालली आहे' म्हणजे 'व्यक्ताचें अव्यक्त आणि पुनः अव्यक्ताचें व्यक्त होत असतें' यापेक्षां 'विपरिवर्तते' पदाचा कांहीं जास्त अर्थ होतो असें आम्हांस वाटत नाहीं, व शांकरभाष्यांतहि म्हटलें नाहीं. कर्मानें मनुष्य अवश कसा होतो याचें गीतारहस्याच्या १० व्या प्रकरणांत विवेचन केलें आहे तें पहा—]

(११) सर्व भूतांचा मोठा ईश्वर असें जें माझें परम स्वरूप तें न जाणणारे मूढ लोक मनुष्यदेह धारण केलेल्या मला ( मनुष्यदेहधारी समजून ) अवमानितात. (१२) त्यांच्या आशा व्यर्थ, कर्में फुकट, ज्ञान वांझ, आणि चित्त भ्रष्ट असून त्यांनीं मोहात्मक राक्षसी व आसूरी स्वभावाचा आश्रय केलेला असतो.

[ आसुरी पुरुषाचें हें वर्णन झालें. आतां दैवी स्वभावाचें वर्णन करितात–]

(१३) परंतु दैवी प्रकृतीचा आश्रय करून राहिलेले महात्मे हे पार्था! सर्व भूतांचें अव्यय आदिस्थान जो मी त्या मला ओळखून अनन्यभाव

सततं कीर्तयन्तो मां यतन्तश्च दृढव्रताः ॥
नमस्यन्तश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते ॥ १४ ॥
ज्ञानयज्ञेन चाप्यन्ये यजन्तो मामुपासते ।
एकत्वेन पृथक्त्वेन बहुधा विश्वतोमुखम् ॥ १५ ॥
§§ अहं क्रतुरहं यज्ञः स्वधाहमहमौषधम् ।
मंत्रोऽहमहमेवाज्यमहमग्निरहं हुतम् ॥ १६ ॥

होत्साते माझें भजन करितात. (१४) आणि यत्नशील, दृढव्रत, आणि नित्य योगयुक्त होत्साते माझें सतत कीर्तन व वंदन करीत भक्तीनें माझी उपासना चालवितात, (१५) तसेंच दुसरे कित्येक सर्वतोमुख जो मी त्या माझें एकत्वानें म्हणजे अभेदभावानें, पृथक्त्वानें म्हणजे भेदभावानें, किंवा बहुप्रकारें ज्ञानयज्ञानें यजन करून उपासना करीत असतात.

[जगांत आढळून येणाऱ्या दैवी व राक्षसी स्वभावाच्या पुरुषांचें येथें जें संक्षिप्त वर्णन आहे त्याचा विस्तार पुढें सोळाव्या अध्यायांत केला आहे. ज्ञानयज्ञ म्हणजे परमेश्वरस्वरूपाचें ज्ञानानेंच आकलन करून तद्द्वारा सिद्धि मिळविणें असा अर्थ आहे हें पूर्वीं सांगितलेंच आहे. (गी. ४.३३ वरील टीप पहा). पण परमेश्वराचें हें ज्ञानहि द्वैताद्वैतादि-भेदानें अनेक प्रकारचें असूं शकतें; व त्यामुळें ज्ञानयज्ञहि निरनिराळ्या प्रकारें होऊं शकतात. परंतु ज्ञानयज्ञ जरी याप्रमाणें अनेक असले तरी परमेश्वर विश्वतोमुख असल्यामुळें हे सर्व यज्ञ त्यालाच पोंचतात असें १५ व्या श्लोकाचें तात्पर्य आहे. 'एकत्वानें,' 'पृथक्त्वानें,' वगैरे पदां-वरून, द्वैताद्वैतविशिष्टाद्वैतादि संप्रदाय जरी अर्वाचीन आहेत तरी या कल्पना प्राचीन आहेत असें उघड होतें. परमेश्वराचें या श्लोकांत जें एकत्व व पृथक्त्व सांगितलें त्याचेंच आतां जास्त निरूपण करून पृथ-क्त्वांत एकत्व कोणतें तेंहि सांगतात—]

(१६) क्रतु म्हणजे श्रौत यज्ञ मी, यज्ञ म्हणजे स्मार्त यज्ञ मी, स्वधा म्हणजे श्राद्धांत पितरांस अर्पण केलेलें अन्न मी, औषध म्हणजे वनस्पती-

पिताहमस्य जगतो माता धाता पितामहः ।
वेद्यं पवित्रमोंकार ऋक् साम यजुरेव च ॥ १७ ॥
गतिर्भर्ता प्रभुः साक्षी निवासः शरणं सुहृत् ।
प्रभवः प्रलयः स्थानं निधानं बीजमव्ययम् ॥ १८ ॥
तपाम्यहमहं वर्षं निगृह्णाम्युत्सृजामि च ।
अमृतं चैव मृत्युश्च सदसच्चाहमर्जुन ॥ १९ ॥

पासून ( यज्ञार्थ ) उत्पन्न झालेलें अन्न मी, (यज्ञांत हवन करितांना म्हणतात ते) मंत्र मी, तूप मी, अग्नि मी, आणि (अग्नींत टाकिलेल्या) आहुति मीच.

[ क्रतु व यज्ञ हे दोन शब्द मूळांत समानार्थकच आहेत. पण ' यज्ञ ' शब्दाचा अर्थ पुढें व्यापक होऊन देवपूजा, वैश्वदेव, अतिथिसंतर्पण, प्राणायाम, जप इत्यादि कर्मांसहि ' यज्ञ ' हीच संज्ञा ज्याप्रमाणें प्राप्त झाली ( गी. ४. २३–३० ), त्याप्रमाणें ' क्रतु ' शब्दाचा अर्थ वाढत गेलेला नाहीं. श्रौतधर्मांत अश्वमेधादि ज्या यज्ञांस हा शब्द लाविलेला आहे तोच त्याचा अर्थ पुढेंहि कायम राहिला आहे. म्हणून या ठिकाणीं ' क्रतु ' शब्दानें ' श्रौत ' यज्ञ व ' यज्ञ ' शब्दानें ' स्मार्त ' यज्ञ समजावे, असें शांकरभाष्यांत म्हटलें आहे; व तोच अर्थ आम्हीं वर दिला आहे. कारण असा भेद न केला तर ' क्रतु ' व ' यज्ञ ' हे शब्द समानार्थक होऊन या श्लोकांत त्यांची निष्कारण द्विरुक्ति केल्याचा दोष येतो. ]

(१७) या जगताचा पिता, माता, धाता ( आधार ), पितामह ( आजा ) मी, जें काय पवित्र किंवा जें कांहीं ज्ञेय आहे तें आणि ॐकार, ऋग्वेद, सामवेद व यजुर्वेदहि मी, (१८) ( सर्वांची ) गति, ( सर्वांचा ) पोषक, प्रभु, साक्षी, निवास, शरण, सखा, उत्पत्ति, प्रलय, स्थिति, निधान आणि अव्यय बीजहि मी. (१९) मी ऊन पाडितों, मी पाऊस

§§ त्रैविद्या मां सोमपाः पूतपापा यज्ञैरिष्ट्वा स्वर्गतिं प्रार्थयन्ते ।
आंखडितों आणि सोडितों; अमृत व मृत्यु, ( तसेंच ) सत् आणि असतहि हे अर्जुना ! मी आहें.

[ परमेश्वराच्या स्वरूपाचें याचसारखें वर्णन पुनः सविस्तर १०,११ व १२ या अध्यायांत आलें आहे. तथापि येथें केवळ विभूति न सांगतां परमेश्वराचा व जगांतील भूतांचा संबंध आईबाप, मित्र इत्यादिकांसारखा आहे, असें विशेष विधान केलें आहे, हा दोहोंकडल्या वर्णनांत थोडा भेद आहे. असो; पाऊस पाडणें व आंखडणें यांपैकीं एक क्रिया जरी आमच्या दृष्टीनें फायद्याची व दुसरी नुकसानीची असली तरी तात्त्विकदृष्ट्या दोन्ही परमेश्वरच करीत असतो हें लक्षांत ठेविलें पाहिजे. हाच अभिप्राय मनांत आणून पूर्वी ( गी. ७.१२ ) सात्त्विक राजस व तामस मिळून सर्व पदार्थ मीच उत्पन्न करितों असें भगवंतांनीं म्हटलें आहे; व पुढें १४ व्या अध्यायांत गुणत्रयविभागानें सृष्टींत नानात्व कसें उत्पन्न होतें याचें सविस्तर वर्णन केलें आहे. अशा दृष्टीनें पाहिलें म्हणजे २५ व्या श्लोकांतील सत् आणि असत् या दोन पदांचा अनुक्रमें 'चांगलें' व 'वाईट' असा अर्थ करितां येईल व पुढें ( गी. १७. २६–२८ ) एकदां तसा अर्थ गीतेंत केलेलाहि आहे. परंतु सत् म्हणजे अविनाशी आणि असत् म्हणजे विनाशी किंवा नाशवंत असे जे सामान्य अर्थ आहेत ( गी. २. १६ ) तेच या ठिकाणींहि अभिप्रेत असावे, व 'मृत्यु व अमृत' याप्रमाणें 'सत् व असत्' हे द्वंद्वात्मक शब्द ऋग्वेदांतील नासदीय सूक्तावरून सुचलेले असावे असें दिसतें. तथापि नासदीय सूक्तांत 'सत्' हा शब्द दृश्य सृष्टीस लाविला आहे, गीता 'सत्' शब्द परब्रह्मास लावित्ये व दृश्य सृष्टीस असत् म्हणत्ये असा भेद आहे ( गीतार. प्र. ९ पृ. २४१–२४३ पहा ). पण परिभाषेचा जरी याप्रमाणें भेद असला तरी

**ते पुण्यमासाद्य सुरेंद्रलोकमश्नन्ति दिव्यान्दिवि देवभोगान् ॥२०॥**
**ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति**
**एवं त्रयीधर्ममनुप्रपन्ना गतागतं कामकामा लभन्ते ॥ २१ ॥**

'सत्' आणि 'असत्' हे दोन्ही शब्द एकदम योजिले म्हणजे त्यांत दृश्य सृष्टि व परब्रह्म या दोहोंचाहि एकत्र समावेश होतो, हें उघड आहे. म्हणून परिभाषेच्या भेदानें तुम्हीं कोणालाहि 'सत्' व कोणालाहि 'असत्' म्हटलें तरी दोन्हीं परमेश्वराचींच रूपें आहेत असें दाखविण्यासाठीं 'सत्' आणि 'असत्' या शब्दांच्या व्याख्या न देतां 'सत्' आणि 'असत्' मीच असें मोघम वर्णन केलें आहे, असाहि या वर्णनाचा भावार्थ काढितां येईल (गी. ११.३७. व १३.१२ पहा). परमेश्वराचीं रूपें जरी याप्रमाणें अनेक असलीं तरी त्यांची एकत्वानें उपासना करणें व अनेकत्वानें उपासना करणें यांतील भेद काय हें आतां सांगतात—]

(२०) त्रैविद्य म्हणजे ऋक्, यजु व साम या तीन वेदांतील कर्मे करणारे जे सोमपि म्ह० सोमयाजी व निष्पाप (पुरुष) माझें यज्ञानें पूजन करून स्वर्गलोकप्राप्तीची इच्छा करितात, ते इंद्राच्या पुण्यलोकास पोंचून स्वर्गांत देवांचें अनेक दिव्य भोग उपभोगितात. (२१) आणि त्या विशाल स्वर्गलोकाचा उपभोग घेऊन पुण्याचा क्षय झाल्यावर ते पुनः जन्म घेऊन मृत्युलोकीं येतात. अशा प्रकारें त्रयी धर्म म्हणजे तीन वेदांतील यज्ञयागादि श्रौतधर्म पाळणाऱ्या व काम्य उपभोगाची इच्छा ठेवणाऱ्या लोकांस (स्वर्गाच्या) येरजाऱ्या प्राप्त होतात.

[यज्ञयागादि धर्म किंवा नाना प्रकारच्या देवतांचें आराधन यांनीं कांहीं काळ स्वर्गवास झाला तरी पुण्यांश सरल्यावर पुनः जन्म घेऊन भूलोकीं यावें लागतें हा सिद्धान्त पूर्वी पुष्कळदां आला आहे (गी. २. ४२–४४; ४. ३४; ६. ४१; ७. २३; ८. १६ व २५). मोक्ष अशा प्रकारचा

अनन्याश्चिंतयन्तो मां ये जनाः पर्युपासते ।
तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥ २२ ॥

नसून नित्य आहे. म्हणजे एकदां परमेश्वराप्रत पोंचल्यावर पुनः जन्ममरणाचा फेरा रहात नाहीं. महाभारतांत (वन. २६०) स्वर्गसुखाचें जें वर्णन आहे तेंहि असेंच आहे. परंतु यज्ञयागादिकानेंच पर्जन्यादिकांची उत्पत्ति होत असल्यामुळें यज्ञयाग सोडिल्यानें या जगांतील योगक्षेम म्हणजे निर्वाह कसा चालेल अशी शंका येत्ये (गी. २.४५ वरील टीप व गीतार. पृ. २९० पहा). म्हणून वरील श्लोकांना जोडूनच आतां त्याचें उत्तर सांगतात—]

(२२) जे अनन्यनिष्ट लोक माझें चिंतन करून मला भजतात त्या नित्य योगयुक्त पुरुषांचा योगक्षेम मी चालवीत असतों.

[न मिळालेली वस्तु मिळणें याचें नांव योग, व मिळविलेल्या वस्तूचें संरक्षण करणें म्हणजे क्षेम, अशी योगक्षेम याची व्याख्या शाश्वतकोशांतहि (१०० व २९२ श्लोक पहा) केलेली असून, त्याचा एकंदर अर्थ 'संसारांतील नित्य निर्वाह' असा आहे. कर्मयोगमार्गांत या श्लोकाचा अर्थ काय होतो याचा विचार गीतारहस्याच्या बाराव्या प्रकरणांत (पृ. ३८२, ३८३), केला आहे तो पहा. नारायणीय धर्मांतहि याचप्रमाणें—

मनीषिणो हि ये केचित् यतयो मोक्षधर्मिणः ।
तेषां विच्छिन्नतृष्णानां योगक्षेमवहो हरिः ॥

असें म्हटलें असून (म. भा. शां ३४८.७२), हे पुरुष एकान्तभक्त असले तरी प्रवृत्तिमार्गांतले म्हणजे निष्काम बुद्धीनें कर्मं करणारे असतात असें तेथें वर्णन आहे. असो, आतां परमेश्वराची बहुत्वानें जे सेवा करितात त्यांची अखेर वाट काय होत्ये तें सांगतात—]

§§ येऽप्यन्यदेवताभक्ता यजन्ते श्रद्धयान्विताः ।
तेऽपि मामेव कौंतेय यजन्त्यविधिपूर्वकम् ॥ २३ ॥
अहं हि सर्वयज्ञानां भोक्ता च प्रभुरेव च ।
न तु मामभिजानन्ति तत्त्वेनातश्च्यवन्ति ते ॥ २४ ॥

(२३) श्रद्धेनें युक्त होत्साते दुसऱ्या देवतांचे भक्त बनून जे यजन करितात तेहि हे कौंतेया ! विधिपूर्वक नसलें तरी (पर्यायानें) माझेंच यजन करितात; (२४) कारण सर्व यज्ञांचा भोक्ता व स्वामी मीच आहें. पण त्यांना माझें तत्त्वतः ज्ञान नाहीं म्हणून ते घसरत असतात.

[ या दोन श्लोकांतील सिद्धान्तांचें महत्त्व काय यांचें विवेचन गीतारहस्याच्या तेराव्या प्रकरणांत (पृ.४१८–४२१) केलें आहे तें पहा. कोणतीहि देवता घ्या, ती भगवंताचें एक प्रकारचें स्वरूप आहे, हें तत्त्व वैदिक धर्मांत फार प्राचीन काळापासून चालत आलें आहे. उदाहरणार्थ, ऋग्वेदांतच 'एकं सद्विप्रा बहुधा वदंत्यग्निं यमं मातरिश्वानमाहुः" (ऋ.१.१६४ ४६)–परमेश्वर एक असून त्याला पंडित लोक अग्नि, यम, मातरिश्वा (वायु) अशीं अनेक प्रकारचीं नांवें देत असतात,–असें म्हटलें आहे; आणि त्याला अनुसरूनच पुढील अध्यायांत परमेश्वर एक असतांहि त्याच्या अनेक विभूतींचें वर्णन केलें आहे. त्याचप्रमाणें महाभारतान्तर्गत नारायणीयोपाख्यानांत चतुर्विध भक्तांत कर्म करणारा एकान्तिक भक्त श्रेष्ठ (गी. ७. १९ वरील टीप पहा), असें सांगितल्यावर—

ब्रह्माणं शितिकंठं च याश्चान्या देवताः स्मृताः ।
प्रबुद्धचर्याः सेवन्तो मामेवैष्यन्ति यत्परम् ॥

"ब्रह्मदेव, शिव किंवा दुसऱ्या देवतांचें भजन करणारे साधु पुरुषहि मलाच येऊन पोंचतात" (म. भा. शां. ३४१. ३५),—असें म्हटलें असून, गीतेंतील वरील श्लोकांचा अनुवाद भागवतपुराणांतहि केलेला

यान्ति देवव्रता देवान् पितृन्यान्ति पितृव्रताः
भूतानि यान्ति भूतेज्या यान्ति मद्याजिनोऽपि माम् ॥ २५ ॥

आहे ( भाग. १० पृ. ४० ८–१० पहा. ). तसेंच पुनः नारायणीयोपाख्यानांत पुढें—

ये यजन्ति पितॄन् देवान् गुरूंश्चैवातिथींस्तथा ।
गाश्चैव द्विजमुख्यांश्च पृथिवीं मातरं तथा ॥
कर्मणा मनसा वाचा विष्णुमेव यजन्ति ते ।

"देव, पितर, गुरु, अतिथि, ब्राह्मण, गाई वगैरेंची सेवा करणारे पर्यायानें विष्णूचेंच यजन करितात" असें सांगितलें आहे ( म. भा. शां. ३४५.२६,२७) भक्ति मुख्य धरून देवतारूप प्रतीक गौण होय, किंवा विधिभेद असला तरी उपासना एकाच परमेश्वराची होत्ये असें याप्रमाणें भागवतधर्म स्पष्ट सांगत असतां, भागवतधर्मीयांनीं सुद्धां शैवाशीं तंटे करीत बसावें हें आश्चर्य आहे ! असो; कोणत्याहि देवतेची उपासना केली तरी ती भगवंतास पोंचत्ये, हा सिद्धान्त जरी खरा आहे तरी देवता एकच हें ज्ञान न झाल्यामुळें मोक्षाची वाट सुटली जाऊन निरनिराळ्या देवतांच्या उपासकांस त्यांच्या त्यांच्या भावाप्रमाणें भगवानच निरनिराळीं फळें कशीं देतात तें आतां सांगतात—]

(२५) देवांचें व्रत करणारे देवांस, पितरांचें व्रत करणारे पितरांस, ( निरनिराळ्या ) भूतांचीं पूजा करणारे ( त्या त्या ) भूतांस, आणि माझें यजन करणारे मला येऊन पोंचतात.

[सारांश, एकच परमेश्वर जरी सर्वत्र भरला आहे तरी उपासनेचें फल ज्याच्या त्याच्या भावाप्रमाणें कमीजास्त योग्यतेचें मिळत असतें. तथापि फल देण्याचें कामहि देवता करीत नसून परमेश्वर करितो असें जें पूर्वीं सांगितलें आहे ( गी. ७. २०–२३) तें विसरतां कामा नये. वर २४ व्या श्लोकांत "सर्व यज्ञांचा भोक्ता मीच आहे" असें जें भगवं-

§§ पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति।
तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः ॥ २६ ॥

तांनीं म्हटलें आहे त्यांतील तात्पर्य हेंच होय. महाभारतांतहि—

यस्मिन् यस्मिंश्च विषये यो यो याति विनिश्चयम्
स तमेवाभिजानाति नान्यं भरतसत्तम ॥

"जो पुरुष ज्या ज्या भावाच्या ठिकाणीं निश्चित होतो तो त्या भावानुरूपच फल पावतो"–असें म्हटलें असून (शां.३५२.३) "यं यथा यथोपासते तदेव भवति" अशी श्रुति आहे (गी. ८. ६. वरील टीप पहा.) नानात्वानें म्हणजे अनेक देवतांची उपासना करणाऱ्यास काय फल मिळतें हें पहिल्या चरणांत सांगितल्यावर दुसऱ्या चरणांत भगवंताची अनन्यभावानें भक्ति करणारांसच खरी भगवत्प्राप्ति होते. हा अर्थ वर्णिला आहे. आतां भगवान् आपला भक्त आपल्याला काय समर्पण करितो इकडे न पाहतां केवळ त्याच्या भावाकडेच दृष्टि देऊन त्याच्या भक्तिचा स्वीकार करीत असतात हें भक्तिमार्गांतील महत्त्वाचें तत्त्व सांगतात—]

(२६) एखादें पान, फूल, फळ किंवा (यथाशक्ति) थोडें पाणीहि जो मला भक्तीनें अर्पण करितो, त्या प्रयतात्म म्हणजे नियतचित्त पुरुषाची ती भक्तीची भेट मी (आनंदानें) सेवन करितों.

[कर्मापेक्षां बुद्धि श्रेष्ठ (गी. २.४९) असें जें कर्मयोगांतील तत्त्व त्याचेंच भक्तिमार्गांतील रूपान्तर वरील श्लोकांत वर्णिलें आहे. (गीतार. प्र. १५ पृ. ४७०-४७३ पहा). यासंबंधानें सुदाम्याच्या पोह्यांची गोष्ट प्रसिद्ध असून भागवतपुराणांत हा श्लोक सुदामचरितोपाख्यानांतच आलेला आहे (भाग. १० उ. ८१. ४). पूजाद्रव्यें किंवा साहित्य पुष्कळ किंवा कमि असणें ही गोष्ट सर्वथैव व सर्वदा मनुष्याचे ताब्यां-

§§ यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत्।
यत्तपस्यसि कौंतेय तत्कुरुष्व मदर्पणम् ॥ २७ ॥
शुभाशुभफलैरेवं मोक्ष्यसे कर्मबंधनैः।
संन्यासयोगयुक्तात्मा विमुक्तो मामुपैष्यसि ॥ २८ ॥

तील असत्ये असें नाहीं. म्हणून यथाशक्ति प्राप्त होणाऱ्या अल्प पूजाद्रव्यानींच नव्हे, तर शुद्ध भावानें समर्पण केलेल्या मानसिक पूजाद्रव्यांनींहि भगवान् संतुष्ट होतात असें शास्त्रांत म्हटलें आहे. देव भावाचा भुकेला; पूजाद्रव्यांचा नव्हे. मीमांसक मार्गापेक्षां भक्तिमार्गांत जो कांहीं विशेष आहे तो हाच होय. यज्ञयाग करण्यास बराच द्रव्यसंग्रह करावा लागत असून खटाटोपहि पुष्कळ लागतो. पण भक्तियज्ञ एका तुळशीपत्रानेंहि होतो. दुर्वास घरीं आले तेव्हां द्रौपदीनें अशाच प्रकारचा यज्ञ करून भगवंतास संतुष्ट केल्याची गोष्ट महाभारतांत वर्णिली आहे. असो; आतां भगवद्भक्त आपलीं कर्में ज्या ज्याप्रमाणें करितो तसें करण्यास अर्जुनाला उपदेश करून त्यापासून काय फल होतें तें सांगतात—]

(२७) हे कौंतेया ! तूं जें करितोस; जें खातोस; जें हवन करितोस, जें दान करितोस, जें तप करितोस, तें (सर्व) मला अर्पण करीत जा.(२८) अशा प्रकारें वागल्यानें (कर्में करूनहि) कर्मांचीं शुभाशुभफलरूप जीं बंधनें त्यांपासून तुझी सुटका होईल, व (कर्मफलांत) संन्यास करण्याचा जो हा योग त्यानें युक्तात्मा म्हणजे शुद्धान्तःकरण आणि मुक्त होत्साता मला येऊन पोंचशील.

[ भगवद्भक्तानें देखील कृष्णार्पणबुद्धीनें सर्व कर्में करावयाचीं, सोडावयाचीं नाहींत हें यावरून उघड होतें; आणि अशा दृष्टीनें हे दोन श्लोक महत्त्वाचे आहेत. "ब्रह्मार्पणं ब्रह्म हविः" (गी. ४.२४) हें ज्ञानयज्ञाचें तत्त्वच आतां २७ व्या श्लोकांत भक्तीच्या परिभाषेप्रमाणें सांगितलें

§§ समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः ।
ये भजन्ति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम् ॥ २९ ॥
अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ।

आहे ( गीतार. प्र. १३ पृ. ४२९ व ४३० पहा ). “ मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्य ” ( गी. ३. ३० ) माझ्या ठिकाणीं सर्व कर्मांचा संन्यास करून –लढ, असें अर्जुनाला तिसऱ्याच अध्यायांत सांगितलें आहे; आणि पांचव्या अध्यायांत “ ब्रह्माचे ठायीं कर्में अर्पण करून संगरहित कर्में करणारास कर्मांचा लेप लागत नाहीं ” ( ५.१० ). असें पुनः ह्मटलें आहे. गीतेप्रमाणें हाच खरा संन्यास होत असून ( गी. १८.२ ) याप्र-माणें म्हणजे कर्मफलाशा सोडून ( संन्यस्य ) सर्व कर्में करणारा पुरुषच ‘ नित्यसंन्यासी ’ होय ( गी. ५.४ ); कर्मत्यागरूप संन्यास गीतेस संमत नाहीं. अशा रीतीनें कर्में मोक्षाला प्रतिबंधक नाहीत हें पूर्वी अनेक ठिकाणीं गी २. ६४; ३. १९; ४. २३; ४. १२; ६. १; ८५. सांगितलें असून तेंच पुनः या २८ व्या श्लोकांत सांगितलें आहे. भागवतपुरा-णांतहि नृसिंहरूप–भगवंतांनीं प्रल्हादास “ मय्यावेश्य मनस्तात कुरु कर्माणि मत्परः ” –माझ्या ठिकाणीं चित्त ठेवून सर्व कर्में कर–असा उपदेश केला असून ( भाग. ७.१०.२३. ), पुढें भगवद्भक्तानें सर्व कर्में नारायणार्पण करावीं असें एकादशस्कंधांत भक्तियोगाचें तत्त्व सांगितलें आहे. ( भाग. ११.२.३६ व ११.११.२४ पहा ). असो; भक्तीचा मार्ग सुखकारक व सुलभ असें या अध्यायाच्या आरंभीं वर्णन केलें आतां त्यांतील समत्वरूपी जो दुसरा मोठा विशिष्ट गुण त्याचें वर्णन करितात—]

( २९ ) मी सर्व भूतांना सारखा आहें. मला ( अमुक एक ) द्वेष्य म्हणजे नावडता, आणि ( अमुक ) प्रिय म्हणजे आवडता नाहीं. तर जे मालें भक्तीनें भजन करितात ते माझ्या ठायीं, आणि मीहि त्यांच्या ठायीं

साधुरेव स मंतव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ॥ ३० ॥
क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छान्तिं निगच्छति ।
कौंतेय प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणश्यति ॥ ३१ ॥
मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः ।
स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम् ॥ ३२ ॥
किं पुनर्ब्राह्मणाः पुण्या भक्ता राजर्षयस्तथा ।

असतो. (३०) मोठा दुराचारी का असेना, मला जर तो अनन्यभावानें भजत आहे, तर तो साधुच समजला पाहिजे. कारण त्याच्या बुद्धीचा निश्चय चांगला झालेला असतो. (३१) तो लवकर धर्मात्मा होतो व नित्य शान्ति पावतो. हे कौंतेया तूं असें पक्कें समज कीं, माझा भक्त (कधींहि) नाश पावत नाहीं.

[भगवद्भक्त दुराचारी असले तरी भगवंताला प्रियच असतात असा तिसाव्या श्लोकाचा अर्थ समजावयाचा नाहीं. भगवान् एवढेंच सांगतात कीं प्रथम एखादा मनुष्य दुराचारी असला तरी एकदां त्याची बुद्धि निश्चयानें परमेश्वराकडे वळली म्हणजे त्याचे हातून पुढें कोणतेंहि दुष्कर्म होणें शक्य नाहीं; आणि मग तो हळूहळू धर्मात्मा होऊन सिद्धि पावतो व या सिद्धीनें त्याच्या पापाचा अखेर पूर्ण नाश होतो. सारांश, सहाव्या अध्यायांत (६.४४) कर्मयोग जाणण्याची नुसती इच्छा झाली तरी चरकांत घातल्याप्रमाणें अवश होऊन मनुष्य शब्दब्रह्मापलीकडे जातो असा सिद्धान्त केला आहे, तोच आतां भक्तिमार्गाला लागू करून दाखविला आहे. परमेश्वर सर्व भूतांना सारखा कसा याचीच आतां जास्त फोड करितात—]

(३२) कारण, हे पार्था! माझा आश्रय करून स्त्रिया, वैश्य व शूद्र, किंवा (अंत्यजादि—) जे पापयोनि असतील ते देखील परमगति पावतात.

अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम् ॥ ३३ ॥

(३३) मग जे पुण्यवान ब्राह्मण, तसेच राजर्षि (क्षत्रिय), माझे भक्त आहेत त्यांची गोष्ट कशास पाहिजे? या अनित्य व असुख म्हणजे दुःखकारक (मृत्यु) लोकीं तूं आहेस म्हणून मला भज.

[३२ व्या श्लोकांत 'पापयोनि' असा जो शब्द आहे तो स्वतंत्र न मानितां स्त्रिया, वैश्य व शूद्र यांसहि लागू पडतो, कारण पूर्वी कांहीं तरी पाप असें केलें असल्याखेरीज स्त्री–वैश्य–शूद्रांच्या जन्मास कोणीहि येत नाहीं, असें कित्येक टीकाकारांनीं म्हटलें आहे. त्यांच्या मतें पापयोनि हा सामान्य शब्द असून स्त्री, वैश्य, शूद्र हे त्याचे भेद उदाहरणार्थ दिलेले आहेत. पण आमच्या मतें हा अर्थ बरोबर नाहीं. पापयोनि शब्दानें अलीकडे सरकारदरबारांत ज्यांना 'गुन्हेगार जाती' असें म्हणतात तशा प्रकारचा अर्थ विवक्षित असून, त्या जातींतील लोकांनाहि भगवद्भक्तीनें सिद्धि मिळत्ये असा या श्लोकांतील सिद्धान्त आहे. स्त्री, वैश्य, शूद्र या वर्गांतले नसून त्यांना मोक्ष प्राप्त होण्यास जी हरकत आहे ती वेदश्रवणास ते अनधिकारी आहेत म्हणून आलेली आहे; आणि म्हणूनच भागवतपुराणांत–

स्त्रीशूद्रद्विजबंधूनां त्रयी न श्रुतिगोचरा ।
कर्मश्रेयसि मूढानां श्रेय एवं भवेदिह ।
इति भारतमाख्यानं कृपया मुनिना कृतम् ॥

"स्त्रिया शूद्र किंवा कलियुगांतील नामधारी ब्राह्मण यांच्या कानीं वेद पडत नसल्यामुळें ते मूढ राहूं नयेत म्हणून व्यासमुनींनें कृपाळु होऊन महाभारत– अर्थात् गीताहि–मुद्दाम त्यांच्या कल्याणार्थ रचिलें"–असें म्हटलें आहे (भाग. १.४.२५). भगवद्गीतेंतले वरील श्लोक थोड्या पाठभेदानें अनुगीतेंतहि आलेले आहेत (म. भा. अश्व. १९.६१,६२). जातीचा, वर्णाचा, स्त्रीपुरुषादिकांचा किंवा काळ्या गोऱ्या रंगाचा वगैरे

§§ मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।
मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायणः ॥ ३४ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे राजविद्याराजगुह्ययोगो नाम नवमोऽध्यायः ॥ ९ ॥

---

## दशमोऽध्यायः ।

श्रीभगवानुवाच ।

भूय एव महाबाहो शृणु मे परमं वचः ।

कोणताच भेद न ठेवितां सर्वांस एकच सद्गति देणारा भगवद्भक्तीचा जो हा राजमार्ग त्याची खरी महती महाराष्ट्रांतील संतमंडळीच्या इतिहासावरून कोणासहि कळून येईल. वरील श्लोकाचा जास्त खुलासा गीतारहस्य प्र. १३ पृ. ४३६–४३८ मध्यें केला आहे तो पहा. जशा प्रकारचा हा धर्म आचरण करण्याबद्दल अर्जुनास ३३ व्या श्लोकाच्या उत्तरार्धांत जो उपदेश आहे तोच पुढील श्लोकांत चालू आहे.]

(३४) माझ्या ठिकाणीं मन ठेव, माझा भक्त हो, माझें यजनपूजन कर, आणि मला नमस्कार कर. याप्रमाणें मत्परायण होऊन आपला योग चालविलास म्हणजे मलाच येऊन पोंचशील.

[ वास्तवीक म्हटलें म्हणजे ३३ व्या श्लोकांतच या उपदेशास सुरुवात झाली आहे. प्रकृतीचा पसारा किंवा नामरूपात्मक दृश्य सृष्टि अनित्य आणि परमात्माच काय तो नित्य, असा जो अध्यात्मशास्त्राचा सिद्धान्त त्याला अनुसरून 'अनित्य' हें पद ३३ व्या श्लोकांत आलेलें आहे, व 'असुख' या पदानें या संसारांत सुखापेक्षां दुःख अधिक आहे या सिद्धान्ताचा अनुवाद आहे. तथापि हें वर्णन अध्यात्मांतलें नव्हे,

यत्तेऽहं प्रीयमाणाय वक्ष्यामि हितकाम्यया ॥ १ ॥
न मे विदुः सुरगणाः प्रभवं न महर्षयः ।

भक्तिमार्गातलें आहे. म्हणून परब्रह्म किंवा परमात्मा हे शब्द न योजितां 'मला भज, माझ्या ठायीं मन ठेव, मला नमस्कार कर,' असा व्यक्त-स्वरूपाचा दर्शक प्रथमपुरुषी निर्देश भगवंतांनीं केला आहे. याप्रमाणें भक्ति करून मत्परायण होशील तर आपला योग म्हणजे कर्मयोग चालविलास (गीता ७.१ पहा) म्हणजे तूं कर्मबंधनापासून मुक्त होऊन निःसंशय मला मिळशील असें भगवंताचें शेवटचें सांगणें आहे; आणि याच उपदेशाची पुनरावृत्ति पुढें ११ व्या अध्यायाच्या अखेर केलेली आहे. सर्व गीतेचें रहस्य हेंच होय. एकदां तें अध्यात्मदृष्ट्या व एकदां भक्ति-दृष्ट्या सांगितलें एवढाच काय तो भेद आहे. ]

याप्रमाणें श्रीभगवंतांनीं गाइलेल्या म्हणजे सांगितलेल्या उपनिष-दांत ब्रह्मविद्यान्तर्गत योग-म्हणजे कर्मयोग-शास्त्रावरील श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या संवादांतील राजविद्याराजगुह्ययोग नांवाचा नववा अध्याय समाप्त झाला.

---

## अध्याय दहावा.

[ कर्मयोगसिद्ध्यर्थ परमेश्वराच्या व्यक्त स्वरूपाच्या उपासनेचा जो राजमार्ग मागील अध्यायांत सांगितला त्यांतील वर्णन या अध्यायांत पुढें चालू असून, अर्जुनाच्या प्रश्नावरून परमेश्वराच्या अनेक व्यक्त रूपांचें किंवा विभूतींचें अखेर वर्णन आहे; व हें ऐकून त्याप्रमाणें प्रत्यक्ष रूप पहाण्याची इच्छा अर्जुनास झाली, म्हणून पुढील ११ व्या अध्यायांत त्याला भगवंतांनीं विश्वरूप दाखवून कृतार्थ केलें आहे. ]

श्रीभगवान् म्हणाले-(१) हे महाबाहो ! (माझ्या भाषणानें) संतुष्ट होणाऱ्या तुला तुझ्या हितार्थ जी पुनश्च (एक) उत्तम गोष्ट मी आतां सांगतों,

अहमादिर्हि देवानां महर्षीणां च सर्वशः ॥ २ ॥
यो मामजमनादिं च वेत्ति लोकमहेश्वरम् ।
असंमूढः स मर्त्येषु सर्वपापैः प्रमुच्यते ॥ ३ ॥
§§ बुद्धिर्ज्ञानमसंमोहः क्षमा सत्यं दमः शमः ।
सुखं दुःखं भवोऽभावो भयं चाभयमेव च ॥ ४ ॥
अहिंसा समता तुष्टिस्तपो दानं यशोऽयशः ।
भवन्ति भावा भूतानां मत्त एव पृथग्विधाः ॥ ५ ॥

ती ऐक. (२) माझी उत्पत्ति देवांच्या गणांना आणि महर्षींनाहि कळत नाहीं कारण देवांचें आणि महर्षींचें सर्व प्रकारें मीच आदिकारण (आहे). (३) मी (पृथिव्यादि सर्व) लोकांचा मोठा ईश्वर असून मला जन्म व आदि नाहीं असें जो जाणितो, तोच मनुष्यांमध्यें मोहविरहित होऊन सर्व पापांपासून मुक्त होतो.

[देवांच्याहि पूर्वी भगवान् किंवा परब्रह्म आहे, देव मागून झाले, हा विचार ऋग्वेदाच्या नासदीय सूक्तांत आलेला आहे (गीतार. प्र. ९ पृ. २५२ पहा). असो; याप्रमाणें प्रस्तावना झाली. आतां मी सर्वांचा महेश्वर कसा याचें भगवान् निरूपण करितात—]

(४) बुद्धि, ज्ञान, असंमोह, क्षमा, सत्य, दम, शम, सुख, दुःख, भव (उद्भव), अभाव (नाश), तसेंच भय आणि अभय, (५) अहिंसा, समता, तुष्टि (संतोष), तप, दान, यश, अयश इत्यादि अनेक प्रकारचे प्राणिमात्रांचे भाव माझ्याचपासून उत्पन्न होतात.

['भाव' या शब्दाचा अर्थ 'अवस्था', 'स्थिति' किंवा 'वृत्ति' असा असून, सांख्यशास्त्रांत 'बुद्धीचे भाव' व 'शारीरिक भाव' असा त्यांचा भेद केला आहे. सांख्यशास्त्री पुरुष अकर्ता व बुद्धि हा प्रकृतीचा एक विकार मानीत असल्यामुळें, लिंगशरीरास पशुपक्ष्यादिकांचें निरनिराळे

महर्षयः सप्त पूर्वे चत्वारो मनवस्तथा ।
मद्भावा मानसा जाता येषां लोक इमाः प्रजाः ॥ ६ ॥

जन्म प्राप्त होण्यास लिंगशरीरांत असलेल्या बुद्धीच्या निरनिराळ्या अवस्था किंवा भाव हेंच कारण होय असें त्यांचें म्हणणें आहे (गीतार. प्र. १८८; व सां. का. ४०–५५ पहा); व तेच भाव बहुतेक वरील दोन श्लोकांत वर्णिले आहेत. परंतु प्रकृति व पुरुष यांच्याहि पलीकडे परमात्मरूपी एक नित्य तत्त्व असून नासदीय सूक्तांत वर्णिल्याप्रमाणें त्याच्याच मनांत सृष्टि निर्माण करण्याची इच्छा उत्पन्न होऊन पुढें सर्व दृश्य जगत् उत्पन्न होतें असा वेदान्त्यांचा सिद्धान्त असल्यामुळें सृष्टींतील मायात्मक सर्व पदार्थ हे परब्रह्माचे मानस भाव आहेत असें वेदान्तशास्त्रांतहि म्हणत असतात (पुढील श्लोक पहा). तप, दान, यश इत्यादि शब्दांनीं तन्निष्ठक बुद्धीचे भावच समजावयाचे. असो; भगवान् आणखी सांगतात कीं—

(६) सात महर्षि, पूर्वींचे चार, तसेच मनु, ज्यांच्यापासून (या) लोकामध्यें ही प्रजा झाली, ते माझेच मानस म्हणजे मनानें निर्माण केलेले भाव होत.

[या श्लोकांतील शब्द सोपे असले तरी ज्या पौराणिक पुरुषांस उद्देशून हा श्लोक आहे त्यांच्यासंबंधानें टीकाकारांमध्यें पुष्कळच मतभेद आहे. विशेषतः 'पूर्वींचे' (पूर्वे) आणि 'चार' (चत्वारः) या पदांचा अन्वय कोणत्या पदांशीं लावावयाचा याचा निर्णय अनेकांनीं अनेक प्रकारें केला आहे. सात महर्षि प्रसिद्ध आहेत; पण ब्रह्मदेवाच्या एका कल्पांत चवदा मन्वंतरें (गीतार. पृ. १९० पहा) असून त्या प्रत्येक मन्वंतराचा मनु, देव व सप्तर्षि निरनिराळे असतात (हरिवंश १. ७; विष्णु. ३. १; व मत्स्य. ९ पहा). म्हणून 'पूर्वींचे' हें सात महर्षींचें विशेषण कल्पून हल्लींच्या म्ह० वैवस्वत मन्वंतराच्या पूर्वींच्या

§§ एतां विभूतिं योगं च मम यो वेत्ति तत्त्वतः ॥

चाक्षुष मन्वंतरांतील सप्तर्षि येथें विवक्षित आहेत असा अर्थ कित्येकांनीं केला आहे. हे सप्तर्षि भृग्वादि म्ह० भृगु, नभ, विवस्वान्, सुधामा, विरजा, अतिनामा व सहिष्णु हे सात होत. परंतु आमच्या मतें हा अर्थ बरोबर नाहीं. कारण हल्लींच्या, म्हणजे वैवस्वत अथवा ज्या मन्वंतरांत गीता सांगितली त्याच्या पूर्वींच्या मन्वंतरांतले सप्तर्षि सांगण्याचें येथें कांहीं कारण नाहीं. म्हणून हल्लींच्या, मन्वंतरांतलेच सप्तर्षि घेतले पाहिजेत. यांचीं नांवें मरीचि, अंगिरस, अत्रि, पुलस्त्य, पुलह, क्रतु आणि वसिष्ठ अशीं महाभारताच्या शान्तिपर्वांत नारायणीयोपाख्यानांत दिलेलीं आहेत ) म. भा. शां. ३३५. २८, २९; ३४०. ६४ व ६५ ); व तींच या ठिकाणीं विवक्षित आहेत असें आमचें मत आहे. कारण नारायणीय किंवा भागवत धर्मच त्याच्या विधींसह गीतेंत प्रतिपाद्य केला आहे ( गीतार. पृ. ९ पहा ). तथापि येथें एवढें सांगणें जरूर आहे कीं, मरीच्यादि सप्तर्षींचीं वरील नांवें अंगिरसाच्या ऐवजीं भृगूपासून कधींकधीं दिलेलीं आढळतात; आणि कांहीं ठिकाणीं तर कश्यप, अत्रि, भरद्वाज, विश्वामित्र, गौतम, जमदग्नि व वसिष्ठ हे हल्लींच्या युगांतील सप्तर्षि होत असें वर्णन आहे ( विष्णु. ३.१.३२ व ३३; मत्स्य. ९.२७ व २८; म. भा. अनु. ९३.२१ ). मरीच्यादि वर दिलेल्या सात ऋषींतच भृगु व दक्ष यांची भर घालून विष्णुपुराणांत नऊ ( विष्णु १.७.५.६ ), आणि त्यांतच पुनः नारदाची भर घालून मनुस्मृतींत ब्रह्मदेवाचे दहा मानसपुत्र वर्णिले आहेत. ( मनु. १.३४, ३५ ); व मरीच्यादि शब्दांची व्युत्पत्ति भारतांत दिली आहे ( म. भा, अनु. ८५ ). परंतु सात महर्षि कोणते एवढेंच सध्यां आपल्याला पहाणें असल्यामुळें या नऊदहांहीं मानस पुत्रांचा किंवा त्यांच्या नामव्युत्पत्तींचा येथें विचार करण्याची जरूर नाहीं. 'पूर्वींचे' म्ह० पूर्वमन्वंतराचे सात महर्षि असा अर्थ लावितां येत नाहीं हें उघड आहे.

सोऽविकंपेन योगेन युज्यते नात्र संशयः ॥ ७ ॥

आतां ' पूर्वीचे चार ' हें मनूंचें विशेषण मानून जो अर्थ कित्येकांनीं लाविला आहे तो कितपत सयुक्तिक ठरतो तें पाहूं. एकंदर मन्वंतरें चवदा आणि या चवदांचे चवदा मनु असून त्यांत सातसातांचे दोन वर्ग आहेत. पहिल्या सातांचीं नांवें स्वायंभुव, स्वारोचिष, औत्तमी, तामस, रैवत, चाक्षुष आणि वैवस्वत अशीं असून यांस स्वायंभुवादि मनु असें म्हणतात ( मनु. १.६२ व ६१ ) यांपैकीं सहा मनु संपून हल्लीं सातवा म्हणजे वैवस्वत चालू आहे. हा संपला म्हणजे यापुढें जे सात मनु येणार ( भाग. ८.१३.७ ) त्यांस सावर्णि मनु अशी संज्ञा आहे; त्यांचीं नांवें सावर्णि, दक्षसावर्णि, ब्रह्मसावर्णि धर्मसावर्णि, रुद्र-सावर्णि, देवसावर्णि व इंद्रसावर्णि अशीं आहेत ( विष्णु. ३.२; भागवत ८.१३ हरिवंश. १.७ ). मनु याप्रमाणें प्रत्येकीं सात सात असतां कोणत्याहि वर्गांतील ' पूर्वीचे ' म्हणजे पहिले ' चार 'च गीतेंत कां विवक्षित असावे याचें कांहीं कारण सांगतां येत नाहीं. सावर्णि मनूं-पैकीं पहिला मनु सोडून पुढील चार म्हणजे दक्ष-,ब्रह्म-,धर्म-, व रुद्रसावर्णि हे एकाच कालीं उत्पन्न झाले अशी जी ब्रह्मांडपुराणांत ( ४.१ ) कथा आहे त्यावरून हे चार सावर्णि मनुच गीतेंत विवक्षित आहेत असें कित्येकांचें ह्मणणें आहे. पण यावर दुसरा असा आक्षेप येतो कीं, सावर्णि मनु हे सर्व पुढें होणारे असल्यामुळें " ज्याच्यापा-सून या लोकांमध्यें ही प्रजा झाली " हें भूतकालदर्शक पुढील वाक्य भावी सावर्णि मनूंस लावितां येत नाहीं. एतावता ' पूर्वीचे चार ' शब्दांचा संबंध ' मनु ' या पदाशीं जोडणें युक्त होत नाहीं. म्हणून ' पूर्वीचे चार ' हे दोन्ही शब्द स्वतंत्ररीत्या पूर्वीच्या कोणत्या तरी चार चार ऋषींना किंवा पुरुषांना अनुलक्षून आहेत असें म्हणावें लागतें-आणि असें म्हटलें म्हणजे पूर्वीचे चार कोणते हा प्रश्न सहजच उप-स्थित होतो. ज्या टीकाकारांनीं या श्लोकाचा अर्थ लाविला आहे

अहं सर्वस्य प्रभवो मत्तः सर्वं प्रवर्तते ।

त्यांच्या मतें सनक, सनंद, सनातन आणि सत्कुमार ( भागवत. ३.१२, ४ ) हेच ते चार ऋषि होत. पण या अर्थावर असा आक्षेप येतो कीं, हे चारी ऋषि यद्यपि ब्रह्मदेवाचे मानसपुत्र आहेत तरी ते सर्व जन्मतःच संन्यासी असून प्रजावृद्धि करीनात म्हणून ब्रह्मदेव त्यांच्यावर रागावला होता ( भाग ३. १२; विष्णु. १. ७ ) अर्थात् "ज्यांपासून या लोकांमध्यें ही प्रजा झाली"–येषां लोक इमाः प्रजाः– हें वाक्य या चार ऋषींस बिलकूल लागू पडत नाहीं. शिवाय हे ऋषि चार होते असें पुराणांतून जरी वर्णन आहे तरी भारतांत नारायणी म्ह० भागवत धर्मांत या चौघांत सनक, कपिल व सनत्सुजात या तिघांची भर घालून, हे सातहि ऋषि ब्रह्मदेवाचे मानसपुत्र असून पहिल्यापासूनच निवृत्तिधर्मांतले होते असें वर्णन आहे ( म. भा ३४०.६७.६८ ) सनकादि ऋषि याप्रमाणें सात धरिले म्हणजे त्यांपैकीं चारच येथें घेण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं. मग 'पूर्वींचे चार' कोण ? आमच्या मतें या प्रश्नाचें उत्तर नारायणीय किंवा भागवत धर्माच्या पुराणकथांवरूनच दिलें पाहिजे. कारण, भागवतधर्मच गीतेंत प्रतिपाद्य आहे हें आमच्या मतें निर्विवाद आहे. आतां भागवतधर्मांत सृष्टयुत्पत्तीची कोणत्या प्रकारची कल्पना होती हें पाहूं गेल्यास असें आढळून येईल कीं, मरीच्यादि सात ऋषींच्या पूर्वीं वासुदेव ( आत्मा ), संकर्षण ( जीव ), प्रद्युम्न ( मन ), आणि अनिरुद्ध ( अहंकार ) या चार मूर्ति उत्पन्न झालेल्या होत्या, व त्यांपैकीं शेवटच्या अनिरुद्धापासून म्हणजे ब्रह्मदेवापासून पुढें मरीच्यादि पुत्र निर्माण झाले असें म्हटलें आहे ( म. भा. शां. ३३९.३४–४० व ६०–७२;३४०. २७–३१ ) वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न व अनिरुद्ध या चार मूर्तींसच 'चतुर्व्यूह' ही संज्ञा असून, या चार मूर्ति स्वतंत्र होत्या असें भागवतधर्मांतील एका पंथाचें मत आहे; आणि दुसरे कांहीं

इति मत्वा भजन्ते मां बुधा भावसमन्विताः ॥ ८ ॥

यांपैकीं तीन किंवा दोन प्रधान मानितात. पण या कल्पना भगवद्गीतेस मान्य नसून गीता एकव्यूहपंथाची, म्हणजे एकाच परमेश्वरापासून चतुर्व्यूहादि सर्व कांहीं झालें असें प्रतिपादन करणारी आहे, असें आम्हीं गीतारहस्यांत दाखविलें आहे ( गीतार. पृ. १९२ व ५३३ पहा ) म्हणून व्यूहात्मक वासुदेवादि मूर्ति स्वतंत्र न मानितां, हे चारी व्यूह एकाच परमेश्वराचे म्ह० सर्वव्यापी वासुदेवाचे ( गी. ७. १९ ) ‘ भाव ’ आहेत असें या श्लोकांत विधान केलें आहे. अशा दृष्टीनें पाहिलें म्हणजे ‘ पूर्वींचे चार ’ हे शब्द भागवतधर्माप्रमाणें सप्तर्षींच्या पूर्वीं उत्पन्न झालेल्या वासुदेवादि चतुर्व्यूहास अनुलक्षून आहेत असें दिसून येईल. भागवतधर्मांचे चतुर्व्यूहादि भेद पूर्वीपासून प्रचारांत होते, असें भारतांतच सांगितलें आहे ( म. भा. शां. ३४८. ५७ ); आम्हीं ही कल्पना नवीन काढलेली नाहीं. सारांश, ‘ सात महर्षि म्ह० मरीच्यादि, पूर्वींचे चार ’ म्ह० वासुदेवादि चतुर्व्यूह आणि ‘ मनु ’ म्ह० तत्कालपूर्वीं झालेले आणि तत्कालीं वर्तमान मिळून स्वायंभुवादि सात मनु, असा भारतांतील नारायणीयाख्यानानुसार आम्ही या श्लोकाचा अर्थ लावितों. अनिरुद्ध म्हणजे अहंकार आदिकरून चारी मूर्ति परमेश्वराचे पुत्र मानण्याची कल्पना भारतांत दुसरे ठिकाणींहि आलेली आहे ( म. भा. शां ३११. ७,८ पहा ). परमेश्वराचे भाव सांगितले; आतां हे जाणून उपासना केल्यानें काय फल मिळतें तें सांगतात—]

(७) माझी ही विभूति म्हणजे विस्तार, आणि योग म्हणजे हा विस्तार करण्याची युक्ति अगर सामर्थ्य, यांतील तत्त्व जो जाणितो, त्याला स्थिर ( कर्म- ) योग प्राप्त होतो यांत संशय नाहीं. (८) मी सर्वांचें उत्पत्तिस्थान, व माझ्यापासून सर्व वस्तूंची प्रवृत्ति, हें जाणून शहाणे पुरुष भाव-

मच्चित्ता मद्गतप्राणा बोधयन्तः परस्परम् ।
कथयन्तश्च मां नित्यं तुष्यन्ति च रमन्ति च ॥ ९ ॥
तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् ।
ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयान्ति ते ॥ १० ॥
तेषामेवानुकंपार्थमहमज्ञानजं तमः ।
नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता ॥ ११ ॥

युक्त होत्साते मला भजत असतात. (९) माझ्या ठिकाणीं चित्त लावून, व माझ्या ठायीं जीवप्राण ठेवून, एकमेकाला बोध करीत व माझ्या कथा सांगत, (त्यांतच) नेहमीं संतुष्ट व रममाण असतात. (१०) याप्रमाणें नेहमीं युक्त म्हणजे समाधानानें राहून प्रीतिपूर्वक मला भजणाऱ्या लोकांस ते मला येऊन पोंचतील असा (समत्व) बुद्धीचा योग मीच देत असतों (११) आणि त्यांवर अनुग्रह करण्यासाठींच मी त्यांच्या आत्मभावांत म्हणजे अंतःकरणांत शिरून तेजस्वी ज्ञानदीपानें (त्यांच्या मनांत) अज्ञानापासून उत्पन्न झालेल्या अंधकाराचा नाश करितों.

[ सातव्या अध्यायांत निरनिराळ्या देवतांवरील श्रद्धा देखील परमेश्वरच देतो असें जें म्हटलें आहे ( ७. २१ ) त्याप्रमाणेंच आतांहि भक्तिमार्गास लागलेल्या मनुष्याची समत्वबुद्धि वाढविण्याचें कामहि परमेश्वरच करितो असें वर दहाव्या श्लोकांत वर्णन असून, कर्मयोगाची एकदां जिज्ञासा झाल्यावर मनुष्य चरकांत घातल्याप्रमाणें पूर्ण सिद्धीकडे ओढिला जातो असें जें पूर्वीं ( गी. ६. ४४ ) वर्णन आलें आहे त्याशीं भक्तिमार्गांतील हा सिद्धान्त समानार्थक आहे ज्ञानदृष्ट्या म्हणजे कर्मविपाकप्रक्रियेप्रमाणें हें कर्तृत्व आत्मस्वातंत्र्यामुळें प्राप्त होतें असें म्हणतात. पण आत्मा तरी परमेश्वरच; म्हणून भक्तिमार्गांत हीं फलें किंवा बुद्धि परमेश्वरच ज्याच्या त्याच्या पूर्वकर्माप्रमाणें देतो असें वर्णन येत असतें ( गी. ७. २० व गीतार. प्र. १३ पृ. २२५ पहा ). याप्रमाणें भगवंतांनीं भक्तिमार्गांतील तत्त्व सांगितल्यावर—]

अर्जुन उवाच ।

§§ परं ब्रह्म परं धाम पवित्रं परमं भवान् ।
पुरुषं शाश्वतं दिव्यमादिदेवमजं विभुम् ॥ १२ ॥
आहुस्त्वामृषयः सर्वे देवर्षिर्नारदस्तथा ।
असितो देवलो व्यासः स्वयं चैव ब्रवीषि मे ॥ १३ ॥
सर्वमेतदृतं मन्ये यन्मां वदसि केशव ।
न हि ते भगवन्व्यक्तिं विदुर्देवा न दानवाः ॥ १४ ॥
स्वयमेवात्मनात्मानं वेत्थ त्वं पुरुषोत्तम ।
भूतभावन भूतेश देवदेव जगत्पते ॥ १५ ॥
वक्तुमर्हस्यशेषेण दिव्या ह्यात्मविभूतयः ।
याभिर्विभूतिभिर्लोकानिमांस्त्वं व्याप्य तिष्ठसि ॥ १६ ॥
कथं विद्यामहं योगिंस्त्वां सदा परिचिंतयन् ।
केषु केषु च भावेषु चिन्त्योऽसि भगवन्मया ॥ १७ ॥

अर्जुन म्हणाला-(१२) तुम्हीच परम ब्रह्म, श्रेष्ठ स्थान व परम पवित्र वस्तु (आहां); दिव्य व शाश्वत पुरुष, आदिदेव, अजन्मा, सर्वविभु म्हणजे सर्व-व्यापी असें (१३) तुम्हांला सर्व ऋषि, तसेंच देवर्षि नारद, असित, देवल आणि व्यासहि म्हणतात; आणि स्वतः तुम्हीहि मला तेंच सांगतां. (१४) हे केशवा! तुम्ही मला जें हें सांगतां तें सर्व मी सत्य मानितों. भगवान्! तुमची व्यक्ति म्हणजे तुमचें मूळ देवांना माहीत नाहीं आणि दैत्यांना माहीत नाहीं. (१५) हें सर्व भूतें उत्पन्न करणाऱ्या भूतेशा! देवदेवा जगत्पते! तुम्ही हे पुरुषोत्तमा! स्वतःच आपण आपल्याला जाणितां; (१६) म्हणून तुमच्या ज्या दिव्य विभूति आहेत, ज्या विभूतींनीं हे सर्व लोक व्यापून तुम्ही राहिला आहां, त्या आपणच मला (कृपा करून) पूर्णपणें सांगा. (१७) हे योगिन्! सदा तुमचें चिंतन करीत असतां

विस्तरेणात्मनो योगं विभूतिं च जनार्दन ।
भूयः कथय तृप्तिर्हि शृण्वतो नास्ति मेऽमृतम् ॥ १८ ॥

श्रीभगवानुवाच ।

§§ हंत ते कथयिष्यामि दिव्या ह्यात्मविभूतयः ।
प्राधान्यतः कुरुश्रेष्ठ नास्त्यंतो विस्तरस्य मे ॥ १९ ॥

तुम्हांला मीं कसें ओळखावें ? आणि हे भगवान् ! कोणकोणत्या पदार्थांमध्यें मीं तुमचें चिंतन करावें ? ( तें मला सांगा ). ( १८ ) हे जनार्दना ! आपली विभूति व योग पुनः मला विस्तारानें सांगा; कारण, अमृततुल्य ( हें तुमचें भाषण ) ऐकितां ऐकितां माझी तृप्ति होत नाहीं.

[ विभूति आणि योग हे शब्द याच अध्यायाच्या सातव्या श्लोकांत आलेले असून त्यांचाच अर्जुनानें येथें अनुवाद केला आहे. 'योग' शब्दाचा अर्थ पूर्वीं ( गी ७. २५ ) दिला आहे तो पहा. भगवंताच्या विभूति अर्जुन विचारितो याचें कारण निरनिराळया विभूतींचें देवता म्हणून ध्यान करण्याकरितां नव्हे, तर सदर विभूतींत सर्वव्यापी परमेश्वराचीच भावना ठेवण्याकरितां होय, असें जें सतराव्या श्लोकांत म्हटलें आहे तें लक्षांत ठेविलें पाहिजे. कारण, एकच परमेश्वर सर्व ठिकाणीं आहे हें ओळखणें आणि परमेश्वराच्या निरनिराळया विभूति निरनिराळया देवता आहेत असे मानणें, यांत भक्तिमार्गदृष्टया महदंतर आहे हें भगवंतांनीं पूर्वींच ( गी. ७.२०–२५, ९. २२–२८ ) सांगितलें आहे. ]

श्रीभगवान् म्हणाले—(१९) बरें; तर आतां ज्या माझ्या दिव्य विभूति आहेत त्यापैकीं हे कुरुश्रेष्ठा ! मुख्य मुख्य तुला सांगतों; कारण माझ्या विस्ताराला अंत नाहीं.

अहमात्मा गुडाकेश सर्वभूताशयस्थितः ।
अहमादिश्च मध्यं च भूतानामंत एव च ॥ २० ॥
आदित्यानामहं विष्णुर्ज्योतिषां रविरंशुमान् ।
मरीचिर्मरुतामस्मि नक्षत्राणामहं शशी ॥ २१ ॥
वेदानां सामवेदोऽस्मि देवानामस्मि वासवः ।
इंद्रियाणां मनश्चास्मि भूतानामस्मि चेतना ॥ २२ ॥

[ या विभूतिवर्णनाप्रमाणेंच अनुशासनपर्वांत (१४. ३११–३२१) व अनुगीतेंत (अश्व. ४३ ज ४४) परमेश्वराच्या रूपाचें वर्णन आहे. पण गीतेंतलें वर्णन त्यापेक्षां अधिक सरस असल्यामुळें त्याचाच दुसऱ्या ठिकाणीं अनुवाद केलेला आढळून येतो. उदाहरणार्थ, भागवतपुराणाच्या एकादशस्कंधांतील सोळाव्या अध्यायांत याच प्रकारचें विभूतिवर्णन भगवंतांनीं उद्धवास निरूपिलें असून तें या अध्यायांतील वर्णनाप्रमाणें आहे असें तेथेंच (भाग. ११. १६. ६–८) आरंभीं म्हटलें आहे. ]

(२०) सर्व भूतांच्या अंतरीं असणारा आत्मा, हे गुडाकेशा! मी; आणि (सर्व) भूतांचा आदि, मध्य व अंतहि मी. (२१) (बारा) आदित्यांपैकीं विष्णु मी, तेजस्व्यांमध्यें किरणमाली सूर्य; (सात किंवा एकुणपन्नास) मरुतांत मरीचि मी आहें; नक्षत्रांत चंद्र मी. (२२) मी वेदांपैकीं सामवेद आहें; देवांपैकीं इंद्र आहें; आणि इंद्रियांमध्यें मन आहें; भूतांच्या ठायीं चेतना म्हणजे प्राणाची हालचाल मी आहें.

[ वेदांपैकीं सामवेद मी, म्हणजे सामवेद मुख्य, असें या ठिकाणीं जें वर्णन आहे, तद्वतच महाभारतांत अनुशासनपर्वांतहि (१४. ३१७) सामवेदश्च वेदानां यजुषां शतरुद्रीयम्" असें म्हटलें आहे. पण अनुगीतेंत 'ॐकारः सर्ववेदानां०' (अश्व. ४४ ६) असें ॐकारासच सर्व वेदांत श्रेष्ठत्व दिलें असून गीतेंतहि पूर्वीं (गी. ७. ८) "प्रणवः सर्ववेदेषु" असें सांगितलें आहे. तसेंच गीता ९. १७ यांत

रुद्राणां शंकरश्चास्मि वित्तेशो यक्षरक्षसाम् ।

" ऋक्सामयजुरेवच " या वाक्यांत सामवेदापेक्षां ऋग्वेदाला अग्रस्थान दिलें असून सामान्य समजूनहि तशीच आहे. हीं परस्परविरोधी विधानें होऊन त्यावर कित्येकांनीं बऱ्याच कल्पना लढविल्या आहेत. छांदोग्योपनिषदांत ॐकारालाच ' उद्गीथ ' हें नांव असून " हा उद्गीथ सामवेदाचें सार होय व सामवेद हा ऋग्वेदाचें सार होय " असें वर्णन आहे ( छां. १, १. २ ). छांदोग्यांतील या वाक्यानें सर्व वेदांत श्रेष्ठ कोण याबद्दलच्या वरील निरनिराळ्या विधानांची एकवाक्यता होऊं शकत्ये. कारण सामवेद झाला तरी त्यांतील मंत्र मूळ ऋग्वेदांतूनच घेतलेले आहेत. पण तेवढ्यावर संतुष्ट न होतां सामवेदाला गीतेंत या ठिकाणीं जे प्राधान्य दिलें आहे त्यांत कांहीं तरी गूढ कारण असलें पाहिजे असें कित्येकांचें म्हणणें आहे. छांदोग्योपनिषदांत सामवेदाला जरी प्राधान्य म्हटलें आहे तरी मनूनें " सामवेदाचा ध्वनि अशुचि होय " ( मनु. ४. १२४ ) असें दिलें आहे. ह्मणून सामवेदाला प्राधान्य देणारी गीता मनुच्या पूर्वीची असावी असें एकानें अनुमान केलें आहे; आणि दुसरा असें म्हणतो कीं, गीतेचा कर्ता सामवेदी असल्यामुळें त्यानें सामवेदाला या ठिकाणीं प्राधान्य दिलें असावें. परंतु " वेदांपैकीं सामवेद मी " याची उपपत्ति लावण्यास आमच्या मतें इतकें लांब जावयास नको. भक्तिमार्गांत परमेश्वराच्या गानपर स्तुतीस नेहमीं प्राधान्य दिलेलें असतें. उदाहरणार्थ, नारायणीय धर्मांत " वेदेषु सपुराणेषु सांगोपांगेषु गीयसे " ( म. भा. शां. ३४.२३ ) असें नारदानें भगवानाचें वर्णन केलें असून वसुराजा " जप्यं जगौ "—जप्य गात होता ( शां. ३३७. २७; आणि ३४२. ७० व ८१ पहा )—असा 'गै' धातूचाच प्रयोग पुनः केलेला आहे. म्हणून भक्तिपर धर्मांतून यज्ञयागादि क्रियात्मक वेदांपेक्षां गानपर म्हणजे सामवेदाला अधिक महत्त्व दिलें असल्यास त्यांत कांहीं आश्चर्य

वसूनां पावकश्चास्मि मेरुः शिखरिणामहम् ॥ २३ ॥
पुरोधसां च मुख्यं मां विद्धि पार्थ बृहस्पतिम् ।
सेनानीनामहं स्कंदः सरसामस्मि सागरः ॥ २४ ॥
महर्षीणां भृगुरहं गिरामस्म्येकमक्षरम् ।
यज्ञानां जपयज्ञोऽस्मि स्थावराणां हिमालयः ॥ २५ ॥

नाहीं; आणि आमच्या मतें हेंच " वेदांमध्यें सामवेद मीं " असें म्हणण्याचें सरळ व सोपें कारण होय. ]

(२३) आणि (अकरा) रुद्रांमध्यें शंकर मीं आहे; यक्षराक्षसांत कुबेर; (आठ) वसूंमध्यें पावक मी आहे; (सात) पर्वतांत मेरु मीं (२८) हे पार्था! आणि पुरोहितांमध्यें मुख्य जो बृहस्पति तो मी आहें असें समज. सेनानायकांत मी स्कंद (कार्तिकेय); जलाशयामधला समुद्र मी आहें. (२५) महर्षींपैकीं भृगु मीं; वाणीमध्यें एकाक्षर म्हणजे ॐकार मी आहे. यज्ञांपैकीं जपयज्ञ मी आहें; स्थावर म्हणजे स्थिर पदार्थांत हिमालय.

[ " यज्ञांपैकीं जपयज्ञ मी " हें वाक्य महत्वाचें आहे. अनुगीतेंत (म. भा. अश्व. ४४. ८) " यज्ञानां हुतमुत्तमम् " म्हणजे यज्ञांमध्यें (अग्नींत) हवि समर्पण करून सिद्ध होणारा यज्ञ उत्तम, असें म्हटलें आहे; व तेंच वैदिक कर्मकांडवाल्यांचें मत आहे. पण भक्तिमार्गांत हविर्यज्ञापेक्षां नामयज्ञाचें किंवा जपयज्ञाचें महत्त्व विशेष असल्यामुळें गीतेंत " यज्ञानां जपयज्ञोऽस्मि " हें वाक्य आलें आहे. " दुसरें कांहीं करो वा न करो, केवळ जपानेंच ब्राह्मण सिद्धि पावतो " असें मनूनेंहि एके ठिकाणीं (२.८७) म्हटलें आहे. भागवतांतील पाठ ' यज्ञानां ब्रह्मयज्ञोऽहं " असा आहे. ]

अश्वत्थः सर्ववृक्षाणां देवर्षीणां च नारदः ।
गंधर्वाणां चित्ररथः सिद्धानां कपिलो मुनिः ॥ २६ ॥
उच्चैःश्रवसमश्वानां विद्धि माममृतोद्भवम् ।
ऐरावतं गजेंद्राणां नराणां च नराधिपम ॥ २७ ॥
आयुधानामहं वज्रं धेनूनामस्मि कामधुक् ।
प्रजनश्चास्मि कंदर्पः सर्पाणामस्मि वासुकिः ॥ २८ ॥
अनंतश्चास्मि नागानां वरुणो यादसामहम् ।
पितृणामर्यमा चास्मि यमः संयमतामहम् ॥ २९ ॥

(२६) सर्व वृक्षांमध्यें अश्वत्थ म्हणजे पिंपळ, व देवर्षींमध्यें नारद; गंधर्वांपैकीं चित्ररथ; सिद्धांपैकीं कपिलमुनि. (२७) घोड्यांत अमृतमंथनाचे वेळीं निघालेला उच्चैःश्रवस मी आहें असें जाण. गजेंद्रांपैकीं ऐरावत; व मनुष्यांत राजा. (२८) आयुधांत वज्र मी; गाईमध्यें कामधेनु मी आहें. आणि प्रजोत्पाद करणारा काम मी आहें; सर्पांपैकीं वासुकि मी आहें. (२९) आणि नागांमध्ये अनंत मी आहे; यादस् म्हणजे जलवासी भूतांत वरुण मी; आणि पितरांत अर्यमा मी आहें; नियमन करणाऱ्यांत यम मी.

[ वासुकि हा सर्पांचा राजा व अनंत म्हणजे 'शेष' हे अर्थ निश्चित असून ते अमरकोशांत व महाभारतांतहि दिलेले आहेत ( म. भा. आदि. ३५–३९ पहा ) पण नाग व सर्प यांमधील भेद काय हें निश्चित सांगतां येत नाहीं. महाभारतांत आस्तिकोपाख्यानांत हे शब्द समानार्थीच योजिलेले आहेत. तथापि या ठिकाणीं सर्प व नाग या शब्दांनीं सर्प या सामान्य वर्गाच्या दोन भिन्न जाति विवक्षित आहेत असें दिसतें. श्रीधरटीकेंत सर्प सविष व नाग निर्विष असें म्हटलें असून रामानुजभाष्यांत सर्प एक डोक्याचे व नाग अनेक डोक्याचे असा भेद दाखविला आहे. परंतु हे दोन्ही भेद खरे दिसत

प्रह्लादश्चास्मि दैत्यानां कालः कलयतामहम् ।
मृगाणां च मृगेंद्रोऽहं वैनतेयश्च पक्षिणाम् ॥ ३० ॥
पवनः पवतामास्मि रामः शस्त्रभृतामहम् ।
झषाणां मकरश्चास्मि स्रोतसामास्मि जाह्नवि ॥ ३१ ॥
सर्गाणामादिरंतश्च मध्यं चैवाहमर्जुन ।
अध्यात्मविद्या विद्यानां वादः प्रवदतामहम् ॥ ३२ ॥
अक्षराणामकारोऽस्मि द्वंद्वः सामासिकस्य च ।
अहमेवाक्षयः कालो धाताऽहं विश्वतोमुखः ॥ ३३ ॥

नाहींत. कारण, कांहीं ठिकाणीं नागांचींच प्रमुख कुलें सांगतांना त्यांपैकीं अनंत व वासुकी हीं पहिल्यानें दिलीं आहेत; आणि दोन्हीही अनेक डोक्यांचे व सविष, पण अनंत अग्निवर्ण व वासुकी पीतवर्ण आहे असें वर्णन आहे. भागवतांतील पाठ गीतेप्रमाणेंच आहेत.]

(३०) आणि दैत्यांपैकीं प्रल्हाद मी आहे; ग्रासणाऱ्यांत काल मी; आणि पशूंपैकीं मृगेंद्र म्हणजे सिंह मी; आणि पक्ष्यांत गरुड. (३१) वेगवानांत वायु मी आहें; शस्त्रधाऱ्यांत राम मी; आणि माशांमध्यें नक्र मी आहें; नद्यांत भागिरथी मी आहें; (३२) हे अर्जुना ! सृष्टिमात्राचा आदि व अंत व मध्यहि मी; विद्यांपैकीं अध्यात्मविद्या; वाद करणारांचा वाद मी.

[ मागें २० व्या श्लोकांत सचेतन भूतांचा आदि, मध्य व अंत मी असें सांगितलें, व आतां सर्व चराचर सृष्टीचा आदि, मध्य व अंत मी असें सांगतात, हा भेद आहे. ]

(३३) अक्षरांपैकीं आकार मी आहें, आणि समासांपैकीं (उभयपदप्रधान) द्वंद्व; (निमेषमुहूर्तादि) अक्षय काल मीच; सर्वतोमुख म्हणजे

मृत्युः सर्वहरश्चाहमुद्भवश्च भविष्यताम् ।
कीर्तिः श्रीर्वाक्च नारीणां स्मृतिर्मेधा धृतिः क्षमा ॥ ३४ ॥
बृहत्साम तथा साम्नां गायत्री छंदसामहम् ।
मासानां मार्गशीर्षोऽहमृतूनां कुसुमाकरः ॥ ३५ ॥

चारी बाजूंनीं मुखें असणारा धाता म्हणजे ब्रह्मदेव मी. (३४) आणि सर्वांचा क्षय करणारा मृत्यु, व पुढें जन्मास येणाऱ्यांचें उत्पत्तिस्थान मी; स्त्रियांपैकीं कीर्ति, श्री आणि वाणी, स्मृति, मेधा, धृति व क्षमा मी.

[ कीर्ति, श्री, वाणी इत्यादि शब्दांनीं त्या त्या देवता विवक्षित आहेत. यांपैकीं वाणी आणि क्षमा या दोन सोडून बाकीच्या पांच व दुसऱ्या पांच ( पुष्टी, श्रद्धा, क्रिया, लज्जा व मति ) मिळून दहा दक्षाच्या कन्या असून त्या धर्मास दिल्या असल्यामुळें त्यांस धर्मपत्नी ह्मणतात असें महाभारतांत ( आदि. ६६,१३,१४ ) वर्णन आहे. ]

( ३५ ) तसेंच साम म्हणजे गावयाच्या वैदिक स्तोत्रांत बृहत्साम, (व) छंदांपैकीं गायत्री छंद मी; महिन्यांत मार्गशीर्ष मी; ऋतूंत वसंत.

[ महिन्यांमध्यें मार्गशीर्षाला जें प्रथम स्थान दिलें आहे तें तत्काळीं बारा महिन्याची गणना करितांना मार्गशीर्ष महिना पहिला धरून मोजण्याची वहिवाट होती म्हणून होय (म. भा. अनु. १०६ व १०९; आणि वाल्मीकिरामायण ३.१६ पहा), भागवत ११.१६.२७ यांतहि असाच उल्लेख आहे. मृगशीर्ष नक्षत्रास अग्रहायणी किंवा वर्षारंभीचें नक्षत्र असें नांव असून, मृगादि नक्षत्रगणना जेव्हां प्रचारांत होती तेव्हां मृगनक्षत्राला प्रथम अग्रस्थान मिळालें, व त्यावरून मार्गशीर्ष महिन्यालाहि पुढें श्रेष्ठत्व आलें असावें, इत्यादि विचार आम्हीं आमच्या 'ओरायन' ग्रंथांत केला आहे तो पहा. विस्तारभयास्तव तो येथें देत नाहीं. ]

द्यूतं छलयतामस्मि तेजस्तेजस्विनामहम् ।
जयोऽस्मि व्यवसायोऽस्मि सत्त्वं सत्त्ववतामहम् ॥ ३६ ॥
वृष्णीनां वासुदेवोऽस्मि पांडवानां धनंजयः ।
मुनीनामप्यहं व्यासः कवीनामुशना कविः ॥ ३७ ॥
दंडो दमयतामस्मि नीतिरस्मि जिगीषताम् ।
मौनं चैवास्मि गुह्यानां ज्ञानं ज्ञानवतामहम् ॥ ३८ ॥
यच्चापि सर्वभूतानां बीजं तदहमर्जुन ।
न तदस्ति विना यत्स्यान्मया भूतं चराचरम् ॥ ३९ ॥
नांतोऽस्ति मम दिव्यानां विभूतीनां परंतप ।
एष तूद्देशतः प्रोक्तो विभूतेर्विस्तरो मया ॥ ४० ॥
§§ यद्यद्विभूतिमत्सत्त्वं श्रीमदूर्जितमेव वा ।
तत्तदेवावगच्छ त्वं मम तेजोंऽशसंभवम् ॥ ४१ ॥

(३६) फसविणाऱ्यांचें द्यूत मीं आहे; तेजस्व्यांचें तेज मी; (विजयशाली पुरुषांचा) विजय मी आहें; (निश्चयी पुरुषांचा) निश्चय मी आहें; सत्त्वशीलांचें सत्त्व मी. (३७) यादवांपैकीं वासुदेव मी आहें; पांडवांत धनंजय; मुनींपैकींहि व्यास मी; कवींमध्यें शुक्राचार्य कवि; (३८) शासन करणाऱ्यांचा दंड मी आहें; जयेच्छूंची नीति म्हणजे मसलत मी आहें; आणि गुह्यांपैकीं मौन देखील मी आहें. ज्ञान्यांचें ज्ञान मी. (३९) तसेंच हे अर्जुना सर्व भूतांचें जें कांहीं बीज तें मी; मला सोडून असेल असें चराचर भूत नाहीं. (४०) हे परंतपा! माझ्या दिव्य विभूतींना अंत नाहीं. विभूतींचा हा विस्तार (केवळ) दिग्दर्शनार्थ मी सांगितला आहे.

[याप्रमाणें प्रमुख प्रमुख विभूती सांगून आतां या प्रकरणाचा उपसंहार करितात—]

(४१) जी जी वस्तु वैभव, लक्ष्मी, किंवा प्रभाव यांनीं युक्त आहे

अथवा बहुनैतेन किं ज्ञातेन तवार्जुन ।
विष्टभ्याहमिदं कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत् ॥ ४२ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे विभूतियोगो नाम दशमोऽध्यायः ॥ १० ॥

---

ती ती माझ्या तेजाच्या अंशापासून झाली आहे असेंच तूं समज. (४२) अथवा हे अर्जुना ! तुला हा पसारा जाणून काय करावयाचें ? ( थोडक्यांत सांगतों कीं, ) मी आपल्या एका(-च) अंशानें हें सर्व जग व्यापून राहिलों आहें.

[ शेवटला श्लोक " पादोऽस्य विश्वा भूतानि त्रिपादस्यामृतं दिवि " या पुरुषसूक्तांतील ऋचेच्या ( ऋ. १०.९०, ३ ) आधारें सांगितला असून, हा मंत्र छांदोग्योपनिषदांतहि ( छां. ३.१२.६ ) आला आहे. ' अंश ' या शब्दाच्या अर्थाचा खुलासा गीतारहस्याच्या ९ व्या प्रकरणाच्या अखेर ( पृ २४३ व २४४ ) केला आहे तो पहा. भगवान् आपल्या एकाच अंशानें हें जग जर व्यापून राहिले आहेत तर याच्यापेक्षां भगवंतांचा एकंदर महिमा पुष्कळच अधिक असला पाहिजे हें उघड आहे; व तें सांगण्याच्या हेतूनेंच शेवटला श्लोक सांगितला आहे. पुरुषसूक्तांत तर " एतावान् अस्य महिमाऽतो ज्यायांश्च पूरुषः " हा एवढा याचा महिमा झाला, यापेक्षां पुरुष श्रेष्ठ आहे–असें स्पष्टच सांगितलें आहे. ]

याप्रमाणें श्रीभगवंतांनीं गाइलेल्या म्हणजे सांगितलेल्या उपनिषदांत ब्रह्मविद्यान्तर्गत योग—म्हणजे कर्मयोग-शास्त्रावरील श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या संवादांतील विभूतीयोग नांवाचा दहावा अध्याय समाप्त झाला.

---

# एकादशोऽध्यायः ।

अर्जुन उवाच ।

मदनुग्रहाय परमं गुह्यमध्यात्मसंज्ञितम् ।
यत्त्वयोक्तं वचस्तेन मोहोऽयं विगतो मम ॥ १ ॥
भवाप्ययौ हि भूतानां श्रुतौ विस्तरशो मया ।
त्वत्तः कमलपत्राक्ष माहात्म्यमपि चाव्ययम् ॥ २ ॥
एवमेतद्यथात्थ त्वमात्मानं परमेश्वर ।
द्रष्टुमिच्छामि ते रूपमैश्वरं पुरुषोत्तम ॥ ३ ॥
मन्यसे यदि तच्छक्यं मया द्रष्टुमिति प्रभो ।
योगेश्वर ततो मे त्वं दर्शयात्मानमव्ययम् ॥ ४ ॥

## अध्याय अकरावा.

[ भगवंतांनीं गेलश अध्यायांत आपल्या विभूतींचें वर्णन केल्यावर परमेश्वराचें हें विश्वरूप पहाण्याची अर्जुनास इच्छा होऊन त्याच्या प्रश्नावरून भगवंतांनीं त्याला जें विश्वरूप दाखविलें त्याचें वर्णन या अध्यायांत आहे हें वर्णन इतकें सरस आहे कीं, गीतेच्या उत्तम भागांत याची गणना होत असून इतर गीता रचणारांनीं त्याचेंच अनुकरण केलेलें आहे, प्रथम अर्जुन असें विचारितो कीं—]

अर्जुन म्हणाला–(१) माझ्यावर अनुग्रह म्हणून अध्यात्मसंज्ञक जी परम गुह्य गोष्ट तुम्हीं सांगितली त्यानें माझा मोह नाहींसा झाला. (२) तसेंच हे कमलपत्राक्षा ! भूतांची उत्पत्ति व लय आणि (तुमचें) अक्षय माहात्म्यहि तुमच्यापासून मीं सविस्तर ऐकिलें. (३) (आतां) हे परमेश्वरा ! तुम्हीं आपलें हें जसें वर्णन केलें तशा प्रकारें तुमचें ईश्वरी स्वरूप हे पुरुषोत्तमा ! मी ( प्रत्यक्ष ) पाहूं इच्छितों. (४) हे प्रभो ! तशा प्रकारचें रूप मीं पहाणें शक्य आहे असें जर तुम्हांस वाटत असेल, तर हे योगेश्वरा ! तुम्हीं आपलें अव्यय स्वरूप मला दाखवा !

श्रीभगवानुवाच ।

§§ पश्य मे पार्थ रूपाणि शतशोऽथ सहस्रशः ।
नानाविधानि दिव्यानि नानावर्णाकृतीनि च ॥ ५ ॥

[ सातव्या अध्यायांत ज्ञानविज्ञान सांगण्यास सुरवात करून सातव्यांत व आठव्यांत परमेश्वराच्या अक्षर किंवा अव्यक्त रूपाचें, आणि नवव्यांत व दहाव्यांत अनेक व्यक्त रूपांचें, जें ज्ञान सांगितलें, त्यासच 'अध्यात्म' ही संज्ञा अर्जुनानें पहिल्या श्लोकांत दिली आहे; आणि एका अव्यक्तापासून अनेक व्यक्त पदार्थ कसे निर्माण होतात याचें सातव्या (७.४–१५), आठव्या (८.१६–२१) व नवव्या (९.४—८) अध्यायांत जें वर्णन आहे तेंच 'भूतांची उत्पत्ति व लय' या शब्दांनीं दुसऱ्या श्लोकांत अभिप्रेत आहे. तिसऱ्या श्लोकाचीं दोन अर्धें हीं दोन निरनिराळीं वाक्यें कल्पून त्यांचा "हे परमेश्वरा ! तुम्हीं आपलें जें (स्वरूप) वर्णन केलें तें खरें आहे (म्हणजे मी समजलों); आतां हे पुरुषोत्तमा ! मी तुमचें ईश्वरी स्वरूप पाहूं इच्छितो," असा अर्थ करीत असतात (गी. १०. १४ पहा). परंतु दोन्हीं पंक्ति मिळून एकच वाक्य मानणें बरें दिसतें, व परमार्थप्रपा टीकेंत तसें केलेंहि आहे. चवथ्या श्लोकांत 'योगेश्वर' असा जो शब्द आहे त्याचा अर्थ 'योगांचा (योग्यांचा नव्हे) ईश्वर' असा आहे (गी. १८. ७५). योग म्हणजे अव्यक्त रूपापासून व्यक्त सृष्टि निर्माण करण्याचें सामर्थ्य किंवा युक्ति असा अर्थ पूर्वी (गी. ७. २५ व ९. ५) दिला असून त्या सामर्थ्यानेंच विश्वरूप दाखवावयाचें असल्यामुळें 'योगेश्वर' हे संबोधन येथें सहेतुक योजिलेलें दिसतें. ]

श्रीभगवान् म्हणाले—(५) हे पार्था ! माझीं अनेक प्रकारचीं आणि अनेक रंगांचीं व आकारांचीं (हीं) शेंकडों अथवा हजारों दिव्य रूपें पहा.

पश्यादित्यान्वसून् रुद्रानश्विनौ मरुतस्तथा ।
बहून्यदृष्टपूर्वाणि पश्याश्चर्याणि भारत ॥ ६ ॥
इहैकस्थं जगत्कृत्स्नं पश्याद्य सचराचरम् ।
मम देहे गुडाकेश यच्चान्यद्द्रष्टुमिच्छसि ॥ ७ ॥
न तु मां शक्यसे द्रष्टुमनेनैव स्वचक्षुषा ।
दिव्यं ददामि ते चक्षुः पश्य मे योगमैश्वरम् ॥ ८ ॥

(६) हे पहा, (बारा) आदित्य, (आठ) वसु, (अकरा) रुद्र, (दोन) अश्विनीकुमार, तसेंच (एकुणपन्नास) मरुद्गण ! हे भारता ! पूर्वी कधींहि न पाहिलेलीं अनेक आश्चर्यें पहा.

[ नारायणीय धर्मांत नारदाला जें विश्वरूप दाखविलें त्यांत बारा आदित्य डाव्या बाजूस, पुढच्या भागीं आठ वसु, उजव्या बाजूस अकरा रुद्र, आणि पाठीमागच्या बाजूस दोन अश्विनीकुमार, असें विशेष वर्णन आहे (शां. ३३९.५०–५२). परंतु हेंच सर्वत्र विवक्षित आहे असें दिसत नाहीं (म. भा. उ. १३० पहा). आदित्य, वसु, रुद्र, अश्विनीकुमार आणि मरुद्गण या देवता वैदिक असून त्यांत आदित्य हे क्षत्रिय, मरुद्गण हे वैश्य व अश्विनीकुमार हे शूद्र असा देवांच्या चातुर्वर्ण्याचा भेद महाभारतांत (शां. २०८. २३, २४) सांगितला आहे. शतपथब्राह्मण १४. ४. २. २३ पहा. ]

(७) हे गुडाकेशा ! आज येथें एकत्र झालेलें सर्व चराचर जग आणि दुसरेंहि जें काय तुला पाहण्याची इच्छा असेल तें माझ्या (या) देहांत पाहून घे ! (८) परंतु तुझ्या याच दृष्टीनें मला तूं पाहूं शकणार नाहींस, तुला मी दिव्यदृष्टि देतों; ( तिनें ) माझा हा ईश्वरी योग म्ह० योगसामर्थ्य पहा !

संजय उवाच ।

§§ एवमुक्त्वा ततो राजन् महायोगेश्वरो हरिः ।
दर्शयामास पार्थाय परमं रूपमैश्वरम् ॥ ९ ॥
अनेकवक्त्रनयनमनेकाद्भुतदर्शनम् ।
अनेकदिव्याभरणं दिव्यानेकोद्यतायुधम् ॥ १० ॥
दिव्यमाल्यांबरधरं दिव्यगंधानुलेपनम् ।
सर्वाश्चर्यमयं देवमनंतं विश्वतोमुखम् ॥ ११ ॥
दिवि सूर्यसहस्रस्य भवेद्युगपदुत्थिता ।
यदि भाः सदृशी सा स्याद्भासस्तस्य महात्मनः ॥ १२ ॥
तत्रैकस्थं जगत्कृत्स्नं प्रविभक्तमनेकधा ।
अपश्यद्देवदेवस्य शरीरे पांडवस्तदा ॥ १३ ॥
ततः स विस्मयाविष्टो हृष्टरोमा धनंजयः ।

संजय म्हणाला–(९) याप्रमाणें बोलल्यावर मग हे राजा धृतराष्ट्रा ! योगांचा मोठा ईश्वर जो हरि त्यानें अर्जुनाला (आपलें) श्रेष्ठ ईश्वरी रूप म्हणजे विश्वरूप दाखविलें. (१०) त्याला म्हणजे त्या विश्वरूपाला अनेक तोंडें व डोळे असून त्यांत अनेक अद्भुत देखावे दिसत होते; (व) त्यावर अनेक प्रकारचे दिव्य अलंकार असून त्यांत अनेक प्रकारचीं दिव्य आयुधें उभारलेलीं (चमकत) होतीं. (११) त्या अनंत, सर्वतोमुख व सर्व आश्चर्यांनीं भरलेल्या देवास दिव्य सुगंधाची उटी लाविली होती, व त्यानें दिव्य पुष्पें व वस्त्रें धारण केलेलीं होतीं. (१२) आकाशांत एक हजार सूर्यांची प्रभा जर एकदम उठेल, तर ती त्या महात्म्याच्या कान्तीसारखी (कांहींशी) दिसेल ! (१३) देवदेवाच्या या शरीरांत नानाप्रकारें विभागलेलें सर्व जग एकत्र झालें आहे असें अर्जुनाच्या तेव्हां दृष्टीस पडलें. (१४) मग आश्चर्यानें थक्क होऊन त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले; आणि शिरसा नमस्कार करून व हात जोडून तो अर्जुन देवाला म्हणाला कीं—

प्रणम्य शिरसा देवं कृतांजलिरभाषत ॥ १४ ॥

अर्जुन उवाच ।

§§ पश्यामि देवांस्तव देव देहे सर्वांस्तथा भूतविशेषसंघान् ।
ब्रह्माणमीशं कमलासनस्थमृषींश्च सर्वानुरगांश्च दिव्यान् ॥ १५ ॥
अनेकबाहूदरवक्त्रनेत्रं पश्यामि त्वां सर्वतोऽनंतरूपम् ।
नांतं न मध्यं न पुनस्तवादिं पश्यामि विश्वेश्वर विश्वरूप ॥ १६ ॥
किरीटिनं गदिनं चक्रिणं च तेजोराशिं सर्वतो दीप्तिमंतम् ।
पश्यामि त्वां दुर्निरीक्ष्यं समंताद्दीप्तानलार्कद्युतिमप्रमेयम् ॥ १७ ॥
त्वमक्षरं परमं वेदितव्यं त्वमस्य विश्वस्य परं निधानम् ।
त्वमव्ययः शाश्वतधर्मगोप्ता सनातनस्त्वं पुरुषो मतो मे ॥ १८ ॥
अनादिमध्यांतमनंतवीर्यमनंतबाहुं शशिसूर्यनेत्रम् ।
पश्यामि त्वां दीप्तहुताशवक्त्रं स्वतेजसा विश्वमिदं तपन्तम् ॥१९॥

अर्जुन म्हणाला—(१५) हे देवा ! तुमच्या या देहांत सर्व देव आणि नानाप्रकारच्या भूतांचे समुदाय, तसेंच कमलासनावर बसलेला (सर्व देवांचा) स्वामी ब्रह्मदेव, सर्व ऋषि, आणि (वासुकि आदिकरून) सर्व दिव्य सर्पहि मला दिसत आहेत. (१६) अनेक बाहु, अनेक उदरें, अनेक तोंडें व अनेक नेत्र असणाऱ्या, अनंतरूपी तुम्हांलाच मी चोहोंकडे पहातों; पण हे विश्वेश्वरा विश्वरूपा ! तुमचा ना अंत, ना मध्य, किंवा ना आदिहि मला (कोठेंहि) दिसत नाहीं. (१७) किरीट, गदा व चक्र धारण करणारे, चोहोंकडे प्रभा फांकलेले, तेजःपुंज, रखरखीत, अग्निसूर्यप्रमाणें दैदीप्यमान, डोळ्यांनीं पहाण्यासहि अशक्य आणि अपरंपार (भरलेले) असे तुम्हीच मला जिकडेतिकडे दिसत आहां. (१८) तुम्हीच अखेरचें ज्ञेय अक्षर (ब्रह्म) तुम्हीच या विश्वाचे शेवटचे आधार, तुम्हीच अव्यय असून शाश्वत धर्माचे रक्षक, आणि सनातन पुरुष तुम्ही, असें मला वाटतें. (१९) आदि, मध्य

द्यावापृथिव्योरिदमंतरं हि व्याप्तं त्वयैकेन दिशश्च सर्वाः ।
दृष्ट्वाद्भुतं रूपमुग्रं तवेदं लोकत्रयं प्रव्यथितं महात्मन् ॥ २० ॥
अमी हि त्वां सुरसंघा विशन्ति केचिद्भीताः प्रांजलयो गृणन्ति ।
स्वस्तीत्युक्त्वा महर्षिसिद्धसंघाः
स्तुवन्ति त्वां स्तुतिभिः पुष्कलाभिः ॥ २१ ॥
रुद्रादित्या वसवो ये च साध्या विश्वेऽश्विनौ मरुतश्चोष्मपाश्च ।
गंधर्वयक्षासुरसिद्धसंघा वीक्षन्ते त्वां विस्मिताश्चैव सर्वे ॥ २२ ॥

किंवा अंत नसून ज्याला अनंत बाहु, चंद्र व सूर्य हे ज्याचे डोळे आणि पेटलेला अग्नि हें ज्याचें तोंड, असे अनंतशक्तिमान् तुह्मीच आपल्या तेजानें या सर्व जगाला तापवीत आहां असें मी पहातों. (२०) कारण आकाश व पृथ्वी यांच्यामधील हें (सर्व) अंतर आणि सर्व दिशा तुह्मी एकट्यानें व्यापून टाकिल्या आहेत; व तुमचें हें अद्भुत व उग्र रूप पाहून हे महात्मन्! त्रैलोक्याची (भीतीनें) गाळण उडाली आहे. (२१) हें पहा, देवाचे हे गण तुमचे ठायीं प्रवेश करीत आहेत, (व) कांहीं भयानें हात जोडून प्रार्थीत आहेत; (आणि) 'स्वस्ति, स्वस्ति' असें म्हणून पुष्कळ प्रकारच्या स्तोत्रांनीं महर्षि व सिद्ध यांचे गण तुमचें स्तवन करीत आहेत (२२) (तसेंच) रुद्र व आदित्य, वसु आणि जे साध्यगण ते, विश्वेदेव, (दोन्ही) अश्विनी कुमार व मरुद्गण व उष्मपा म्हणजे पितर, आणि गंधर्व, यक्ष, राक्षस व सिद्ध यांचे मेळे सर्वत्र विस्मित होऊन तुमच्याकडे पहात आहेत.

[ श्राद्धकालीं पितरांस अर्पण केलेल्या अन्नांचें तें ऊनऊन (उष्ण) असेपर्यंतच पितर ग्रहण करितात, म्हणून त्यांस 'उष्मपा' असें नांव आहे (मनु. ३. २३७.) याच पितरांचे सोमसद्, अग्निष्वात्त, बर्हिषद्, सोमपा, हविष्मान्, आज्यपा आणि सुकालिन्, असे सात प्रकारचे गण मनुस्मृतींत (३. १९४–२००) सांगितले आहेत. आदित्यादि देवता वैदिक आहेत. वर श्लोक ६ पहा. बृहदारण्यकोप-

रूपं महत्ते बहुवक्त्रनेत्रं महाबाहो बहुबाहूरुपादम् ।
बहूदरं बहुदंष्ट्राकरालं दृष्ट्वा लोकाः प्रव्यथितास्तथाहम् ॥ २३ ॥
नभःस्पृशं दीप्तमनेकवर्णं व्यात्ताननं दीप्तविशालनेत्रम् ।
दृष्ट्वा हि त्वां प्रव्यथितांतरात्मा
धृतिं न विंदामि शमं च विष्णो ॥ २४ ॥
दंष्ट्राकरालानि च ते मुखानि दृष्ट्वैव कालानलसंनिभानि ।
दिशो न जाने न लभे च शर्म प्रसीद देवेश जगन्निवास ॥ २५ ॥
अमी च त्वां धृतराष्ट्रस्य पुत्राः सर्वे सहैवावनिपालसंघैः ।
भीष्मो द्रोणः सूतपुत्रस्तथासौ सहास्मदीयैरपि योधमुख्यैः ॥२६॥

निषदांत (३. ९. २.) आठ वसु अकरा रुद्र, बारा आदित्य आणि इंद्र व प्रजापति मिळून ३३ देव होतात असें वर्णन असून, महाभारतांत आदिपर्व अ. ६५ व ६६ व शान्तिपर्व अ. २०८ यांत त्यांचीं नांवें व उत्पत्ति सांगितली आहे.]

(२३) हे महाबाहो! तुमचें हें अवाढव्य, अनेक तोंडांचें, अनेक डोळयांचें, अनेक बाहूंचें, अनेक मांड्यांचें, अनेक पायांचें, अनेक उदरांचें व अनेक दाढांमुळें विक्राळ दिसणारें रूप पाहून सर्व लोकांना व मलाहि भीति उत्पन्न झाली आहे. (२४) आकाशाला जाऊन भिडलेले, तेजस्वी, अनेक रंगाचे, जबडा पसरलेले, आणि मोठ्या व प्रदीप्त डोळयांनीं युक्त अशा तुम्हांला पाहून अंतरात्मा व्याकुळ झाल्यानें हे विष्णो! माझा धीर सुटला व शान्तिहि नाहींशी झाली! (२५) आणि दाढांनीं विक्राळ व प्रळयकाळच्या अग्नीसारखीं तुमचीं (हीं) तोंडें पाहूनच, मला दिशा कळत नाहींत, आणि समाधानहि वाटत नाहीं (असें झालें आहे). हे जगन्निवासा देवदेवा! प्रसन्न व्हा! (२६) हे पहा, राजांच्या गणांसह धृतराष्ट्राचे सर्व पुत्र, भीष्म, द्रोण आणि तसाच हा सूतपुत्र (कर्ण),

वक्त्राणि ते त्वरमाणा विशन्ति दंष्ट्राकरालानि भयानकानि ।
केचिद्विलग्ना दशनांतरेषु संदृश्यन्ते चूर्णितैरुत्तमांगैः ॥ २७ ॥
यथा नदीनां बहवोऽबुवेगाः समुद्रमेवाभिमुखा द्रवन्ति ।
तथा तवामी नरलोकवीरा विशन्ति वक्त्राण्यभिविज्वलन्ति ॥२८॥
यथा प्रदीप्तं ज्वलनं पतंगा विशन्ति नाशाय समृद्धवेगाः ।
तथैव नाशाय विशन्ति लोकास्तवापि वक्त्राणि समृद्धवेगाः ॥२९॥
लेलिह्यसे ग्रसमानः समंताल्लोकान्समग्रान्वदनैर्ज्वलद्भिः ।
तेजोभिरापूर्य जगत्समग्रं भासस्तवोग्राः प्रतपन्ति विष्णो ॥ ३० ॥
आख्याहि मे को भवानुग्ररूपो नमोऽस्तुते देववर प्रसीद ।
विज्ञातुमिच्छामि भवन्तमाद्यं न हि प्रजानामि तव प्रवृत्तिम् ॥३१॥

आमच्या बाजूच्याहि मुख्य मुख्य योद्ध्यांसह, (२७) तुमच्या विक्राळ दाढांच्या या अनेक भयंकर तोंडांत भराभर शिरत आहेत
व कांहीं दातांमध्यें सांपडून डोक्याचा चुराडा झालेले नजरेस येत आहेत. (२८) नद्यांच्या पाण्याचे अनेक लोट समुद्राकडेच ज्याप्रमाणें धांव घेतात तसे मनुष्य लोकांतील हे वीर! तुमच्या अनेक प्रज्वलित मुखांत शिरत आहेत. (२९) पेटलेल्या अग्नींत मरण्यासाठीं मोठ्या वेगानें पतंग जसे उड्या टाकतात, तद्वत्च तुमच्याहि अनेक जबड्यांत ( हे ) लोक मरण्यासाठीं मोठ्या वेगानें शिरत आहेत. (३०) हे विष्णो ! आसमंतात् सर्व लोकांना आपल्या जाज्वल्य मुखांनीं ग्रासून टाकीत तुम्ही जिभा चाटीत आहां! व तेजानें सर्व जग व्यापून तुमच्या उग्र प्रभा (चोहोंकडे) तळपत आहेत. (३१) हें उग्ररूप धारण करणारे तुम्ही कोण हें मला सांगा. हे देवदेवश्रेष्ठा ! तुम्हाला नमस्कार करितों ! प्रसन्न व्हा ! तुम्ही आदिपुरुष कोण हें जाणण्याची मला इच्छा आहे. कारण तुमची ही करणी मला ( कांहींच ) कळत नाहीं !

श्रीभगवानुवाच ।

§§ कालोऽस्मि लोकक्षयकृत्प्रवृद्धो लोकान्समाहर्तुमिह प्रवृत्तः ।
ऋतेऽपि त्वां न भविष्यन्ति सर्वे
येऽवस्थिताः प्रत्यनीकेषु योधाः ॥ ३२ ॥
तस्मात्त्वमुत्तिष्ठ यशो लभस्व जित्वा शत्रून्भुंक्ष्व राज्यं समृद्धम् ।
मयैवैते निहताः पूर्वमेव निमित्तमात्रं भव सव्यसाचिन् ॥ ३३ ॥
द्रोणं च भीष्मं च जयद्रथं च कर्णं तथान्यानपि योधवीरान् ।
मया हतांस्त्वं जहि मा व्यथिष्ठा
युद्ध्यस्व जेतासि रणे सपत्नान् ॥ ३४ ॥

श्रीभगवान् म्हणाले-(३२) मी लोकांचा क्षय करणारा व वृद्धिंगत झालेला 'काळ' आहे; आणि येथें लोकांचा संहार करण्यास निघालों आहे. तूं नसलास तरी, म्हणजे तूं कांहीं केलें नाहींस तरीहि, सैन्यासैन्यांतून उभे असलेले हे सर्व योद्धे नाहींसे होणार ( मरणार ) आहेत; (३३) तस्मात् तूं ऊठ, यश मिळव, आणि शत्रूंना जिंकून समृद्ध राज्याचा उपभोग घे. मीं यांना पूर्वींच मारिलेले आहेत. ( म्हणून आतां ) हे सव्यसाची (अर्जुना)! तूं निमित्ताला मात्र ( पुढें ) हो ! (३४) द्रोण व भीष्म व जयद्रथ आणि कर्ण व तसेच दुसरेहि वीर योद्धे मीं ( पूर्वींच ) मारिलेले आहेत; त्यांना तूं मार ! घाबरूं नकोस ! लढ ! लढाईंत शत्रूला तूं जिंकणार आहेस.

[ सारांश उद्योगपर्वांत श्रीकृष्ण शिष्टाईला गेले होते त्या वेळीं दुर्योधन तडजोडीचें कोणतेंच बोलणें ऐकेना असें पाहून भीष्मांनीं "कालपक्वमिदं मन्ये सर्वं क्षत्रं जनार्दन" (म. भा. उ. १२७.३२)-हे सर्व क्षत्रिय कालपक्व झालेले आहेत-असें जें श्रीकृष्णास निराळ्या शब्दांनीं सांगितलें त्याचाच हा प्रत्यक्ष देखावा श्रीकृष्णांनीं आपल्या विश्वरूपानें अर्जुनास दाखविला आहे. वर श्लोक २६-३१ पहा. दुष्ट

संजय उवाच।

§§ एतच्छ्रुत्वा वचनं केशवस्य कृतांजलिर्वेपमानः किरीटी।
नमस्कृत्वा भूय एवाह कृष्णं सगद्गदं भीतभीतः प्रणम्य॥ ३५॥

अर्जुन उवाच।

स्थाने हृषीकेश तव प्रकीर्त्या जगत्प्रहृष्यत्युनुरज्यते च।
रक्षांसि भीतानि दिशो द्रवन्ति सर्वे नमस्यन्ति च सिद्धसंघाः॥३६
कस्माच्च ते न नमेरन्महात्मन् गरीयसे ब्रह्मणोप्यादिकर्त्रे।
अनंत देवेश जगन्निवास त्वमक्षरं सदसत्तत्परं यत्॥ ३७॥

मनुष्य आपल्या कर्मानींच परत असून त्यांना मारणारा फक्त निमित्त मात्र असल्यामुळें मारणाराकडे त्याचा दोष येत नाहीं हा कर्मविपाक-प्रक्रियेचा सिद्धान्तहि ३३ व्या श्लोकांत आला आहे.]

संजय म्हणाला-(३५) केशवाचें हें भाषण ऐकून अत्यंत भयभीत होत्साता कंठ दाटून येऊन कांपत कांपत हात जोडीत नमस्कार करून अर्जुन श्रीकृष्णास लवून पुनश्च म्हणाला कीं,—अर्जुन म्हणाला (३६) हे हृषीकेशा! ( सर्व ) जग तुमच्या ( गुण- ) कीर्तनानें आनंदतें, व ( त्यांत ) अनुरक्त असतें, राक्षसें तुम्हांला भिऊन ( दाही ) दिशांस पळून जातात, आणि सिद्ध पुरुषांचे मेळे तुम्हांलाच नमस्कार करितात, हें ( सर्व ) योग्यच होय. (३७) हे महात्मन्! ब्रह्मदेवाचेंहि आदिकारण व त्यापेक्षांहि श्रेष्ठ जे तुम्ही त्या तुम्हांला ते कां बरें वंदन करणार नाहींत? हे अनंता! देवदेवा! हे जगन्निवासा! तुम्हीच सत् व असत् असून या दोहोंच्याहि पलीकडचें जें अक्षर तें तुम्हीच आहां.

[ सत् व असत् या शब्दांचे अर्थ या ठिकाणीं अनुक्रमें व्यक्त व अव्यक्त या शब्दांशीं किंवा क्षर आणि अक्षर या दोन शब्दांशीं समानार्थक आहेत असें गीता. ७.२४;८.२०; किंवा १५.१६ वरून दिसून

त्वमादिदेवः पुरुषः पुराणस्त्वमस्य विश्वस्य परं निधानम्।
वेत्ताऽसि वेद्यं च परं च धाम त्वया ततं विश्वमनन्तरूप ॥ ३८ ॥
वायुर्यमोऽग्निर्वरुणः शशांकः प्रजापतिस्त्वं प्रपितामहश्च ।
नमो नमस्तेऽस्तु सहस्रकृत्वः पुनश्च भूयोऽपि नमो नमस्ते ॥ ३९ ॥

येईल. सत् व असत् यापलीकडलें जें तत्त्व तेंच अक्षर ब्रह्म म्हणून गीता १३.१२ यांत 'मी सत् नाहीं व असत् नाहीं' असे स्वच्छ वर्णन आहे. 'अक्षर' शब्द गीतेंत कधीं प्रकृतीस तर कधीं परब्रह्मास लाविलेला असतो. गीता ९.१९; १३.१२; व १५.१६ वरील टीका पहा. ]

(३८) तुम्हीं आदिदेव, (तुम्ही) पुरातन पुरुष; तुम्हीच या जगताचे परम आधार; तुम्ही ज्ञाते व ज्ञेय, तुम्ही श्रेष्ठ स्थान, आणि तुम्हीच हे अनंतरूपा! (हें) विश्व विस्तारिलें किंवा व्यापिलें आहे. (३९) वायु, यम, अग्नि, वरुण, चंद्र, प्रजापति म्हणजे ब्रह्मदेव, आणि पणजोबाहि तुम्हीच आहां. तुम्हांला हजार वेळां नमस्कार असो! आणि फिरून आणखीहि तुम्हांलाच नमस्कार असो!

[ब्रह्मदेवापासून मरीच्यादि सात मानसपुत्र निर्माण होऊन मरीच्यापासून कश्यप व कश्यपापासून सर्व प्रजा झाली आहे (म. भा. आदि. ६५.११); म्हणून या मरीच्यादिकांसच प्रजापति असें म्हणतात (शां. ३४०.६५). यामुळें प्रजापति शब्दाचा कश्यपादि प्रजापति असा कोणी अर्थ करितात. पण प्रजापति हें पद येथें एकवचनी असल्यामुळें प्रजापति म्हणजे ब्रह्मदेव हा अर्थ अधिक ग्राह्य दिसतो. शिवाय ब्रह्मदेव हा मरीच्यादिकांचा पिता म्हणजे सर्वांचा पितामह (आजा) असल्यामुळें पुढें 'प्रपितामह' (पणजोबा) हें पदहि ओघानेंच प्राप्त होऊन त्याची सार्थकता व्यक्त होत्ये. ]

नमः पुरस्तादथ पृष्ठतस्ते नमोऽस्तु ते सर्वत एव सर्व ।
अनंतवीर्यामितविक्रमस्त्वं सर्वं समाप्नोषि ततोऽसि सर्वः ॥ ४० ॥
सखेति मत्वा प्रसभं यदुक्तं हे कृष्ण हे यादव हे सखेति ।
अजानता महिमानं तवेदं मया प्रमादात्प्रणयेन वापि ॥ ४१ ॥
यच्चावहासार्थमसत्कृतोऽसि विहारशय्यासनभोजनेषु ।
एकोऽथवाप्यच्युत तत्समक्षं तत्क्षामये त्वामहमप्रमेयम् ॥ ४२ ॥
पितासि लोकस्य चराचरस्य त्वमस्य पूज्यश्च गुरुर्गरीयान् ।
न त्वत्समोऽस्त्यभ्यधिकः कुतोऽन्यो लोकत्रयेऽप्यप्रतिमप्रभावः ॥ ४३

(४०) तुम्हांला पुढून नमस्कार आणि पाठीमागून नमस्कार, सर्वच बाजूंनीं हे सर्वात्मका ! तुम्हांला नमस्कार असो. तुमचें वीर्य अनंत व तुमचा पराक्रम अतुल असून सर्वांना पुरे पडत असल्यामुळें तुम्हींच 'सर्व' आहां.

[ पुढून नमस्कार, पाठीमागून नमस्कार हे शब्द परमेश्वराचें सर्वव्यापित्व दाखवितात. उपनिषदांत " ब्रह्मैवेदं अमृतं पुरस्तात् ब्रह्म पश्चात् ब्रह्म दक्षिणतश्चोत्तरेण । अधश्चोर्ध्वं च प्रसृतं ब्रह्मैवेदं विश्वमिदं वरिष्ठम् " ( मुं. २.२.११; छां. ७.२५ ) असें जें ब्रह्माचें वर्णन येतें त्याला अनुसरून भक्तिमार्गांतील ही नमनात्मक स्तुति आहे. ]

(४१) तुमचा हा महिमा न ओळखितां मित्र समजून ' रे कृष्णा, ' ' रे यादवा ' ' रे सखे ' असें चुकीनें किंवा सलगीनें जें कांहीं मी अमर्याद बोललों असेन, (४२) आणि आहारविहारांत किंवा निजण्याबसण्यांत, हे अच्युता ! एकट्याला किंवा चारचौघांत मी जो कांहीं तुमचा थट्टेनें अपमान केला असेल त्याची आपण मला क्षमा करावी असें तुम्हां अप्रमेयांजवळ माझें मागणें आहे. (४३) तुम्हींच या चराचर जगताचे पिता असून पूज्य व गुरूचे गुरू आहां ? सर्व त्रैलोक्यांत तुमच्या बरोबरीचा

तस्मात्प्रणम्य प्रणिधाय कायं प्रसादये त्वामहमीशमीड्यम् ।
पितेव पुत्रस्य सखेव सख्युः प्रियः प्रियायार्हसि देव सोढुम् ॥ ४४ ॥

कोणी नाहीं. मग हे अतुलप्रभावा ! अधिक कोठून असणार ? (४४) या साठीं स्तुत्य व समर्थ अशी तुमची 'प्रसन्न व्हा' म्हणून शरीर वांकवून नमस्कार करून मी प्रार्थना करीत आहें. पिता ज्याप्रमाणें आपल्या पुत्राचे, किंवा सखा ज्याप्रमाणें आपल्या सख्याचे ( अपराध क्षमा करितो ), त्याप्रमाणें हे देवा ! प्रियानें म्हणजे तुम्हीं, प्रियाय म्हणजे तुमचा प्रिय जो मी त्याला किंवा तत्प्रीत्यर्थ ( माझे सर्व ) अपराध क्षमा करावे.

[ " प्रियः प्रियायार्हसि " या शब्दांचा 'प्रिय पुरुष ज्याप्रमाणें आपल्या पिय स्त्रिला '' असा कित्येक अर्थ करितात. पण आमच्या मतें तो बरोबर नाहीं. कारण " प्रियायार्हसि " यार्चीं प्रियायाः+अर्हसि किंवा प्रियायै×अर्हसि अशींहि व्याकरणरीत्या पदें पडत नसून 'इव' हा उपमाद्योतक शब्दहि या श्लोकांत दोनदांच आलेला आहे. म्हणून " प्रियः प्रियायार्हसि " ही तिसरी उपमा न समजतां उपमेय मानणेंच अधिक प्रशस्त होय. 'पुत्राचें,' (पुत्रस्य), सख्याचें (सख्युः) या दोन उपमानात्मक षष्ठ्यंत शब्दाप्रमाणें उपमेयांतहि 'प्रियस्य' ( प्रियाचें ) असें षष्ठ्यंत पद असतें तर अधिक चांगलें झालें असतें. पण 'स्थितस्य गतिश्चिंतनिया' या न्यायानें आपणांस या ठिकाणीं वागलें पाहिजे. 'प्रियस्य' असें षष्ठ्यंत पुल्लींगी पद नाहीं म्हणून 'प्रियायाः' असें व्याकरणविरुद्ध षष्ठ्यंत स्त्रीलिंगी पद काढणें, आणि तें अर्जुनाला लागू पडत नाहीं म्हणून 'इव' शब्द अध्याहृत कल्पून 'प्रियः प्रियायाः'–प्रिय आपल्या प्रिय स्त्रीचें–अशी तिसरी, व तिहि शृंगारिक अतएव अप्रासंगिक, उपमा मानणें आमच्या मतें युक्त नाहीं. शिवाय पुत्रस्य, सख्युः, प्रियायाः हीं तिन्ही पदें उपमानांत गेलीं म्हणजे उपमेयांत षष्ठ्यंत पद मुळींच शिल्लक रहात नाहीं व " मे किंवा मम " असें

अदृष्टपूर्वं हृषितोऽस्मि दृष्ट्वा भयेन च प्रव्यथितं मनो मे ।
तदेव मे दर्शय देव रूपं प्रसीद देवेश जगन्निवास ॥ ४५ ॥
किरीटिनं गदिनं चक्रहस्तमिच्छामि त्वां द्रष्टुमहं तथैव ।
तेनैव रूपेण चतुर्भुजेन सहस्रबाहो भव विश्वमूर्ते ॥ ४६ ॥

श्रीभगवानुवाच ।

§§ मया प्रसन्नेन तवार्जुनेदं रूपं परं दर्शितमात्मयोगात् ।
तेजोमयं विश्वमनंतमाद्यं यन्मे त्वदन्येन न दृष्टपूर्वम् ॥ ४७ ॥

पदपुनः अध्याहृत ध्यावें लागतें; आणि इतक्या खटाटोपानें उपमान व उपमेय यांत विभक्तिसाम्य साधून घेतलें तरी, दोहोंमध्यें लिंगवैषम्याचा नवा दोष पुनः उत्पन्न होतो तो होतोच. दुसऱ्या पक्षीं म्हणजे प्रियाय +अर्हसि अशीं व्याकरणरीत्या शुद्ध व सरळ पदें पाडिलीं तर उपमेयांत जेथें षष्ठी असावी तेथें 'प्रियाय' ही चतुर्थी येते एवढा एकच आक्षेप रहातो, व तोहि विशेष महत्त्वाचा नाहीं. कारण षष्ठीचा अर्थ या ठिकाणीं चतुर्थीसारखाच आहे व इतरत्रहि पुष्कळदां असतो. परमार्थप्रपा टीकेंत आमच्याप्रमाणेंच या श्लोकाचा अर्थ केला आहे.]

(४५) कधीं न पाहिलेलें पाहून मला हर्ष झाला आहे व भयानें माझें मन व्याकुळ झालें आहे. हे जगन्निवासा देवदेवा ! प्रसन्न व्हा ! आणि हे देवा ! आपलें तें पूर्वीचें स्वरूप दाखवा. (४६) किरीट व गदा धारण करणारे, हातांत चक्र घेतलेले, पूर्वीप्रमाणेंच मी तुम्हाला पाहूं इच्छितों; (म्हणून) हे सहस्रबाहो विश्वमूर्ते ! त्याच चतुर्भुज रूपानें प्रकट व्हा !

श्रीभगवान् म्हणाले--(४७) हे अर्जुना ! (तुझ्यावर) प्रसन्न होऊन तुझ्याखेरीज दुसऱ्यानें पूर्वीं न पाहिलेले हें तेजोमय, अनंत, आद्य व

न वेदयज्ञाध्ययनैर्न दानैर्न च क्रियाभिर्न तपोभिरुग्रैः ।
एवंरूपः शक्य अहं नृलोके द्रष्टुं त्वदन्येन कुरुप्रवीर॥ ४८ ॥
मा ते व्यथा मा च विमूढभावो दृष्ट्वा रूपं घोरमीदृङ्ममेदम् ।
व्यपेतभीः प्रीतमनाः पुनस्त्वं तदेव मे रूपमिदं प्रपश्य ॥ ४९ ॥

संजय उवाच ।

इत्यर्जुनं वासुदेवस्तथोक्त्वा स्वकं रूपं दर्शयामास भूयः ।
आश्वासयामास च भीतमेनं भूत्वा पुनः सौम्यवपुर्महात्मा ॥५०॥

परम विश्वरूप माझ्या योगसामर्थ्यानें मी तुला दाखविलें. (४८) हे कुरुवीरश्रेष्ठा ! वेदानें, यज्ञांनीं, स्वाध्यायानें, दानानें, कर्मांनीं, किंवा उग्र तपानें माझें या प्रकारचें स्वरूप तुझ्याखेरीज दुसऱ्या कोणासहि मनुष्यलोकीं पहावयास मिळणें शक्य नाहीं. (४९) माझें असलें हें घोर रूप पाहून तुझ्या चित्ताला व्यथा होऊं देऊं नको, अगर गांगरल्यासारखाहि होऊं नको. भीति सोडून देऊन संतुष्ट मनानें पुनः तेंच हें माझें स्वरूप तूं पहा. संजय म्हणाला–(५०) असें याप्रमाणें भाषण करून वासुदेवांनीं अर्जुनाला पुनः आपलें (पूर्वीचें) स्वरूप दाखविलें; आणि पुनः सौम्य रूप धारण करून त्या महात्म्यानें भ्यालेल्या त्या अर्जुनास धीर दिला

[विश्वरूपवर्णनाच्या या ३६ श्लोकांचें आणि गीतेच्या द्वितीय अध्यायांतील श्लोक ५–८, २०, २२, २९ व ७०, आठव्या अध्यायांतील श्लोक ९, १०, ११, व २८, नवव्या अध्यायांतील श्लोक २० व २१, पंधराव्या अध्यायांतील श्लोक २–५ व १५, यांचें वृत्त एकच म्हणजे अकरा अक्षरी चरणांचें आहे. पण त्यांत गणांचा एक नियम नसल्यामुळें कालिदासादिकांच्या काव्यांतील इंद्रवज्रा, उपेंद्रवज्रा, उपजाति, दोधक, शालिनी वगैरे वृत्तांच्या चालीवर हे श्लोक म्हणतां येत नाहींत, अर्थात् ही वृत्तरचना आर्ष म्हणजे वेदसंहितेंतल्या त्रिष्टुप्

अर्जुन उवाच ।

दृष्ट्वेदं मानुषं रूपं तव सौम्यं जनार्दन ।
इदानीमस्मि संवृत्तः सचेताः प्रकृतिं गतः ॥ ५१ ॥

श्रीभगवानुवाच ।

§§ सुदुर्दर्शमिदं रूपं दृष्टवानसि यन्मम ।
देवा अप्यस्य रूपस्य नित्यं दर्शनकांक्षिणः ॥ ५२ ॥
नाहं वेदैर्न तपसा न दानेन न चेज्यया ।
शक्य एवंविधो द्रष्टुं दृष्टवानसि मां यथा ॥ ५३ ॥
भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन ।
ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परंतप ॥ ५४ ॥

वृत्ताच्या धर्तीवर केलेली आहे, व त्यामुळें गीता पुष्कळ प्राचीन असावी हा सिद्धांत अधिक बळकट होतो. गीतारहस्य परिशिष्टप्रकरण पृ. ५११ पहा.]

अर्जुन म्हणाला—(५१) हे जनार्दना ! तुमचें हें सौम्य व मनुष्यदेहधारी रूप पाहून आतां मन ठिकाणावर येऊन मी पूर्ववत् सावध झालों आहे.

श्रीभगवान् म्हणाले—(५२) माझें जें हें रूप तूं पाहिलेंस तें पहाण्यास मिळणें फार कठिण आहे. देव सुद्धां हें रूप पहाण्याची नेहमीं इच्छा करीत असतात. (५३) तूं जसें मला पाहिलेंस तसें वेदांनीं, तपानें, दानानें किंवा यज्ञानेंहि (कोणी) मला पहाणें शक्य नाहीं. (५४) केवळ अनन्यभक्तीनेंच हे अर्जुना ! याप्रमाणें माझें ज्ञान होणें, मला पहाणें, आणि हे परंतपा ! माझ्या ठायीं तत्त्वानें प्रवेश करणें, शक्य आहे.

भक्तीनें परमेश्वराचें प्रथम ज्ञान होतें व नंतर शेवटीं भक्ताचें परमेश्वराशीं तादात्म्य होतें हाच सिद्धान्त पूर्वी ४.९ व पुढें १८.५५ या

§§ मत्कर्मकृन्मत्परमो मद्भक्तः संगवर्जितः ।
निर्वैरः सर्वभूतेषु यः स मामेति पांडव ॥ ५५ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुन-संवादे विश्वरूपदर्शनं नाम एकादशोऽध्यायः ॥ ११ ॥

---

श्लोकांत पुनः आला असून त्याचा खुलासा गीतारहस्याच्या तेराव्या प्रकरणांत ( पृ. ४२५–४२७ ) आम्हीं केला आहे तो पहा. आतां अर्जुनास सकलगीतार्थसार काय तें थोडक्यांत सांगतात—]

(५५) सर्व कर्में माझीं म्हणजे परमेश्वराचीं होत या बुद्धीनें कर्मे करणारा, मत्परायण व संगविरहित आणि सर्व भूतांचे ठायीं निर्वैर असा जो माझा भक्त तो हे पांडवा ! मला येऊन पोंचतो.

[ परमेश्वरार्पणबुद्धीनें, म्ह० जगांतील सर्व कर्मे परमेश्वराचें असून तोच खरा कर्ता व करविता आहे, पण हें कर्म आपणास निमित्तमात्र करून तो करवीत आहे अशा निरभिमानबुद्धीनें, जगांतील व्यवहार भगवद्भक्तानें करावे ( वर श्लोक ३३ पहा ), म्हणजे तीं कर्मे शान्तीच्या किंवा मोक्ष-प्राप्तीच्या आड येत नाहींत, असा वरील श्लोकाचा अर्थ आहे; आणि या श्लोकांत सर्व गीताशास्त्राचें तात्पर्य आलें आहे, असें शांकर भाष्यांतहि म्हटलें आहे. गीतेंतील भक्तिमार्ग स्वस्थ ‘ हरि हरि ’ म्हणण्यास सांगणारा नसून जाज्वल्य भक्तीबरोबरच उत्साहानें सकल निष्काम कर्में करण्यास सांगणारा आहे असें यावरून उघड सिद्ध होतें. ‘ निर्वैर ’ म्हणजे संन्यासमार्गीयांप्रमाणें निष्क्रिय असा अर्थ या ठिकाणीं विवक्षित नाहीं हें व्यक्त करण्यासाठीं त्याला ‘ मत्कर्मकृत् ’ म्हणजे ‘ सर्व कर्में परमेश्वराचीं आहेत, आपलीं नव्हेत, असें मानून परमेश्वरार्पण-बुद्धीनें तीं करणारा,’ हें विशेषण जोडलेलें आहे. पण याबद्दल गीता-

# द्वादशोऽध्यायः ।

अर्जुन उवाच ।

एवं सततयुक्ता ये भक्तास्त्वां पर्युपासते ।
ये चाप्यक्षरमव्यक्तं तेषां के योगवित्तमाः ॥ १ ॥

श्रीभगवानुवाच ।

§§ मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते ।
श्रद्धया परयोपेतास्ते मे युक्ततमा मताः ॥ २ ॥
ये त्वक्षरमनिर्देश्यमव्यक्तं पर्युपासते ।

रहस्याच्या बाराव्या प्रकरणांत (पृ० ३८९–३९६) सविस्तर विचार केला असल्यामुळें येथें जास्त चर्चा करीत नाहीं ].

याप्रमाणें श्रीभगवंतांनीं गाइलेल्या म्हणजे सांगितलेल्या उपनिषदांत ब्रह्मविद्यान्तर्गत योग–म्हणजे कर्मयोग–शास्त्रावरील श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या संवादांतील विश्वरूपदर्शनयोग नांवाचा अकरावा अध्याय समाप्त झाला.

---

## अध्याय बारावा.

[ कर्मयोगसिद्ध्यर्थ सातव्या अध्यायांत ज्ञानविज्ञाननिरूपणास सुरुवात होऊन आठव्यांत अक्षर, अनिर्देश्य व अव्यक्त ब्रह्माचें स्वरूप सांगितलें; आणि नंतर नवव्या अध्यायांत भक्तिरूप प्रत्यक्ष राजमार्गाच्या निरूपणास सुरुवात करून दहाव्यांत व अकराव्यांत तदंतर्गत 'विभूति-वर्णन' व विश्वरूपदर्शन' हीं दोन उपाख्यानें झाल्यावर, भक्तीनें व निःसंग बुद्धीनें सर्व कर्में करण्याबद्दल सर्वार्थसार म्हणून अकराव्याच्या अखेर अर्जुनास उपदेश केला. आतां यावर अर्जुन असा प्रश्न करितो कीं, कर्मयोग

सर्वत्रगमचिंत्यं च कूटस्थमचलं ध्रुवम् ॥ ३ ॥
संनियम्येंद्रियग्रामं सर्वत्र समबुद्धयः ।
ते प्राप्नुवन्ति मामेव सर्वभूतहिते रताः ॥ ४ ॥
क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् ।
अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥ ५ ॥

सिद्ध्यर्थ सातव्या व आठव्या अध्यायांत क्षराक्षरविचारपूर्वक परमेश्वराचें अव्यक्त रूपच श्रेष्ठ असें सिद्ध करून अव्यक्ताची किंवा अक्षराची उपासना (७.१९ व २४; ८.२१) सांगितली, व युक्तचित्तानें युद्ध कर (८.७) असा उपदेश केला; आणि पुढें नवव्या अध्यायांत व्यक्तोपासनेचा प्रत्यक्ष धर्म सांगून सर्व कर्में परमेश्वरार्पणबुद्धीनें करावीं (९.२७,३४ व ११.५५) असें सांगितलें. तरी या दोहोंपैकीं श्रेष्ठ मार्ग कोणता ? या प्रश्नांत व्यक्तोपासना म्हणजे भक्ति असा अर्थ आहे. पण ही भक्ति निरनिराळ्या अनेक उपास्यांची असा अर्थ येथें विवक्षित नसून उपास्य अगर प्रतीक कोणतेंहि असलें तरी त्यांत एकाच सर्वव्यापी परमेश्वराची भावना ठेवून जी भक्ति करितात ती खरी व्यक्तोपासना होय, व तीच या अध्यायांत उद्दिष्ट आहे. ]

अर्जुन म्हणाला—(१) याप्रमाणें नेहमीं युक्त म्हणजे योगयुक्त होत्साते जे भक्त तुमची, आणि जे अव्यक्त अक्षराची म्हणजे ब्रह्माची, उपासना करितात त्यांपैकीं उत्तम (कर्म) योगवेत्ते कोण ?

श्रीभगवान् म्हणाले—(२) माझ्या ठिकाणीं मन ठेवून नेहमीं युक्तचित्त होत्साते, परमश्रद्धेनें जे माझी उपासना करितात ते माझ्या मतें सर्वांत उत्तम युक्त म्हणजे योगी होत. (३) पण जे अनिर्देश्य म्हणजे प्रत्यक्ष दाखवितां न येणारें, अव्यक्त, सर्वव्यापी, अचिंत्य आणि कूटस्थ म्हणजे सर्वांच्या बुडाशीं असणारें, अचल व नित्य अशा अक्षराची म्हणजे ब्रह्माची उपासना (४) सर्व इंद्रियें आंवरून सर्वत्र समबुद्धि होत्साते करितात, ते सर्व भूतांच्या हितांत गढलेले (लोक देखील) मलाच येऊन पोंचतात; (५) तथापि त्यांचें चित्त अव्यक्ताचे ठिकाणीं आसक्त असल्यामुळें त्यांना क्लेश

ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः
अनन्येनैव योगेन मां ध्यायन्त उपासते ॥ ६ ॥
तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात् ।
भवामि न चिरात्पार्थ मय्यावेशितचेतसाम् ॥ ७ ॥
मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय ।
निवसिष्यसि मय्येव अत ऊर्ध्वं न संशयः ॥ ८ ॥

अधिक पडतात. कारण, (व्यक्त देहधारी मनुष्यांस) अव्यक्तोपासनेचा मार्ग कष्टानें सिद्ध होतो. (६) पण जे माझे ठायीं सर्व कर्मांचा संन्यास म्हणजे अर्पण करून मत्परायण होत्साते अनन्ययोगानें माझें ध्यान करून मला भजतात, (७) त्या मच्चित्त झालेल्या लोकांचा विलंब न लावितां हे पार्था ! मी या मृत्युमय संसारसागरांतून उद्धार करीत असतों. (८) (म्हणून) माझ्याच ठायीं मन ठेव, माझ्या ठायीं बुद्धि स्थिर कर म्हणजे पुढें माझ्या ठायींच तूं निवास करशील यांत संशय नाहीं.

[ भक्तिमार्गाचें श्रेष्ठत्व यांत प्रतिपादिलें आहे. दुसऱ्या श्लोकांत भगवद्भक्त उत्तम योगी हा सिद्धान्त प्रथम देऊन नंतर तिसऱ्या श्लोकांत 'तु' हें पक्षान्तरबोधक अव्यय घालून त्या व चवथ्या मिळून दोन श्लोकांत अव्यक्ताची उपासना करणारेहि मलाच पोंचतात असें विधान केलें आहे पण हें खरें असलें तरी अव्यक्तोपासकांचा मार्ग अधिक क्लेशप्रद असें पांचव्या श्लोकांत सांगून सहा व सात या दोन श्लोकांत त्यापेक्षां व्यक्तोपासनेचें सुलभत्व वर्णून आठव्या श्लोकांत त्या-प्रमाणें वागण्यास अर्जुनास अखेर उपदेश केला आहे. सारांश, अकराव्या अध्यायाच्या अखेर (गी. ११.५५) जो उपदेश केला तोच येथें अर्जुनाच्या प्रश्नावरून दृढ केला आहे. भक्तिमार्गाचें सुलभत्व कोणतें याचा सविस्तर विचार गीतारहस्याच्या तेराव्या प्रकरणांत केला असल्यामुळें येथें आम्ही त्याची पुनरुक्ति करीत नाहीं. एवढेंच सांगतों

§§ अथ चित्तं समाधातुं न शक्नोषि मयि स्थिरम् ।
अभ्यासयोगेन ततो मामिच्छाप्तुं धनंजय ॥ ९ ॥
अभ्यासेऽप्यसमर्थोऽसि मत्कर्मपरमो भव ।
मदर्थमपि कर्माणि कुर्वन्सिद्धिमवाप्स्यसि ॥ १० ॥
अथैतदप्यशक्तोऽसि कर्तुं मद्योगमाश्रितः ।
सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु यतात्मवान् ॥ ११ ॥

कीं, अव्यक्तोपासना कष्टमय असली तरी तीहि मोक्षप्रदच आहे, आणि भक्तिमार्ग झाला तरी त्यांत कर्में न सोडितां तींच ईश्वरार्पण करून अवश्य करावयाचीं आहेत हें भक्तिमार्गीयांनीं लक्षांत ठेवावें; व याच हेतूनें सहाव्या श्लोकांत "माझेच ठायीं सर्व कर्मांचा संन्यास करून" हे शब्द घातलेले आहेत, भक्तियोगांतील कर्में स्वरूपतः सोडावयाचीं नाहींत तर परमेश्वराचे ठिकाणीं तीं म्हणजे त्यांचीं फळें अर्पण करावयाचीं, असा याचा स्पष्ट अर्थ आहे. आणि जो भक्तिमान् पुरुष मला प्रिय म्हणून भगवंतांनीं या अध्यायाच्या अखेर सांगितला आहे तोहि याच म्हणजे निष्काम कर्मयोगमार्गांतला समजावयाचा, स्वरूपतः कर्मसंन्यासी नव्हे, हेंहि यावरून उघड होतें. असो; भक्तिमार्गाची सुलभता व श्रेष्ठत्व याप्रमाणें दाखवून आतां परमेश्वराच्या ठायीं या प्रकारची भक्ति जडण्यास उपाय अथवा साधनें कोणतीं तें सांगून त्यांतील तारतम्याचाहि अखेर खुलासा करितात—]

(९) आतां (याप्रमाणें) माझ्या ठायीं चांगल्या प्रकारें चित्त स्थिर ठेवणें तुला होत नसेल तर हे धनंजया! अभ्यासाच्या सहाय्यानें पुनःपुनः प्रयत्न करून माझी प्राप्ति करून घेण्याची उमेद राख. (१०) अभ्यास करण्यासहि तूं असमर्थ असशील तर मदर्थ म्हणजे मत्प्राप्त्यर्थ (शास्त्रांत सांगितलेलीं ज्ञान-ध्यान-भजन-पूजनादि) कर्में करीत जा; मदर्थ (हीं) कर्में केल्यानेंहि तूं सिद्धि पावशील. (११) पण हें कर्म करण्यासहि जर तूं

श्रेयो हि ज्ञानमभ्यासाज्ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते ।
ध्यानात्कर्मफलत्यागस्त्यागाच्छान्तिरनंतरम् ॥ १२ ॥

असमर्थ असशील तर मद्योग म्ह० मदर्पणपूर्वक जो योग, अर्थात् कर्मयोग त्याचा आश्रय करून यतात्मा म्ह० हळूहळू चित्त आंवरीत होत्साता तदनंतर (अखेर) सर्व कर्मांच्या फलाचा त्याग कर. (१२) कारण, अभ्यासापेक्षां ज्ञान अधिक चांगलें, ज्ञानापेक्षां ध्यान अधिक योग्यतेचें, ध्यानापेक्षां कर्मफलाचा त्याग (श्रेष्ठ), आणि (या कर्मफलाच्या), त्यागापासून पुढें लगेच शान्ति (प्राप्त) होत्ये.

[हे श्लोक कर्मयोगदृष्ट्या अत्यंत महत्त्वाचे आहेत; व त्यांत भक्तियुक्त कर्मयोग सिद्ध होण्यास अभ्यास, ज्ञानभजनादि कर्में वगैरे साधनें सांगून साधनांच्या तारतम्यविचारान्तीं अखेर म्हणजे १२ व्या श्लोकांत कर्मफलत्यागाचें म्हणजे निष्काम कर्मयोगाचें श्रेष्ठत्व वर्णिलें आहे. निष्काम कर्मयोगाचें हें श्रेष्ठत्व येथेंच वर्णिलें आहे असें नाहीं. तर पूर्वीं तिसऱ्या (३. ८), पांचव्या (५. २) व सहाव्या (६. ४६) अध्यायांत हाच अर्थ स्पष्टरीत्या वर्णिला असून त्याप्रमाणें फलत्यागरूप कर्मयोगाचें आचरण करण्यासहि ठिकठिकाणीं अर्जुनास उपदेश केला आहे (गीतार. पृ. ३०४, ३०५ पहा). पण गीताधर्माहून ज्यांचा संप्रदाय भिन्न आहे त्यांना ही गोष्ट विरुद्ध पडत्ये. म्हणून त्यांनीं वरील श्लोकांचे व विशेषतः १२ व्या श्लोकांतील पदांचे अर्थ बदलण्याचा प्रयत्न केला आहे. निव्वळ ज्ञानमार्गी म्हणजे सांख्य टीकाकारांस ज्ञानापेक्षां कर्मफलत्याग श्रेष्ठ ठरविलेला आवडत नाहीं. म्हणून एक तर ज्ञान शब्दानें 'पुस्तकी ज्ञान' घ्यावें किंवा कर्मफलत्यागाची ही प्रशंसा अर्थवादात्मक म्हणजे पोकळ समजावी, असें त्यांनीं म्हटलें आहे. त्याचप्रमाणें पातंजलयोगमार्गीयांस अभ्यासापेक्षां कर्मफलत्याग अधिक ठरविलेला खपत नाहीं. आणि तसेंच भक्तिमार्गीयांस म्हणजे भक्तीखेरीज दुसरी कांहीं कर्में करूं नये

§§ अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च ।

म्हणणारांस ध्यानापेक्षां म्हणजे भक्तीपेक्षां कर्मफलत्यागाचें श्रेष्ठत्व मान्य होत नाहीं. पातंजलयोग, ज्ञान किंवा भक्ति या तीन संप्रदायाहून भिन्न म्हणजे गीतेंतील भक्तियुक्त कर्मयोगसंप्रदाय हल्लीं बहुतेक लुप्त आहे; व त्यामुळें त्या संप्रदायाचा टीकाकारहि उरला नाहीं. म्हणून हल्लीं गीतेवर ज्या उपलब्ध टीका आहेत त्यांत कर्मफलत्यागाचें श्रेष्ठत्व अर्थवादात्मक ठरविलें आहे. पण आमच्या मतें ही चूक होय. गीतेंत निष्काम कर्मयोगच प्रतिपाद्य आहे असें मानिलें म्हणजे या श्लोकाच्या अर्थाबद्दल कांहींच अडचण रहात नाहीं. कर्म सोडून चालत नाहीं, निष्काम कर्म केलेंच पाहिजे, असें म्हटलें म्हणजे स्वरूपतः कर्मत्याग करणारा ज्ञानमार्ग, किंवा नुस्ती इंद्रियांची कसरत करणारा पातंजलयोग, अगर सर्व कर्में सोडून देणारा भक्तिमार्ग, हे सर्वच कर्मयोगापेक्षां कमी योग्यतेचे ठरतात. निष्काम कर्मयोग याप्रमाणें श्रेष्ठ ठरल्यावर त्यांत अवश्य लागणारी भक्तियुक्त साम्यबुद्धि संपादन, करण्यास उपाय काय एवढाच काय तो प्रश्न शिल्लक रहातो. हे उपाय तीन आहेत–अभ्यास, ज्ञान, व ध्यान. पैकीं कोणाला अभ्यास करवत नसला तर त्यानें ज्ञान किंवा ध्यान यांपैकीं कोणताहि उपाय स्वीकारावा. हे उपाय आचरण्यास यथोक्तक्रमानें सुलभ आहेत असें गीता सांगत आहे. पण हेंहि न साधलें, तर मनुष्यानें कर्मयोगाच्या आचरणासच एकदम सुरुवात करावी म्हणजे झालें असें १२ व्या श्लोकांत सांगितलें आहे. आतां या ठिकाणीं अशी एक शंका येत्ये कीं, ज्याला अभ्यास होत नाहीं व ज्ञानध्यानहि होत नाहीं, तो कर्मयोग तरी कसा चालविणार ? तेव्हां कर्मयोग सर्वापेक्षां सुलभ म्हणणेंच निरर्थक होय असें कित्येकांनीं ठरविलें आहे. पण जरा विचार केला तर या आक्षेपांत कांहीं अर्थ नाहीं असें दिसून येईल १२ व्या श्लोकांत सर्वकर्मफलत्याग 'एकदम' कर असें म्हटलेलें नाहीं. तर भगवंतांनीं वर्णिलेल्या कर्मयोगाचा

निर्ममो निरहंकारः समदुःखसुखः क्षमी ॥ १३ ॥

प्रथम आश्रय करून, ततः म्हणजे तदनंतर हळूहळू ही गोष्ट अखेर सिद्ध करून घ्यावयाची आहे. आणि असा अर्थ केला म्हणजे कांहींच विसंगत रहात नाहीं. कर्मफलाचें स्वल्पाचरणच नव्हे ( गी. २.४० ) तर जिज्ञासाहि ( गी. ६.४४ व त्यावरील आमची टीप पहा ) झाल्यानें मनुष्य धरकांत घातल्याप्रमाणें अखेर सिद्धीकडे ओढिला जातो, हें पूर्वीच्या अध्यायांतून सांगितलें आहे म्हणून कर्मयोगाचा आश्रय करणें म्हणजे त्या मार्गानें जावें असें मनांत येणें हेंच त्या मार्गांत सिद्धि मिळविण्याचें पहिलें साधन किंवा पायरी आहे; आणि हें साधन अभ्यास, ज्ञान व ध्यान यापेक्षां सुलभ नाहीं असें कोण म्हणेल? आणि १२ व्या श्लोकाचा भावार्थहि हाच आहे. भगवद्गीतेंतच नव्हे तर सूर्यगीतेंतहि याचप्रमाणें—

ज्ञानादुपास्तिरुत्कृष्टा कर्मोत्कृष्टमुपासनात् ।
इति यो वेद वेदान्तैः स एव पुरुषोत्तमः ॥

" ज्ञानापेक्षां उपासना म्ह० ध्यान किंवा भक्ति उत्कृष्ट, व उपासनेपेक्षां कर्म—अर्थात् निष्काम श्रेष्ठ, हें वेदान्ततत्त्व जो जाणितो तो पुरुषोत्तम म्हणावा " असें सांगितलें आहे ( सूर्यगी. ४.७७ ). सारांश, कर्मफलत्यागरूप योग म्हणजे ज्ञानभक्तियुक्त निष्काम कर्मयोगच सर्व मार्गांत श्रेष्ठ असें भगवद्गीतेचें ठाम मत असून त्याला अनुकूलच नव्हे तर पोषक युक्तिवाद १२ व्या श्लोकांत आहे. दुसऱ्या कोणत्या संप्रदायास तो पटत नसला तर त्यांनीं तो सोडून द्यावा, पण अर्थाची फुकट ओढाताण करूं नये. असो कर्मफलत्याग याप्रमाणें श्रेष्ठ ठरवून आतां त्या मार्गानें जाणारास ( कर्में स्वरूपतः सोडणारास नव्हे ) जी सम व शान्त स्थिति, अखेर प्राप्त होते तिचें वर्णन करून शेवटीं या प्रकारचाच भक्त मला अत्यंत प्रिय होय असें भगवान् सांगतात—]

( १३ ) कोणाचा द्वेष न करणारा, सर्व भूतांशीं मित्रभावानें

संतुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चयः ।
मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मे भक्तः स मे प्रियः ॥ १४ ॥
यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः ।
हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तो यः स च मे प्रियः ॥ १५ ॥
अनपेक्षः शुचिर्दक्ष उदासीनो गतव्यथः ।
सर्वारंभपरित्यागी यो मद्भक्तः स मे प्रियः ॥ १६ ॥
यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न कांक्षति ।
शुभाशुभपरित्यागी भक्तिमान्यः स मे प्रियः ॥ १७ ॥
समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः ।
शीतोष्णसुखदुःखेषु समः संगविवर्जितः ॥ १८ ॥
तुल्यनिंदास्तुतिर्मौनी संतुष्टो येनकेनचित् ।

वागणारा, तसाच कृपालु, ज्याची ममत्वबुद्धि व अहंकार सुटली, ज्याला सुख व दुःख सम झालीं, व जो क्षमावान्, (१४) सदा संतुष्ट, संयमी, दृढनिश्चयी, ज्यानें आपलें मन व बुद्धि मला वाहिली, असा जो माझा (कर्म-) योगी भक्त तो मला प्रिय होय. (१५) ज्याला लोक कंटाळत किंवा त्रासत नाहींत आणि लोकांनाहि जो कंटाळत नाहीं, तसेंच हर्ष, क्रोध, भय व विषाद यांपासून जो अलिप्त तोच मला प्रिय होय. (१६) निरपेक्ष, शुचिर्भूत, दक्ष म्हणजे कोणतेंहि काम आळस सोडून करणारा, (फलाबद्दल) उदासीन, ज्याला कोणताच विकार चाळवूं शकत नाहीं, आणि ज्यानें (काम्यफलाचे) सर्व आरंभ म्हणजे उद्योग सोडिले, असा जो माझा भक्त तो मला प्रिय होय. (१७) जो (कशाचाहि) आनंद मानीत नाहीं, द्वेष करीत नाहीं, शोक करीत नाहीं व इच्छाहि ठेवीत नाहीं, ज्यानें (कर्माचें) शुभ व अशुभ (फळ) सोडिलें, असा जो भक्तिमान पुरुष तो मला प्रिय होय. (१८) शत्रु आणि मित्र, तसेंच मान आणि अपमान, शीत आणि उष्ण, सुख आणि दुःख

अनिकेतः स्थिरमतिर्भक्तिमान्मे प्रियो नरः ॥ १९ ॥

दीं ज्याला सारखींच, व ज्याला (कशांतहि) आसक्ति नाहीं, (१९) ज्याला निंदा व स्तुति दोन्ही समसमान, जो मितभाषी, व जें कांहीं मिळेल तेवढ्यानेंच संतुष्ट, आणि ज्याचें चित्त स्थिर असून जो अनिकेत म्हणजे ज्याचें कर्मफलाशारूप ) बिऱ्हाड कोठेंच राहिलेलें नाहीं, असा भक्तिमान पुरुष मला प्रिय होतो.

[ 'अनिकेत' हा शब्द गृहस्थाश्रम सोडून व संन्यास घेऊन रानांत भिक्षा मागत हिंडणाऱ्या यतींच्या वर्णनांतहि पुष्कळदां येत असतो (मनु. ६.२५ पहा). व त्याचा धात्वर्थ 'घर नसणारा' असा आहे. म्हणून या अध्यायांतील 'निर्मम' 'सर्वारंभपरित्यागी' व 'अनिकेत' आणि इतरत्र गीतेंत 'त्यक्तसर्वपरिग्रहः' (४.२१, किंवा 'विविक्तसेवी' (१८.५२) इत्यादि जे शब्द आहेत त्यांवरून "घरदार सोडून निरिच्छपणानें रानांत आयुष्याचे दिवस काढणें" असें जें संन्यासाश्रममार्गाचें परम ध्येय तेंच गीतेंत प्रतिपाद्य आहे, असें संन्यासमार्गीय टीकाकारांचें म्हणणें असून त्यास आधार म्हणून स्मृतिग्रंथांतील संन्यासाश्रमप्रकरणांतील श्लोक ते दाखवीत असतात. पण गीतावक्यांचे हे केवळ संन्यासपर अर्थ संन्याससंप्रदायदृष्ट्या जरी महत्त्वाचे असले तरी खरे नव्हेत. कारण, 'निरग्नि' किंवा 'निष्क्रिय' होणें हा गीतेप्रमाणें खरा संन्यास होत नसून फक्त फलाशा सोडावी, कर्में कधींच सोडूं नयेत, असा गीतेचा कायम सिद्धान्त आहे, हें मागें अनेक वेळां सांगितलें आहे (गी. ५.२ व ६.१,२ पहा). म्हणून 'अनिकेत' या पदाचा अर्थ घरदार सोडणें असा न घेतां गीतेंतील कर्मयोगाला जुळेल असाच घेतला पाहिजे. गी. ४.२० या श्लोकांत कर्मफलाची आशा न ठेवणाऱ्या पुरुषासच 'निराश्रय' हें विशेषण दिलेलें असून गी. ६.१ यांत "अनाश्रितः कर्मफलं" असे त्याच अर्थी शब्द आलेले

§§ ये तु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते ।...

आहेत. 'आश्रय' व 'निकेत' या दोन शब्दांचा अर्थ एकच आहे. म्हणून अनिकेत म्ह० घरदार सोडणारा असा अर्थ न करितां, गृहादिकांचे ठायीं ज्याच्या मनाचें बिऱ्हाड गुंतून राहिलेलें नाहीं असा अर्थ होतो. तसेंच वर १६ व्या श्लोकांत 'सर्वारंभपरित्यागी' असा जो शब्द आहे त्याचा अर्थहि "सर्व कर्में किंवा उद्योग सोडणारा" असा न करितां "ज्याचे समारंभ फलाशाविरहित त्याचीं कर्में ज्ञानानें दग्ध होतात" (गी. ४.१९) या श्लोकाशीं समानार्थक अर्थात् "काम्य आरंभ म्ह. कर्में सोडणारा" असाच करावा लागतो, हें गी. १८.२ आणि १८. ४८ व ४९ या श्लोकांवरून सिद्ध होतें. सारांश, घरदारांत, बायकामुलांत किंवा जगाच्या इतर व्यवहारांत ज्याचें चित्त गुंतलेलें असतें त्याला त्यापासून पुढें दुःख होतें, म्हणून या सर्व गोष्टींत चित्त गुंतवून ठेवूं नये, एवढेंच गीतेचें सांगणें आहे. आणि मनाची हीच वैराग्ययुक्त स्थिति दाखविण्यास गीतेंत 'अनिकेत,' 'सर्वारंभपरित्यागी' इत्यादि शब्द स्थितप्रज्ञाच्या वर्णनांत येत असतात. हेच शब्द यतीचीं म्हणजे कर्मत्याग करणाऱ्या संन्याश्यांचीं जी वर्णनें आहेत त्यांतहि स्मृतिग्रंथांत आलेले आहेत. पण तेवढ्यामुळें कर्मत्यागरूप संन्यासच गीतेंत प्रतिपाद्य आहे असें म्हणतां येत नाही. कारण ज्याच्या बुद्धींत हें वैराग्य पूर्ण भिनलें अशा ज्ञानी पुरुषानेंहि याच विरक्त बुद्धीनें फलाशा सोडून शास्त्रतः प्राप्त होणारीं सर्व कर्में केलींच पाहिजेत, असा याबरोबरच गीतेचा दुसराहि निश्चित सिद्धान्त आहे; आणि हा पूर्वापर सर्व संबंध लक्षांत न घेतां 'अनिकेत' शब्दासारखे वैराग्यबोधक शब्द गीतेंत काठ आढळले कीं तेवढयावर मदार ठेवून कर्मसंन्यासपर मार्गच गीतेंत प्रतिपाद्य आहे, असें म्हणणें बरोबर नाहीं.

श्रद्दधाना मत्परमा भक्तास्तेऽतीव मे प्रियाः ॥ २० ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुन-
संवादे भक्तियोगो नाम द्वादशोऽध्यायः ॥ १२ ॥

(२०) वर सांगितलेला हा अमृततुल्य धर्म मत्परायण होत्साते श्रद्धेनें जे आचरितात ते भक्त मला अत्यंत प्रिय आहेत.

[ भक्तिमान ज्ञानी पुरुष सर्वांत श्रेष्ठ असें जें पूर्वी वर्णन आलें आहे ( गी. ६.४७;७.१८ ) त्या वर्णनाला अनुसरून भगवंतांनीं आपणाला अत्यंत प्रिय कोण याचें म्ह० परम भगवद्भक्त कर्मयोग्याचें या श्लोकांत वर्णन केलें आहे. पण गी. ९.२९ या श्लोकांत भगवानच " मला सर्व सारखे, अमुक प्रिय व अमुक द्वेष्य नाहीं " असें सांगतात. दिसण्यांत हा विरोध आहे असा भास होतों; पण एक वर्णन सगुणोपासनेचें किंवा भक्तिमार्गांतलें, आणि दुसरें अध्यात्मदृष्ट्या किंवा कर्मविपाकदृष्ट्या आहे, हें लक्षांत आणिलें म्हणजे हा विरोध रहात नाहीं. गीतारहस्याच्या तेराव्या प्रकरणाच्या अखेरीस ( पृ. ४२७ व ४२८ ) यासंबंधीं विवेचन केलें आहे तें पहा. ]

याप्रमाणें श्रीभगवंतांनीं गाइलेल्या म्हणजे सांगितलेल्या उपनिषदांत ब्रह्मविद्यान्तर्गत योग—म्हणजे कर्मयोग—शास्त्रावरील श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या संवादांतील भक्तियोग नांवाचा बारावा अध्याय समाप्त झाला.

---

## अध्याय तेरावा.

[ अनिर्देश्य व अव्यक्त परमेश्वराचें ( बुद्धीनें ) चिंतन करून अखेर मोक्ष मिळतो हें जरी खरें आहे, तरी त्यापेक्षां श्रद्धेनें परमेश्वराच्या प्रत्यक्ष व व्यक्त स्वरूपाची भक्ति करून परमेश्वरार्पण बुद्धीनें सर्व कर्मे करीत गेल्यानें तोच मोक्ष सुलभ रीतीनें मिळतो असें गेल्या अध्यायांत सिद्ध

# त्रयोदशोऽध्यायः ।

श्रीभगवानुवाच ।

इदं शरीरं कौंतेय क्षेत्रमित्यभिधीयते ।

केलें. परंतु सातव्या अध्यायांत जें ज्ञानविज्ञान सांगण्यास सुरुवात केली तें एवढ्यानेंच संपत नाहीं. परमेश्वराचें पूर्ण ज्ञान होण्यास बाह्य सृष्टीच्या क्षराक्षरविचाराबरोबरच मनुष्याचें शरीर आणि आत्मा, किंवा क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ, यांचाहि विचार करावा लागतो. तसेंच जड प्रकृतीपासून सर्व व्यक्त पदार्थ निर्माण होतात असें जरी सामान्यत. कळलें तरी प्रकृतीच्या कोणत्या गुणामुळें हा विस्तार होतो व त्याचा क्रम काय हें सांगितल्याखेरीज ज्ञान-विज्ञानाचें निरूपण पूर्ण होत नाहीं. म्हणून तेराव्या अध्यायांत प्रथम क्षेत्र-क्षेत्रज्ञविचार व पुढें चार अध्यायांत गुणत्रयविभाग सांगून अठराव्या अध्या-यांत एकंदर सर्व विषयाचा उपसंहार केला आहे. सारांश तृतीय षडध्यायी ही स्वतंत्र नसून कर्मयोगसिद्ध्यर्थ ज्या ज्ञानविज्ञानाच्या निरूपणास सातव्या अध्यायांत सुरुवात झाली त्याचीच पूर्तता या षडध्यायींत केली आहे. गीतारहस्य प्र. १४ पृ. ४५७–४५९ पहा. गीतेच्या कित्येक प्रतींत या तेराव्या अध्यायाच्या आरंभीं "अर्जुन उवाच—प्रकृतिं पुरुषं चैव क्षेत्रं क्षेत्रज्ञमेव च । एतद्वेदितुमिच्छामि ज्ञानं ज्ञेयं च केशव ॥" असा श्लोक दिलेला असतो; व त्याचा अर्थ अर्जुन म्हणाला, मला प्रकृति, पुरुष, क्षेत्र, क्षेत्रज्ञ, ज्ञान व ज्ञेय म्हणजे काय तें जाणण्याची इच्छा आहे, म्हणून मला तें सांगा" असा आहे. पण क्षेत्रक्षेत्रज्ञ विचार गीतेंत कसा आला हें न कळ. त्यामुळें कोणीं तरी हा श्लोक येथें मागाहून घुसडून दिला आहे असें स्प दिसून येतें. टीकाकार हा श्लोक प्रक्षिप्त मानितात; व तसें न केल्यास गीतेंतील श्लोकांची संख्याहि सातशेंपेक्षां एक अधिक होते. म्हणून आम्हींहि हा श्लोक प्रक्षिप्त समजून शांकरभाष्याप्रमाणें या अध्यायाचा आरंभ केला आहे.]

एतद्यो वेत्ति तं प्राहुः क्षेत्रज्ञ इति तद्विदः ॥ १ ॥
क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि सर्वक्षेत्रेषु भारत ।
क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं यत्तज्ज्ञानं मतं मम ॥ २ ॥

श्रीभगवान् म्हणाले–(१) हे कौंतेया! या शरीरासच क्षेत्र असें म्हटलें आहे. हें (शरीर) जो जाणितो त्यास क्षेत्रज्ञ असें तद्विद म्हणजे या शास्त्रांतील ज्ञाते पुरुष म्हणतात. (२) सर्व क्षेत्रांमध्यें हे भारता! क्षेत्रज्ञ सुद्धां मीच असें समज. क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचें जें ज्ञान तेंच माझें (परमेश्वराचें) ज्ञान मानिलें आहे.

[पहिल्या श्लोकांत 'क्षेत्र' व 'क्षेत्रज्ञ' या दोन शब्दांचे अर्थ दिले आहेत; व दुसऱ्या श्लोकांत क्षेत्रज्ञ म्हणजे मी परमेश्वर, किंवा जें पिंडीं तेंच ब्रह्मांडीं, असें क्षेत्रज्ञाचें स्वरूप सांगितलें आहे. दुसऱ्या श्लोकांतील चापि=सुद्धां या शब्दांचा क्षेत्रज्ञच नव्हे तर क्षेत्र देखील मीच आहें असा अर्थ होतो. कारण, क्षेत्र किंवा शरीर ज्या पंचमहाभूतांचें बनतें तीं प्रकृतीपासून झालेलीं असून प्रकृति परमेश्वराचीच कनिष्ठ विभूति आहे, हें सातव्या व आठव्या अध्यायांत वर्णिलें आहे (७. ४;८.४;९ ८ पहा). क्षेत्र किंवा शरीर अशा रीतीनें पंचमहाभूतांचें झालेलें असल्यामुळें क्षराक्षरविचारांत ज्याला क्षर म्हणतात त्या वर्गांतच क्षेत्राचा समावेश होतो; आणि क्षेत्रज्ञ म्हणजेच परमेश्वर होय. एतावता क्षराक्षरविचाराप्रमाणेंच क्षेत्रक्षेत्रज्ञविचारहि परमेश्वराच्या ज्ञानाचा एक भाग बनतो (गीतार. पृ. १४१–१४६ पहा.), आणि हाच अभिप्राय मनांत आणून दुसऱ्या श्लोकाचे अखेर "क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचे जें ज्ञान तेंच माझें ह्मणजे परमेश्वराचें ज्ञान" हें वाक्य आलें आहे. ज्यांना अद्वैत वेदान्त कबूल नाही त्यांना "क्षेत्रज्ञ सुद्धां मीच" या वाक्याची ओढाताण करावी लागून 'क्षेत्रज्ञ' व 'मी परमेश्वर' यांचा अभेदभाव या वाक्यानें दाखविला जात नाहीं असें प्रतिपादन

§§ तत्क्षेत्रं यच्च यादृक् च यद्विकारि यतश्च यत् ।
स च यो यत्प्रभावश्च तत्समासेन मे शृणु ॥ ३ ॥
ऋषिभिर्बहुधा गीतं छंदोभिर्विविधैः पृथक् ।
ब्रह्मसूत्रपदैश्चैव हेतुमद्भिर्विनिश्चितैः ॥ ४ ॥

करावें लागतें; व दुसरे कित्येक ' माझें ' ( मम ) या पदाचा अन्वय ' ज्ञान ' या शब्दाशीं न लावितां ' मतं ' म्हणजे " मानिलें आहे " या शब्दाशीं लावून " यांचें जें ज्ञान तें मी ज्ञान समजतों " असा अर्थ करितात. पण हे अर्थ सरळ नव्हेत देहामध्यें वास करणारा आत्मा ( अधिदेव ) मीच आहे, किंवा " पिंडीं तें ब्रह्मांडीं," असें आठव्या अध्यायाच्या आरंभींच वर्णन असून सातव्यांतहि 'जीव ही माझीच परा प्रकृति (७.५), असें सांगितलें आहे. आणि पुढें या अध्यायांतील श्लोक २२ व ३१ यांतहि तसेंच वर्णन आहे. असो; आतां क्षेत्रक्षेत्रज्ञ-विचार कोठें व कोणीं केलेला आहे तें सांगतात—]

(३) क्षेत्र म्हणजे काय, तें कशाप्रकारचें आहे, त्याचे विकार कोणते, आणि (त्यांतहि) कशापासून काय होतें; तसेंच तो म्हणजे क्षेत्रज्ञ कोण व त्याचा प्रभाव काय, हें मी संक्षेपानें सांगतों ऐक. (४) बहुत प्रकारें, विविध छंदांनीं, पृथक् पृथक् (अनेक) ऋषींनीं आणि (कार्यकारण-रूप) हेतु दाखवून पूर्ण निश्चित केलेल्या ब्रह्मसूत्रांतील पदांनींहि हें म्हणजे हा विषय गाइला आहे.

[ या श्लोकांत ब्रह्मसूत्र शब्दानें प्रस्तुतचीं वेदान्तसूत्रें उद्दिष्ट आहेत हें गीतारहस्याचे परिशिष्टप्रकरणांत आम्हीं सविस्तर दाखविलें आहे ( गीतार. पृ. ५२७–५३४ पहा ). उपनिषदें हा एकच ऋषीचा एक ग्रंथ नसून; अनेक ऋषींस भिन्न भिन्न कालीं किंवा स्थलीं ज्या अध्यात्म-विचारांचें स्फुरण झालें ते विचार परस्परसंबंध न पहातां निरनिराळ्या उपनिषदांतून वर्णिले आहेत. त्यामुळें उपनिषदें संकीर्ण व कित्येक

§§ महाभूतान्यहंकारो बुद्धिरव्यक्तमेव च ।
इंद्रियाणि दशैकं च पंच चेंद्रियगोचराः ॥ ५ ॥
इच्छा द्वेषः सुखं दुःखं संघातश्चेतना धृतिः ।
एतत्क्षेत्रं समासेन सविकारमुदाहृतम् ॥ ६ ॥

ठिकाणीं परस्परविरुद्ध झाल्यासारखीं दिसतात. वरील श्लोकाच्या पहिल्या चरणांत 'विविध' आणि 'पृथक्' असे जे शब्द आहेत ते उपनिषदांच्या या संकीर्णस्वरूपासच उद्देशून आहेत. उपनिषदें अशा प्रकारें संकीर्ण व परस्परविरुद्ध असल्यामुळें त्यांतील सिद्धान्तांची एकवाक्यता करण्यासाठीं बादरायणाचार्यांनीं ब्रह्मसूत्रें किंवा वेदान्तसूत्रें रचिलेलीं आहेत. व त्यांत उपनिषदांतील सर्व विषय घेऊन प्रत्येक विषयासंबंधानें सर्व उपनिषदांपासून एकच सिद्धान्त कसा काढितां येतो हें सप्रमाण म्हणजे कार्यकारणादि हेतु दाखवून पूर्णपणें सिद्ध केलें आहे. अर्थात् उपनिषदांतील रहस्य समजण्यास वेदान्तसूत्रांची नेहमीं जरूर पडत्ये म्हणून या श्लोकांत दोहोंचाहि उल्लेख केलेला आहे. ब्रह्मसूत्रांच्या दुसऱ्या अध्यायांतील तिसऱ्या पादाच्या पहिल्या १६ सूत्रांत क्षेत्राचा व नंतर त्या पादाच्या अखेरपर्यंत क्षेत्रज्ञाचा विचार केलेला आहे. ब्रह्मसूत्रांत हा विचार आहे म्हणून त्यांस 'शारीरकसूत्रें' म्हणजे शरीर किंवा क्षेत्र याचा विचार करणारीं सूत्रें असेंहि म्हणतात. असो; क्षेत्रक्षेत्रज्ञविचार कोणीं व कोठें केला आहे तें सांगितलें; आतां क्षेत्र म्हणजे काय तें सांगतात—]

(५) (पृथिव्यादि पांच स्थूल) महाभूतें, अहंकार, बुद्धि (महान्), आणि अव्यक्त (प्रकृति), तसेंच दहा (सूक्ष्म) इंद्रियें व एक (मन), आणि (पांच) इंद्रियांचे पांच (शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध हे सूक्ष्म) विषय, (६) इच्छा, द्वेष, सुख, दुःख, संघात, चेतना म्हणजे प्राणादिकांचा व्यक्त व्यापार, आणि धृति म्हणजे धैर्य, या (तत्त्वांच्या) समुदायास सविकार क्षेत्र असें म्हटलें आहे.

§§ अमानित्वमदंभित्वमहिंसा शांतिरार्जवम् ।

[ क्षेत्र व त्यांचे विकार यांचें हें लक्षण आहे. पांचव्या श्लोकांत सांख्यांच्या पंचवीस तत्त्वांपैकीं पुरुष सोडून बाकी चोवीस तत्त्वें आलीं आहेत. या चोवीस तत्त्वांतच मनाचा समावेश होत असल्यामुळें इच्छा, द्वेष इत्यादी मनोधर्म निराळे सांगण्याची जरूर नव्हती. काणादांच्या मतें हे धर्म आत्म्याचे होत व हें मत स्वीकारल्यास या गुणांचा क्षेत्रांतच समावेश होतो कीं नाहीं ही शंका येते. म्हणून क्षेत्र शब्दाची व्याख्या निःसंदिग्ध करण्यासाठीं क्षेत्रांतच स्पष्टरीत्या इच्छाद्वेषादि द्वंद्वांचा येथें समावेश केला आहे व त्यांतच भयाभयादि इतर द्वंद्वांचाहि लक्षणेनें समावेश होतो. सर्वांचा संघात म्हणजे समूह हा क्षेत्राहून स्वतंत्र कर्ता नाहीं हें दाखविण्यास त्याची गणना क्षेत्रांत केली आहे. 'चेतना' या शब्दाचाच कित्येकदां 'चैतन्य' असा अर्थ होतो. पण प्रकृत स्थलीं चेतना म्हणजे जड देहांत प्राणादिकांचे जे व्यापार दृग्गोचर होतात ते, किंवा जिवंतपणाच्या चेष्टा, एवढाच अर्थ विवक्षित असून जडांत ही चेतना ज्यामुळें उत्पन्न होते ती चिच्छक्ति किंवा चैतन्य क्षेत्रज्ञ या रूपानें क्षेत्राहून निराळें असतें, हें वर दुसऱ्या श्लोकांत सांगितलें आहे. 'धृति' या शब्दाची व्याख्या गीतेंतच पुढें (१८. ३३) केलेली आहे ती पहा. सहाव्या श्लोकांतील 'समासेन' या पदाचा अर्थ "हीं सर्व मिळून होणारा समुदाय" असा आहे. जास्त माहिती गीतारहस्याच्या आठव्या प्रकरणाच्या अखेर (पृ. १४१ व १४२) दिली आहे ती पहा. 'क्षेत्रज्ञ' म्हणजे 'परमेश्वर' हें प्रथम सांगून नंतर 'क्षेत्र' म्हणजे काय याचा खुलासा केला. आतां ज्ञान कशाला म्हणावयाचें हें सदर ज्ञानाचे मनुष्याच्या स्वभावावर जे परिणाम घडतात त्यांचें वर्णन करून सांगतात; व पुढें ज्ञेयाचें स्वरूप सांगितलें आहे. हे दोन्ही विषय दिसण्यांत निराळे दिसतात; पण वास्तविकरीत्या क्षेत्रक्षेत्रज्ञविचाराचेच दोन भाग आहेत. कारण क्षेत्रज्ञ म्हणजे परमेश्वर

आचार्योपासनं शौचं स्थैर्यमात्मविनिग्रहः ॥ ७ ॥
इन्द्रियार्थेषु वैराग्यमनहंकार एव च ।
जन्ममृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनम् ॥ ८ ॥
असक्तिरनभिष्वंगः पुत्रदारगृहादिषु ।
नित्यं च समचित्तत्वमिष्टानिष्टोपपत्तिषु ॥ ९ ॥
मयि चानन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी ।
विविक्तदेशसेवित्वमरतिर्जनसंसदि ॥ १० ॥
अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्त्वज्ञानार्थदर्शनम् ।
एतज्ज्ञानमिति प्रोक्तमज्ञानं यदतोऽन्यथा ॥ ११ ॥

हें आरंभींच सांगितलें आहे. म्हणून क्षेत्रज्ञाचें जें ज्ञान तेंच परमेश्वराचें ज्ञान होय, व याचेंच स्वरूप पुढील श्लोकांतून वर्णिलें आहे. भलताच निराळा विषय मध्यें घुसडलेला नाहीं. ]

(७) मान नसणें, दंभ नसणें, अहिंसा, क्षमा, सरळपणा, गुरुसेवा, शुचिर्भूतपणा, स्थैर्य, मनोनिग्रह, (८) इंद्रियांच्या विषयांचे ठायीं विरक्ति, तसेंच अहंकार नसणें, आणि जन्म, मृत्यु, जरा, व्याधि व दुःख ( हे आप ल्यामागें लागलेले ) दोष आहेत अशी बुद्धि असणें; (९) (कर्मांचे ठायीं) अनासक्ति, बायकामुलें व घर इत्यादिकांत लंपट न होणें, इष्ट किंवा अनिष्ट प्राप्त झालें तरी नेहमीं चित्ताची एकसारखी वृत्ति असणें, (१०) आणि माझ्या ठायीं अनन्यभावानें न ढळणारी भक्ति 'विविक्त' म्हणजे निवडक किंवा एकान्त जागीं रहाणें, सामान्य जनांचा चव्हाठा न आवडणें, (११) अध्यात्मज्ञान नित्य आहे अशी बुद्धि होणें, व तत्त्वज्ञानाच्या सिद्धान्तांचें परिशीलन, यांस ज्ञान म्हटलें आहे. याखेरीज जें दुसरें तें अज्ञान होय.

§§ ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वाऽमृतमश्नुते ।

[ क्षेत्रक्षेत्रज्ञाचें ज्ञान म्हणजे प्रकृतिपुरुषांच्या विवेकाचें ज्ञान असें सांख्यांचें मत आहे, व तें याच अध्यायांत पुढें सांगितलें आहे (१३. १९–२३; १४. १८); तसेंच "अविभक्तं विभक्तेषु" असेंहि ज्ञानाच्या स्वरूपाचें व्यापक लक्षण अठराव्या अध्यायांत ( १८. २० ) दिलें आहे पण क्षेत्रक्षेत्रज्ञज्ञान म्हणजे अमुक अमुक गोष्टी अमक्या प्रकारच्या आहेत असें केवळ बुद्धीनें जाणणें एवढाच अर्थ मोक्षशास्त्रांत विवक्षित नसतो. त्या ज्ञानाचा देहस्वभावावर साम्यबुद्धिरूप परिणाम घडला असला पाहिजे, एरवीं तें ज्ञान अपुरें किंवा कच्चें होय, असा अध्यात्मशास्त्राचा सिद्धान्त आहे. म्हणून ज्ञान म्हणजे बुद्धीला अमुक अमुक कळणें असें न सांगतां मान व दंभ सुटणें, अहिंसा, अनासक्ति, समबुद्धि इत्यादि वरील पांच श्लोकांत सांगितलेले वीस गुण मनुष्याचे अंगांत दृष्टीस पडूं लागले म्हणजे त्याला ज्ञान म्हणावें अशी ज्ञानाची व्याख्या वरील श्लोकांत केली आहे ( गीतार. प्र. ९ पृ. २४५ व ३४६ पहा). दहाव्या श्लोकांत "विविक्त जागीं रहाणें व चव्हाठा न आवडणें" असें जें ज्ञानाचें एक लक्षण दिलें आहे त्यावरून संन्यासमार्गच गीतेस अभिप्रेत आहे असें दाखविण्याचा कित्येकांनीं प्रयत्न केला आहे. पण हें मत खरें नसून असा अर्थ करणें युक्तहि नाहीं हें आम्हीं पूर्वीच सांगितलें आहे (गी. १२.१९ वरील टीप व गीतार. पृ. २८० पहा). 'ज्ञान' म्हणजे काय एवढ्याचा या ठिकाणीं विचार केलेला आहे; व तें ज्ञान म्हणजे बायकामुलें, घरदार किंवा लोकांचा चव्हाठा या ठिकाणीं अनासक्ति होय, याबद्दल कोणताच वाद नाहीं. हें ज्ञान झाल्यावर याच अनासक्त बुद्धीनें बायकामुलांत किंवा जगांत राहून सर्वभूतहितार्थ जगाचे व्यवहार करावे कीं नाहीं हा यापुढला प्रश्न आहे आणि त्याचा निकाल केवळ ज्ञानाच्या व्याख्येवरूनच करणें योग्य नाहीं. कारण, गीतेंतच भगवंतांनीं अनेक ठिकाणीं ज्ञानी पुरु-

अनादिमत्परं ब्रह्म न सत्तन्नासदुच्यते ॥ १२ ॥
सर्वतः पाणिपादं तत्सर्वतोऽक्षिशिरोमुखम् ।
सर्वतः श्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति ॥ १३ ॥
सर्वेंद्रियगुणाभासं सर्वेंद्रियविवर्जितम् ।
असक्तं सर्वभृच्चैव निर्गुणं गुणभोक्तृ च ॥ १४ ॥
बहिरंतश्च भूतानामचरं चरमेव च ।
सूक्ष्मत्वात्तदविज्ञेयं दूरस्थं चांतिके च तत् ॥ १५ ॥

यानें कर्मात लंपट न होतां तींच कर्मे आसक्त बुद्धीनें लोकसंग्रहार्थ केलीं पाहिजेत असें म्हटलें असून तत्सिद्ध्यर्थ जनकाच्या व आपल्या वर्तनाचा दाखलाहि दिला आहे (गी. ३. १९–२५; ४. १४). शहरांत रहाण्याची आवड नसूनहि जगाचे व्यवहार केवळ कर्तव्य म्हणून कसे करितां येतात हें समर्थ श्रीरामदासांच्या चरित्रावरून उघड होतें. दासबोध १९.६.२९ व १९.९.११ पहा. हें ज्ञानाचें लक्षण झालें; आतां ज्ञेयाचें स्वरूप सांगतात—]

(१२) (आतां) जें जाणिल्यानें 'अमृत' म्हणजे मोक्ष मिळतो तें (तुला) सांगतों. (तें) अनादि, (सर्वांच्या) पलीकडलें ब्रह्म (होय). त्याला 'सत्' म्हणत नाहींत आणि 'असत्'हि म्हणत नाहींत. (१३) त्याला सर्व बाजूंनीं हातपाय आहेत; सर्व बाजूंनीं डोळे, डोकीं व तोंडें आहेत. सर्व बाजूंनीं कान आहेत; आणि तेंच या लोकीं सर्व व्यापून राहिलें आहे. (१४) (त्यांत) सर्व इंद्रियांच्या गुणांचा आभास होणारा असून त्याला कोणतेंच इंद्रिय नाहीं; तें (सर्वांपासून) असक्त म्हणजे विलग असूनहि सर्वांचें धारण करणारें; आणि निर्गुण असूनहि गुणांचा उपभोग घेणारें आहे. (१५) (तें) सर्व भूतांच्या आंत व बाहेरहि आहे; अचर आहे व चरहि आहे; सूक्ष्म असल्यामुळें तें अविज्ञेय आहे, आणि दूर

अविभक्तं च भूतेषु विभक्तमिव च स्थितम् ।
भूतभर्तृ च यज्ज्ञेयं ग्रसिष्णु प्रभविष्णु च ॥ १६ ॥
ज्योतिषामपि तज्ज्योतिस्तमसः परमुच्यते ।
ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यं हृदि सर्वस्य धिष्ठितम् ॥ १७ ॥

असूनहि जवळ आहे. (१६) तें (तत्त्वतः) 'अविभक्त' म्हणजे अखंड (असतांहि), सर्व भूतांत जणूं काय (नानात्वानें) विभागून राहिलेलें आहे; व (सर्व) भूतांना धारण करणारें, ग्रासणारें व उत्पन्न करणारेंहि तेंच समजलें पाहिजे. (१७) त्यालाच तेजाचेंहि तेज, व अंधकारापलीकडचें म्हणतात, ज्ञान जें जाणावयाचें तें (ज्ञेय) व ज्ञानगम्य म्हणजे ज्ञानानें (-च) कळणारेंहि (तेंच) असून, सर्वांच्या हृदयांत तेंच अधिष्ठित झालेलें आहे.

[अचिंत्य व अक्षर परब्रह्म ज्याला क्षेत्रज्ञ किंवा परमात्मा असेंहि म्हणतात (गी. १३.२२), त्याचें वरील वर्णन, आठव्या अध्यायांतील अक्षर ब्रह्माच्या वर्णनाप्रमाणें (गी. ८,९.११), उपनिषदांच्या आधारें केलेलें आहे. सबंध तेरावा श्लोक (श्वे. ३.१६) आणि "सर्व इंद्रियांच्या गुणांचा भास होणारें तथापि सर्वेंद्रियविरहित" हें पुढील श्लोकार्ध अक्षरशः श्वेताश्वतरोपनिषदांत (श्वे. ३.१७), आणि "दूर असूनहि जवळ" हे शब्द ईशावास्य (५) व मुंडक (३.१.७) उपनिषदांतून आढळून येतात. तसेंच "तेजाचें तेज" हे शब्द बृहदारण्यकांतले (बृ. ४.४.१६) व "अंधकाराच्या पलीकडले" हे शब्द श्वेताश्वतरांतले (३.८) आहेत. "जें सत्हि नाहीं व जें असत्हि म्हणतां येत नाहीं" हें वर्णन ऋग्वेदांतील "नासदासीत् नो सदासीत" या प्रसिद्ध ब्रह्मपर सूक्तास (ऋ. १०.१२९) अनुलक्षून आहे. 'सत्' व 'असत्' या दोन शब्दांच्या अर्थाचा विचार गीतारहस्य प्र. ९ पृ. २४१ व २४२ यांत सविस्तर, व पुनः गीता ९.१९ या श्लोकाव-

§§ इति क्षेत्रं तथा ज्ञानं ज्ञेयं चोक्तं समासतः ।

रील टीकेंत केलेला आहे तो पहा. गीता ९.१९ यांत 'सत्' आणि 'असत्' मीच आहें असें म्हटलें असून आतां खरें ब्रह्म 'सत्' नाहीं आणि 'असत्'हि नाहीं असें विरुद्ध वर्णन केल्यासारखें वाटतें. पण हा विरोध वस्तुतः खरा नाहीं. कारण 'व्यक्त' (क्षर) आणि 'अव्यक्त' (अक्षर) सृष्टि हीं दोन्ही परमेश्वराचींच स्वरूपें असलीं तरी खरें परमेश्वरतत्त्व या दोहोंपलीकडलें ह्मणजे पूर्णपणें अज्ञेय आहे, हा सिद्धांत गीतेंतच पूर्वीं "भूतभृन्न च भूतस्थो" (गी. ९.५). या श्लोकांत, आणि पुनः पुढें (१५.१६,१७) पुरुषोत्तमलक्षणांतहि स्पष्ट सांगितला आहे. असो, निर्गुण ब्रह्म कशाला ह्मणतात व तें जगांत असूनहि जगाबाहेरील कसें, किंवा तें 'विभक्त' ह्म० नानारूपात्मक दिसलें तरी मूळांत अविभक्त म्ह० एकच कसें, वगैरे प्रश्नांचा विचार गीतारहस्याच्या ९ व्या प्रकरणांत (पृ. २०५ पासुन पुढें) केला असल्यामुळें त्याची द्विरुक्ती येथें करीत नाहीं. सोळाव्या श्लोकांत "जणूं काय विभागून राहिल्यासारखें दिसतें" हें 'विभक्तमिव' याचें भाषांतर असून हा 'इव' शब्द अर्थीं, ह्मणजे जगांतील नानात्व भ्रांतिकारक व एकत्वच काय तें सत्य, या अर्थीं उपनिषदांतून अनेक वेळा आलेला आहे. उदाहरणार्थ "द्वैतमिव भवति" "य इह नानेव पश्यति" इत्यादी. पहा (बृ. २.४.१४; ४.४.१९; ४.३.७). (ह्मणून नानानामरूपात्मक माया हा भ्रम व यांत अविभक्तत्वानें रहाणारें ब्रह्म तेवढेंच सत्य, हा अद्वैत सिद्धांतच गीतेंत प्रतिपाद्य आहे असें उघड दिसून येतें. 'अविभक्तं विभक्तेषु' ह्मणजे नानात्वाच्या ठिकाणीं एकत्व पहाणें हें सात्विक ज्ञानाचें लक्षण होय, असें गीता १८.२० यांत पुनः सांगितलें आहे. हें सात्विक ज्ञान ह्मणजेच ब्रह्म होय, इत्यादी चर्चा गीतारहस्याच्या अध्यात्मप्रकरणांत केलेली आहे. (गीतार. प्र. ९ पृ. २११, २१२ आणि प्र. ६ पृ. १३० व १३१) ती पहा.]

मद्भक्त एतद्विज्ञाय मद्भावायोपपद्यते ॥ १८ ॥

(१८) याप्रमाणें क्षेत्र, तसेंच ज्ञान व ज्ञेय ह्मणजे काय हें सक्षेपानें सांगितलें. हें जाणिलें ह्मणजे माझा भक्त माझ्या स्वरूपाला येऊन पोंचतो.

[ अध्यात्म किंवा वेदान्तशास्त्राच्या आधारें आतांपर्यंत क्षेत्र ज्ञान व ज्ञेय यांचा विचार केला, पैकीं 'ज्ञेय' ह्मणजेच क्षेत्रज्ञ किंवा परब्रह्म आणि 'ज्ञान' दुसऱ्या श्लोकांत सांगितलेलें क्षेत्रक्षेत्रज्ञज्ञान, असा अर्थ असल्यामुळें परमेश्वराच्या सर्व ज्ञानाचें हें थोडक्यांत निरूपण होतें. आणि ज्या अर्थी क्षेत्रक्षेत्रज्ञ विचार म्हणजेच परमेश्वराचें ज्ञान होय त्या अर्थी त्याचें फळहि मोक्षच असलें पाहिजे हें पुढें ओघानेंच प्राप्त होतें; व तोच सिद्धान्त १८ व्या श्लोकांत सांगितला आहे. वेदान्तशास्त्रांतील क्षेत्रक्षेत्रज्ञविचार येथें संपला. पण प्रकृतीपासूनच पांचभौतिक सविकार क्षेत्र उत्पन्न झालें असल्यामुळें, आणि सांख्य ज्याला 'पुरुष' म्हणतात त्याला अध्यात्मशास्त्रांत 'आत्मा' हें नांव असल्यामुळें, क्षेत्रक्षेत्रज्ञविचार म्हणजेच सांख्यदृष्ट्या प्रकृतिपुरुषविवेक होतो. सांख्यांप्रमाणें प्रकृति व पुरुष हीं दोन तत्त्वें गीताशास्त्र स्वतंत्र मानीत नसून एकाच परमेश्वराचीं हीं कनिष्ठ व श्रेष्ठ दोन रूपें आहेत असें सातव्या अध्यायांत सांगितलें आहे (७.४,५). परंतु सांख्यांच्या द्वैताऐवजीं गीताशास्त्रांतलें हें अद्वैत एकदां पत्करिल्यावर, मग प्रकृति व पुरुष यांच्या परस्परसंबंधाचें सांख्यांचें ज्ञान गीतेस अमान्य नाहीं. किंबहुना क्षेत्रक्षेत्रज्ञज्ञानाचेंच प्रकृतिपुरुषविवेक हें रूपान्तर होतें, असें म्हटलें तरी चालेल (गीतार; प्र. ७ पहा). म्हणून एवढा वेळ उपनिषदांच्या आधारें जें क्षेत्रक्षेत्रज्ञज्ञान सांगितलें तेंच ज्ञान आतां सांख्यांच्या परिभाषेंत, पण सांख्यांचें द्वैत न स्वीकारितां, प्रकृतिपुरुषविवेक या दुसऱ्या रूपानें सांगण्यास सुरुवात करितात— ]

§§ प्रकृतिं पुरुषं चैव विद्ध्यनादी उभावपि ।
विकारांश्च गुणांश्चैव विद्धि प्रकृतिसंभवान् ॥ १९ ॥
कार्यकरणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते ।
पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते ॥ २० ॥

(१९) प्रकृति व पुरुष हीं दोन्हीहि अनादि असें समज. विकार व गुण हे सर्व प्रकृतीपासून उद्भवतात असें जाण.

[ सांख्यशास्त्राप्रमाणें प्रकृति व पुरुष हे दोन्ही अनादिच नव्हे तर स्वतंत्र व स्वयंभूहि आहेत, वेदान्ती प्रकृति परमेश्वरापासून उत्पन्न झालेली, अतएव स्वयंभू नाहीं आणि स्वतंत्रहि नाहीं असें समजतात (गी. ४. ५, ६ ). पण प्रकृति परमेश्वरापासून केव्हां निघाली तें सांगतां येत नसल्यामुळें, व पुरुष ( जीव ) हा परमेश्वराचाच अंश (गी.१५.७) असल्यामुळें दोन्ही अनादि आहेत एवढें वेदान्त्यांस मान्य आहे. यासंबंधाचा जास्त खुलासा गीतारहस्य पृ. ७ विशेषतः पृ. १५९–१६४ आणि प्र. १० पृ. २५९–२६२ यांत केला आहे तो पहा. ]

(२०) कार्य म्हणजे देह, व कारण म्हणजे इंद्रियें, यांच्या कर्तृत्वास प्रकृति कारण आहे असें म्हणतात; आणि ( कर्ता नसूनहि ) सुखदुःखाचा उपभोग घेण्यास पुरुष ( क्षेत्रज्ञ ) कारण आहे असें म्हटलें आहे.

[ या श्लोकांत 'कार्यकरण' या ऐवजीं 'कार्यकारण' असाहि पाठ आहे; व तेव्हां सांख्यांचीं महदादि तेवीस तत्त्वें एकापासून एक अशा कार्यकारणक्रमानें उत्पन्न होऊन सर्व व्यक्त सृष्टि प्रकृतीपासून बनस्ये असा त्याचा अर्थ होतो हाहि अर्थ कांहीं गैरशिस्त नाहीं. तथापि क्षेत्रक्षेत्रज्ञविचारांत क्षेत्राची उत्पत्ति प्रस्तुत नाहीं. जग प्रकृतीपासून कसें झालें हें पूर्वी सातव्या व नवव्या अध्यायांत वर्णिलें आहे. म्हणून 'कार्यकरण' हा पाठच येथें अधिक प्रशस्त दिसतो. शांकरभाष्यांत 'कार्यकरण' हाच पाठ घेतलेला आहे. ]

पुरुषः प्रकृतिस्थो हि भुंक्ते प्रकृतिजान्गुणान् ।
कारणं गुणसंगोऽस्यसदसद्योनिजन्मसु ॥ २१ ॥
§§ उपद्रष्टाऽनुमंता च भर्ता भोक्ता महेश्वरः ।
परमात्मेति चाप्युक्तो देहेऽस्मिन्पुरुषः परः ॥ २२ ॥
य एवं वेत्ति पुरुषं प्रकृतिं च गुणैः सह ।
सर्वथा वर्तमानोऽपि न स भूयोऽभिजायते ॥ २३ ॥

(२१) कारण प्रकृतींत पुरुष अधिष्ठित झाला म्हणजे प्रकृतीच्या गुणांचा तो उपभोग घेतो; आणि (प्रकृतीच्या) गुणांचा संयोग पुरुषाला बऱ्यावाईट योनींत जन्म घेण्यास कारण होतो.

[ प्रकृति व पुरुष यांच्या परस्परसंबंधाचें व भेदाचें हें वर्णन सांख्यशास्त्रांतलें आहे (गीतार. पृ. १५१–१६० पहा). आतां त्यांपैकीं पुरुषाला वेदान्ती परमात्मा म्हणतात असें सांगून सांख्य व वेदान्त यांची जोड घालतात; व तसें केलें म्हणजे प्रकृतिपुरुषविचार व क्षेत्रक्षेत्रज्ञविचार यांची पुरी एकवाक्यता होत्ये. ]

(२२) ( हा जो प्रकृतीच्या गुणांचा ) उपद्रष्टा म्हणजे जवळ बसून पहाणारा, अनुमोदन देणारा, भर्ता म्हणजे ( प्रकृतीच्या गुणांत ) भर घालणारा, आणि उपभोग घेणारा त्यासच या देहांतील परपुरुष, महेश्वर आणि परमात्मा असें म्हणतात. (२३) पुरुष ( निर्गुण ) आणि प्रकृति (-च काय ती ) गुणांसहवर्तमान, याप्रमाणें जो जाणितो तो कसाहि वागत असला तरी त्याला पुनर्जन्म घडत नाहीं.

[ पुरुष म्ह० देहांतील परमात्मा असें २२ व्या श्लोकांत ठरविल्यावर सांख्यशास्त्राप्रमाणें पुरुषाचें जें उदासीनत्व व अकर्तृत्व तेंच आतां आत्म्याचें अकर्तृत्व होतें व सांख्याच्या उपपत्तीची व वेदान्ताची एकवाक्यता होत्ये. सांख्य म्हणजे वेदान्ताचे शत्रु होत अशी वेदान्तांतील

§§ ध्यानेनात्मनि पश्यन्ति केचिदात्मानमात्मना।
अन्ये सांख्येन योगेन कर्मयोगेण चापरे ॥ २४ ॥
अन्ये त्वेवमजानन्तः श्रुत्वान्येभ्य उपासते ।
तेऽपि चातितरन्त्येव मृत्युं श्रुतिपरायणाः ॥ २५ ॥
§§ यावत्संजायते किंचित्सत्त्वं स्थावरजंगमम् ।

किस्येक ग्रंथकारांची समजूत असून पुष्कळ वेदान्ती सांख्य उपपत्ति सर्वथा त्याज्य मानितात. पण गीतेंत तसें न करितां क्षेत्रक्षेत्रज्ञविचार हा एकच विषय एकदां वेदान्तदृष्ट्या, व एकदां ( वेदान्ताचें अद्वैत मत न सोडितां ) सांख्यदृष्ट्या, प्रतिपादन केला आहे, यावरून गीताशास्त्राची समबुद्धि व्यक्त होते. किंबहुना उपनिषदांतील आणि गीतेंतील विवेचनांतला हा एक महत्त्वाचा भेद होय असें म्हटलें तरी चालेल ( गी. र. परिशिष्ट पृ. ५३३ पहा ). सांख्यांचा द्वैतवाद गीतेस मान्य नसला तरी सांख्यांच्या प्रतिपादनांत जें कांहीं सयुक्तिक दिसेल तें गीतेस अमान्य नाहीं हें यावरून दिसून येतें. क्षेत्रक्षेत्रज्ञाचें ज्ञान म्हणजेच परमेश्वराचें ज्ञान होय हें दुसऱ्याच श्लोकांत सांगितलें आहे. आतां पिंडाचें आणि देहांतील परमेश्वराचें हें ज्ञान संपादन करून मोक्ष मिळविण्याचे मार्ग कोणते हें प्रसंगानुसार थोडक्यांत सांगतात—]

(२४) कांहीं लोक आपण होऊनच आपल्या ठायीं ध्यानानें आत्म्याला पहातात; कांहीं सांख्ययोगानें आणि कांहीं कर्मयोगानें, (२५) परंतु ज्यानां याप्रमाणें ( स्वतः ) ज्ञान होत नाहीं असे कित्येक दुसऱ्यांचें सांगणें ऐकून ( श्रद्धेनें परमेश्वराचें ) भजन करितात. ऐकिलेली गोष्ट प्रमाण मानून वागणारे हे पुरुषहि मृत्यु तरून पलीकडे जातात.

[पातंजलयोगाप्रमाणें ध्यान, सांख्यमार्गाप्रमाणें ज्ञानोत्तर कर्मसंन्यास, कर्मयोगाप्रमाणें निष्काम बुद्धीनें परमेश्वरार्पणपूर्वक कर्म करणें आणि ज्ञान नसलें तरी श्रद्धेनें आप्तवचनावर विश्वास ठेवून परमेश्वराची

क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात्तद्विद्धि भरतर्षभ ॥ २६ ॥
समं सर्वेषु भूतेषु तिष्ठन्तं परमेश्वरम् ।
विनश्यत्स्वविनश्यन्तं यः पश्यति स पश्यति ॥ २७ ॥
समं पश्यन् हि सर्वत्र समवस्थितमीश्वरम् ।
न हिनस्त्यात्मनात्मानं ततो याति परां गतिम् ॥ २८ ॥

भक्ति करणें ( गी. ४ ३९ ), असे आत्मज्ञानाचे निरनिराळे मार्ग या दोन श्लोकांत सांगितले आहेत. कोणत्याहि मार्गानें गेलें तरी अखेर भगवंताचें ज्ञान होऊन मोक्ष मिळतो. तथापि लोकसंग्रहदृष्ट्या कर्मयोग श्रेष्ठ असा जो पूर्वी सिद्धांत केला आहे तो यामुळें बाधित होत नाहीं. याप्रमाणें साधनें सांगून झाल्यावर एकंदर विषयाचा सामान्यरीता पुढील श्लोकांत उपसंहार केला असून त्यांतहि कापिल सांख्याची वेदान्ताशीं जोड घातलेली आहे. ]

(२६) हे भरतश्रेष्ठा ! स्थावर किंवा जंगम जी कोणीहि वस्तु निर्माण होत्ये, ती क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्या संयोगापासून होत्ये हें ध्यानांत ठेव (२७) सर्व भूतांचे ठायीं सारखाच राहणारा, व सर्व भूतें नाहींशीं झालीं तरी ज्याचा नाश होत नाहीं, अशा परमेश्वराला ज्यानें पाहिलें त्यानें ( खरें तत्त्व ) ओळखिलें म्हणावयाचें. ( २८ ) ईश्वर सर्वत्र सारखाच भरलेला आहे हें जाणून ( जो पुरुष ) आपण आपलाच घात करीत नाहीं, म्हणजे आपण होऊनच चांगल्या मार्गाला लागतो, तो त्यामुळें उत्तम गतीस पोंचतो.

[ २७ व्या श्लोकांत सांगितलेलें परमेश्वराचें लक्षण मागें गी. ८–२० यांत आलेलें असून त्याचा खुलासा गीतारहस्याच्या नवव्या प्रकरणांत केलेला आहे, (गीतार. पृ २१५ व २६५ पहा) तसेंच आत्मा हा आपला बंधु व तोच आपला शत्रु असें जें मागें (गी. ६. ५–७) सांगितलें तोच अर्थ २८ व्या श्लोकांत पुनः आला आहे. २६, २७ व २८ या श्लोकांत सर्व भूतांचें ठायीं साम्यबुद्धिरूप भावाचें याप्रमाणें वर्णन झाल्यावर हें जाणिल्यानें काय होतें तें सांगतात—]

§§ प्रकृत्यैव च कर्माणि क्रियमाणानि सर्वशः ।
यः पश्यति तथात्मानमकर्तारं स पश्यति ॥ २९ ॥
यदा भूतपृथग्भावमेकस्थमनुपश्यति ।
तत एव च विस्तारं ब्रह्म संपद्यते तदा ॥ ३० ॥
§§ अनादित्वान्निर्गुणत्वात्परमात्मायमव्ययः ।
शरीरस्थोऽपि कौंतेय न करोति न लिप्यते ॥ ३१ ॥
यथा सर्वगतं सौक्ष्म्यादाकाशं नोपलिप्यते ।
सर्वत्रावस्थितो देहे तथात्मा नोपलिप्यते ॥ ३२ ॥
यथा प्रकाशयत्येकः कृत्स्नं लोकमिमं रविः ।
क्षेत्रं क्षेत्री तथा कृत्स्नं प्रकाशयति भारत ॥ ३३ ॥

(२९) (सर्व) कर्मे सर्व प्रकारें केवळ प्रकृतीकडूनच केलीं जातात, आणि आत्मा हा अकर्ता म्हणजे कांहींएक न करणारा आहे, हें ज्यानें जाणिलें त्यानें (खरें तत्त्व) ओळखिलें म्हणावयाचें. (३०) जेव्हां सर्व भूतांतील पृथक्त्व म्हणजे नानात्व एकत्वानें (दिसूं लागेल), आणि या (एकत्वा-) पासूनच (सर्व) विस्तार (झाला आहे) असें दिसूं लागेल तेव्हां ब्रह्म प्राप्त होतें.

[आत्मा निर्गुण, अलिप्त व अक्रिय कसा तें आतां सांगतात—]

(३१) अनादि व निर्गुण असल्यामुळें हा अव्यय परमात्मा शरीरांत राहूनहि हे कौंतेया! कांहीं करीत नाहीं, व त्याला (कोणत्याहि कर्माचा) लेप म्हणजे बंध लागत नाहीं. (३२) ज्याप्रमाणें आकाश चोहोंकडे भरलें असून सूक्ष्म असल्यानें त्याला (कशाचाहि) लेप लागत नाहीं, त्याप्रमाणें आत्मा देहांत सर्वत्र रहात असून त्याला (कशा-चाहि) लेप लागत नाहीं. (३३) ज्याप्रमाणें एकटा सूर्य हें सर्व जग प्रकाशित करितो, त्याप्रमाणें हे भारता! क्षेत्रज्ञ सर्व क्षेत्राला म्हणजे शरीराला प्रकाशित करीत असतो.

§§ क्षेत्रक्षेत्रज्ञयोरेवमंतरं ज्ञानचक्षुषा ।
भूतप्रकृतिमोक्षं च ये विदुर्यान्ति ते परम् ॥ ३४ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुन-
संवादे क्षेत्रक्षेत्रज्ञविभागयोगो नाम त्रयोदशोऽध्यायः ॥ १३ ॥

---

(३४) याप्रमाणें ज्ञानचक्षूनें म्हणजे ज्ञानरूप डोळयानें, क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांमधील भेद आणि सर्व भूतांच्या ( मूलभूत ) प्रकृतीचा मोक्ष ज्यांनीं जाणिला ते परब्रह्माप्रत जातात.

[ एकंदर सर्व प्रकरणाचा हा उपसंहार आहे. ' भूतप्रकृतिमोक्ष ' या शब्दाचा अर्थ आम्हीं सांख्यशास्त्राच्या सिद्धान्ताप्रमाणें केला आहे. मोक्ष मिळणें किंवा न मिळणें या अवस्था आत्म्याच्या नाहींत; कारण तो नेहमींच अकर्ता व असंग आहे. परंतु प्रकृतिगुणांच्या संगानें तो आपल्या ठायीं कर्तृत्वाचा आरोप करीत असल्यामुळें, त्याचें हें अज्ञान नाहींसें झालें म्हणजे त्याशीं संयुक्त असलेली प्रकृति सुटते, म्हणजे तिचाच मोक्ष होतो, व नंतर ती पुरुषापुढें नाचावयाची बंद होते, असा सांख्यांचा सिद्धान्त आहे. म्हणून बंध व मोक्ष या दोन्ही अवस्था तात्त्विकदृष्ट्या प्रकृतीच्याच आहेत असें सांख्य प्रतिपादन करीत असतात ( सांख्यकारिका ६२ आणि गीतारहस्य प्र. ७ पृ. १६२ पहा ). या सांख्यसिद्धान्ताला अनुसरूनच ' प्रकृतीचा मोक्ष ' हे शब्द या श्लोकांत आले आहेत असें आम्हांस वाटतें. परंतु कित्येक " भूतेभ्यः प्रकृतेश्च मोक्षः " म्हणजे पंचमहाभूतें व प्रकृति यांच्यापासून अर्थात् मायात्मक कर्मांपासून आत्म्याचा मोक्ष होतो असाहि या शब्दाचा अर्थ लावितात. असो; हा क्षेत्रक्षेत्रज्ञविवेक ज्ञानचक्षूनें कळणारा ( गी. १३. ३४ ), तर नवव्या अध्यायांतील राजविद्या प्रत्यक्ष म्हणजे चर्मचक्षूनें कळणारी ( गी. ९.२ ), आणि विश्वरूपदर्शन परम भगवद्भक्तासहि केवळ दिव्य

# चतुर्दशोऽध्यायः ।

श्रीभगवानुवाच ।

परं भूयः प्रवक्ष्यामि ज्ञानानां ज्ञानमुत्तमम् ।
यज्ज्ञात्वा मुनयः सर्वे परां सिद्धिमितो गताः ॥ १ ॥

चक्षूनेंच दिसणारें (गी. ११.८), हा नऊ, अकरा व तेरा या अध्यायांतील ज्ञानविज्ञाननिरूपणांतला भेद लक्षांत ठेवण्यासारखा आहे. ]

याप्रमाणें श्रीभगवंतांनीं गाइलेल्या ह्मणून सांगितलेल्या उपनिषदांत ब्रह्मविद्यान्तर्गत योग–ह्मणजे कर्मयोग–शास्त्रावरील श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या संवादांतील प्रकृतिपुरुषविवेक ह्म० क्षेत्रक्षेत्रज्ञविभागयोग नांवाचा तेरावा अध्याय समाप्त झाला.

---

## अध्याय चवदावा.

[ तेराव्या अध्यायांत क्षेत्रक्षेत्रज्ञविचार एकदां वेदान्तदृष्ट्या व एकदां सांख्यदृष्ट्या सांगितला, आणि त्यांत सर्व कर्तृत्व प्रकृतीचें असून पुरुष म्ह० क्षेत्रज्ञ उदासीन असतो असें प्रतिपादन केलें. पण प्रकृतीचें हें कर्तृत्व कसें चालू रहातें याचें विवेचन अद्याप झालें नाहीं. म्हणून एकाच प्रकृतीपासून नानाविध सृष्टि, विशेषतः सजीव सृष्टि, कशी उत्पन्न होते असें या अध्यायांत निरूपण करितात. केवळ मानवी सृष्टीचाच विचार केला तर हा विषय क्षेत्राबद्दलचा म्हणजे शरीराचा असल्यामुळें त्याचा क्षेत्रक्षेत्रज्ञविचारांत समावेश होऊं शकतो. पण स्थावर सृष्टिसुद्धां त्रिगुणात्मक प्रकृतीचाच पसारा असल्यामुळें प्रकृतीच्या गुणभेदाचें हें विवेचन क्षराक्षरविचाराचाहि भाग होऊं शकतें. म्हणून क्षेत्रक्षेत्रज्ञविचार हें संकुचित नांव सोडून देऊन सातव्या अध्यायांत जें ज्ञानविज्ञान सांगण्यास सुरुवात केली तेंच ज्ञान-

इदं ज्ञानमुपाश्रित्य मम साधर्म्यमागताः ।
सर्गेऽपि नोपजायन्ते प्रलये न व्यथन्ति च ॥ २ ॥
§§ मम योनिर्महद्ब्रह्म तस्मिन् गर्भं दधाम्यहम् ।
संभवः सर्वभूतानां ततो भवति भारत ॥ ३ ॥
सर्वयोनिषु कौंतेय मूर्तयः संभवन्ति याः ।
तासां ब्रह्म महद्योनिरहं बीजप्रदः पिता ॥ ४ ॥

विज्ञान जास्त खुलासेवार आतां तुला पुनः सांगतों अशी या अध्यायास भगवंतांनीं सुरुवात केली आहे. सांख्यशास्त्रदृष्ट्या या विषयाचें सविस्तर निरूपण गीतारहस्याच्या आठव्या प्रकरणांत केलें आहे तें पहा. त्रिगुणाच्या पसाऱ्याचें हें वर्णन अनुगीतेंत व मनुस्मृतीच्या बाराव्या अध्यायांतहि आलेलें आहे.]

श्रीभगवान् ह्मणाले—(१) आणखीं पुनः ज्ञानांतलें उत्तम ज्ञान सांगतों, जें जाणल्यानें सर्व मुनींना या लोकांतून परम सिद्धि प्राप्त झाली आहे. (२) या ज्ञानाचा आश्रय करून माझ्याशीं एकरूपता पावलेले, सृष्टीच्या उत्पत्तिकालींहि जन्मत नाहींत आणि प्रलयकालींहि व्यथा पावत नाहींत; ( ह्मणजे जन्ममरणापासून अजिबात मुक्त होतात. ).

[ ही प्रस्तावना झाली. आतां प्रकृति हें माझेंच स्वरूप आहे असें प्रथम सांगून सांख्यांचें द्वैत काढून टाकल्यावर सत्त्व, रज व तम या प्रकृतीच्या तीन गुणांमुळें सृष्टींतील नानाविध व्यक्त पदार्थ कसे निर्माण होतात याचें वेदान्तशास्त्राशीं विरोध न आणितां निरूपण करितात—]

(३) हे भारता ! महद्ब्रह्म म्हणजे प्रकृति ही माझीच योनि असून मी तिच्या ठिकाणीं गर्भ ठेवितों; नंतर त्यापासून सर्व भूतें उत्पन्न होऊं लागतात. (४) (पशुपक्ष्यादि) सर्व योनींत ज्या ज्या मूर्ति जन्मास येतात त्यांची हे कौंतेया ! महत् ब्रह्म ही योनि असून मी बीजदाता पिता आहें.

§§ सत्त्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसंभवाः ।
निबध्नन्ति महाबाहो देहे देहिनमव्ययम् ॥ ५ ॥
तत्र सत्त्वं निर्मलत्वात्प्रकाशकमनामयम् ।
सुखसंगेन बध्नाति ज्ञानसंगेन चानघ ॥ ६ ॥
रजो रागात्मकं विद्धि तृष्णासंगसमुद्भवम् ।
तन्निबध्नाति कौंतेय कर्मसंगेन देहिनम् ॥ ७ ॥
तमस्त्वज्ञानजं विद्धि मोहनं सर्वदेहिनाम् ।
प्रमादालस्यनिद्राभिस्तन्निबध्नाति भारत ॥ ८ ॥
सत्त्वं सुखे संजयति रजः कर्मणि भारत ।
ज्ञानमावृत्य तु तमः प्रमादे संजयत्युत ॥ ९ ॥

(५) हे महाबाहो ! प्रकृतीपासून उत्पन्न झालेले सत्व, रज व तम हे गुण देहांत रहाणाऱ्या अव्ययास म्हणजे निर्विकार आत्म्यास देहांत बांधून टाकितात, (६) पैकीं निर्मल असल्यामुळें प्रकाश पाडणारा व निर्दोष असा जो सत्वगुण तो हे निष्पाप अर्जुना ! सुख आणि ज्ञान यांच्या संगानें (प्राण्यास) बांधून टाकितो. (७) रजोगुणाचा स्वभाव रंगविण्याचा असून तृष्णा व आसक्ति हीं यापासून उत्पन्न होतात असें समज. हे कौंतेया ! तो प्राण्याला कर्में करण्याच्या ( प्रवृत्तिरूप ) संगानें बांधून टाकितो. (८) पण तमोगुण अज्ञानापासून उत्पन्न होऊन सर्व प्राण्यांना मोह घालणारा आहे असें समज. हे भारता तो प्रमाद, आळस व निद्रा यांनीं (त्यास) बांधून टाकितो. (९) सत्वगुण सुखाचे ठायीं; व रजोगुण कर्माचे ठायीं आसक्ति उत्पन्न करितो. परंतु हे भारता ! तमोगुण हा ज्ञानावर पांघरूण घालून प्रमाद म्हणजे कर्तव्यमूढता किंवा कर्तव्याचा विसर याचे ठायीं आसक्ति उत्पन्न करितो.

[सत्व, रज व तम या तीन गुणांचीं हीं पृथक् लक्षणें सांगितलीं. पण हे गुण पृथक् पृथक् कधींच रहात नसून नेहमीं तिन्ही एकत्र

§§ रजस्तमश्चाभिभूय सत्त्वं भवति भारत ।
रजः सत्त्वं तमश्चैव तमः सत्त्वं रजस्तथा ॥ १० ॥
सर्वद्वारेषु देहेऽस्मिन्प्रकाश उपजायते ।
ज्ञानं यदा तदा विद्याद्विवृद्धं सत्त्वमित्युत ॥ ११ ॥
लोभः प्रवृत्तिरारंभः कर्मणामशमः स्पृहा ।
रजस्येतानि जायन्ते विवृद्धे भरतर्षभ ॥ १२ ॥
अप्रकाशोऽप्रवृतिश्च प्रमादो मोह एव च ।
तमस्येतानि जायन्ते विवृद्धे कुरुनंदन ॥ १३ ॥

असतात. उदाहरणार्थ कोणतेंहि चांगलें काम करणें हें जरी सत्त्वाचें लक्षण असलें तरी चांगलें काम करण्याची प्रवृत्ति होणें हा धर्म रजाचा असल्यामुळें सात्विक स्वभावांतहि थोडी तरी रजाची मिसळ नेहमींच असली पाहिजे. यासाठींच तमाचें मिथुन म्हणजे जोडी सत्त्व, सत्त्वाचें मिथुन रज, असें अनुगीतेंत या गुणांचें मिथुनात्मक वर्णन असून ( म. भा. अश्व. ३६ ), त्यांच्या अन्योन्य म्हणजे परस्परांच्या आश्रयानें अगर झटापटीनें सृष्टींतील सर्व पदार्थ होतात, असें म्हटलें आहे. गी. र. प्र. १२ व गीतार. पृ. १५५ व १५६ पहा. हेंच तत्त्व आतां प्रथम सांगून नंतर सात्विक, राजस व तामस स्वभावांचीं लक्षणें सांगतात—]

(१०) रज व तम यांचा पाडाव करून सत्त्व (वरचढ) होतें (तेव्हां त्याला सात्त्विक म्हणावयाचें ); व त्याचप्रमाणें सत्त्व व तम यांचा पाडाव करून रज, आणि सत्त्व व रज यांचा पाडाव करून तम (वरचढ होत असतें). (११) या देहांत सर्व द्वारांत ( इंद्रियांत ) प्रकाश म्हणजे निर्मल ज्ञान जेव्हां उत्पन्न होतें तेव्हां सत्त्वगुण वाढला आहे असें समजावें. (१२) हे भरतश्रेष्ठा ! रजोगुण वाढला म्हणजे लोभ, कर्मांकडे प्रवृत्ति व त्यांचा आरंभ, अतृप्ति व इच्छा हीं उत्पन्न होतात. (१३) आणि हे कुरुनंदना !

§§ यदा सत्त्वे प्रवृद्धे तु प्रलयं याति देहभृत्।
तदोत्तमविदां लोकानमलान्प्रतिपद्यते ॥ १४ ॥
रजसि प्रलयं गत्वा कर्मसंगिषु जायते।
तथा प्रलीनस्तमसि मूढयोनिषु जायते ॥ १५ ॥
कर्मणः सुकृतस्याहुः सात्त्विकं निर्मलं फलम्।
रजसस्तु फलं दुःखमज्ञानं तमसः फलम् ॥ १६ ॥
सत्त्वात्संजायते ज्ञानं रजसो लोभ एव च।
प्रमादमोहौ तमसो भवतोऽज्ञानमेव च ॥ १७ ॥
ऊर्ध्वं गच्छन्ति सत्त्वस्था मध्ये तिष्ठन्ति राजसाः।
जघन्यगुणवृत्तिस्था अधो गच्छन्ति तामसाः ॥ १८ ॥

तमोगुण वाढला म्हणजे अंधार, कांहीं करूं नये असें वाटणें, प्रमाद म्हणजे कर्तव्याचा विसर आणि मोह हे देखील उत्पन्न होत असतात.

[ मनुष्य जिवंत असतां त्रिगुणामुळें त्याच्या स्वभावांत कोणकोणते फरक होतात तें सांगितलें. आतां या तीन प्रकारच्या मनुष्यांस कोणती गति मिळत्ये तें सांगतात—]

(१४) सत्त्वगुणाचा उत्कर्ष झाला असतां प्राणी मरण पावला तर उत्तम तत्त्वें जाणणारांचे म्हणजे देवादिकांचे निर्मल (स्वर्गादि) लोक त्याला प्राप्त होतात. (१५) रजोगुणाचें प्राबल्य असतां मरण पावला तर कर्मांत आसक्त झालेल्यांत (जनांत) जन्म घेतो; आणि तमोगुणांत मेला तर (पशुपक्ष्यादि) मूढ योनींत जन्मतो. (१६) पुण्य कर्मांचें फल निर्मल व सात्त्विक, पण राजस कर्मांचें फल दुःख, आणि तामस कर्मांचें फल अज्ञान होय, असें आहे. (१७) सत्त्वापासून ज्ञान, तर रजोगुणापासून केवळ लोभ उत्पन्न होतो. तमोगुणापासून प्रमाद व मोहच नव्हे तर अज्ञानहि उत्पन्न होतें. (१८) सात्त्विक पुरुष वरच्या म्हणजे स्वर्गादि लोकांस जातात.

§§ नान्यं गुणेभ्यः कर्तारं यदा द्रष्टानुपश्यति ।
गुणेभ्यश्च परं वेत्ति मद्भावं सोऽधिगच्छति ॥ १९ ॥

राजस मध्यम ह्मणजे मनुष्यलोकीं राहतात आणि कनिष्ठगुणवृत्तीचे तामस अधोगतीस जातात.

[ सत्त्वस्थ मनुष्य धार्मिक व पुण्यकर्मे करणारा असल्यामुळें त्याला स्वर्ग मिळतो, आणि तामस अधर्माचरण करून अधोगतीला जातो, असें सांख्यकारिकेंतहि वर्णन आहे ( सांका. ४४ ) तसेंच १८ वा श्लोक अनुगीतेंतील त्रिगुणवर्णनांतहि अक्षरशः आला आहे ( म. भा. अश्व. ३९. १०; व मनु. १२. ४० पहा ). पण सात्त्विक कर्मांनीं स्वर्गप्राप्ति झाली तरी स्वर्गसुख अनित्य असल्यामुळें परम पुरुषार्थाची सिद्धि त्यानें होत नाहीं. हा परम पुरुषार्थ किंवा मोक्ष प्राप्त होण्यास उत्तम सात्त्विक स्थिती राहून, त्याशिवाय प्रकृती निराळी व मी ( पुरुष ) निराळा हें ज्ञान झालें पाहिजे असा सांख्यांचा सिद्धान्त आहे. यालाच सांख्य त्रिगुणातीतावस्था असें ह्मणतात; व ही स्थिती सत्त्व, रज आणि तम या तीन गुणापलीकडली असली, तरी सात्त्विक अवस्थेचीच ती पराकाष्ठा असल्यामुळें तिचा सामान्यतः सात्त्विक वर्गातच समावेश करितात, त्यासाठीं नवा चवथा वर्ग करीत नाहींत, हें आम्हीं गीता-रहस्याच्या सातव्या प्रकरणांत अखेर ( पृ.१६५ ) सांगितलें आहे. तथापि प्रकृति व पुरुष हें सांख्यांचें द्वैत गीतेस मान्य नसल्यामुळें, प्रकृति व पुरुष यांच्या पलीकडे जो एक आत्मस्वरूपी परमेश्वर किंवा परब्रह्म आहे तें निर्गुण ब्रह्म जो ओळखील तो त्रिगुणातीत ह्मणावयाचा, असें सांख्यांच्या वरील सिद्धान्ताचें गीतेंत रूपान्तर होत असतें; आणि तोच अर्थ आतां पुढील श्लोकांनुन वर्णिला आहे--]

(१९) द्रष्टा म्हणजे उदासीनपणानें पहाणारा पुरुष, (प्रकृतीच्या) गुणाखेरीज दुसरा कोणी कर्ता नाहीं असें जेव्हां जाणितो, व (तिन्ही) गुणांच्या पलीकडचें (तत्त्व) ओळखितो, तेव्हां माझ्या स्वरूपाला पोंचतो.

गुणानेतानतीत्य त्रीन्देही देहसमुद्भवान् ।
जन्ममृत्युजरादुःखैर्विमुक्तोऽमृतमश्नुते ॥ २० ॥

अर्जुन उवाच ।

§§ कैर्लिंगैस्त्रीन्गुणानेतानतीतो भवति प्रभो ।
किमाचारः कथं चैतांस्त्रीन्गुणानतिवर्तते ॥ २१ ॥

श्रीभगवानुवाच ।

प्रकाशं च प्रवृत्तिं च मोहमेव च पांडव ।
न द्वेष्टि संप्रवृत्तानि न निवृत्तानि कांक्षति ॥ २२ ॥

**(२०)** देहधारी मनुष्य देहोत्पत्तीस कारण झालेल्या या तिन्ही गुणांच्या पलीकडे जाऊन जन्म मृत्यु, जरा यांच्या दुःखानीं विमुक्त होत्साता अमृताचा ह्म० मोक्षाचा अनुभव घेतो.

[वेदान्तांत ज्याला माया ह्मणतात त्यालाच सांख्य त्रिगुणात्मक प्रकृती असें म्हणत असल्यामुळें त्रिगुणातीत होणें म्हणजे मायेंतून सुटून परब्रह्म ओळखणें होय (गी. ९.५५); व हिलाच ब्राह्मी अवस्था म्हणतात (गी. २ ७२; १८.५३). त्रिगुणातीताचें हें अध्यात्मशास्त्रांतील लक्षण ऐकून त्याची अधिक माहिती करून घेण्याची अर्जुनास इच्छा होऊन मागें दुसऱ्या अध्यायांत स्थितप्रज्ञाबद्दल जसा त्यानें प्रश्न केला होता (२,५४), तद्वत् आतांहि तो विचारितो कीं--]

अर्जुन म्हणाला--(२१) हे प्रभो! कोणत्या लक्षणांनीं या तीन गुणांच्या पलीकडे जातो (म्हणावयाचा)? त्या (त्रिगुणातीताचा) आचार कसा आणि तो या तीन गुणांच्या पलीकडे कसा जातो? (हें मला सांगा). श्रीभगवान् म्हणाले-(२२) हे पांडवा! प्रकाश, प्रवृत्ति आणि मोह (म्हणजे अनुक्रमें सत्व, रज व तम या गुणांनीं कार्यें किंवा फलें)

उदासीनवदासीनो गुणैर्यो न विचाल्यते ।
गुणा वर्तन्त इत्येव योऽवतिष्ठति नेंगते ॥ २३ ॥
समदुःखसुखः स्वस्थः समलोष्टाश्मकांचनः ।
तुल्यप्रियाप्रियो धीरस्तुल्यनिंदात्मसंस्तुतिः ॥ २४ ॥
मानापमानयोस्तुल्यस्तुल्यो मित्रारिपक्षयोः ।
सर्वारंभपरित्यागी गुणातीतः स उच्यते ॥ २५ ॥

प्राप्त झालीं तरी त्यांचा जो द्वेष करीत नाहीं, आणि प्राप्त न झालीं तरी त्यांची आकांक्षा ठेवीत नाहीं; (२३) (कर्माबद्दल) जो उदासीनासारखा राहणारा; (सत्व, रज व तम हे) गुण ज्याला चाळवूं शकत नाहींत; गुण (आपापलें) काम करीत आहेत एवढेंच मानुन जो स्थिर रहातो, हलत नाहीं म्हणजे विकार पावत नाहीं; (२४) ज्याला सुख व दुःख सारखेंच; जो स्वस्थ म्ह० आपल्या ठिकाणींच स्थिर झाला; माती, दगड व सोनें हीं ज्याला सारखींच; प्रिय व अप्रिय, निंदा व आपली स्तुति हीं ज्याला समसमान; सदा धैर्यानें युक्त; (२५) ज्याला मान व अपमान किंवा मित्र व शत्रुपक्ष तुल्य म्हणजे एकसारखे; आणि (प्रकृति सर्व करिते असें समजल्यामुळें) ज्याचे सर्व (काम्य) उद्योग सुटले, त्या पुरुषास गुणातीत असें म्हणतात.

[त्रिगुणातीत पुरुषाचीं लक्षणें व आचार कसा असतो या दोन प्रश्नांचें हें उत्तर झालें. हीं लक्षणें आणि दुसऱ्या अध्यायांतील स्थितप्रज्ञ (२.५५.७२) व बाराव्या अध्यायांतील भक्तिमान पुरुष (१२.१३–२०) यांचीं लक्षणें एकसारखींच आहेत. किंबहुना ‘सर्वारंभपरित्यागी,’ तुल्यनिंदास्तुतिः,’ ‘उदासीनः’ वगैरे कांहीं विशेषणेंहि दोन्ही किंवा तिन्ही ठिकाणीं एकच आहेत. यावरून मागील अध्यायांत (१३.२४, २५) सांगितलेल्या चार मार्गांपैकीं कोणताहि मार्ग स्वीकारिला तरी सिद्धी पावलेल्या पुरुषाचा आचार लक्षणें सर्व मार्गांत एकच

§§ मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते ।
स गुणान्समतीत्यैतान् ब्रह्मभूयाय कल्पते ॥ २६ ॥
ब्रह्मणो हि प्रतिष्ठाहममृतस्याव्ययस्य च ।
शाश्वतस्य च धर्मस्य सुखस्यैकांतिकस्य च ॥ २७ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुन-संवादे गुणत्रयविभागयोगो नाम चतुर्दशोऽध्यायः ॥ १४ ॥

---

असतात हें उघड होतें. तथापि मागें तिसऱ्या, चवथ्या, पांचव्या वगैरे अध्यायांतून निष्काम कर्म कोणालाच चुकलीं नाहींत असा जो एक ठाम सिद्धान्त केला तो अबाधित असल्यामुळें हे स्थितप्रद भगवद्भक्त किंवा त्रिगुणातीत सर्व कर्मयोगमार्गांतील आहेत हें लक्षांत ठेविलें पाहिजे. 'सर्वारंभपरित्यागी' याचा अर्थ काय हें १२. १९ या श्लोकाच्या टीपेंत सांगितलें आहे तें पहा. सिद्धावस्थेस पोंचलेल्या पुरुषाचीं हीं वर्णनें स्वतंत्र आहेत असें कल्पून संन्यासमार्गांतील टीकाकार आपलाच संप्रदाय गीतेंत प्रतिपाद्य आहे असें वर्णन करीत असतात. पण तो अर्थ पूर्वापार संदर्भाच्या विरुद्ध आहे, खरा नव्हे, हें गीतारहस्यांतील ११ व्या व १२ व्या प्रकरणांत (पृ. ३२२ व ३७१) आम्हीं सविस्तर प्रतिपादन केलें आहे. असो अर्जुनाच्या दोन प्रश्नांचीं उत्तरें झालीं. आतां हे पुरुष तीन गुणांपलीकडे कसे जातात याचें उत्तर सांगतात— ]

(२६) आणि जो ( सर्व कर्मे मलाच अर्पण करण्याच्या ) अव्यभिचार म्हणजे एकनिष्ठ भक्तियोगानें माझी सेवा करितो तो या तीन गुणांच्या पलीकडे जाऊन ब्रह्मभूतावस्था प्राप्त करून घेण्यास समर्थ होतो.

[ त्रिगुणातीतावस्था सांख्यमार्गांतली असतां तीच कर्मपर भक्तियोगानें कशी प्राप्त होत्ये अशी शंका या श्लोकावर येण्याचा संभव आहे, म्हणून भगवान् असें सांगतात कीं—]

(२७) कारण, मीच अमृत व अव्यय ब्रह्माचें, शाश्वत धर्माचें व एकान्तिक म्हणजे परमावधीच्या अत्यंत सुखाचें अखेरचें स्थान आहें.

## पंचदशोऽध्यायः ।

श्रीभगवानुवाच ।

ऊर्ध्वमूलमधःशाखमश्वत्थं प्राहुरव्ययम् ।

[ सांख्यांचें द्वैत सोडून दिल्यावर सर्वत्र एकच परमेश्वर असल्यामुळें त्याच्याच भक्तीनें त्रिगुणातीतावस्थाहि प्राप्त होत्ये, असा या श्लोकाचा भावार्थ आहे तथापि परमेश्वर एक आहे एवढें कबूल केल्यावर साधना-संबंधानें गीतेचा कोणताहि आग्रह नाहीं ( गी. १३. २४ व २९ पहा ). भक्तिमार्ग हा सुलभ अतएव सर्वांस ग्राह्य असें गीतेंत म्हटलें आहे खरें; तथापि इतर मार्ग त्याज्य होत असें गीतेंत कोठेंहि म्हटलें नाहीं. गीतेंत भक्ति किंवा ज्ञान अगर योगच प्रतिपाद्य आहे, हीं मतें त्या त्या सांप्रदायाच्या अभिमान्यांनीं मागाहून गीतेवर लादलेलीं आहेत. गीतेचा खरा प्रतिपाद्य विषय निराळाच होय मार्ग कोणताहि असो, परमेश्वराचें ज्ञान झाल्यावर संसारांतील कर्में लोकसंग्रहार्थ करावीं किंवा नाहीं हा गीतेंतील मुख्य प्रश्न आहे, व त्याचें उत्तर कर्मयोग श्रेष्ठ असें पूर्वींच साफ दिलें आहे. ]

याप्रमाणें श्रीभगवंतांनीं गाइलेल्या म्हणजे सांगितलेल्या उपनिषदांत ब्रह्मविद्यान्तर्गत योग–म्हणजे कर्मयोग–शास्त्रावरील श्रीकृष्ण व अर्जुन यांचें संवादांतील गुणत्रयविभागयोग नांवाचा चवदावा अध्याय समाप्त झाला.

---

## अध्याय पंधरावा.

[ क्षेत्रक्षेत्रज्ञविचार जोडून तेराव्या अध्यायांत तत्सदृश सांख्यांचा प्रकृतिपुरुषविवेक सांगितला, व चवदाव्यांत प्रकृतीच्या तीन गुणांनीं मनुष्यामनुष्यामध्यें स्वभावभेद कसा उत्पन्न होतो व त्यामुळें सात्त्विकादि गतिभेद कसे होतात हें सांगून त्रिगुणातीतावस्था किंवा अध्यात्मदृष्ट्या

छंदांसि यस्य पर्णानि यस्तं वेद स वेदवित् ॥ १ ॥

ब्राह्मी स्थिति म्हणजे काय व ती कशी संपादन करावी याचें विवेचन केलें. हें सर्व निरूपण सांख्यांचे परिभाषेंत आहे खरें, तथापि सांख्यांचें द्वैत न पत्करितां, प्रकृति व पुरुष ज्या एकाच परमेश्वराच्या विभूति त्या परमेश्वराचें ज्ञानविज्ञान या दृष्टीनें तें केलेलें आहे. परमेश्वररूपाच्या या वर्णनाखेरीज अधियज्ञ, अभ्यास, अधिदैवत इ. भेद आठव्या अध्यायांत दाखवून, सर्व ठिकाणीं एकच परमात्मा भरला आहे, व क्षेत्रांत क्षेत्रज्ञहि तोच आहे हें पूर्वींच सांगितलें आहे. आतां परमेश्वरानेंच निर्माण केलेल्या सृष्टीच्या पसाऱ्याचें किंवा परमेश्वराच्या नामरूपात्मक विस्ताराचेंच कधीं कधीं वृक्षरूपानें किंवा वनरूपानें जें वर्णन येतें त्यांतील बीज काय हें प्रथम सांगून नंतर परमेश्वराच्या सर्व स्वरूपांत श्रेष्ठ असें जें पुरुषोत्तमस्वरूप त्याचें या अध्यायांत वर्णन केलें आहे. ]

श्रीभगवान् म्हणाले–( १ ) मूळ ( एक ) वर, व शाखा ( अनेक ) खालीं असून ( जो ) अव्यय म्हणजे कधींहि नाश न पावणारा छंदांसि म्हणजे वेद हीं ज्याचीं पानें, असें ज्या अश्वत्थवृक्षाचें वर्णन करितात, तो ( वृक्ष ) ज्यानें जाणिला तो पुरुष ( खरा ) वेदवेत्ता होय).

[ वरील वर्णन ब्रह्मवृक्षाचें म्ह. संसारवृक्षाचें आहे. संसार किंवा प्रपंच याचा अर्थ " बायकामुलांत राहून नित्य व्यवहार करणें " असा मराठींत समजतात. परंतु प्रकृतस्थलीं हा संकुचित अर्थ विवक्षित नसून संसार म्हणजे " डोळ्यांपुढें दिसणारें सर्व जग किंवा दृश्य सृष्टी " असा अर्थ आहे. यासच सांख्य, " प्रकृतीचा विस्तार " व वेदान्ती " भगवंताच्या मायेचा पसारा " असें म्हणतात, व अनुगीतेंत यासच ' ब्रह्मवृक्ष व ब्रह्मवन ' ( ब्रह्मारण्य ) असें म्हटलें आहे ( म. भा. अश्व. ३५ व ४७ पहा ). एक सूक्ष्म बीजापासून ज्याप्रमाणें मोठा गगनचुंबित वृक्ष निर्माण व्हावा त्याप्रमाणें एका अव्यक्त परमेश्वरापासून दृश्य सृष्टि-

अधश्चोर्ध्वं प्रसृतास्तस्य शाखा गुणप्रवृद्धा विषयप्रवालाः।

रूप भव्य वृक्ष निघालेला आहे ही कल्पना किंवा रूपक वैदिक धर्मांतच नव्हे तर इतर प्राचीन धर्मांतहि आढळून येते; व प्राचीन युरोपीय भाषांतुन त्यास 'विश्ववृक्ष' किंवा 'जगद्वृक्ष' अशीं नांवें आहेत. ऋग्वेदांत ( १. २४. ७ ) वरुणाच्या लोकीं एक वृक्ष असून त्या वृक्षाच्या किरणांचें मूळ वर ( ऊर्ध्वं ) असून त्याचे किरण वरून खालीं (निचीनाः) पसरतात असें वर्णन आहे; आणि विष्णुसहस्रनामांत "वरुणो वृक्षः" ( वरुणाचा वृक्ष ) हें परमेश्वराच्या हजार नांवांतलेंच एक नांव म्हणून सांगितलें आहे. यम आणि पितर ज्या "सुपलाश वृक्षा" खालीं बसून सहपान करितात ( ऋ. १०. १३५. १ ), किंवा ज्याच्या "अग्रभागीं स्वादु पिप्पल असून ज्यावर दोन सुपर्ण पक्षी रहातात" ऋ. १. १६४. २२ ), अगर "ज्या पिप्पलाला ( पिंपळाला ) आयु देवता ( मरुद्गण ) हालवितात" ( ऋ. ५. ५४. १२ ) तो वृक्षहि हाच असून अथर्ववेदांत "देवसदन अश्वत्थवृक्ष तिसऱ्या स्वर्गलोकांत ( वरुणलोकांत ) आहे" असें जें वर्णन आहे ( अथर्व. ५. ४. ३; व १९. ३९. ६ ) तेंहि याच वृक्षास अनुलक्षून आहेसें दिसतें. अग्नि किंवा यज्ञप्रजापति पितृयाणकालीं देवलोकांतून नष्ट होऊन या वृक्षांत अश्वाचें ( घोड्याचें ) रूप धारण करून एक वर्ष गुप्त राहिला म्हणून या वृक्षास अश्वत्थ हें नांव पडलें अशी तैत्तिरीय ( ३. ८. १२. २ ) ब्राह्मणांत अश्वत्थ या शब्दाची व्युत्पत्ति दिली आहे ( म. भा. अनु. ८५ पहा ); व कित्येक नैरुक्तिकांचें असेंहि मत आहे कीं पितृयाणांतील दीर्घ रात्रींत सूर्याचे घोडे यमलोकीं या झाडाखालीं विश्रान्ति घेतात म्हणून यास अश्वत्थ ( म्हणजे घोड्याचे ठाणें ) हें नांव प्राप्त झालें असावें. 'अ' म्हणजे नाहीं, 'श्व' म्हणजे उद्यां आणि 'त्थ' म्हणजे टिकणारा, ही आध्यात्मिक निरुक्ति मागाहून कल्पिलेली आहे. नामरूपात्मक मायेचें स्वरूप विनाशी किंवा दर घडीस

अधश्च मूलान्यनुसंततानि कर्मानुबंधीनि मनुष्यलोके ॥ २ ॥

पालटणारें असल्यामुळें त्याला " उद्यांपर्यंत न टिकणारें " असें म्हणतां येईल खरें; पण ही दृष्टि येथें अभिप्रेत नाहीं, हें 'अव्यय' म्हणजे 'कधींहि ज्याचा व्यय होत नाहीं' या विशेषणावरून स्पष्ट होतें. पिंपळ या वृक्षासच आरंभीं अश्वत्थ म्हणत असून कठोपनिषदांत (६.१)–

ऊर्ध्वमूलोऽवाक्शाख एषोऽश्वत्थः सनातनः ।
तदेव शुक्रं तद्ब्रह्म तदेवामृतमुच्यते ॥

असा जो ब्रह्ममय अमृत अश्वत्थवृक्ष सांगितला आहे तोहि हाच होय; व भगवद्गीतेंतील वर्णन कठोपनिषदांतील वर्णनावरूनच घेतलेलें आहे. हें " ऊर्ध्वमूलमधःशाखं " या पदसादृश्यावरूनच व्यक्त होतें परमेश्वर स्वर्गांत असून त्यापासून निघालेला जगद्वृक्ष खालीं म्हणजे मनुष्य-लोकीं आलेला असल्यामुळें या वृक्षाचें मूळ म्हणजे परमेश्वर वर आणि त्या वृक्षाच्या अनेक शाखा म्हणजे जगाचा पसारा खालीं फुटलेला असल्याबद्दल वर्णन केलें आहे. परंतु वडाच्या झाडाच्या पारंब्याहि वरून खालीं वाढत जात असल्यामुळें हा संसारवृक्ष वटवृक्ष असावा, पिंपळ नव्हे, अशीं दुसरी कल्पनाहि प्राचीन धर्मग्रंथांतून आढळून येत्ये. उदा० अश्वत्थवृक्ष आदित्याचा आणि " न्यग्रोधो वारुणो वृक्षः"–न्यग्रोध म्हणजे खालीं (न्यक्) वाढणारा (रोध) वटवृक्ष हा वरुणाचा वृक्ष–असें वर्णन असून (गोभिलगृह्य. ४. ७. २४). मार्कंडेय ऋषींनीं प्रलयकालीं बालरूपी परमेश्वर (त्या प्रलयकालींहि नाश न पावणाऱ्या अतएव) अव्यय अशा एका न्यग्रोधाच्या म्ह० वटवृक्षाच्या खांदीवर पाहिला असें महाभारतांत वर्णन आहे ( म. भा. वन. १८८.९१ ). तसेंच छांदोग्योप-निषदांत अव्यक्त परमेश्वरापासून अवाढव्य दृश्य जग कसें निर्माण होतें हें दाखविण्यास जो दृष्टान्त घेतला आहे तोहि न्यग्रोधाच्या बीजाचाच आहे ( छां. ६.१२.१ ). श्वेताश्वतरोपनिषदांतहि विश्ववृक्षाचें वर्णन

§§ न रूपमस्येह तथोपलभ्यते नांतो न चादिर्न च संप्रतिष्ठा।

आहे ( श्वे. ६.६ ). पण हा वृक्ष कोणता हें येथें स्पष्ट सांगितलें नाहीं; आणि मुंडकोपनिषतांत ( ३.१ ) याच वृक्षावर दोन पक्षी (जीवात्मा व परमात्मा ) बसलेले असून एक पिंपळ म्हणजे पिंपळाचीं फळें खातो असें ऋग्वेदांतलेंच वर्णन घेतलेलें आहे. पिंपळ आणि वड यांज-खेरिज या संसारवृक्षाच्या स्वरूपाची तिसरी कल्पना म्हटली म्हणजे औदुंबर होय; व पुराणांतून हा दत्तात्रेयाचा वृक्ष मानिला आहे. सारांश, परमेश्वराच्या मायेनें उत्पन्न झालेलें जग म्हणजे एक मोठा पिंपळ, वड किंवा औदुंबर आहे या तिन्ही कल्पना प्राचीन ग्रंथांतून आढळतात; व याच कारणामुळें विष्णुसहस्रनामांत " न्यग्रोधोदुंबरो श्वत्थाः " अशीं विष्णूचीं वृक्षात्मक तीन नांवें दिलीं असून ( म. भा. अनु. १४९-१०१ ), हेच तीन वृक्ष प्रचारांतहि देवतात्मक व पूजार्ह मानीत असतात. शिवाय विष्णुसहस्रनाम व गीता हे दोन्ही महाभार-ताचे भाग आहेत, व विष्णुसहस्रनामांत जर औदुंबर वड ( न्यग्रोध ) आणि अश्वत्थ अशी तीन निराळीं नांवें दिलेलीं आहेत, तर 'अश्वत्थ ' शब्दानें गीतेंतहि पिंपळ ( औदुंबर अगर वट नव्हे ) हाच अर्थ घेतला पाहिजे, व मूळचा अर्थहि तोच आहे. " छंदांसि म्हणजे वेद हीं ज्याचीं पानें " वाक्यांतील छंदांसि शब्दांत छद्=झांकणें हा धातु मानून ( छां. १.४.२. पहा ) वृक्षाला झांकणाऱ्या पानांशीं वेदाचें साम्य वर्णिलें आहे; आणि हें सर्व वर्णन वैदिक परंपरेप्रमाणें असल्यामुळें हें ज्यानें जाणिलें तो वेदवेत्ता म्हणावयाचा असें अखेर म्हटलें आहे. येणेंप्रमाणें वैदिक वर्णन झालें; आतां याच वृक्षाचें दुसऱ्या प्रकारें म्हणजे सांख्य-शास्त्राप्रमाणें वर्णन करितात—]

(२) सत्त्वादि (तीन) गुणांनीं पोसलेल्या आणि ज्यापासून (शब्द स्पर्श–रूप–रस व गंध–रूपी ) विषयांचे अंकुर फुटलेले आहेत, अशा त्याच्या शाखा खालीं आणि वरहि पसरलेल्या आहेत; आणि अखेर कर्माचें

अश्वत्थमेनं सुविरूढमूलमसंगशस्त्रेण दृढेन छित्त्वा ॥ ३ ॥

रूप पावणाऱ्या त्याच्या मुळ्या खालींहि मनुष्यलोकांत वाढत लांब गेल्या आहेत.

[ सांख्यशास्त्राप्रमाणें प्रकृति व पुरुष हीं दोनच तत्त्वें आरंभीं असून पुरुषापुढें त्रिगुणात्मक प्रकृति आपला पसारा मांडूं लागली म्हणजे महदादि तेवीस तत्त्वें उत्पन्न होऊन त्यांचा ब्रह्मांडवृक्ष कसा बनतो याचें गीतारहस्याच्या ८ व्या प्रकरणांत (पृ. १७६) सविस्तर निरूपण केलें आहे. परंतु वेदान्तशास्त्राच्या दृष्टीनें प्रकृति स्वतंत्र नसून परमेश्वराचाच एक अंश असल्यामुळें त्रिगुणात्मक प्रकृतीचा हा पसारा स्वतंत्र वृक्ष न मानितां 'ऊर्ध्वमूल' पिंपळाच्याच या शाखा होत असा वेदान्तशास्त्राचा सिद्धान्त आहे. या सिद्धान्ताला अनुसरून पहिल्या श्लोकांत वर्णिलेल्या वैदिक 'अधःशाखा' वृक्षाच्या "त्रिगुणांनीं पोसलेल्या" शाखा 'खालीं'च नव्हे तर 'वर'हि पसरलेल्या आहेत, असें आतां थोडें निराळें स्वरूप वर्णिलें असून, कर्म-विपाकप्रक्रियेचा धागाहि त्यांत अखेर ओवून दिला आहे. अनुगीतेंत ब्रह्मवृक्षाचें जें वर्णन आहे त्यांत या वृक्षाच्या वैदिक व सांख्य वर्णनांचा मेळ घालण्याच्या भरीस न पडतां फक्त सांख्यशास्त्रांतील चोवीस तत्त्वांचाच ब्रह्मवृक्ष तेथें वर्णिला आहे (म. भा. अश्व. ३५.२२.२३; व गीतार. प्र. ८ पृ. १७६ पहा) परंतु गीतेंत तसें न करितां दृश्यसृष्टिरूप वृक्ष या नात्यानें परमेश्वराचें जें वर्णन वेदांत आढळून येतें, तें आणि सांख्यशास्त्रोक्त प्रकृतीच्या पसाऱ्याचें किंवा ब्रह्मांडवृक्षाचें वर्णन यांची या दोन श्लोकांत जोड घातलेली आहे. मोक्षप्राप्ती होण्यास त्रिगुणात्मक व ऊर्ध्वमूल वृक्षाच्या या पसाऱ्यांतून मुक्त झालें पाहिजे. पण हा वृक्ष एवढा अवाढव्य आहे. कीं, याला कोठून सुरुवात झाली हेंहि कळत नाहीं. म्हणून या जगडव्याळ वृक्षाचा नाश करून त्याच्या बुडाशीं असणारें अमृततत्त्व ओळखण्यास मार्ग कोणता तें सांगतात—]

(३) परंतु ( वर जसें वर्णन केलें ) त्याप्रमाणें इहलोकीं याचें स्वरूप

ततः पदं तत्परिमार्गितव्यं यस्मिन्गता न निवर्तन्ति भूयः।
तमेव चाद्यं पुरुषं प्रपद्ये यतः प्रवृत्तिः प्रसृता पुराणी ॥ ४ ॥

उपलब्ध होत नाहीं; किंवा अंत, आदि आणि आधारस्थानहि मिळत नाहीं. अत्यंत खोल गेलेल्या मुळयांचा हा अश्वत्थ (वृक्ष) अनासक्तिरूप बळकट तरवारीनें तोडून टाकून, (४) नंतर (सृष्टिक्रमाची ही) "पुरातन प्रवृत्ति ज्यापासून निघाली त्याच आद्य पुरुषाकडे मी जातों" (अशा संकल्पानें), जेथें गेलें असतां पुनः माघारे येत नाहींत, तें स्थान शोधून काढावें.

[सृष्टीचा संसार म्हणजे नामरूपात्मक कर्म असून हें कर्म अनादि आहे, आणि त्याचा क्षय करणें म्हणजे त्यांतील आसक्तबुद्धि सोडून देणें होय; दुसऱ्या कोणत्याहि रीतीनें त्याचा क्षय होणें शक्य नाहीं; कारण स्वरूपतः तें अनादि व अव्यय आहे; इत्यादि विवेचन गीतारहस्याच्या दहाव्या प्रकरणांत (पृ. २८२–२८६) केलें आहे तें पहा. कर्म अनादि आहे हा सिद्धान्तच तिसऱ्या श्लोकांत "त्याचें स्वरूप किंवा आदिअंत लागत नाहीं" या शब्दांनीं व्यक्त केला आहे; व पुढें या कर्मवृक्षाचा क्षय करण्यास अनासक्ति हें एकच साधन सांगितलें आहे; तसेंच उपासना करितांना जी भावना मनांत असत्ये त्याप्रमाणें पुढें फल मिळतें (गी. ८.६). म्हणून वृक्षच्छेदनाची ही क्रिया चालू असतां मनांत भावना कोणती असावी याचा खुलासा चवथ्या श्लोकांत आहे. "तमेव चाद्यं पुरुषं प्रपद्ये" असा जो पाठ शांकरभाष्यांत घेतलेला आहे त्यांत वर्तमानकाळीं प्रथमपुरुषीं एकवचनीं 'प्रपद्ये' असें क्रियापद असल्यामुळें हा अर्थ करावा लागतो; व त्यांत 'इति' सारखें कांहीं तरी पद अध्याहृत घ्यावें लागतें. ही अडचण टाळण्यास रामानुजभाष्यांत नमूद केलेलें "तमेव चाद्यं पुरुषं प्रपद्येद्यतः प्रवृत्तिः" हें पाठांतर स्वीकारिलें तर "ज्या स्थानीं गेलें असतां पुनः माघारीं येत नाहीं तें स्थान शोधून काढावें, (व) ज्यापासून सर्व सृ-

निर्मानमोहा जितसंगदोषा अध्यात्मनित्या विनिवृत्तकामाः।
द्वंद्वैर्विमुक्ताः सुखदुःखसंज्ञैर्गच्छन्त्यमूढाः पदमव्ययं तत् ॥ ५ ॥
न तद्भासयते सूर्यो न शशांको न पावकः।
यद्गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं मम ॥ ६ ॥

ष्टीची उत्पत्ति झाली त्यालाच जाऊन पोंचावें" असा अर्थ करितां येईल पण 'प्रपद्' हा धातु नित्य आत्मनेपदी असल्यामुळें 'प्रपद्येत्' असें त्याचें विध्यर्थी तृतीयपुरुषी रूप होऊं शकत नाहीं. 'प्रपद्येत्' हें परस्मैपदाचें रूप असून तें व्याकरणदृष्ट्या अशुद्ध होय. प्राय: याच कारणास्तव हा पाठ शांकरभाष्यांत स्वीकारिला नाहीं; व तेंच युक्त आहे. छांदोग्योपनिषदांतील कांहीं मंत्रांत 'प्रपद्ये' या पदाचा 'इति' शिवाय अशाच प्रकारें उपयोग केलेला आहे (छां. ८.१४.१). 'प्रपद्ये' हें क्रियापद प्रथमपुरुषी असलें तरी वक्त्याशीं म्हणजे हा उपदेश करणाऱ्या श्रीकृष्णाशीं त्याचा संबंध जोडितां येत नाहीं, हें सांगावयास नको. आतां याप्रमाणें वागल्यानें काय फल मिळतें तें सांगतात--]

(५) मान व मोह यांनीं जे विरहित, आसक्तिदोष ज्यांनीं जिंकिला आहे; अध्यात्मज्ञानाचे ठिकाणीं जे नेहमीं स्थिर, जे निष्काम आणि सुख दुःखसंज्ञक द्वंद्वांपासून मुक्त झालेले आहेत, ते ज्ञाते पुरुष त्या अव्यय स्थानाला जाऊन पोंचतात. (६) जेथें गेलें असतां परत येत नाहींत, (असें) तें माझें परम स्थान होय. तें ना सूर्य, ना चंद्र, ना अग्निहि प्रकाशित करित नाहीं.

[ यांपैकीं सहावा श्लोक श्वेताश्वतर (६.१४), मुंडक (२.२.१०) व कठ (५.१५) या तिन्ही उपनिषदांत आला आहे. सूर्य, चंद्र किंवा तारे हे सर्व नामरूपांच्या कोटींत येतात, आणि परब्रह्म या सर्व नामरूपांपलीकडचें असल्यामुळें परब्रह्माच्या तेजानें सुर्यचंद्रादिकांस प्रकाश मिळतो, परब्रह्मास प्रकाशीत करण्यास दुसऱ्या कोणाचीहि अपेक्षा

§§ ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः ।
मनःषष्ठानीन्द्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति ॥ ७ ॥
शरीरं यदवाप्नोति यच्चाप्युत्क्रामतीश्वरः ।
गृहीत्वैतानि संयाति वायुर्गंधानिवाशयात् ॥ ८ ॥
श्रोत्रं चक्षुः स्पर्शनं च रसनं घ्राणमेव च ।
अधिष्ठाय मनश्चायं विषयानुपसेवते ॥ ९ ॥

नाहीं, हें उघड सिद्ध होतें. वरील श्लोकांत 'परम स्थान' या शब्दाचा 'परब्रह्म' असा अर्थ आहे, व या ब्रह्मांत मिळून जाणें हा ब्रह्मनिर्वाण मोक्ष होय. वृक्षाचें रूपक घेऊन परब्रह्माचें अध्यात्मशास्त्रांत जें ज्ञान सांगतात त्याचें विवेचन संपलें. आतां पुरुषोत्तमस्वरूप सांगावयाचें; पण "जेथें गेलें असतां परत येत नाहीं" असें जें शेवटीं सांगितलें त्यावरून सुचणारी जीवाची उत्क्रान्ति व त्याला लागूनच जीवाचें स्वरूप या दोन गोष्टींचें प्रथम वर्णन करितात—]

(७) माझाच सनातन अंश जीवलोकीं (कर्मभूमींत) जीव होऊन प्रकृतींत असणारीं मनासह सहा म्हणजे मन व पांच (सूक्ष्म) इंद्रियें तो (आपल्याकडे) ओढून घेतो. (यालाच लिंगशरीर असें म्हणतात). (८) (या) ईश्वराला म्हणजे जीवाला जेव्हां (स्थूल) शरीर प्राप्त होतें, आणि जेव्हां तो (स्थूल) शरीरांतून निघून जातो, तेव्हां (गंधाच्या पुष्पादि) आश्रयापासून वायु जसा गंध, तद्वत् हा (जीव) वरील (मन व पांच इंद्रियें) बरोबर घेऊन जातो, (९) कान, डोळे, त्वचा व जीभ आणि नाकहि, तसेंच मन, यांचे ठायीं ठाणें देऊन हा (जीव) विषयांचा उप-भोग घेत असतो.

[या तीन श्लोकांपैकीं पहिल्यांत सूक्ष्म किंवा लिंग शरीर म्हणजे काय हें सांगून पुढें हें लिंगशरीर स्थूल देहांत शिरतें कसें, त्यांतून

उत्क्रामंतं स्थितं वापि भुंजानं वा गुणान्वितम् ।
विमूढा नानुपश्यन्ति पश्यन्ति ज्ञानचक्षुषः ॥ १० ॥
यतन्तो योगिनश्चैवं पश्यन्त्यात्मन्यवस्थितम् ।
यतन्तोऽप्यकृतात्मानो नैनं पश्यन्त्यचेतसः ॥ ११ ॥

बाहेर कसें जातें आणि त्यांत राहून विषयोपभोग कसा घेतें या तीन स्थितींचें वर्णन आहे. सांख्यमताप्रमाणें हें सुक्ष्म शरीर महान् तत्त्वापासून सुक्ष्म पंचतन्मात्रांपर्यंतच्या अठरा तत्त्वांचें झालेलें आहे; व वेदान्तसुत्रांत (३.१.१) पंच सुक्ष्म भूतें व प्राण यांचाहि त्यांत समावेश होतो असें म्हटलें आहे. गीतारहस्यप्रकरण ८ पृ. १८४–१८७ पहा. तसेंच मैत्र्युपनिषदांत (९.१०) सुक्ष्म शरीर अठरा तत्त्वाचें असें वर्णन आहे. यावरून "मन व पांच इंद्रियें" या शब्दांनीं सूक्ष्म शरीरांत असणाऱ्या दुसऱ्या तत्त्वांचा संग्रहहि येथें अभिप्रेत आहे, असें म्हणावें लागतें. जीवात्मा परमेश्वरापासून दरवेळीं नवा नवा उत्पन्न होत नसून परमेश्वराचा तो "सनातन अंश" आहे (गी. २.२४ पहा), हा सिद्धान्त वेदान्तसूत्रांतहि 'नित्य' आणि 'अंश' या दोन पदांचा उपयोग करूनच सांगितला आहे (वे. सू. २. ३. १७ व ४३) व गीतेंतील क्षेत्रक्षेत्रज्ञविचार ब्रह्मसूत्रांतून घेतला आहे असें जें तेराव्या अध्यायांत म्हटलें आहे (१३.४) त्याचें यानें दृढीकरण होतें (गी. र. परी. पृ. ५३३, ५३४ पहा). 'अंश' शब्दाचा अर्थ 'घटकाशा'दिवत् अंश समजावयाचा, तोडून काढिलेला 'अंश' नव्हे, असें गीतारहस्याच्या नवव्या प्रकरणांत (पृ. २४३) दाखविलें आहे. शरीर धारण करणें, शरीर सोडून जाणें व उपभोग घेणें या तीन क्रिया याप्रमाणें चालल्या असतां––]

(१०) शरीरांतून निघून जाणारास अथवा राहाणारास किंवा गुणांनीं युक्त होऊन (स्वतः नव्हे) उपभोग घेणारास मूर्ख लोक जाणीत नाहींत. ज्ञानचक्षूनें पहाणारे लोक (त्यास) ओळखितात. (११) तसेंच प्रयत्न

§§ यदादित्यगतं तेजो जगद्भासयतेऽखिलम् ।
यच्चंद्रमसि यच्चाग्नौ तत्तेजो विद्धि मामकम् ॥ १२ ॥
गामाविश्य च भूतानि धारयाम्यहमोजसा ।
पुष्णामि चौषधीः सर्वाः सोमो भूत्वा रसात्मकः ॥१३॥

करणारे जे योगी ते आपले ठायीं स्थित असलेल्या या आत्म्यास ओळखितात पण ज्यांचा आत्मा म्हणजे बुद्धि संस्कृत नाहीं असे अज्ञ लोक प्रयत्न करूनहि याला ओळखीत नाहींत.

[ १० व्या ११ व्या श्लोकांत ज्ञानचक्षूनें किंवा कर्मयोगमार्गानें आत्मज्ञान होतें असें सांगून जीवाच्या उत्क्रान्तीचें वर्णन पुरें केलें. आतां याचे मागें सातव्या अध्यायांत वर्णिल्याप्रमाणें ( ७.८–१२ पहा ) आत्म्याच्या सर्वव्यापित्वाचें प्रस्तावनेदाखल थोडें पुन्हा वर्णन करून पुढ सोळाव्या श्लोकापासुन पुरुषोत्तमस्वरूप सांगितलें आहे. ]

(१२) जें तेज सूर्यामध्यें असून सर्व जगाला प्रकाशित करितें, जें तेज चंद्रांत आणि अग्नींत आहे तें माझेंच तेज असें समज. (१३) तसेंच पृथ्वीमध्यें प्रवेश करून मीच ( सर्व ) भूतें आपल्या तेजानें धारण करितों, आणि रसात्मक सोम ( चंद्र ) होऊन सर्व औषधींचें म्हणजे वनस्पतींचें पोषण करितों.

[ सोम या शब्दाचे ‘ सोमवल्ली ’ व ‘ चंद्र’ असे दोन्ही अर्थ आहेत; आणि चंद्र ज्याप्रमाणें जलात्मक, अंशुमान व शुभ्र आहे त्याचप्रमाणें सोमवल्लीहि असते, असें वेदांत वर्णन असून, दोहोंसहि ’वनस्पतींचा राजा ’ असें म्हटलें आहे. तथापि पूर्वापरसंदर्भावरून येथें चंद्र हाच अर्थ विवक्षित आहे. चंद्राचें तेज मीच असें या श्लोकांत सांगितल्यावर या श्लोकांतच वनस्पतींचें पोषण करण्याचा जो चंद्राचा गुण तोहि मीच असें म्हटलें आहे. चंद्र जलमय असल्यामुळें हा गुण त्याचे अंगीं असून त्यामुळें वनस्पतींची वाढ होते अशीं इतरत्रहि वर्णनें आहेत. ]

अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः ।
प्रणापानसमायुक्तः पचाम्यन्नं चतुर्विधम् ॥ १४ ॥
सर्वस्य चाहं हृदि संनिविष्टो मत्तः स्मृतिर्ज्ञानमपोहनं च।
वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यो वेदांतकृद्वेदविदेव चाहम् ॥ १५ ॥
§§ द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च ।
क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते ॥ १६ ॥
उत्तमः पुरुषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः ।

(१४) मी वैश्वानररूप अग्नि होऊन प्राण्यांच्या देहांत राहिलों असून, प्राण व अपान यांनीं युक्त होत्साता ( भक्ष्य, चोष्य, लेह्य व पेय असें ) चार प्रकारचें अन्न पचन करितों. (१५) तसेंच सर्वांच्या हृदयांत मी अधिष्ठित असून स्मृति, ज्ञान व अपोहन म्हणजे तन्नाश, हीं माझ्यापासूनच होतात आणि सर्व वेदांनीं जें काय जाणावयाचें तें मीच. वेदान्ताचा कर्ता आणि वेद जाणणाराहि मी.

[ या श्लोकाचा दुसरा चरण कैवल्योपनिषदांत आला असून ( कै.२.३ ) त्यांत " वेदैश्च सर्वैः " याऐवजीं " वेदैरनेकैः " एवढाच पाठभेद आहे. तेव्हां 'वेदान्त' हा शब्द गीताकालीं प्रवृत्त झालेला नव्हता असें कल्पून हा श्लोक प्रक्षिप्त असावा किंवा त्यांत 'वेदान्त' शब्दाचा अर्थ दुसरा कांहीं तरी घेतला पाहिजे असे जे तर्क कित्येकांनीं काढिले आहेत ते निर्मूल होत. 'वेदान्त' हा शब्द मुंडक ( ३. २. ६ ) व श्वेताश्वतर ( ६.२२ ) या उपनिषदांतून आलेला असून श्वेताश्वतरांतील कांहीं मंत्र तर शब्दशः गीतेंत आलेले आहेत. आतां पुरुषोत्तमाचें लक्षण काय तें निरुक्तिपूर्वक सांगतात—]

(१६) या लोकांत 'क्षर' आणि 'अक्षर' हे दोन पुरुष आहेत. क्षर म्हणजे सर्व ( नाशवंत ) भूतें आणि कूटस्थ म्हणजे या सर्व भूतांच्या मूळाशीं (कूटाशीं)

योः लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्यय ईश्वरः ॥ १७ ॥
यस्मात्क्षरमतीतोऽहमक्षरादपि चोत्तमः ।
अतोऽस्मि लोके वेदे च प्रथितः पुरुषोत्तमः ॥ १८ ॥

असणारें जें (प्रकृतिरूप अव्यक्त तत्त्व) त्यास अक्षर असें म्हणतात. (१७) परंतु जो पुरुष उत्तम तो (या दोहोंहून) भिन्न आहे. त्याला परमात्मा असें म्हण-तात. तोच अव्यय ईश्वर त्रैलोक्यांत भरलेला असून (त्रैलोक्याचें) पोषण करितो. (१८) ज्या अर्थी मी क्षराच्याहि पलीकडचा व अक्षराहूनहि उत्तम (पुरुष) आहें त्या अर्थी लोकव्यवहारांत आणि वेदान्तामध्येंहि पुरुषोत्तम या नांवानें प्रसिद्ध आहें.

[ सोळाव्या श्लोकांत 'क्षर' आणि 'अक्षर' हे दोन शब्द व्यक्त व अव्यक्त —किंवा व्यक्त सृष्टि आणि अव्यक्त प्रकृति—या दोन सांख्यशास्त्रांतील शब्दांशीं समानार्थक आहेत. पैकीं क्षर म्हणजे नाशवंत पंचभूतात्मक व्यक्त पदार्थ हा अर्थ उघड आहे. पण 'अक्षर' हें विशेषण पूर्वीं अनेक वेळां परब्रह्मासहि लाविलेलें असल्यामुळें (गी. ८.३; ८.२१; ११.३७; १२.३ पहा), पुरुषोत्तमाच्या वरील लक्षणांत 'अक्षर' या शब्दाचा अक्षरपरब्रह्म असा अर्थ नसून सांख्यांची अक्षर प्रकृति असा अर्थ आहे, हें लक्षांत ठेविलें पाहिजे; व हा घोटाळा उत्पन्न होऊं नये म्हणू-नच 'अक्षर म्हणजे कूटस्थ (प्रकृती)' अशी व्याख्या सोळाव्या श्लोकांत मुद्दाम दिली आहे (गीतारहस्य पृ. १९८–२०१), सारांश, व्यक्त सृष्टि व अव्यक्त प्रकृति यांच्या पलीकडलें अक्षरब्रह्म (गी. ८.२०–२२ वरील आमची टीका पहा), आणि 'क्षर' (व्यक्त सृष्टी) व 'अक्षर' (प्रकृति) यांच्यापलीकडला पुरुषोत्तम हे दोन्ही वस्तुतः एकच आहेत. यांसच परमात्मा असें म्हणतात आणि हाच परमात्मा शरीरांत क्षेत्रज्ञरूपानें वास करितो असें तेराव्या अध्यायांत सांगि-तलें आहे (गी. १३.३१) यावरून क्षराक्षरविचारांत अखेर निष्पन्न

§§ यो मामेवमसंमूढो जानाति पुरुषोत्तमम् ।
स सर्वविद्भजति मां सर्वभावेन भारत ॥ १९ ॥
इति गुह्यतमं शास्त्रमिदमुक्तं मयानघ ।
एतद्बुध्वा बुद्धिमान् स्यात्कृतकृत्यश्च भारत ॥ २० ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुन-संवादे पुरुषोत्तमयोगो नाम पंचदशोऽध्यायः ॥ १५ ॥

---

होणारें मूलतत्त्व जें अक्षरब्रह्म तेंच क्षेत्रक्षेत्रज्ञविचाराचेंहि पर्यवसान होय, किंवा " पिंडीं व ब्रह्मांडीं " मिळून एकच पुरुषोत्तम आहे असें सिद्ध होतें. तसेंच अधिभूत, अधियज्ञ इत्यादिकांतील किंवा जुन्या पिंपळांतीलहि तत्व हेंच होय असेंहि सांगितलें आहे. जगांतील हें ऐक्य ज्यानें ओळखिलें आणि "सर्वांभूतीं एक आत्मा" (गी. ६.२९) ही ओळख ज्याच्या मनांत मरेपर्यंत कायम राहिली (वे. सू. ४.१.१२; गी. ८.६), तो कर्मयोग आचरीत असतांच परमेश्वरप्राप्ति करून घेतो हा या ज्ञानविज्ञान प्रकरणाचा अखेर निष्कर्ष आहे. कर्में न करितां केवळ परमेश्वरभक्तीनें मोक्ष मिळत नाहीं असें नाहीं; पण गीतेंतील ज्ञानविज्ञाननिरूपणाचें तें तात्पर्य नसून ज्ञानानें किंवा भक्तीनें परिपूत झालेल्या निष्काम बुद्धीनें सर्व सांसारिक कर्में करावीं, व तीं करीत असतांच मोक्ष कसा मिळतो, हें दाखविण्यासाठींच ज्ञान-विज्ञानाच्या या निरूपणास सुरवात केलेली आहे, असें सातव्या अध्यायाच्या आरंभींच म्हटलें आहे. असो; आतां हें जाणिल्यानें काय फल मिळतें तें सांगतात—]

(१९) याप्रमाणें मी पुरुषोत्तम हें मोह न पावतां जो जाणतो, तो सर्वज्ञ होत्साता सर्वभावेंकरून हे भारता ! मलाच भजतो (२०) हे निष्पाप भारता ! असें हें गुह्यांतलें गुह्य शास्त्र मीं सांगितलें. हें समजून घेतल्यानें (मनुष्य) बुद्धिमान् म्हणजे बुद्ध किंवा जाणता आणि कृतकृत्य होईल.

## षोडशोऽध्यायः ।

श्रीभगवानुवाच ।

अभयं सत्त्वसंशुद्धिर्ज्ञानयोगव्यवस्थितिः ।

[ बुद्धिमान् याचाच बुद्ध म्हणजे जाणता असा येथें अर्थ आहे; कारण भारतांत (शां. २४८.११) याच अर्थी 'बुद्ध' व 'कृतकृत्य' हे शब्द आलेले आहेत. 'बुद्ध' या शब्दाचा 'बौद्धावतार' हा रूढार्थ महाभारतांत कोठेंच आलेला नाहीं. गीतार. परि. पृ. ५५६ पहा. ]

याप्रमाणें श्रीभगवंतांनीं गाईलेल्या म्हणजे सांगितलेल्या उपनिषदांत ब्रह्मविद्यान्तर्गत योग–म्हणजे कर्मयोग–शास्त्रावरील श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या संवादांतील पुरुषोत्तमयोग नांवाचा पंधरावा अध्याय समाप्त झाला.

---

## अध्याय सोळावा.

[ पुरुषोत्तमयोग ही क्षराक्षरज्ञानाची परमावधि झाली; व खरें म्हटलें म्हणजे कर्मयोग आचरीत असतां त्यानेंच परमेश्वराचें ज्ञान होऊन मोक्ष कसा मिळतो हें दाखविण्यासाठीं सातव्या अध्यायापासून जें ज्ञानविज्ञान सांगण्यास सुरवात केली तें येथें संपून आतां उपसंहार करावयास पाहिजे परंतु नवव्या अध्यायांत (९.१२) राक्षसी मनुष्यें माझें अव्यक्त व श्रेष्ठ स्वरूप ओळखीत नाहींत असें जें भगवंतांनीं नुस्तें संक्षिप्त विधान केलें आहे त्याचें स्वरूप सांगण्यासाठीं या अध्यायास सुरवात केली आहे; आणि मनुष्यामनुष्यांत असे भेद कां होतात याचें कारण पुढील अध्यायांत सांगितल्यावर, अठराव्या अध्यायांत सर्व गीतेचा उपसंहार केला आहे. ]

दानं दमश्च यज्ञश्च स्वाध्यायस्तप आर्जवम् ॥ १ ॥
अहिंसा सत्यमक्रोधस्त्यागः शांतिरपैशुनम् ।
दया भूतेष्वलोलुप्त्वं मार्दवं ह्रीरचापलम् ॥ २ ॥
तेजः क्षमा धृतिः शौचमद्रोहो नातिमानिता ।
भवन्ति संपदं दैवीमभिजातस्य भारत ॥ ३ ॥

श्रीभगवान् म्हणाले-(१) अभय, शुद्ध सात्त्विक वृत्ति, ज्ञानयोगव्यवस्थिति म्हणजे ज्ञान (-मार्ग) व (कर्म-) योग यांची तारतम्यानें व्यवस्था, दातृत्व, दम, यज्ञ, स्वाध्याय म्हणजे स्वधर्माप्रमाणें आचरण, तप, सरळपणा, (२) अहिंसा, सत्य, क्रोध नसणें, त्याग म्हणजे कर्मफलत्याग, शान्ति, अपैशून्य म्हणजे क्षुद्र दृष्टि सुटून उदारबुद्धि असणें, सर्व भूतांचे ठायीं दया, हावरेपणा नसणें, मृदुपणा, (वाईट कृत्यांची) लाज, अचापल म्हणजे रिकामे व्यापार सुटणें, (३) तेजस्विता, क्षमा, धृति, शुचिर्भूतपणा, द्रोह न करणें, अतिमान नसणें, हे (गुण) हे भारता ! दैवी संपत्तींत जन्मलेल्या पुरुषांस प्राप्त होतात.

[ दैवी संपत्तींचे हे सव्वीस गुण आणि तेराव्या अध्यायांत सांगितलेलीं ज्ञानाचीं लक्षणें ( गी. १३.७-११ ) वस्तुतः एकच होत; व याच कारणामुळें पुढील श्लोकांत 'अज्ञाना'चा आसुरी लक्षणांत समावेश केलेला आहे. सव्वीस गुणांच्या यादींतील प्रत्येक शब्दाचा अर्थ दुसऱ्या शब्दाच्या अर्थाहून सर्वांशीं भिन्न होईल असा सांगणें शक्य नाहीं; व हेतूहि पण तसा नाहीं. उदाहरणार्थ, अहिंसेचेंच कोणी कायिक, वाचिक मानसिक असे भेद करून क्रोधानें दुसऱ्याचें मन दुखविणें ही एक प्रकारची हिंसाच मानितात. शुचिर्भूतपणाहि याप्रमाणें त्रिविध मानिला, म्हणजे मनाच्या शुचिर्भूतपणांत क्रोध नसणें, द्रोह नसणें, इत्यादी गुणहि येऊं शकतात. महाभारतांत शान्तिपर्वांत अध्याय १६० पासून अध्याय १६३ पर्यंत अनुक्रमें दम, तप, सत्य व लोभ यांचें सवि-

§§ दंभो दर्पोऽतिमानश्च क्रोधः पारुष्यमेव च।
अज्ञानं चाभिजातस्य पार्थ संपदमासुरीम्॥ ४ ॥

स्तर वर्णन आहे. पैकीं दमांतच क्षमा, धृति, अहिंसा, सत्य, आर्जव, लज्जा इत्यादी पंचवीस तीस गुणांचा व्यापकार्थी समावेश केला असून (शां. १६०) सत्याच्या निरूपणांत ( शां. १६२ ) सत्य, समता, दम, अमात्सर्य, क्षमा, लाज, तितिक्षा, अनसूयता, याग, ध्यान, आर्यता ( लोककल्याणेच्छा ) धृति, व दया या तेरा गुणांचा एका 'सत्यांतच समावेश होतो, असें म्हटलें आहे; व तेथेंच या शब्दांच्या व्याख्याहि दिल्या आहेत. एका गुणांतच अशा रीतीनें अनेकांचा समावेश करणें हें पांडित्याचें काम होय; व प्रत्येक गुणाची अशी चर्चा करूं लागल्यास दरएक गुणावर एकेक ग्रंथ लिहावा लागेल. वरील श्लोकांत या सर्व गुणांचा जो समुच्चय सांगितला आहे त्याचा हेतु एवढाच आहे कीं, दैवी संपत्तीच्या सात्त्विक रूपाची त्यानें पूर्ण कल्पना यावी; आणि कांहीं अर्थ एका शब्दांत सुटला असला तर त्याचा समावेश दुसऱ्या शब्दांत व्हावा. असो, वरील यादींतील 'ज्ञानयोगव्यवस्थिति' या शब्दाचा अर्थ आम्ही गीता ४.४१ व ४२ या श्लोकांच्या आधारें कर्मयोगपर केला आहे. त्याग व धृति यांच्या व्याख्या खुद्द भगवानांनींच अठराव्या अध्यायांत केलेल्या आहेत त्या पहा (१८,४ व २९). दैवी संपत्तींत कोणत्या गुणांचा समावेश होतो तें सांगून आतां उलट पक्षीं आसुरी किंवा राक्षसी संपत्तीचें वर्णन करितात—]

(४) दंभ, दर्प, अतिमान तसेंच हे पार्था ! क्रोध, पारुष्य म्हणजे निष्ठुरपणा आणि अज्ञान, हे आसुरी म्हणजे राक्षसी संपत्तींत जन्मलेल्यास ( प्राप्त होतात ).

[ महाभारत शांतिपर्व अ. १६४ व १६५ यांत यांपैकीं कांहीं दोषांचें वर्णन असून अखेरीस नृशंस कोणास म्हणावें तेंहि सांगितलें आहे.

§§ दैवी संपद्विमोक्षाय निबंधायासुरी मता ।
मा शुचः संपदं दैवीमभिजातोऽसि पांडव ॥ ५ ॥
§§ द्वौ भूतसर्गौ लोकेऽस्मिन्दैव आसुर एव च ।
दैवो विस्तरशः प्रोक्त आसुरं पार्थ मे शृणु ॥ ६ ॥

'अज्ञान' हें आसुरी संपत्तीचें लक्षण असें या श्लोकांत म्हटलें असल्यामुळें 'ज्ञान' हें दैवी संपत्तीचें लक्षण आहे हें उघड होतें. जगांत आढळून येणाऱ्या दोन तऱ्हेच्या स्वभावाचें याप्रमाणें वर्णन झाल्यावर—]

(५) (यापैकीं) दैवी संपत्ती (परिणामीं) मोक्षदायक आणि आसुरी बंधदायक असें समजतात. हे पांडवा! तूं दैवी संपत्तींत जन्मलेला आहेस. शोक करूं नको.

[या दोन प्रकारच्या पुरुषांस कोणती गति मिळत्ये तें संक्षेपानें सांगितलें. आतां आसुरी पुरुषांचें विस्तारानें वर्णन करितात—]

(६) या लोकांत दोन प्रकारचे प्राणी उत्पन्न होत असतात; (एक) दैव आणि दुसरा आसुर. (पैकीं) दैव (प्रकाराचें) वर्णन विस्तारानें सांगितलें. (आतां) हे पार्था! आसुर (प्रकाराचें) वर्णन मी सांगतों ऐक.

[पूर्वीच्या अध्यायांतून कर्मयोग्यानें कसें वागावें आणि ब्राह्मी अवस्था कशी असते, अगर स्थितप्रज्ञ, भगवद्भक्त व त्रिगुणातीत कोणाला म्हणतात, व ज्ञान म्हणजे काय, इत्यादिकांचें, आणि या अध्यायाच्या पहिल्या तीन श्लोकांत दैवी संपत्तिचें जें वर्णन आहे तेंच दैव प्रकृतीच्या पुरुषाचें वर्णन असल्यामुळें, दैव वर्गाचें वर्णन विस्तारानें पूर्वीं सांगितलें असें म्हटलें आहे. आसुर संपत्तींचा थोडा उल्लेख नवव्या अध्यायांत (९.११ व १२). आला आहे. पण तेथील वर्णन अपुरें असल्यामुळें तेंच आतां या अध्यायांत पुरें करितात.]

प्रवृत्तिं च निवृत्तिं च जना न विदुरासुराः ।
न शौचं नापि चाचारो न सत्यं तेषु विद्यते ॥ ७ ॥
असत्यमप्रतिष्ठं ते जगदाहुरनीश्वरम् ।
अपरस्परसंभूतं किमन्यत्कामहैतुकम् ॥ ८ ॥

(७) प्रवृत्ति म्हणजे काय करावें, आणि निवृत्ति म्हणजे काय करूं नये, हें आसुर लोकांस कळत नसतें; आणि शुचिर्भूतपणा, किंवा आचार अगर सत्य हीं त्यांचे ठायीं वसत नसतात. (८) हे (आसुरी लोक) सर्व जग असत्य, अ-प्रतिष्ठ म्हणजे निराधार, अनीश्वर म्हणजे परमेश्वरावांचून असणारें, अ-परस्परसंभूत म्हणजे एकमेकांपासूनहि न झालेलें, (अतएव) कामाखेरीज म्हणजे मनुष्याच्या विषयोपभोगाखेरीज त्याचा दुसरा हेतु काय असणार, असें म्हणतात,

[ या श्लोकाचा अर्थ जरी स्पष्ट आहे तरी त्यांतील पदांचा अर्थ लावण्यांत बराच मतभेद आहे. आमच्या मतें वेदान्त किंवा कापिल सांख्य या दोन्ही शास्त्रांचे जगाच्या रचनेबद्दलचे सिद्धान्त नाकबूल करणाऱ्या चार्वाकादि नास्तिकांच्या मतांचें हें वर्णन आहे, व म्हणून या श्लोकांतील पदें सांख्य व अध्यात्मशास्त्रांतील सिद्धान्ताच्या विरुद्ध अर्थाचीं आहेत. वेदान्ती जग विनाशी मानून त्यांतलें अविनाशी सत्य-सत्यस्य सत्यं (बृ. २. ३. ६)—शोधून काढीत असतो, आणि तेंच सत्य तत्त्व जगाचा मूळ आधार किंवा प्रतिष्ठा आहे असें मानितो—ब्रह्मपुच्छं प्रतिष्ठा (तै. २. ५) पण आसुरी लोक हें जग अ-सत्य म्हणजे ज्यांत सत्य नाहीं, आणि मग अर्थातच अ-प्रतिष्ठ म्हणजे ज्याला प्रतिष्ठा अगर आधारहि नाहीं असें मानितात. पण अध्यात्मशास्त्रांत प्रतिपादिलेलें अव्यक्त परब्रह्म जरी याप्रमाणें आसुरी लोकांस संमत नसलें, तरी भक्तिमार्गांतील व्यक्त ईश्वर त्यांस मान्य असेल अशी शंका येण्याचा संभव आहे. म्हणून अनीश्वर (अन्+ईश्वर) हें तिसरें पद घालून आसुरी

एतां दृष्टिमवष्टभ्य नष्टात्मानोऽल्पबुद्धयः ।

लोक जगांत ईश्वरहि मानीत नाहींत असें म्हटलें आहे. जगाचा मूळ आधार याप्रमाणें नाकबूल केला म्हणजे "आत्मन आकाशः संभूतः। आकाशाद्वायुः। वायोरग्निः। अग्नेरापः। अद्भ्यः पृथिवी। पृथिव्या ओषधयः। ओषधीभ्यः अन्नं अन्नात्पुरुषः।" इत्यादि उपनिषदांतील (तै. २.१), किंवा प्रकृति व पुरुष हीं दोन स्वतंत्र मूलतत्त्वें मानून सत्त्व रज व तम या तीन गुणांच्या अन्योन्याश्रयानें म्ह०परस्पर मिश्रणानें सर्व व्यक्त पदार्थ उत्पन्न झाले आहेत, हा सांख्यशास्त्रांतील सृष्टयुत्पत्तिक्रमहि सोडून द्यावा लागतो. कारण, ही सांखळी किंवा परंपरा जर कबूल केली तर दृश्य सृष्टींत पदार्थांपासून मागें जातां जातां या जगाला कांहीं तरी मूळ आहे असें मानावें लागेल. म्हणून आसुरी लोक जगांतील पदार्थ अपरस्परसंभूत म्ह० एकमेकांपासून कोणत्यातरी क्रमानें उत्पन्न झालेले आहेत असें कबूल करीत नाहींत. जगाच्या रचनेसंबंधानें एकदां अशी समजूत झाल्यावर मनुष्य प्राणीच प्रधान ठरून त्याच्या कामवासना तृप्त करण्यासाठींच जगांतील पदार्थ झालेले आहेत, त्यांचा दुसरा कांहीं उपयोग नाहीं, असें पुढें ओघानेंच प्राप्त होतें. आणि हाच अर्थ "किमन्यत्कामहैतुकं"—कामाखेरीज त्याचा दुसरा काय हेतु असणार?—या शब्दांनीं या श्लोकाचे अखेरीस, व पुढील श्लोकांतूनहि, वर्णिला आहे. कित्येक टीकाकार "अपरस्परसंभूतं" याचा अन्वय "किमन्यम्" या पदांशीं लावून "परस्पर म्हणजे स्त्रीपुरुष यांच्या संयोगापासून न झालेलें असें दुसरें कांहीं दिसतें काय? नाहीं; आणि असा पदार्थच जर दिसत नाहीं तर हें जग कामहेतुक म्हणजे स्त्रीपुरुषांच्या कामेच्छेपासूनच निर्माण झालें आहे," असा अर्थ लावितात; आणि कित्येक "अपरश्च परश्च" अपरस्परौ असा विलक्षण विग्रह करून 'अपरस्पर' म्हणजेच स्त्री-पुरुष व त्यापासून हें जग झालें असून त्याला स्त्री-पुरुषांचा

प्रभवन्त्युग्रकर्माणः क्षयाय जगतोऽहिताः ॥ ९ ॥

काम हाच हेतु आहे, दुसरें कांहीं कारण नाहीं," असा याच पदांचा अर्थ लावीत असतात. पण हा अन्वय सरळ नाहीं, आणि 'अपरश्च परश्च' याचा समास 'अपर-पर' होईल, मध्यें 'अपरस्पर' असा सकार येणार नाहीं. शिवाय अ-सत्य, अ–प्रतिष्ठ, वगैरे पूर्वीचीं पदें पाहिलीं तर अ-परस्परसंभूत हा नञसमासच असला पाहिजे असें दिसून येतें; आणि मग 'परस्परसंभूत' या शब्दानें सांख्यशास्त्रांत 'गुणापासून गुणांचें अन्योन्यजनन' वर्णिलें आहे, तेंच या ठिकाणीं विवक्षित आहे असें म्हणावें लागतें (गीतारहस्य पृ. १५५ व १५६ पहा). 'अन्योन्य' व 'परस्पर' हे दोन्ही शब्द समानार्थक असून सांख्यशास्त्रांतील गुणांच्या अन्योन्य लटपटी वर्णन करितांना हे दोन्ही शब्द येत असतात (म. भा. शां ३०५; सां. का. १२ व १३ पहा). गीतेवरील माध्वभाष्यांत हाच अर्थ स्वीकारून जगांतील वस्तु एकमेकांपासून कशा उत्पन्न होतात हें दाखविण्यास "अन्नाद्भवंति भूतानि इ०–', (अग्नींत टाकिलेली आहुति सूर्यास पोचत्ये म्हणून) यज्ञापासून वृष्टि, वृष्टीपासून अन्न व अन्नापासून प्रजा उत्पन्न होत्ये–हा गीतेंतीलच श्लोक दिला आहे गी. ३.१४; मनु. ३. ७९ पहा). पण तैतिरीय उपनिषदांतील वचन यापेक्षां अधिक प्राचीन व व्यापक असल्यामुळें तेंच आम्ही वर प्रमाणार्थ घेतलें आहे. तथापि गीतेंतील 'अ-परस्परसंभूत' या पदानें उपनिषदांतील सृष्टयुत्पत्तिक्रमापेक्षां सांख्यांचा सृष्टयुत्पत्तिक्रमच जास्त विवक्षित आहे, असें आमचें मत आहे. असो; जगाच्या रचनेसंबंधानें वर जें आसुरी मत सांगितलें त्याचा या लोकांच्या वर्तनावर काय परिणाम घडतो तें आतां सांगतात. वरील श्लोकांत शेवटीं 'कामहैतुक' असें जें पद आहे त्याचेंच हें जास्त स्पष्टीकरण आहे. ]

(९) अशा प्रकारची दृष्टि स्वीकारून अल्पबुद्धीचे हे नष्टात्मे व दुष्ट लोक क्रूर कर्में आचरीत जगाचा क्षय करण्यास उत्पन्न होत असतात

काममाश्रित्य दुष्पूरं दंभमानमदान्विताः ।
मोहाद्गृहीत्वाऽसद्ग्राहान्प्रवर्तन्तेऽशुचिव्रताः ॥ १० ॥
चिंतामपरिमेयां च प्रलयान्तामुपाश्रिताः ।
कामोपभोगपरमा एतावदिती निश्चिताः ॥ ११ ॥
आशापाशशतैर्बद्धाः कामक्रोधपरायणाः ।
ईहन्ते कामभोगार्थमन्यायेनार्थसंचयान् ॥ १२ ॥
इदमद्य मया लब्धमिमं प्राप्स्ये मनोरथम् ।
इदमस्तीदमपि मे भविष्यति पुनर्धनम् ॥ १३ ॥
असौ मया हतः शत्रुर्हनिष्ये चापरानपि ।
ईश्वरोऽहमहं भोगी सिद्धोऽहं बलवान्सुखी ॥ १४ ॥
आढ्योऽभिजनवानस्मि कोऽन्योऽस्ति सदृशो मया ।
यक्ष्ये दास्यामि मोदिष्य इत्यज्ञानविमोहिताः ॥ १५ ॥

(१०) (आणि) कधींच पुरा न होणाऱ्या कामाचा म्हणजे विषयोपभोगेच्छेचा आश्रय करून दंभ, मान, व मद यांनीं व्यापिलेले हे (आसुरी लोक) मोहानें खोटेनाटे ग्रह म्हणजे भलभलत्या कल्पना (मनांत) धरून घाणेरडीं कामें करण्यास प्रवृत्त होत असतात, (११) तसेंच आमरणान्त (सुखोपभोगाच्या) अगणित चिंतेनें ग्रासलेले, कामोपभोगांत गढून गेलेले आणि तेंच काय तें सर्वस्व असें निश्चयानें मानणारे, (१२) शेंकडों आशापाशांनीं बद्ध झालेले, कामक्रोधपरायण होत्साते (हे आसुरी लोक) सुखोपभोगार्थ अन्यायानें पुष्कळ अर्थसंचय करण्याची हांव बाळगीत असतात. (१३) मी आज हें मिळविलें, (उद्यां) तो मनोरथ प्राप्त करून घेईन; हें धन (मजजवळ) आहे, आणि पुनः तेंहि माझें होईल; (१४) हा शत्रु मारिला, आणि दुसरेहि मारीन; मी ईश्वर, मी (-च) उपभोग घेणारा, मी सिद्ध, बलाढ्य आणि सुखी, (१५) मी संपन्न व कुलवान, माझ्यासारखा दुसरा आहे कोण ? मी यज्ञ करीन,

अनेकचित्तविभ्रांता मोहजालसमावृताः ।
प्रसक्ताः कामभोगेषु पतन्ति नरकेऽशुचौ ॥ १६ ॥
आत्मसंभाविताः स्तब्धा धनमानमदान्विताः ।
यजन्ते नामयज्ञैस्ते दंभेनाविधिपूर्वकम् ॥ १७ ॥
अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं च संश्रिताः ।
मामात्मपरदेहेषु प्रद्विषन्तोऽभ्यसूयकाः ॥ १८ ॥
तानहं द्विषतः क्रूरान्संसारेषु नराधमान् ।
क्षिपाम्यजस्रमशुभानासुरीष्वेव योनिषु ॥ १९ ॥
आसुरीं योनिमापन्ना मूढा जन्मनि जन्मनि ।
मामप्राप्यैव कौन्तेय ततो यान्त्यधमां गतिम् ॥ २० ॥

मी दान देईन, मी चैन करीन, याप्रमाणें अज्ञानानें मोहपावलेले, (१६) अनेक प्रकारच्या कल्पनांनीं भ्रमलेले, मोहाच्या जाळयांत गुरफटलेले, आणि विषयोपभोगांत आसक्त झालेले, (हे आसुरी लोक) घाणेरड्या नरकांत पडतात ! (१७) आत्मश्लाघी, ताठ्यानें वागणारे, व धन आणि मान यांच्या मदानें युक्त असलेले, हे (आसुरी लोक) दांभिकपणानें शास्त्रविधि सोडून देऊन केवळ नांवाचे यज्ञ करीत असतात. (१८) अहं-कारानें, बलानें, दर्पानें, कामानें व क्रोधानें फुगून जाऊन आपल्या स्वतः च्या व इतरांच्या देहांत असणारा जो मी (परमेश्वर) त्याचा द्वेष कर-णारे, (आणि) निंदक, (१९) अशुभ कर्मे करणाऱ्या (या) द्वेष्ट्या व क्रूर नराधमांस (या) संसारांतील आसुरी म्हणजे पापयोनींतच मी नेहमीं टाकीत असतों. (२०) हे कौंतेया ! (याप्रमाणें) जन्मोजन्म आसुरी योनिच प्राप्त होऊन, हे मूर्ख लोक माझ्याकडे कधींच न येतां अखेर अत्यंत अधोगतीला जातात.

[आसुरी लोकांचें व त्यांस प्राप्त होणाऱ्या गतीचें हें वर्णन झालें. आतां यांतून सुटावें कसें तें सांगतात.—]

§§ त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः ।
कामः क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत्त्रयं त्यजेत् ॥ २१ ॥
एतैर्विमुक्तः कौंतेय तमोद्वारैस्त्रिभिर्नरः ।
आचरत्यात्मनः श्रेयस्ततो याति परां गतिम् ॥ २२ ॥
§§ यः शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारतः ।
न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न परां गतिम् ॥ २३ ॥
तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ ।
ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि ॥ २४ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुन संवादे दैवासुरसंपद्विभागयोगो नाम षोडशोऽध्यायः ॥ १६ ॥

---

(२१) काम, क्रोध व लोभ असें तीन प्रकारचें नरकाचें द्वार असून तें आपला नाश करणारें आहे. म्हणून या तिहींचाहि त्याग करावा. (२२) हे कौंतेया ! या तीन तमोद्वारांतून सुटला म्हणजे मनुष्य आपलें ज्यांत कल्याण तेंच आचरण करूं लागतो, व नंतर उत्तम गतीला पोंचतो.

[ तीन नरकाची द्वारें सुटलीं म्हणजे सद्गति मिळाली पाहिजे, हें उघड आहे पण तीं कोणत्या प्रकारच्या आचरणानें सुटतात तें सांगितलें नाहीं. करितां त्याचा मार्ग काय तो आतां सांगतात—]

(२३) जो शास्त्रोक्त विधि सोडून मनास वाटेल तें करूं लागला, त्याला सिद्धि मिळत नाहीं, आणि उत्तम गतिहि नाहीं (२४) तस्मात् कार्याकार्यव्यवस्थितीचा म्हणजे कर्तव्य कोणतें व अकर्तव्य कोणतें याचा निर्णय करण्यास तुला शास्त्र प्रमाण मानिलें पाहिजे; व शास्त्रांत काय सांगितलें आहे तें समजून घेऊन त्याप्रमाणें या लोकीं कर्म करणें तुला योग्य होय.

## सप्तदशोऽध्यायः।

अर्जुन उवाच।

ये शास्त्रविधिमुत्सृज्य यजन्ते श्रद्धयान्विताः।

[या श्लोकांतील 'कार्याकार्यव्यवस्थिति, या पदावरून कर्तव्य-शास्त्राशीं म्ह० नीतिशास्त्राची कल्पना डोळ्यापुढें ठेवून गीता उपदेशिली आहे हें स्पष्ट होतें. यासच कर्मयोगशास्त्र असें म्हणतात, हें गीता-रहस्यांत (पृ. ४९-५१) स्पष्ट करून दाखविलें आहे.]

याप्रमाणें श्रीभगवंतांनीं गाइलेल्या म्हणजे सांगितलेल्या उपनिषदांत ब्रह्मविद्यान्तर्गत योग-म्हणजे कर्मयोग-शास्त्रावरील श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या संवादांतील दैवासुरसंपद्विभागयोग नांवाचा सोळावा अध्याय समाप्त झाला.

---

## अध्याय सतरावा.

[कर्मयोगशास्त्राप्रमाणें जगाचें धारणपोषण करणारे पुरुष कोणत्या प्रकारचे आणि त्याच्या उलट जगाचा नाश करणारे पुरुष कोण, याचें याप्रमाणें वर्णन झाल्यावर, मनुष्यामनुष्यांमध्यें असे भेद कां होतात असा प्रश्न सहज उत्पन्न होतो या प्रश्नाचें सामान्य उत्तर "प्रकृत्या नियताः स्वया"-ज्याचा त्याचा प्रकृतिस्वभाव-असें सातव्याच अध्यायांत आलें आहे (७. २०). परंतु सत्त्व रज व तम या गुणांचें विवेचन तेव्हां केलें नसल्यामुळें या प्रकृतिजन्य भेदाची सविस्तर उपपत्ति तेथें सांगतां आली नाहीं. म्हणून चवदाव्या अध्यायांत त्रिगुणाचें विवेचन करून आतां त्याचमुळें श्रद्धादिकांचेंहि स्वभाव वैचित्र्य कसें उत्पन्न होतें तें सांगून ज्ञानविज्ञानाचें एकंदर निरूपण या अध्यायांत पुरें केलें आहे. तसेंच नवव्या अध्यायांतील भक्तिमार्गाचे सुद्धां अनेक भेद कां होतात, याचें कारणहि या अध्यायांतील उपपत्तीनें समजून येतें (९.२३,२४ पहा). अर्जुन प्रथमतः असें विचारितो कीं—]

तेषां निष्ठा तु का कृष्ण सत्त्वमाहो रजस्तमः ॥ १ ॥

श्रीभगवानुवाच ।

त्रिविधा भवति श्रद्धा देहिनां सा स्वभावजा ।
सात्त्विकी राजसी चैव तामसी चेति तां शृणु ॥ २ ॥
सत्त्वानुरूपा सर्वस्य श्रद्धा भवति भारत ।
श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यच्छ्रद्धः स एव सः ॥ ३ ॥

अर्जुन म्हणाला—(१) हे कृष्णा ! श्रद्धेनें युक्त असूनहि शास्त्रांतील विधि सोडून जे यजन करितात, त्यांची निष्ठा म्हणजे ( मनाची ) स्थिति कोणती बरें समजावयाची ? सात्त्विक, कीं राजस, कीं तामस ?

[ गेल्या अध्यायाचे अखेर शास्त्रांतील विधि किंवा नियम पाळले पाहिजेत असें जें सांगितलें त्यावर अर्जुनाची ही शंका आहे. शास्त्रावर श्रद्धा असूनहि मनुष्य अज्ञानानें चुकतो. उदाहरणार्थ, सर्वव्यापी परमेश्वराचें भजनपूजन करावें हा शास्त्रविधि सोडून देवतांच्याच नादीं लागतो ( गी. ९.२३ ). तरी अशा पुरुषाची निष्ठा म्हणजे अवस्था अगर स्थिति कोणती असा अर्जुनाचा प्रश्न आहे. शास्त्राचा व धर्माचा अश्रद्धेनें तिरस्कार करणाऱ्या म्ह० आसुरी लोकांबद्दल हा प्रश्न नव्हे. तथापि प्रसंगानुसार त्यांच्या कर्मांची फलेंहि या अध्यायांत वर्णिलीं आहेत. ]

श्रीभगवान् म्हणाले—(२) प्राणिमात्राची ही श्रद्धा स्वभावतः तीन प्रकारची असते; सात्त्विक व राजस आणि तामस. ( कशी ) ती ऐक. (३) सर्व लोकांची श्रद्धा हे भारता ! त्यांच्या त्यांच्या सत्त्वाप्रमाणें म्हणजे प्रकृति-स्वभावाप्रमाणें होत असते. मनुष्य हा श्रद्धामय आहे. ज्याची ज्या ठिकाणीं श्रद्धा ( असते ), त्याप्रमाणें तो ( बनत असतो ).

यजन्ते सात्त्विका देवान्यक्षरक्षांसि राजसाः ।
प्रेतान्भूतगणांश्चान्ये यजन्ते तामसा जनाः ॥ ४ ॥

[दुसऱ्या श्लोकांत 'सत्त्व शब्दाचा अर्थ देहस्वभाव, बुद्धि किंवा अंतःकरण असा आहे. कठोपनिषदांत 'सत्त्व' शब्दाचा हा अर्थ आला असून (कठ. ६.७), वेदान्तसूत्राच्या शांकरभाष्यांतहि 'क्षेत्रक्षेत्रज्ञ' या पदाऐवजीं 'सत्वक्षेत्रज्ञ' हें पद आलेलें आहे (वे. सू. शां. भा. १.२.१२). सारांश, दुसऱ्या श्लोकांतील 'स्वभाव' आणि तिसऱ्या श्लोकांतील 'सत्व' हे दोन्ही शब्द या ठिकाणीं समानार्थक आहेत. कारण, स्वभाव म्हणजे प्रकृति व प्रकृतीपासूनच पुढें बुद्धि व अंतःकरण होतें हा सिद्धान्त सांख्य व वेदान्त या दोहोंसहि मान्य आहे. "ज्याची जशी श्रद्धा तसा तो होतो" हें तत्व "देवांची भक्ति करणारे देवांस" इत्यादी जे सिद्धान्त पूर्वीं आलेले आहेत त्यांचाच सामान्यानुवाद आहे (गी. ७.२०.२३; ९.२५) व त्याचें विवेचन आम्हीं गीतारहस्याच्या तेराव्या प्रकरणांत केलें आहे (गीता. पृ. ४२०–४२६ पहा) ज्याची जशी बुद्धि तसें त्याला फल, आणि ही बुद्धि होणें किंवा न होणें हें प्रकृतिस्वभावावर अवलंबून असतें, असें म्हटल्यावर त्यांत सुधारणा कशी व्हावी असाहि प्रश्न उद्भवतो. आत्मा स्वतंत्र असल्यामुळें हा देह-स्वभाव अभ्यासानें आणि वैराग्यानें हळूहळू पालटतां येतो हें त्याचें उत्तर होय, व त्याचें विवेचन गीतारहस्याच्या दहाव्या प्रकरणांत (पृ. २७४–२७९) केलें आहे तें पहा. सध्यां श्रद्धाभेद कां व कसे कसे होतात एवढेंच पहाणें आहे. म्हणून प्रकृतिस्वभावाप्रमाणें श्रद्धा बदलत्ये असें सांगितल्यावर आतां प्रकृतिहि ज्या अर्थी सत्त्व, रज व तम या तीन गुणांनीं युक्त आहे, त्या अर्थीं श्रद्धेचेहि मनुष्यामनुष्यांत कोणत्या प्रकारचे त्रिधा भेद होतात, व त्याचे परिणाम काय घडतात, तें सांगतात—]

(४) सात्त्विक म्हणजे सत्त्वगुणप्रधान स्वभावाचे जे पुरुष ते देवांचें

§§ अशास्त्रविहितं घोरं तप्यन्ते ये तपो जनाः।
दंभाहंकारसंयुक्ताः कामरागबलान्विताः ॥ ५ ॥
कर्षयन्तः शरीरस्थं भूतग्राममचेतसः ।
मां चैवांतःशरीरस्थं तान्विद्ध्यासुरनिश्चयान् ॥ ६ ॥

यजन करितात; राजस यक्षराक्षसांचें, आणि याशिवाय बाकीचे तामस प्रेतें व भूतगण यांचें यजन करितात.

[ शास्त्रावर श्रद्धा असणाऱ्या मनुष्यांचेहि सत्वादि प्रकृतिगुणभेदानें जे तीन भेद होतात ते आणि त्यांचें स्वरूपहि सांगितलें. आतां शास्त्रावर श्रद्धा नसल्यामुळें कामपरायण व दांभिक लोकांचा वर्ग कोणता तें सांगतात. हे लोक सात्विक नव्हेत हें उघड आहे. पण त्यांस नुस्तें तामस असेंहि म्हणतां येत नाहीं; कारण त्यांचीं कर्मे शास्त्राविरुद्ध असलीं तरी तीं करण्याकडे त्यांची प्रवृत्ति असत्ये व प्रवृत्ति रजोगुणाचा धर्म आहे. सारांश अशा लोकांस सात्विक, राजस किंवा तामस हीं विशेशणें एकएकटीं लागू पडत नाहींत. म्हणून दैवी व आसुरी असे निराळे दोन वर्ग करून त्यांपैकीं या दुष्ट लोकांचा आसुरी वर्गांत समावेश करितात; आणि तोच अर्थ पुढील दोन श्लोकांत वर्णिला आहे. ]

(५) परंतु जे लोक दंभ व अहंकार यांनीं युक्त होत्साते, काम आणि आसक्ति यांच्या जोरावर, शास्त्राविरुद्ध घोर तप करितात, (६) आणि शरीरांतील पंचमहाभूतादिकांच्या समुदायासच नव्हे तर शरीरान्तर्गत असणाऱ्या मलाहि कष्टवितात ते अविवेकी आसुर बुद्धीचे असें समज.

[ अर्जुनाच्या प्रश्नाचीं उत्तरें झालीं. मनुष्याची श्रद्धा ज्याच्या त्याच्या प्रकृतिस्वभावामुळें सात्विक, राजस किंवा तामस असूं शकेल; आणि त्याप्रमाणें त्याच्या कर्मांत भेद पडून त्याच्या कर्मानुरूप त्याला निरनिराळी गति मिळेल. तथापि एवढ्यानेंच कोणी आसुरी वर्गां-

§§ आहारस्त्वपि सर्वस्य त्रिविधो भवति प्रियः ।
यज्ञस्तपस्तथा दानं तेषां भेदमिमं शृणु ॥ ७ ॥
आयुःसत्त्वबलारोग्यसुखप्रीतिविवर्धनाः ।
रस्याः स्निग्धाः स्थिरा हृद्या आहाराः सात्त्विकप्रियाः ॥ ८ ॥
कट्वम्ललवणात्युष्णतीक्ष्णरूक्षविदाहिनः ।
आहारा राजसस्येष्टा दुःखशोकामयप्रदाः ॥ ९ ॥

पडतो असें नाहीं. आत्मस्वातंत्र्याचा उपयोग करून व शास्त्राप्रमाणें वागून प्रकृतिस्वभाव हळहळू सुधारणें हें प्रत्येकाचें काम आहे. हें न करितां दुष्ट प्रकृतिस्वभावाचाच अभिमान धरून शास्त्रविरुद्ध जे आचरण करितात ते आसुरी बुद्धीचे म्हणावयाचे असा या श्लोकांचा भावार्थ आहे. आतां श्रद्धेप्रमाणेंच आहार, यज्ञ, तप व दान यांचे सत्त्व, रज व तम या प्रकृतिगुणांमुळें निरनिराळे भेद कसे होतात व त्यामुळें स्वभाववैचित्र्याबरोबरच क्रियावैचित्र्यहि कसें उत्पन्न होतें याचें वर्णन करितात—]

(७) आतां प्रत्येकाला आवडणाऱ्या आहाराचेहि तीन प्रकार होतात. आणि तेच प्रकार यज्ञ, तप व ज्ञान यांचा होय. त्यांचा हा भेद सांगतों ऐक. (८) सात्त्विक पुरुषास आवडणारे आहार आयुष्य, सात्त्विक वृत्ति, बल, आरोग्य, सुख आणि प्रीति हीं वाढविणारे, रसयुक्त, स्निग्ध, शरीरांत मुरून चिरकाल रहाणारे आणि मनाला आनंददायक असतात. (९) राजस पुरुषाला प्रिय होणारे आहार कटु म्हणजे तिखट, आंबट, खारट, अति उष्ण, झणझणीत, रुक्ष, दाहकारक आणि दुःख, शोक व रोग उत्पन्न करणारे असतात.

[संस्कृतांत कटु म्हणजे तिखट आणि तिक्त म्हणजे कडू असा अर्थ असून, त्याप्रमाणें संस्कृत वैद्यक ग्रंथांत मिरें कटु व निंब तिक्त असें

यातयामं गतरसं पूति पर्युषितं च यत्।
उच्छिष्टमपि चामेध्यं भोजनं तामसप्रियम्॥ १०॥
§§ अफलाकांक्षिभिर्यज्ञो विधिदृष्टो य इज्यते।
यष्टव्यमेवेति मनः समाधाय स सात्त्विकः॥ ११॥

वर्णन असतें (वाग्भट. सूत्र. अ. १० पहा). कटु व तिक्त यांचेच अनुक्रमें कडू व तिखट हे अपभ्रंश आहेत, पण मराठींत त्यांच्या अर्थांची अदलाबदल झालेली आहे. 'अपरोक्ष' या शब्दाचेहि मराठी व संस्कृत अर्थ असेच भिन्न होतात. ही गोष्ट शब्दव्युत्पत्तिशास्त्रदृष्ट्या महत्त्वाची आहे.]

(१०) तामस पुरुषास आवडणारें अन्न वेळ होऊन गेलेलें म्हणजे निवालेलें, नीरस, दुर्गंधी, (एक दिवसाचें) शिळें झालेलें, उष्टें आणि तसेंच अपवित्र असतें.

[सात्त्विक मनुष्यास सात्त्विक, व राजस मनुष्यास राजस, अगर तामस मनुष्यास तामस अन्न आवडतें, इतकेंच नव्हे तर उलटपक्षीं आहार शुद्ध म्हणजे सात्त्विक ठेविल्यानें मनुष्याची वृत्तिहि हळूहळू शुद्ध किंवा सात्विक होऊं शकते—आहारशुद्धौ सत्त्वशुद्धिः–असें उपनिषदांत म्हटलें आहे. (छां. ७. २६. २). कारण, मन, बुद्धि हे प्रकृतीचे विकार असल्यामुळें खाणें सात्त्विक असल्यास त्याप्रमाणें बुद्धिहि आपोआपच सात्त्विक बनते. आहाराचे हे भेद झाले. आतां याचप्रमाणें यज्ञाचेहि तीन भेद कसे होतात. तें सांगतात.]

(११) फलाशेची आकांक्षा न ठेवितां यज्ञ करणें हें आपलें कर्तव्य समजून शास्त्रविधीप्रमाणें शान्त चित्तानें जो यज्ञ करितात तो सात्त्विक

अभिसंधाय तु फलं दंभार्थमपि चैव यत् ।
इज्यते भरतश्रेष्ठ तं यज्ञं विद्धि राजसम् ॥ १२ ॥
विधिहीनमसृष्टान्नं मंत्रहीनमदक्षिणम् ।
श्रद्धाविरहितं यज्ञं तामसं परिचक्षते ॥ १३ ॥
§§ देवद्विजगुरुप्राज्ञपूजनं शौचमार्जवम् ।
ब्रह्मचर्यमहिंसा च शारीरं तप उच्यते ॥ १४ ॥
अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रियहितं च यत् ।
स्वाध्यायाभ्यसनं चैव वाङ्मयं तप उच्यते ॥ १५ ॥

होय. (१२) पण फलाची इच्छा ठेवून किंवा दंभार्थ म्हणजे ऐश्वर्यप्रदर्शनार्थहि जो यज्ञ करितात तो यज्ञ हे भरतश्रेष्ठा ! राजस असें समज. (१३) शास्त्रविधि सोडून अन्नसंतर्पणाशिवाय, मंत्रांवांचून, दक्षिणा न देतां आणि श्रद्धा नसतां (केलेला) जो यज्ञ त्याला तामस म्हणतात.

[ आहार व यज्ञ यांप्रमाणें तपाचेहि तीन प्रकार आहेत. पण आधीं कायिक, वाचिक व मानसिक असे तपाचे तीन भेद करून नंतर या तिघांच्याहि प्रत्येकीं सत्व, रज व तम या गुणांनीं होणाऱ्या त्रैविध्याचें वर्णन केलें आहे. तप म्हणजे अरण्यांत जाऊन पातंजल योगानें शरीर कष्टविणें असा संकुचित अर्थ या ठिकाणीं विवक्षित नसून यज्ञयागादिक कर्में, वेदाध्ययन किंवा चातुर्वण्याप्रमाणें ज्याचें जें कर्तव्य–उदाहरणार्थ क्षत्रियास युद्ध, वैश्यास व्यापार इ०–तें सर्व त्याचें तपच होय असा जो 'तप' शब्दाचा व्यापक अर्थ मनूनें दिला आहे (मनु. ११.२३६) तोच गीतेच्या खालील श्लोकांत अभिप्रेत आहे. ]

(१४) देव, ब्राह्मण, गुरु व विद्वान्, यांचें पूजन, शुचिर्भूतपणा, सरळपणा, ब्रह्मचर्य व अहिंसा यांस शारीर म्हणजे कायिक तप म्हणतात. (१५) (मनाला) उद्वेग न देणारें, सत्य, प्रिय व हितकारक, असें जें भाषण

मनःप्रसादः सौम्यत्वं मौनमात्मविनिग्रहः ।
भावसंशुद्धिरित्येतत्तपो मानसमुच्यते ॥ १६ ॥
§§ श्रद्धया परया तप्तं तपस्तत्त्रिविधं नरैः ।
अफलाकांक्षिभिर्युक्तैः सात्विकं परिचक्षते ॥ १७ ॥
सत्कारमानपूजार्थं तपो दंभेन चैव यत् ।
क्रियते तदिह प्रोक्तं राजसं चलमध्रुवम् ॥ १८ ॥
मूढग्राहेणात्मनो यत्पीडया क्रियते तपः ।
परस्योत्सादनार्थं वा तत्तामसमुदाहृतम् ॥ १९ ॥
§§ दातव्यमिति यद्दानं दीयतेऽनुपकारिणे ।

तें, आणि स्वाध्यायाचा म्हणजे स्वकर्मांचा अभ्यास, यांस वाङ्मय (वाचिक) तप म्हणतात. (१६) मन प्रसन्न ठेवणें, सौम्यता, मौन म्ह० मुनीप्रमाणें वृत्ति असणें, मनोनिग्रह आणि शुद्ध भावना यांस मानस तप म्हणतात.

[ पंधराव्या श्लोकांतील सत्य, प्रिय, व हित हे शब्द "सत्यं ब्रूयात् प्रियं ब्रूयान्न ब्रूयात्सत्यमप्रियम् । प्रियं च नानृतं ब्रूयादेषधर्मः सनातनः (मनु. ४.१३८)—खरें बोलावें, गोड बोलावें, खरें व अप्रिय बोलूं नये, हा सनातन धर्म होय–असें जें मनूचें वचन आहे त्याला अनुलक्षून आहेत असें दिसतें. तथापि "अप्रियस्य च पथ्यस्य वक्ता श्रोता हि दुर्लभः" असें महाभारतांतच विदुरानें दुर्योधनास सांगितलें आहे (सभा. ६३.१७ पहा). कायिक, वाचिक, मानसिक या तिन्ही प्रकारच्या तपाचे पुनः जे भेद होतात ते असे—]

(१७) हें तीनहि प्रकारचें तप फलाची आकांक्षा न ठेवितां उत्कृष्ट श्रद्धेनें व योगयुक्त बुद्धीनें मनुष्यांनीं केलें म्हणजे त्यास सात्विक म्हणतात. (१८) आणि आपला सत्कार, मान किंवा पूजा व्हावी म्हणून अथवा दंभानें जें तप करितात तेव्हां त्या चल व अस्थिर तपास येथें म्ह० शास्त्रांत राजस म्हटलें आहे. (१९) वेड्या आग्रहानें आपल्याला पीडा करणारें; किंवा

देशे काले च पात्रे च तद्दानं सात्त्विकं स्मृतम् ॥ २० ॥
यत्तु प्रत्युपकारार्थं फलमुद्दिश्य वा पुनः ।
दीयते च परिक्लिष्टं तद्दानं राजसं स्मृतम् ॥ २१ ॥
अदेशकाले यद्दानमपात्रेभ्यश्च दीयते ।
असत्कृतमवज्ञातं तत्तामसमुदाहृतम् ॥ २२ ॥

( जारणमारणादि कर्मांनीं ) लोकांना नाडवण्यासाठीं जें तप करितात त्याला तामस म्हणतात.

[ तपाचे भेद झाले; आतां दानाचे त्रिविध भेद सांगतात—]

(२०) दान करणें आपलें कर्तव्य आहे अशा बुद्धीनें, ( योग्य ) स्थल, काल व पात्र ( यांचा विचार ) पाहून आपल्यावर उपकार न करणाऱ्यास जें दान देतात तें सात्त्विक म्हटलें आहे. (२१) परंतु ( केलेल्या ) उपकाराचा मोबदला म्हणून, किंवा पुढें कांहीं फलाची आशा ठेवून संकटानें जें दान देतात तें राजस म्हटलें आहे. (२२) अयोग्य स्थलीं, अकालीं किंवा अपात्रीं सत्काररहित अगर अवहेलनापूर्वक जें दान देतात तें तामस म्हणतात.

[ आहार, यज्ञ, तप व दान यांप्रमाणें ज्ञान, कर्म, कर्ता, बुद्धि धृति व सुख यांच्या त्रैविध्याचें वर्णन पुढील अध्यायांत केलें आहे ( गी.१८. २०–३९ ) या अध्यायांतील गुणभेदप्रकरण येथें संपलें. आतां ब्रह्मनिर्देश घेऊन वर सांगितलेलें सात्त्विक कर्माचें श्रेष्ठत्व व संग्राह्यत्व सिद्ध करितात. कारण, वरील एकंदर विवेचनावर सामान्यतःच अशी शंका येण्याचा संभव आहे कीं, कर्म सात्त्विक असो, राजस असो किंवा तामस असो, कोणतेंहि कर्म घेतलें तरी तें दोषमय व दुःखकारक असल्यामुळें हीं सर्व कर्में सोडिल्याखेरीज ब्रह्मप्राप्ति होणें शक्य नाहीं; आणि हें जर खरें तर, अमुक कर्म सात्त्विक आणि अमुक राजस हा भेद

§§ ॐ तत्सदिति निर्देशो ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः ।
ब्राह्मणास्तेन वेदाश्च यज्ञाश्च विहिताः पुरा ॥ २३ ॥

करण्यांत तरी काय हंशील ? गीतेचें या आक्षेपास असें उत्तर आहे कीं, सात्त्विक, राजस, तामस हे कर्मांचे भेद परब्रह्माला सोडून आहेत असें नाहीं. ब्रह्म म्हणजे काय हें ज्या संकल्पांत सांगितलें आहे त्यांतच सात्त्विक कर्में व सत्कर्में यांचा समावेश होतो, व त्यामुळें हीं कर्में अध्यात्मदृष्ट्याहि त्याज्य नव्हेत, असें निर्विवाद सिद्ध होतें ( गीतार. पृ. २४३ पहा ). परब्रह्माच्या स्वरूपाबद्दल मनुष्याला जें काय ज्ञान प्राप्त झालें आहे तें सर्व " ॐ तत् सत् " या तीन शब्दांच्या निर्देशांत ग्रथित झालें आहे. पैकीं ॐ हें अक्षरब्रह्म असून त्याचा उपनिषदांतून निरनिराळ्या प्रकारें अर्थ केलेला आहे (प्रश्न. ५; कठ. २.१५-१७; तै. १.८; छां. १.१; मैत्र्यु. ६.३,४; मांडूक्य. १-१२ ). आणि हें वर्णाक्षररूपी ब्रह्म व ज्या अर्थी जगाच्या आरंभीं होतें त्या अर्थी सर्व क्रियांना तेथून प्रारंभ होतो. 'तत्=तें' म्ह० सामान्य कर्मांहून पलीकडचें अर्थात् निष्काम बुद्धीनें फलाशा सोडून केलेलें सात्त्विक कर्म, आणि 'सत्' म्हणजे फलाची आशा असली तरी शास्त्राप्रमाणें केलेलें शुद्ध कर्म, असा या संकल्पाचा अर्थ होतो. आणि या अर्थाप्रमाणें निष्काम बुद्धीनें केलेल्या सात्त्विक कर्मांचाच नव्हे तर शास्त्राप्रमाणें केलेल्या सत्कर्मांचाहि परब्रह्माच्या सामान्य व सर्वमान्य संकल्पांत समावेश होतो. म्हणून हीं कर्में त्याज्य होत हें म्हणणें गैर ठरतें. 'तत्' आणि 'सत्' या दोन कर्मांखेरीज 'असत्' म्हणजे वाईट कर्म शिल्लक राहिलें. पण तें उभय लोकींहि गर्ह्य असल्यामुळें त्याचा संकल्पांत समावेश होत नाहीं, असें शेवटच्या श्लोकांत दर्शविलें आहे. भगवान् म्हणतात--]

(२३) परब्रह्माचा 'ॐतत्सत्' असा तीन प्रकारें ( शास्त्रांत ) निर्देश केला जातो. या ( -च ) निर्देशानें पूर्वी ब्राह्मण वेद व यज्ञ निर्माण केलेले आहेत.

§§ तस्मादोमित्युदाहृत्य यज्ञदानतपःक्रियाः ।
प्रवर्तन्ते विधानोक्ताः सततं ब्रह्मवादिनाम् ॥ २४ ॥
तदित्यनभिसंधाय फलं यज्ञतपःक्रियाः ।
दानक्रियाश्च विविधाः क्रियन्ते मोक्षकांक्षिभिः ॥ २५ ॥
सद्भावे साधुभावे च सदित्येतत्प्रयुज्यते ।
प्रशस्ते कर्मणि तथा सच्छब्दः पार्थ युज्यते ॥ २६ ॥
यज्ञे तपसि दाने च स्थितिः सदिति चोच्यते ।
कर्म चैव तदर्थीयं सदित्येवाभिधीयते ॥ २७ ॥

[ सर्व सृष्टीच्या आरंभीं ब्रह्मदेवरूपी पहिला ब्राह्मण, देव आणि यज्ञ हे उत्पन्न झालेले आहेत असें पूर्वीच ( गी. ३.१० ) सांगितलें आहे. पण हें सर्व ज्या परब्रह्मापासून निर्माण झालें, त्या परब्रह्माचें स्वरूप "ॐतत्सत्" या तीन शब्दांत आहे. म्हणून "ॐतत्सत्" हा संकल्प सर्व सृष्टीचें मूळ होय, असा या श्लोकाचा भावार्थ आहे. आतां या संकल्पांतील तीन पदांचें कर्मयोगदृष्ट्या पृथक् निरूपण करितात—]

(२४) तस्मात् म्हणजे जगाला या संकल्पानें आरंभ झाला आहे म्हणून, ब्रह्मवादी लोकांचीं यज्ञ, दान, तप, आणि इतर शास्त्रोक्त कर्मे नेहमीं 'ॐ' असा उच्चार करून प्रवृत्त होत असतात. (२५) 'तत्' या शब्दानें फलाची आशा न ठेवितां यज्ञ, तप दान वगैरे अनेक प्रकारच्या क्रिया मोक्षार्थी लोक करीत असतात. (२६) अस्तित्व आणि साधुत्व ह्मणजे चांगलेपणा या अर्थी 'सत्' हा शब्द योजिला जातो; आणि हे पार्था ! तसेंच प्रशस्त ह्मणजे चांगल्या कर्मासहि 'सत्' हा शब्द लावण्यांत येतो. (२७) यज्ञ, तप आणि दान यांच्या ठिकाणीं स्थिति ह्म० स्थिर भावना असणें यालाहि 'सत्' असें ह्मणतात; व यांच्यासाठीं जें कर्म करावयाचें त्या कर्मालाहि 'सत्' हेंच नांव आहे.

§§ अश्रद्धया हुतं दत्तं तपस्तप्तं कृतं च यत् ।
असदित्युच्यते पार्थ न च तत्प्रेत्य नो इह ॥ २८ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुन-
संवादे श्रद्धात्रयविभागयोगो नाम सप्तदशोऽध्यायः ॥ १७ ॥

---

[यज्ञ, तप, व दान हीं प्रमुख धार्मिक कृत्यें होत; व यासाठीं जें कर्म करावयाचें त्यालाच मीमांसकांनीं यज्ञार्थ कर्म असें सामान्य नांव दिलें आहे. हें कर्म करितांना फलाशा असली तरी ती धर्माला अनुकूल असल्यामुळें हीं कर्में 'सत्' या वर्गांत पडून सर्व निष्काम कर्म "तत्=तें ह्मणजे पलीकडलें" या वर्गांत येतें. याप्रमाणें प्रत्येक कर्मारंभीं "ॐतत्सत्" असा जो ब्रह्मसंकल्प ह्मणतात, त्यांत या दोन्हीं कर्मांचा समावेश होत असल्यामुळें हीं दोन्हीं कर्में ब्रह्मानुकूलच ह्मटलीं पाहिजेत. गीतारहस्य पृ. २४३ पहा. बाकी राहिलें 'असत्' त्याची वाट काय हें आतां सांगतात–]

(२८) अश्रद्धेनें जें हवन केलें, जें (दान) दिलें, जें तप आचरिलें, आणि जें कांहीं (कर्म) केलें, तें 'असत्' ह्मटलें आहे. हे पार्था! तें (कर्म) मेल्यावर (परलोकीं) नाहीं, आणि या लोकींहि (लाभत) नाहीं.

[तात्पर्य, ब्रह्मस्वरूपाचा बोधक जो सर्वमान्य संकल्प त्यांतच निष्काम बुद्धीनें, किंवा केवळ कर्तव्य ह्मणून, केलेल्या सात्विक कर्मांचा आणि शास्त्राप्रमाणें सद्बुद्धीनें, केलेल्या प्रशस्त कर्मांचा किंवा सत्कर्मांचा समावेश होतो. बाकीचीं कर्में फुकट होत. ब्रह्मनिर्देशांतच ज्या कर्मांचा समावेश होतो. आणि ब्रह्मदेवाबरोबरच जें कर्म उत्पन्न झालें (गी. ३. १०), व जें कोणालाहि सुटलें नाहीं, तें सोडून द्या असें ह्मणणें योग्य नव्हे हें यावरून सिद्ध होतें 'ॐतत्सत्' या ब्रह्मनिर्देशाचा वरील कर्मयोगपर अर्थ याच अध्यायांत कर्मविभागाला जोडून सांगण्याचा

# अष्टादशोऽध्यायः ।

अर्जुन उवाच ।

संन्यासस्य महाबाहो तत्त्वमिच्छामि वेदितुम् ।

हेतुहि तोच आहे. कारण नुसत्या ब्रह्मस्वरूपाचें वर्णन मागें तेराव्या अध्यायांत व त्यापूर्वीहि आलेलें आहे. 'ॐतत्सत्' याचा मूळचा अर्थ काय असावा हें गीतारहस्याच्या नवव्या प्रकरणाच्या अखेर (पु.२४३) सांगितलें आहे. 'सच्चिदानंद' हा ब्रह्मनिर्देश हल्लीं प्रचारांत आहे. प... तो न घेतां 'ॐतत्सत्' हा ब्रह्मनिर्देशच ज्या अर्थी येथें घेतला आहे त्या अर्थी 'सच्चिदानंद' हा ब्रह्मनिर्देशच सामान्य ब्रह्मनिर्देश या रूपानें, प्रायः गीतेनंतर प्रचारांत आला असावा असें यावरून एक अनुमान निघण्याचा संभव आहे.]

याप्रमाणें श्रीभगवंतांनीं गाइलेल्या ह्मणजे सांगितलेल्या उपनिषदांत ब्रह्मविद्यान्तर्गत योग–ह्मणजे कर्मयोग–शास्त्रावरील श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या संवादांतील श्रद्धात्रयविभाग नांवाचा सतरावा अध्याय समाप्त झाला.

---

## अध्याय अठरावा.

[अठरावा अध्याय हा सर्व गीताशास्त्राचा उपसंहार होय. ह्मणून आतांपर्यंत काय काय सांगितलें याचें या ठिकाणीं थोडक्यांत सिंहावलोकन करूं (जास्त माहितीसाठीं गीतार. प्र. १४ पहा). स्वधर्माप्रमाणें* प्राप्त झालेलें युद्ध सोडून देऊन भीक मागण्यास तयार झालेल्या अर्जुनास आपलें कर्तव्य करावयास प्रवृत्त करण्यासाठीं गीता उपदेशिली आहे, हें पहिल्या अध्यायावरून स्पष्ट आहे. गुरुहत्यादि दोषयुक्त कर्म केल्यानें आत्म्याचें कल्याण होणार नाहीं, अशी अर्जुनाची शंका होती. म्हणून आत्म-

त्यागस्य च हृषीकेश पृथक्केशिनिषूदन ॥ १ ॥

ज्ञानी पुरुषांनीं स्वीकारिलेले दोन प्रकारचे आयुष्यक्रमणाचे मार्ग दुसऱ्या अध्यायाच्या आरंभींच सांगितले, एक सांख्य ( सन्यास ) व दुसरा कर्मयोग ( योग ); आणि हे दोन्ही मार्ग जरी मोक्षप्रद असले तरी त्यांतले त्यांत कर्मयोगच अधिक श्रेयस्कर असा अखेर सिद्धान्त केला ( गी. ५.२ ). पैकीं कर्मयोगांत बुद्धि श्रेष्ठ समजतात; बुद्धि स्थिर व सम असली म्हणजे कर्मांची बाधा लागत नाहीं; कर्म कोणाला सुटलें नाहीं व कोणीं सोडूंहि नये; फक्त फलाशा सोडिली म्हणजे झालें; स्वतःकरितां नको तरी लोकसंग्रहार्थ कर्म करणें जरूर आहे; बुद्धि चांगली असली म्हणजे ज्ञानाचा व कर्माचा विरोध येत नाहीं; आणि पूर्वीची वहिवाट पहातां जनकादि याप्रमाणेंच वागले; इत्यादि युक्तिवाद तिसऱ्यापासून पांचव्या अध्यायापर्यंत आहे. कर्मयोगसिद्ध्यर्थ लागणारी बुद्धीची ही समता कशी प्राप्त करावी, आणि हा कर्मयोग चालवीत असतां त्यानेंच अखेर मोक्ष कसा मिळतो, हा यापुढला विषय होय. ही समता प्राप्त होण्यास इंद्रियनिग्रह करून एकच परमेश्वर सर्वांभूतीं भरला आहे हें पुरें जाणिलें पाहिजे, दुसरा मार्ग नाहीं. पैकीं इंद्रियनिग्रहाचें वर्णन सहाव्या अध्यायांत करून सातव्या अध्यायापासून सतराव्या अध्यायापर्यंत कर्मयोग आचरीत असतांच परमेश्वराचें ज्ञान कसें होतें, व तें ज्ञान कोणतें, हें सांगितलें आहे. पैकीं सातव्यांत व आठव्यांत क्षराक्षराचें किंवा व्यक्ताव्यक्तांचें ज्ञानविज्ञान सांगून, परमेश्वराच्या व्यक्त रूपापेक्षां अव्यक्त जरी श्रेष्ठ आहे, तरी परमेश्वर एक आहे ही बुद्धी ढळूं न देतां व्यक्ताचीच उपासना करणें प्रत्यक्षावगम्य अतएव सर्वांस सुलभ हा अर्थ नवव्या अध्यायापासुन बाराव्या अध्यायापर्यंत वर्णिला आहे. नंतर क्षराक्षरविचारांत ज्याला अव्यक्त म्हणतात तोच मनुष्याच्या शरीरांतील आत्मा होय असा क्षेत्रक्षेत्रज्ञ विचार तेराव्या अध्यायांत सांगितला; व पुढें एकाच अव्यक्तापासुन प्रकृतीच्या गुणांमुळें जगांतील विविध स्वभा-

श्रीभगवानुवाच ।

काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः ।

वाचीं मनुष्यें अगर दुसरा नानाविध पसारा कसा होतो या क्षराक्षरविज्ञानान्तर्गत विषयाचा चवदाव्यापासून सतराव्यापर्यंत चार अध्यायांत सविस्तर विचार करून ज्ञानविज्ञाननिरूपण पुरें केलें आहे. तथापि ठिकठिकाणीं तूं कर्म कर, असाच अर्जुनास उपदेश असून, परमेश्वराची भक्ति करून शुद्धान्तःकरणानें ' परमेश्वरार्पणपूर्वक स्वधर्माप्रमाणें केवळ कर्तव्य म्हणून आमरणान्त सर्व कर्में करीत रहाणें ' हा कर्मयोगपर आयुष्यक्रमणाचा मार्गच सर्वांत उत्तम असा सिद्धान्त केला आहे. ज्ञानमूलक व भक्तिप्रधान कर्मयोगाचें याप्रमाणें सांगोपांग विवेचन झाल्यावर, त्याच धर्माचा अठराव्या अध्यायांत उपसंहार करून अर्जुनाला स्वेच्छेनें युद्ध करण्यास प्रवृत्त केलें आहे. गीतेंत सर्वोत्तम म्हणून प्रतिपादन केलेल्या या मार्गांत ' तूं चतुर्थाश्रम धारण करून संन्यासी हो,' असें अर्जुनाला सांगितलें नाहीं. तथापि या मार्गानें वागणारा मनुष्य ' नित्यसंन्यासी ' (गी. ५. ३) असतो, असें म्हटलें आहे. म्हणून चतुर्थाश्रमरूपी संन्यास घेऊन सर्व कर्मांचा केव्हां तरी खरोखरच त्याग करण्याचें तत्त्व या कर्मयोगमार्गांत आहे कीं नाहीं, नसल्यास ' संन्यास व ' व त्याग ' या दोन शब्दांचें काय असा अर्जुनाचा आतां प्रश्न आहे. गीतारहस्य पृ. ३४४–३४७ पहा.]

अर्जुन म्हणाला—(१) हे महाबाहो हृषीकेशा ! संन्यासांतील तत्त्व, आणि हे केशिदैत्यनिषूदना ! त्यागांतील तत्त्व मी पृथक् जाणूं इच्छितों.

[' संन्यास ' व 'त्याग' या शब्दांचे केवळ कोशकारांनीं दिलेले अर्थ किंवा त्यांतील भेद विचारण्यासाठीं हा प्रश्न केलेला नाहीं. दोहोंचाहि धात्वर्थ ' सोडणें ' असा असून ही गोष्ट अर्जुनास माहीत नव्हती असें नाहीं. परंतु भगवान् कर्में सोडण्यास कोठेंच सांगत नसून चवथ्या, पांचव्या किंवा सहाव्या अध्यायांत (४. ४१; ५. १३; ६. १) अगर

सर्वकर्मफलत्यागं प्राहुस्त्यागं विचक्षणाः ॥ २ ॥

इतरत्र संन्यासाचें म्हणून जें वर्णन आहे तेथें फक्त फलाशेचा 'त्याग' करून (गी. १२ ११) सर्व कर्मांचा परमेश्वराचे ठायीं 'संन्यास' म्हणजे अर्पण करा असें त्यांनीं सांगितलें आहे (३.३०;१२.६); आणि उपनिषदांत पहावें तर 'न कर्मणा न प्रजया धनेन त्यागेनैके अमृतत्वमानशुः' (कै. १. २; ) नारायण. (१२. ३)—सर्व कर्मांचा स्वरूपतः 'त्याग' करूनच कित्येकांनीं मोक्ष मिळविला,–किंवा "वेदान्तविज्ञानसुनिश्चितार्थाः संन्यासयोगाद्यतयः शुद्धसत्त्वाः" (मुंडक ३.२.६)—कर्मत्यागरूपी 'संन्यास' योगानें शुद्ध झालेले 'यति'–अथवा 'किं प्रजया करिष्यामः' (बृ. ४.४.२२)–आम्हांला पुत्रपौत्रादिक प्रजा काय करावयाची!–अशीं कर्मत्यागपर संन्यासधर्माचीं वचनें आढळून येतात. अर्थात् भगवान् 'त्याग' व 'संन्यास' हे दोन शब्द स्मृतिग्रंथांतून प्रतिपादन केलेल्या चार आश्रमांपैकीं कर्मत्यागरूप संन्यासाश्रमास न लावितां दुसऱ्या कोणत्या तरी अर्थानें त्या शब्दांचा उपयोग करीत आहेत अशी अर्जुनाची समजूत झाल्यानें, त्याचा पूर्ण खुलासा व्हावा म्हणून त्यानें हा प्रश्न विचारिला आहे. गीतारहस्य प्रकरण अकरा (पृ. ३४४–३४७) यांत याचें सविस्तर विवेचन आहे तें पहा.]

श्रीभगवान् म्हणाले—(२) काम्य (म्हणून जेवढीं) कर्मे त्यांचा न्यास म्हणजे सोडणें याला शहाणे लोक संन्यास असें समजतात; (व) सर्व कर्मांच्या फलांचा त्याग करणें याला पंडित त्याग असें म्हणतात.

[कर्मयोगमार्गांत संन्यास व त्याग कशाला म्हणावयाचें तें या श्लोकांत स्पष्ट सांगितलें आहे. पण संन्यासमार्गीय टीकाकारांस हें मत ग्राह्य नसल्यामुळें त्यांनीं या श्लोकाची बरीच ओढाताण केली आहे. श्लोकांत प्रथमच 'काम्य' हा शब्द आला आहे. म्हणून मीमांसकांचे नित्य, नैमित्तिक, काम्य व निषिद्ध, इ. कर्मांचे भेद या ठिकाणीं विव-

§§ त्याज्यं दोषवदित्येके कर्म प्राहुर्मनीषिणः ।

क्षित असून पैकीं काम्य तेवढीं " कर्में सोडावीं असा भगवंतांचा उपदेश आहे असें या टीकाकारांचें ह्मणणें आहे. परंतु संन्यासमार्गांतील लोकांस नित्य आणि नैमित्तिक कर्मांचा समावेश काम्य कर्मांतच येथें केलेला आहे, असें प्रतिपादन करावें लागत आहे. इतकें झालें तरी या श्लोकाच्या दुसऱ्या अर्धांत फलाशा सोडावी, कर्में सोडूं नयेत, असें जें ह्मटलें आहे ( पुढें सहावा श्लोक पहा ) त्याची संगति लागत नसल्यामुळें, अखेर कर्मयोगमार्गाची भगवंतांनीं ही पोकळ स्तुती केली आहे, भगवंतांचा खरा अभिप्राय कर्में सोडावीं असाच आहे, असा आपल्या पदरचाच शेरा मारून या टीकाकारांनीं आपलें समाधान करून घेतलें आहे ! संन्यासादि सांप्रदायिक दृष्टीनें या श्लोकाचा अर्थ नीट लागत नाहीं, हें यावरून उघड होतें. त्याचा खरा अर्थ कर्मयोगपर म्हणजे फलाशा सोडून आमरणान्त सर्व कर्में करण्याचें जें तत्व पूर्वीं गीतेंत अनेक वेळां सांगितलें आहे त्याच्याच अनुरोधानें लाविला पाहिजे; व तो सरळ लागतोहि. 'काम्य' शब्दानें मीमांसकांचा नित्य, नैमित्तिक, काम्य व निषिद्ध, हा कर्मविभाग या ठिकाणीं अभिप्रेत नाहीं, हें प्रथम लक्षांत ठेविलें पाहिजे. कर्मयोगमार्गांत सर्व कर्मांचे 'काम्य' म्हणजे फलाशा धरून केलेलीं, आणि 'निष्काम' म्हणजे फलाशा सोडून केलेलीं, असे दोनच वर्ग करीत असतात; व मनुस्मृतींत त्यांस अनुक्रमें 'प्रवृत्त' कर्म व 'निवृत्त' कर्म अशीं नांवें दिलेलीं आहेत (मनु. १२.८८ व ८९ पहा). कर्में नित्य असोत, नैमित्तिक असोत, काम्य असोत, कायिक असोत, वाचिक असोत, मानसिक असोत, अथवा सात्विकादि भेदानें दुसऱ्या कोणत्याहि प्रकारचीं असोत, तीं सर्व 'काम्य' आणि 'निष्काम,' या दोन वर्गांपैकीं कोणत्या तरी एका कोटींत आलींच पाहिजेत. कारण, काम म्ह० फलाशा असणें किंवा नसणें, या दोहोंव्यतिरिक्त फलाशेच्या दृष्टीनें तिसरा भेद संभवत नाहीं. ज्या

यज्ञदानतपःकर्म न त्याज्यमिति चापरे ॥ ३ ॥

कर्माचें जें फल शास्त्रांत सांगितलें आहे, उदाहरणार्थ, पुत्रप्राप्तीसाठीं पुत्रेष्टि, त्या फलासाठीं तें कर्म केलें तर काम्य झालें; आणि त्या फलाची इच्छा मनांत न ठेवतां तेंच कर्म केवळ कर्तव्य म्हणून केलें तर तें निष्काम म्हणावयाचें. सर्व कर्मांचे 'काम्य' आणि 'निष्काम' (किंवा मनुच्या परिभाषेप्रमाणें प्रवृत्त व निवृत्त) असे दोन भेद झाल्यावर, कर्मयोगी सर्व प्रकारचीं काम्य कर्में अजीबात सोडितो; म्हणून कर्मयोगांतहि काम्यकर्मांचा 'संन्यास' करावा लागतो असें सिद्ध होतें. कर्मांच्या वरील दोन वर्गांपैकीं निष्काम कर्में शिल्लक राहिलीं. हीं निष्काम कर्में कर्मयोग्यानें केलीं पाहिजेत, असा गीतेचा निश्चित उपदेश आहे हें खरें; पण त्यांतहि फलाशेचा सर्वस्वी 'त्याग' करावा लागतो (गी. ६.२). म्हणून त्यागाचें तत्वहि गीताधर्मांत कायमच रहातें. सारांश, सर्व कर्में न सोडितांहि 'संन्यास' व 'त्याग' हीं दोन्ही तत्वें कर्मयोगमार्गांत कायम रहातात, हें अर्जुनाच्या लक्षांत येण्यासाठीं संन्यास म्हणजे 'काम्य कर्मांचा अजीबात संन्यास', आणि त्याग' म्हणजे 'जीं कर्में करावयाचीं त्या सर्वांत फलाशेचा त्याग' या दोन व्याख्या या श्लोकांत दिल्या आहेत. मागें संन्यास (किंवा सांख्य) व योग हे तत्वतः एकच आहेत, असें दाखवितांना 'संन्यासी' या शब्दाचा (गी ५.३–६ व ६.१,२ पहा), व पुढें याच अध्यायांत 'त्यागी' शब्दाचा (गी. १८.११) अर्थहि याचप्रमाणें केलेला असून, प्रकृतस्थलीं तोच अर्थ इष्ट आहे. ब्रह्मचारी गृहस्थ व वानप्रस्थ अशा क्रमानें "शेवटीं प्रत्येकानें सर्वकर्मत्यागरूप संन्यास अगर चतुर्थाश्रम घेतल्याखेरीज मोक्षप्राप्तीच होत नाहीं," हें स्मार्त मत येथें प्रतिपाद्य नाहीं. संन्याशाचा भगवा वेष घेऊन कर्मयोगी सर्व कर्मांचा त्याग करीत नसला तरी तो संन्याशाचें खरें तत्व पाळीत असल्यामुळें कर्मयोगाचा स्मृतिग्रंथाशीं विरोध नाहीं असें यावरून सिद्ध होतें. आतां

निश्चयं शृणु मे तत्र त्यागे भरतसत्तम ।
त्यागो हि पुरुषव्याघ्र त्रिविधः सम्प्रकीर्तितः ॥ ४ ॥
यज्ञदानतपःकर्म न त्याज्यं कार्यमेव तत् ।
यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणाम् ॥ ५ ॥
एतान्यपि तु कर्माणि संगं त्यक्त्वा फलानि च ।
कर्तव्यानीति मे पार्थ निश्चितं मतमुत्तमम् ॥ ६ ॥

संन्यासमार्ग व मिमांसक यांच्यामधील कर्माबद्दलच्या वादाचा उपन्यास करून कर्मयोगशास्त्राचा त्या बाबतींतील अखेर निर्णय सांगतात—]

(३) कर्म दोषयुक्त म्हणून त्याचा (सर्वस्वी) त्याग करावा असें कित्येक पंडित ह्मणतात; आणि यज्ञ, दान, तप व कर्म यांचा कधींहि त्याग करूं नये असें दुसऱ्यांचें म्हणणें आहे. (४) तरी हे भरतश्रेष्ठा! त्यागाबद्दल माझा निर्णय काय तो ऐक. त्याग हे पुरुषश्रेष्ठा! तीन प्रकारचा सांगितला आहे. (५) यज्ञ, दान, तप आणि कर्म यांचा त्याग करूं नये; तीं (कर्में) केलींच पाहिजेत. यज्ञ, दान व तप, हीं शहाण्या पुरुषांस (-हि) पावन म्हणजे चित्तशुद्धिकारक आहेत. (६) म्हणून हीं (यज्ञदानादि) कर्में सुद्धां आसक्ति न ठेवतां फलांचा त्याग करून (इतर निष्काम कर्मां प्रमाणेंच लोकसंग्रहार्थ) केलीं पाहिजेत, असें हे पार्था! माझें निश्चित मत (असून तेंच) उत्तम आहे.

[कर्माचा दोष म्ह० बंधकत्व कर्मांत नाहीं, फलाशेंत आहे. म्हणून सर्व कर्में फलाशा सोडून निष्काम बुद्धीनें करावीं असें कर्मयोगाचें जें तत्व पूर्वीं अनेक वेळां सांगितलें त्याचा हा उपसंहार आहे. सर्व कर्में दोषयुक्त अतएव त्याज्य होत हें संन्यासमार्गांतलें मत गीतेस संमत नाहीं (गी. १८.४८ व ४९ पहा). गीता फक्त 'काम्य' कर्मांचा संन्यास करण्यास सांगत आहे. पण धर्मशास्त्रांत प्रतिपादिलेलीं कर्में पाहिलीं

§§ नियतस्य तु संन्यासः कर्मणो नोपपद्यते ।

तर तीं सर्व काम्यच असल्यामुळें (गी. २.४२–४४), त्यांचाहि संन्यास करावा असें आतां प्राप्त होतें; व तसें केलें तर यज्ञचक्र बुडून (३. १६) सृष्टि उध्वस्त होण्याचाहि प्रसंग येतो. तेव्हां करावें काय ? गीता या प्रश्नाचें उत्तर असें देत्ये कीं, यज्ञदानादि कर्मे स्वर्गादि फलप्राप्त्यर्थ करा म्हणून शास्त्रांत जरी सांगितलें असलें, तरी यज्ञ करणें दान करणें, तप करणें इ० माझें कर्तव्य होय (गी. १७. ११, १७ व २० पहा), अशा निष्काम बुद्धीनें लोकसंग्रहार्थ हींच कर्मे करितां येत नाहींत असें नाहीं. ह्मणून लोकसंग्रहार्थ स्वधर्माप्रमाणें दुसरीं निष्काम कर्मे जशीं करावयाचीं तद्वतच यज्ञदानादि कर्मेसुद्धां फलाशा व आसक्ति सोडून केलीं पाहिजेत. कारण, तीं नेहमींच 'पावन' म्हणजे चित्तशुद्धिकारक किंवा परोपकारबुद्धि वाढविणारीं आहेत. मूळांत "एतान्यपि–हीं सुद्धां" असे जे शब्द आहेत त्यांचा अर्थ "इतर निष्काम कर्माप्रमाणें हीं यज्ञदानादि कर्मे सुद्धां" असा आहे. अशा रीतीनें फलाशा सोडून किंवा भक्तिदृष्ट्या केवळ परमेश्वरार्पणबुद्धीनें हीं कर्मे केलीं म्हणजे सृष्टीचें रहाटगाडगें चालू राहून कर्त्याच्या मनांतली फलाशा सुटलेली असल्यामुळें हीं कर्मे मोक्षप्राप्तीच्याहि आड न येतां सर्व गोष्टींचा नीट मेळ बसतो; व कर्मासंबंधानें कर्मयोगशास्त्राचा हाच अखेरचा निश्चित सिद्धान्त आहे (गीता. २.४५ वरील आमची टीप पहा) मीमांसकांचा कर्ममार्ग आणि गीतेंतील कर्मयोग यांमधला भेद गीतारहस्यांत (पृ. २८९–२९२; व पृ. ३४२–३४४) अधिक स्पष्ट करून दाखविला असल्यामुळें, या विषयाची येथें जास्त चर्चा करीत नाहीं. असो; अर्जुनाच्या प्रश्नावरून संन्यास व त्याग यांच्या अर्थाचा कर्मयोगदृष्ट्या याप्रमाणें खुलासा केल्यावर, सात्त्विकादि भेदानें कर्मे करण्याचे निरनिराळे प्रकार कोणते हे सांगून तोच अर्थ दृढ करितात––

मोहात्तस्य परित्यागस्तामसः परिकीर्तितः ।। ७ ।।
दुःखमित्येव यत्कर्म कायक्लेशभयात्त्यजेत् ।
स कृत्वा राजसं त्यागं नैव त्यागफलं लभेत् ।। ८ ।।
कार्यमित्येव यत्कर्म नियतं क्रियतेऽर्जुन ।
संगं त्यक्त्वा फलं चैव स त्यागः सात्त्विको मतः ।। ९ ।।
§§ न द्वेष्ट्यकुशलं कर्म कुशले नानुषज्यते ।

(७) जें कर्म (स्वधर्माप्रमाणें) नियत म्ह० नेमलेलें त्याचा संन्यास म्ह० त्याग करणें (कोणासहि) योग्य नाहीं. मोहानें केलेला त्याचा त्याग तामस म्हटला आहे. (८) शरीराला कष्ट होतील या भीतीनें, म्ह० दुःखकारक एवढ्याचसाठीं, जर कर्म सोडील तर त्याचा त्याग राजस होऊन त्यागाचें (म्हणून जें) फल (तें) त्याला मिळणार नाहीं. (९) हे अर्जुना (स्वधर्माप्रमाणें) नियत म्हणजे नेमलेलें कार्य म्हणजे कर्तव्य ह्मणूनच जें कर्म संग व फल सोडून केलें जातें, तेव्हां त्याला सात्त्विक त्याग समजतात.

[ सातव्या श्लोकांत 'नियत' या पदाचा नित्यनैमित्तिकादि भेदांपैकीं 'नित्य' कर्म असा अर्थ कित्येक करितात तो बरोबर नाहीं. 'नियतं कुरु कर्म त्वं' (गी. ३.८) या ठिकाणीं नियत पदाचा जो अर्थ आहे तोच येथेंहि घेतला पाहिजे, मीमांसकांची परिभाषा येथें विवक्षित नाहीं, हें वर सांगितलेंच आहे. 'नियत' शब्दाऐवजीं 'कार्य' हा शब्द गी. ३.१९ यांत आला असून ९ व्या श्लोकांत ' कार्य ' व ' नियत ' हे शब्द एकत्र आले आहेत. स्वधर्माप्रमाणें प्राप्त झालेलें कोणतेहि कर्म न सोडितां तेंच कर्म कर्तव्य म्हणून करणें (गी. ३.१९ पहा) याला सात्त्विक त्याग म्हणतात, इतकेंच नव्हे तर कर्मयोगशास्त्रांत यालाच त्याग किंवा संन्यास हें नांव आहे, असें जें या अध्यायाचे आरंभीं दुसऱ्या श्लोकांत सांगितलें त्याचेंच हें समर्थन आहे. त्याग किंवा संन्यास

त्यागी सत्त्वसमाविष्टो मेधावी छिन्नसंशयः ॥ १० ॥
न हि देहभृता शक्यं त्यक्तुं कर्माण्यशेषतः ।
यस्तु कर्म फलत्यागी स त्यागीत्यभिधीयते ॥ ११ ॥
§§ अनिष्टमिष्टं मिश्रं च त्रिविधं कर्मणः फलम् ।
भवत्यत्यागिनां प्रेत्य न तु संन्यासिनां क्वचित् ॥ १२ ॥

यांच्या अर्थाचा हा खुलासा झाला. आतां याच तत्वाला अनुसरून खरा त्यागी किंवा संन्यासी कोण हें सांगतात—]

(१०) एखादें कर्म अकुशल म्हणजे अकल्याणकारक असलें तर त्याचा द्वेष करीत नाहीं, व दुसरें कल्याणकारक किंवा फायद्याचें आहे म्हणून त्यांत अनुषक्त होत नाहीं, तो सत्वशील बुद्धिमान् व संशयविरहित त्यागी म्ह० संन्यासी म्हणावयाचा (११) कारण ज्याला म्हणून देह आहे त्याला कर्मांचा निःशेष त्याग करणें शक्य नाहीं. म्हणून ज्यानें (कर्में न सोडितां) फक्त कर्मफलांचा त्याग केला त्यालाच (खरा) त्यागी म्हणजे संन्यासी म्हटलें आहे.

[अशा प्रकारें, म्ह० कर्म न सोडितां फक्त फलाशा सोडून जो त्यागी झाला त्याला त्याच्या कर्मांचीं कोणतींच फलें बंधक होत नाहींत असें आतां सांगतात—]

(१२) अनिष्ट, इष्ट व (कांहीं इष्ट व कांहीं अनिष्ट असें) मिश्र याप्रमाणें कर्माचें तीन प्रकारचें फल, मेल्यावर अत्यागी म्हणजे फलाशेचा त्याग न करणाऱ्या पुरुषास मिळतें. पण जो संन्यासी ह्मणजे फलाशा सोडून कर्में करणारा त्याला (हें फल) कधींहि मिळत नाहीं; ह्मणजे बांधूं शकत नाहीं.

[त्याग, त्यागी व संन्यासी यांच्याबद्दलचे हे विचार पूर्वीं (गी. ३. ४–७; ५. २–१०; ६. १) अनेक ठिकाणीं आले असून त्यांचाच येथें उप-

§§ पंचैतानि महाबाहो कारणानि निबोध मे ।
सांख्ये कृतांते प्रोक्तानि सिद्धये सर्वकर्मणाम् ॥ १३ ॥
अधिष्ठानं तथा कर्ता करणं च पृथग्विधम् ।
विविधाश्च पृथक् चेष्टा दैवं चैवात्र पंचमम् ॥ १४ ॥
शरीरवाङ्मनोभिर्यत्कर्म प्रारभते नरः ।
न्याय्यं वा विपरीतं वा पंचैते तस्य हेतवः ॥ १५ ॥
§§ तत्रैवं सति कर्तारमात्मानं केवलं तु यः ।
पश्यत्यकृतबुद्धित्वान्न स पश्यति दुर्मतिः ॥ १६ ॥
यस्य नाहंकृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते ।
हत्वा स इमां ल्लोकान्न हन्ति न निबद्ध्यते ॥ १७ ॥

संहार केला आहे. सर्व कर्मांचा संन्यास केव्हांच गीतेस इष्ट नाहीं. फलाशेचा त्याग करणारा पुरुषच गीतेप्रमाणें खरा किंवा नित्यसंन्यासी होय ( गी. ५. ३ ). खरा त्याग म्हणजे ममत्वयुक्त फलाशेचा अर्थात् अहंकारबुद्धीचा त्याग. हाच सिद्धांत दृढ करण्यास आतां आणखी कारणें सांगतात— ]

(१३) हे महाबाहो ! सर्व कर्में घडून येण्यास सांख्यांच्या सिद्धान्तांत जीं पांच कारणें सांगितलीं आहेत तीं मी ( तुला ) सांगतों ऐक. ( १४ ) अधिष्ठान ( जागा ), तसाच कर्ता, निरनिराळ्या प्रकारचें कारण म्हणजे साधन किंवा हत्यार, अनेक प्रकारच्या ( कर्त्यांच्या ) पृथक् पृथक् चेष्टा म्हणजे व्यापार, आणि त्याबरोबरच पांचवें दैव होय. ( १५ ) शरीरानें, वाचेनें किंवा मनानें मनुष्य जें जें कर्म आरंभितो—मग तें न्याय्य असो वा विपरीत म्हणजे अन्याय्य असो—त्याचीं हीं पांच कारणें आहेत.

(१६) या प्रकारची (खरी) स्थिती असतां, बुद्धि संस्कृत नसल्यामुळें मी एकटाच कर्ता आहें असें ज्याला वाटतें त्या दुर्मतीला कांहींच कळत नाहीं ( असें म्हटलें पाहिजे ). (१७) ज्याला ' मी करितों ' ही भावना नाहीं, व

§§ ज्ञानं ज्ञेयं परिज्ञाता त्रिविधा कर्मचोदना ।

ज्याची बुद्धि अलिप्त असते, त्यानें या लोकांना मारिलें तरीहि मारिलें असें होत नाहीं, आणि तें ( कर्म ) त्याला बंधकहि होत नाहीं.

तेराव्या श्लोकांत सांख्य शब्दाचा अर्थ वेदान्तशास्त्र असा कित्येक टीकाकारांनीं केला आहे. पण पुढील म्हणजे चवदावा श्लोक नारायणीय धर्मांत ( म. भा. शां. ३४७.८७ ) अक्षरशः आला असून तेथें तत्पूर्वी प्रकृति व पुरुष या कापिलसांख्यांतील तत्त्वांचा उल्लेख असल्यामुळें सांख्य या शब्दानें प्रकृतस्थलींहि कापिल सांख्यशास्त्रच अभिप्रेत आहे असें आमचें मत आहे. कर्मफलाची आशा मनुष्यानें धरूं नये, किंवा मी अमुक करीन ही अहंकारबुद्धि मनांत ठेवूं नयें, हा सिद्धान्त पूर्वी गीतेंत अनेक वेळां आलेला असून ( गी. २.१९;२.४७;३ २७;५.८–११; १३.२९ ) तोच येथें " कर्माचें फल घडण्यास मनुष्य हा एकटाच कारण नाहीं" असें सांगून दृढ केला आहे ( गीतार. प्र. ११ पहा ). मनुष्य या जगांत असो वा नसो, प्रकृतिस्वभावाप्रमाणें जगाचा अखंड व्यापार नेहमीं चालत्र आहे; व मनुष्य आपण जें कांहीं केलें असें समजतो तें केवळ त्याच्या प्रयत्नाचें फल नसून त्याचा प्रयत्न आणि जगांतील इतर व्यापार किंवा चेष्टा या सर्वांच्या साह्यानें तें कार्य घडून आलेलें असतें असा १४ व्या श्लोकाचा अर्थ आहे. उदाहरणार्थ शेती केवळ मनुष्याच्याच प्रयत्नावर अवलंबून नसून जमीन, बीं, पाऊस, खत, बैल इत्यादिकांचे गुणधर्म किंवा व्यापार यांची, शेती सफल होण्यास अवश्य मदत लागत्ये. मनुष्याचा प्रयत्न सिद्ध होण्यास अशा रीतीनें जगाच्या ज्या विविध व्यापारांचें साहाय्य लागतें त्यांपैकीं कांहीं व्यापार आपणांस माहीत असून त्यांची अनुकूलता पाहूनच मनुष्य प्रयत्न करीत असतो. पण आपल्या प्रयत्नांस अनुकूल किंवा प्रतिकूल असणारे दुसरे असेहि कांहीं सृष्टीव्यापार असतात कीं त्यांची आपणांस माहिती नसत्ये. यांसच दैव असें म्हणतात; व कार्य घडून येण्याचें हें पांचवें कारण

करणं कर्म कर्तेति त्रिविधः कर्मसंग्रहः ॥ १८ ॥

होय, असें म्हटलें आहे. मनुष्याचा प्रयत्न सफल होण्यास इतक्या सर्व गोष्टींची अवश्यकता असून त्यांपैकीं पुष्कळ आपल्या ताब्यांतल्या अगर आपणांस माहीतहि जर नसतात, तर मी अमुक करीन म्हणून अभिमान धरणें, किंवा माझ्या कर्माचें फल अमुकच व्हावें अशी फलाशा ठेवणें, हें मूर्खपणाचें लक्षण होय, असें उघड सिद्ध होतें (गीतार. पृ. ३२४ व ३२५ पहा). तथापि ज्याची फलाशा सुटली त्यानें वाटेल तें कुकर्म करावें असाहि सतराव्या श्लोकाचा अर्थ समजावयाचा नाहीं. सामान्य मनुष्यें जें कांहीं करितात तें स्वार्थाच्या लोभानें करीत असल्यामुळें त्यांच्या हातून गैरवर्तन होत असतें. पण ज्याचा स्वार्थ, लोभ किंवा फलाशा पूर्ण लयास जाऊन सर्व भूतें ज्याला सारखींच झालीं त्याच्या हातून कोणाचेंच अनहित होणें शक्य नाहीं. कारण दोष बुद्धींत असतो, कर्मांत नाहीं. म्हणून ज्याची बुद्धि शुद्ध व पवित्र असें प्रथम कायम ठरलें त्यानें केलेली एखादी गोष्ट लौकिकदृष्ट्या दिसण्यांत जरी विपरीत दिसली तरी त्यांतील बीज शुद्धच असलें पाहिजे असें न्यायतःच प्राप्त होतें, व त्याबद्दल शुद्ध बुद्धीच्या मनुष्यास जबाबदार धरितां येत नाहीं, असें सतराव्या श्लोकांत म्हटलें आहे. स्थितप्रज्ञाच्या म्हणजे शुद्ध बुद्धीच्या पुरुषाच्या निष्पापत्वाबद्दल हें तत्त्व उपनिषदांतूनहि वर्णिलेलें आहे (कौषी. ३. १ व पंचदशी, १४. १६ व १७ पहा). पण यासंबंधानें गीतारहस्याच्या बाराव्या प्रकरणांत (पृ. ३६८–३७२) पूर्ण विवेचन केलें असल्यामुळें येथें जास्त विस्तार करीत नाहीं. अर्जुनाच्या प्रश्नावरून उपस्थित झालेल्या संन्यास व त्याग या शब्दांच्या अर्थाची याप्रमाणें मीमांसा करून स्वधर्माप्रमाणें प्राप्त झालेलीं कर्में अहंकार-बुद्धि व फलाशा सोडून करणें हाच सात्त्विक किंवा खरा त्याग होय. कर्में सोडणें हा खरा त्याग नव्हे, असें सिद्ध केल्यावर, कर्मांच्या सात्त्विकादि भेदांचा जो विचार सतराव्या अध्यायांत सुरू केला तोच आतां कर्मयोगदृष्ट्या पुरा करून घेतात.

(१८) ज्ञान, ज्ञेय, व ज्ञाता अशी तीन प्रकारची कर्मचोदना, आणि

ज्ञानं कर्म च कर्ता च त्रिधैव गुणभेदतः ।
प्रोच्यते गुणसंख्याने यथावच्छृणु तान्यपि ॥ १९ ॥

करण, कर्म व कर्ता असा तीन प्रकारचा कर्मसंग्रह आहे. (१९), ज्ञान, कर्म आणि कर्ता (प्रत्येकीं सत्त्व, रज व तम या) गुणभेदानें तीन तीन प्रकारचीं आहेत असें गुणसंख्यानशास्त्रांत म्ह० कापिलसांख्यशास्त्रांत म्हटलें आहे. ते (प्रकार) जसेच्या तसे (तुला सांगतों) ऐक.

[कर्मचोदना व कर्मसंग्रह हे शब्द पारिभाषिक आहेत. कोणतेंहि कर्म इंद्रियांनीं घडण्यापूर्वीं त्याचा मनानें निश्चय करावा लागतो. म्हणून या मानसिक विचारास 'कर्मचोदना' म्ह० कर्म करण्याची प्रथम प्रेरणा असें म्हणतात; व ती साहजिकरीत्या ज्ञान, ज्ञेय व ज्ञाता याप्रमाणें तीन प्रकारची असते. उदाहरणार्थ प्रत्यक्ष मडकें करण्यापूर्वीं मला अमुक करावयाचें (ज्ञेय), व तें अमक्या रीतीनें होईल (ज्ञान), असें कुंभार (ज्ञाता), आपल्या मनानें ठरवीत असतो ही कर्मचोदना झाली. मनाचा याप्रमाणें निश्चय झाल्यावर तो कुंभार (कर्ता) माती, चाक वगैरे साधनें (करण) मिळवून प्रत्यक्ष मडकें (कर्म) तयार करितो. हा कर्मसंग्रह झाला. मडकें हें कुंभाराचें कर्म आहे पण त्यासच मृत्तिकेचें कार्य असेंहि म्हणतात. असो; कर्मचोदना हा शब्द मानसिक किंवा अंतःकरणांतील क्रियेचा बोधक असून, कर्मसंग्रह या शब्दानें त्याच मानसिक क्रियेच्या तोडीच्या बाह्य क्रिया दाखविल्या जातात, हें यावरून दिसून येईल. कोणत्याहि कर्माचा पूर्ण विचार करावयाचा म्हणजे 'चोदना' व 'संग्रह' हीं दोन्ही पाहिलीं पाहिजेत. पैकीं ज्ञान, ज्ञेय आणि ज्ञाता (क्षेत्रज्ञ) यांचीं अध्यात्मदृष्ट्या लक्षणें पूर्वीं तेराव्या अध्ययांत (१३.१८) सांगितलीं आहेत. तथापि क्रियारूपी ज्ञानाचें लक्षण थोडें निराळें असल्यामुळें या त्रयीपैकीं ज्ञान आणि दुसऱ्या त्रयीपैकीं कर्म व कर्ता यांच्या व्याख्या आतां सांगतात—]

§§ सर्वभूतेषु येनैकं भावमव्ययमीक्षते ।
अविभक्तं विभक्तेषु तज्ज्ञानं विद्धि सात्त्विकम् ॥ २० ॥
पृथक्त्वेन तु यज्ज्ञानं नानाभावान्पृथग्विधान् ।
वेत्ति सर्वेषु भूतेषु तज्ज्ञानं विद्धि राजसम् ॥ २१ ॥
यत्तु कृत्स्नवदेकस्मिन् कार्ये सक्तमहैतुकम् ।
अतत्त्वार्थवदल्पं च तत्तामसमुदाहृतम् ॥ २२ ॥

(२०) विभक्त म्हणजे निरनिराळया सर्व भूतांत, एकच अविभक्त व अव्यय भाव किंवा तत्त्व आहे, असें ज्या ज्ञानानें कळतें तें सात्त्विक ज्ञान असें समज. (२१) सर्व भूतांमध्यें भिन्नभिन्न प्रकारचे नाना भाव आहेत असा पृथक्त्वबोध ज्या ज्ञानानें होतो तें ज्ञान राजस समज. (२२) परंतु हेंच काय तें सर्वस्व म्हणून एकाच गोष्टींत निष्कारण व तत्त्वार्थ न जाणितां गुंतून राहिलेलें जें अल्पज्ञान तें तामस म्हटलें आहे.

[ निरनिराळया ज्ञानाची लक्षणें फार व्यापक आहेत. आपलीं बायका मुलें हाच काय तो सर्व संसार, हें ज्ञान तामस होय. यापेक्षां जरा वर चढलें म्हणजे दृष्टि अधिक व्यापक होऊन आपल्या गावांतला अगर देशांतला मनुष्य आपला वाटूं लागतो; तथापि निरनिराळया गांवांतील अगर देशांतील लोक निरनिराळे ही बुद्धि अद्याप कायम असत्ये. हें ज्ञान राजस होय. पण याहिपेक्षां वर चढून सर्वांभूतीं एक आत्मा हें ओळखलें म्हणजे हें ज्ञान पूर्ण व सात्त्विक झालें. सारांश, ‘ विभक्तांत अविभक्त ’ किंवा ‘ नानात्वांत एकत्व ’ ओळखणें हें ज्ञानाचें खरें लक्षण होय, आणि याप्रमाणें “नेह नानास्ति किंचन” या जगांत नानात्व नाहीं, हें ज्यानें ओळखिलें तो मुक्त, आणि “मृत्योः स मृत्युमाप्नोति य इह नानेव पश्यति ” (बृ. ४. ४. १९)–जो या जगांत नानात्व पहातो तो जन्ममरणाच्या फेऱ्यांत पडतो–असें बृहदारण्यकांत व कठोपनिषदांत वर्णन केलेलें आहे (कठ. ४.११). या जगांत

§§ नियतं संगरहितमरागद्वेषतः कृतम् ।
अफलप्रेप्सुना कर्म यत्तत्सात्त्विकमुच्यते ॥ २३ ॥
यत्तु कामेप्सुना कर्म साहंकारेण वा पुनः ।
क्रियते बहुलायासं तद्राजसमुदाहृतम् ॥ २४ ॥

जें काय जाणावयाचें तें हेंच असून (गी. १३. १६) यांतच ज्ञानाची परमावधि होते; कारण, सर्वच एक झाल्यावर एकीकरणाच्या ज्ञान-क्रियेस पुढें अवकाशच रहात नाहीं (गीतार. पृ. २३० पहा). एकीकरण करण्याची ज्ञानाची ही क्रिया कशी चालते याचें गीतारहस्याच्या नवव्या प्रकरणांत निरूपण केलें आहे (पृ. २१२ व २१३) तें पहा. हेंच सात्त्विक ज्ञान मनांत बिंबलें म्हणजे देहस्वभावावर त्याचा जो परिणाम घडतो त्याचें वर्णन, दैवी संपत्तीचें गुणवर्णन म्हणून, सोळाव्या अध्यायाचे आरंभीं आलें असून तेराव्या अध्यायांत (१३.७-११) अशा प्रकारच्या देहस्वभावासच 'ज्ञान' हे नांव दिलें आहे. यावरून 'ज्ञान' या शब्दानें (१) एकीकरणाच्या मानसिक क्रियेची पूर्तता, आणि (२) त्या पूर्ततेमुळें देहस्वभावावर घडलेला परिणाम, असे दोन्ही अर्थ गीतेंत विवक्षित आहेत असें दिसून येतें. म्हणून विसाव्या श्लोकांत दिलेलें ज्ञानाचें लक्षण दिसण्यांत जरी मानसिक क्रियात्मक दिसलें तरी त्यांतच सदर ज्ञानानें देहस्वभावावर होणाऱ्या परिणामाचा समावेश इष्ट आहे, हें गीतारहस्याच्या नवव्या प्रकरणाच्या अखेर (पृ. २४५ व २४६) स्पष्ट केलें आहे. असो; ज्ञानाचे भेद सांगितले. आतां कर्माचे भेद सांगतात--]

(२३) फलप्राप्तीची इच्छा न धरणारा पुरुष, प्रीति किंवा द्वेष (मनांत) न ठेवितां, आसक्तिविरहित (स्वधर्माप्रमाणें) नियत म्हणजे नेमलेलें जें कर्म करितो तें (कर्म) सात्त्विक म्हटलें आहे. (२४) पण काम म्हणजे फलाशेची इच्छा धरणारा किंवा अहंकारबुद्धीचा (पुरुष) पुष्कळ

अनुबंधं क्षयं हिंसामनपेक्ष्य च पौरुषम् ।
मोहादारभ्यते कर्म यत्तत्तामसमुच्यते ॥ २५ ॥
§§ मुक्तसंगोऽनहंवादी धृत्युत्साहसमन्वितः
सिद्ध्यसिद्ध्योर्निर्विकारः कर्ता सात्त्विक उच्यते ॥ २६ ॥

आयासानें जें कर्म करितो त्याला राजस म्हणतात. (२५) अनुबंध म्हणजे पुढें होईल काय, पौरुष म्ह० आपलें सामर्थ्य किती, आणि (त्यांत) नाश अगर हिंसा घडेल किंवा नाहीं, यांचा विचार न करितां मोहानें जें कर्म आरंभिलें जातें, त्याला तामस म्हणतात.

[या तीन प्रकारच्या कर्मांत सर्व प्रकारच्या कर्मांचा समावेश होतो. निष्काम कर्मांसच सात्त्विक म्हणजे उत्तम कां म्हटलें याचें विवेचन गीतारहस्याच्या ११ व्या प्रकरणांत केलें आहे तें पहा. हेंच खरें अकर्म होय ( गी. ४.१६ वरील टीप पहा ). कर्मापेक्षां बुद्धि श्रेष्ठ असा गीतेचा सिद्धांत असल्यामुळें कर्माची वरील लक्षणें सांगतांना कर्त्याच्या बुद्धीचा दर वेळीं उल्लेख आलेला आहे. कर्मांच्या केवळ बाह्य परिणामावरूनच तें सात्त्विक का तामस हें ठरविलेलें नाहीं, हें लक्षांत ठेविलें पाहिजे ( गीतार. प्र. १२ पृ. ३७९ पहा ). तसेंच फलाशा सुटली म्हणजे मागचापुढचा सुमार अगर सारासारविचार न पहातां वाटेल तें करावें असाहि अर्थ समजावयाचा नाहीं, हें २५ व्या श्लोकावरून सिद्ध होतें. कारण अनुबंध व फल न पहातां केलेलें कर्म तामस होतें, सात्त्विक नव्हे, असें २५ व्या श्लोकांत निश्चित म्हटलें आहे ( गीतार. पृ. ३७९ पहा ). आतां याच तत्त्वाप्रमाणें कर्त्यांचे जे भेद होतात ते सांगतात–]

(२६) ज्याला आसक्ति नाहीं, जो 'मी' व माझें म्हणत नाहीं, कार्य सिद्ध होवो न होवो ( दोन्ही वेळीं ) जो (मनानें) अविकृत; (तथापि) जो धृति व उत्साह यांनीं युक्त होत्साता कर्म करितो, त्यास सात्त्विक

रागी कर्मफलप्रेप्सुर्लुब्धो हिंसात्मकोऽशुचिः ।
हर्षशोकान्वितः कर्ता राजसः परिकीर्तितः ॥ २७ ॥
अयुक्तः प्राकृतः स्तब्धः शठो नैष्कृतिकोऽलसः ।
विषादी दीर्घसूत्री च कर्ता तामस उच्यते ॥ २८ ॥

(कर्ता) म्हटलें आहे. (२७) विषयासक्त, लोभी, (सिद्धि व असिद्धि यांचे ठायीं यथानुक्रम) हर्ष व शोक यांनीं युक्त, कर्मफलाच्या प्राप्तीची इच्छा धरणारा, हिंसात्मक आणि अशुचि अशा कर्त्यास राजस म्हणतात, (२८) अयुक्त म्ह० चंचल बुद्धीचा, अडाणी, ताठलेला, ठक, नैष्कृतिक म्ह० बुडव्या, आळशी, सदा खट्टू व दीर्घसूत्री म्हणजे चेंगट किंवा घटकेच्या ठिकाणीं महिना लावणारा' अशा कर्त्यास तामस म्हटलें आहे.

[ २८ व्या श्लोकांत नैष्कृतिक (निस्+कृत्=छेद करणें, कापणें) याचा दुसऱ्याचे कामाचा छेद करणारा, किंवा तें बुडविणारा असा अर्थ आहे. पण या ऐवजीं कित्येक नैकृतिक असा पाठ घेतात. 'निकृत' म्हणजे शठ असा अमरकोशांत अर्थ दिलेला आहे. पण शठ हें विशेषण पूर्वीं आलें असल्यामुळें आम्हीं नैष्कृतिक हा पाठ स्वीकारिला आहे. असो; या तीन प्रकारच्या कर्त्यांपैकीं सात्त्विक कर्ता, हाच अकर्ता अलिप्तकर्ता किंवा कर्मयोगी होय. फलाशा सोडून दिली तरी कर्में करण्याची त्याची उमेद, उत्साह व सारासारविचार कायम असतात, असें वरील श्लोकावरून स्पष्ट होतें. जगाच्या त्रिविध पसाऱ्याचें जें हें वर्णन चालू आहे तेंच बुद्धि, धृति व सुख यांसहि आतां लावून दाखवितात. बुद्धि म्हणजे दुसऱ्या अध्यायांत ( २. ४१ ) सांगितलेली व्यवसायात्मिक बुद्धि अथवा निश्चय करणारें इंद्रिय असा अर्थ या श्लोकांतून इष्ट आहे. व त्याचा खुलासा गीतारहस्य प्रकरण ६ पृ. १३७–१४० यांत केला आहे तो पहा. ]

§§ बुद्धेर्भेदं धृतेश्चैव गुणतस्त्रिविधं शृणु ।
प्रोच्यमानमशेषेण पृथक्त्वेन धनंजय ॥ २९ ॥
प्रवृत्तिं च निवृत्तिं च कार्याकार्ये भयाभये ।
बंधं मोक्षं च या वेत्ति बुद्धिः सा पार्थ सात्त्विकी ॥ ३० ॥
यया धर्ममधर्मं च कार्यं चाकार्यमेव च ।
अयथावत्प्रजानाति बुद्धिः सा पार्थ राजसी ॥ ३१ ॥
अधर्मं धर्ममिति या मन्यते तमसावृता ।
सर्वार्थान् विपरीतांश्च बुद्धिः सा पार्थ तामसी ॥ ३२ ॥
§§ धृत्या यया धारयते मनःप्राणेंद्रियक्रियाः ।
योगेनाव्यभिचारिण्या धृतिः सा पार्थ सात्त्विकी ॥ ३३ ॥

(२९) हे धनंजया! बुद्धि आणि धृति यांचेहि गुणांमुळें होणारे तीन प्रकारचे भेद वेगवेगळे निःशेष तुला सांगतों, ऐक. (३०) प्रवृत्ति म्हणजे एखादी गोष्ट करूं लागणें, आणि निवृत्ती म्हणजे एखादी गोष्ट करूं न लागणें, कार्य म्हणजे कोणतें कृत्य करण्यास योग्य आणि कोणतें अयोग्य (अकार्य), भ्यावें कशास, आणि कशास भिऊं नये, बंध व मोक्ष कशांत आहे, हें जी बुद्धि जाणत्ये ती (बुद्धि) हे पार्था! सात्त्विक होय. (३१) ज्या बुद्धीनें धर्म व अधर्म, किंवा कार्य आणि अकार्य यांचा यथार्थ निर्णय होत नाहीं, ती बुद्धि हे पार्था! राजस होय. (३२) जी बुद्धि तमानें व्याप्त होऊन अधर्माला धर्म मानित्ये, आणि सर्व गोष्टींत विपरीत म्हणजे उलटा समज करून देत्ये, ती बुद्धि हे पार्था! तामस होय.

[ बुद्धिचे याप्रमाणें विभाग केल्यावर सदसद्विवेकबुद्धि म्हणून स्वतंत्र देवता रहात नसून तिचा सात्त्विक बुद्धींतच समावेश करावा लागतो, इत्यादी विवेचन गीतारहस्यांत (पृ. १४०) केलें आहे तें पहा. बुद्धीचे भेद झाले. आतां धृतीचे भेद सांगतात—]

(३३) ज्या अव्यभिचारी म्ह० इकडेतिकडे न ढळणाऱ्या धृतीनें

यया तु धर्मकामार्थान् धृत्या धारयतेऽर्जुन ।
प्रसंगेन फलाकांक्षि धृतिः सा पार्थ राजसी ॥ ३४ ॥
यया स्वप्नं भयं शोकं विषादं मदमेव च ।
न विमुंचति दुर्मेधा धृतिः सा पार्थ तामसी ॥ ३५ ॥

मन, प्राण व इंद्रियें यांचे व्यापार, (कर्मफलत्यागरूप) योगानें चालविले जातात, ती धृति हे पार्था! सात्विक होय. (३४) हे अर्जुना! ज्या धृतीनें धर्म, काम व अर्थ (हे पुरुषार्थ) चालविले जातात व (धर्मार्थकामांतील) प्रसंगानुसार जी फलाची इच्छा ठेविस्ये, ती धृति हे पार्था! राजस होय. (३५) ज्या धृतीनें मनुष्य दुर्बुद्ध होऊन झोंप, भय, शोक, विषाद आणि मद ही सोडीत नाहीं ती धृति हे पार्था! तामस होय.

[ 'धृति' या शब्दाचा अर्थ धैर्य असा आहे; पण शारीरिक धैर्य या ठिकाणीं विवक्षित नसून मनाचा दृढनिश्चय असा या शब्दाचा या प्रकरणांत अर्थ आहे. निर्णय करणें हें काम बुद्धीचें आहे. परंतु बुद्धीनें योग्य निर्णय केला तरी तो कायम टिकला पाहिजे. निर्णयाला याप्रमाणें बळकटपणा आणणें हा मनाचा धर्म होय. म्हणून धृति किंवा मानसिक धैर्य हा गुण मन आणि बुद्धि या दोघांच्या साह्यायानें उत्पन्न होतो असें म्हटलें आहे. पण अव्यभिचारी ह्म० इकडे तिकडे न धावणाऱ्या धैर्यानें मन, प्राण व इंद्रियें यांचे व्यापार चालविले पाहिजेत, एवढें ह्मटल्यानें सात्विक धृतीचें लक्षण पुरें होत नाहीं. हे व्यापार कशावर घडावयाचे किंवा या व्यापाराचें कर्म काय हें सांगितलें पाहिजे. आणि तें कर्म 'योग' या शब्दानें सांगितलें आहे. अर्थात् 'योग' या शब्दाचा केवळ 'एकाग्र चित्त' असा अर्थ करून काम भागत नाहीं. ह्मणून आह्मीं त्याचा अर्थ, कर्मफलत्यागरूप योग असा पूर्वापार संदर्भावरून केला आहे. सात्विक कर्म सात्विक कर्ता वगैरेचीं लक्षणें सांगतांना 'फलाची आसक्ति सोडणें' हा गुण ज्याप्रमाणें प्रधान मानिला

§§ सुखं त्विदानीं त्रिविधं शृणु मे भरतर्षभ ।
अभ्यासाद्रमते यत्र दुःखांतं च निगच्छति ॥ ३६ ॥
यत्तदग्रे विषमिव परिणामेऽमृतोपमम्
तत्सुखं सात्त्विकं प्रोक्तमात्मबुद्धिप्रसादजम् ॥ ३७ ॥
विषयेंद्रियसंयोगाद्यत्तदग्रेऽमृतोपमम् ।
परिणामे विषमिव तत्सुखं राजसं स्मृतम् ॥ ३८ ॥

आहे. तद्वतच सात्त्विक धृतीचें लक्षण सांगतांनाहि तोच गुण प्रधान मानिला पाहिजे. शिवाय राजस धृति फलाकांक्षी असल्ये असें पुढच्याच श्लोकांत वर्णन आहे; ह्मणून सात्त्विक धृति त्याच्या विरुद्ध अफलाकांक्षी असली पाहिजे असें पुढील श्लोकावरूनही सिद्ध होतें. सारांश निश्चयाची दृढता ही नुस्ती मानसिक क्रिया आहे, आणि ती बरी किंवा वाईट हें ठरविण्यास ज्या कामाला ही क्रिया लावितात तें काम कसें आहे तें पाहिलें पाहिजे. झोंप आणि आळस इत्यादि कामांतच जर दृढनिश्चय असेल तर तो तामस, फलाशेनें नित्य व्यवहारांतलीं कामें करण्यांत असेल तर राजस, आणि फलाशा त्यागरूप योगांत दृढनिश्चय असेल तर तो सात्त्विक होय. याप्रमाणें धृतीचे भेद झाले. आतां सुखाचेहि गुणभेदानें तीन प्रकार कसे होतात तें सांगतात—]

(३६) आतां हे भरतश्रेष्ठा ! सुखाचेहि तीन मी प्रकार सांगतों ऐक अभ्यासानें म्ह० सतत परिचयानें ज्यांत रमतो व जेथें दुःखाचा अंत प्राप्त होतो, (३७) जें आरंभीं विषासारखें पण परिणामीं अमृततुल्य तें आत्मनिष्ठ बुद्धीच्या प्रसन्नतेपासून होणारें (म्हणजे आध्यात्मिक) सुख सात्त्विक म्हटलें आहे. (३८) इंद्रियें व त्यांचे विषय यांच्या संयोगापासून होणारें (म्हणजे आधिभौतिक), जें प्रथम अमृतासारखें व परिणामीं विषासारखें

यदग्रे चानुबंधे च सुखं मोहनमात्मनः।
निद्रालस्यप्रमादोत्थं तत्तामसमुदाहृतम् ॥ ३९ ॥

(असतें), तें सुख राजस म्हटलें आहे. (३९) आणि जें प्रारंभीं व अनुबंधांत म्हणजे परिणामींहि आपल्याला मोह पाडतें, व जें निद्रा, आळस व प्रमाद म्हणजे कर्तव्याचा विसर यांपासून होतें तें सुख तामस म्हटलें आहे.

[ ३७ व्या श्लोकांतील आत्मबुद्धि याचा अर्थ आम्ही 'आत्मनिष्ठ बुद्धि' असा केला आहे. परंतु 'आत्म' म्हणजे 'आपण' असा अर्थ घेऊन त्याच पदाचा 'आपली बुद्धि' असाहि अर्थ करितां येईल. कारण मागें (६. २१) अत्यंत सुख केवळ 'बुद्धिग्राह्य' व 'अतींद्रिय' असतें असें म्हटलें आहे. परंतु कसाहि अर्थ केला तरी तात्पर्य एकच आहे. खरें व नित्य सुख इंद्रियोपभोगांत नसून केवळ बुद्धिग्राह्य आहे असें जरी म्हटलें, तरी हें खरें व अत्यंत सुख बुद्धीला प्राप्त होण्यास काय करावें लागतें याचा विचार केला म्हणजे बुद्धि आत्मनिष्ठ झाल्याखेरीज हें परमावधीचें सुख मिळत नाहीं, असें गीतेच्या सहाव्या अध्यायावरून स्पष्ट होतें (गी. ६. २१, २२). 'बुद्धि' हें इंद्रिय असें आहे कीं, तें एका बाजूनें त्रिगुण प्रकृतीच्या पसाऱ्याकडे पहातें, व दुसऱ्या बाजूनें या पसाऱ्याच्या बुडाशीं म्हणजे सर्व भूतांत एकत्वानें असणाऱ्या आत्मस्वरूपी परब्रह्माचाहि त्याला बोध होऊं शकतो म्हणून इंद्रियनिग्रहानें त्रिगुणात्मक प्रकृतीच्या पसाऱ्यांतून बुद्धि काढून अंतर्मुख व आत्मनिष्ठ केली—आणि पातंजल योगानें जें काय साधावयाचें तें हेंच—म्हणजे ती प्रसन्न होऊन खऱ्या व अत्यंत सुखाचा मनुष्यास अनुभव येतो, असें तात्पर्य आहे. आध्यात्मिक सुखाच्या श्रेष्ठत्वाबद्दल गीतारहस्याच्या ५ व्या प्रकरणांत (पृ. ११४–१७) केलेला खुलासा पहा. आतां हा त्रिविध भेदच या जगांत भरला आहे असें सामान्यतः सांगतात—]

§§ न तदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुनः।
सत्त्वं प्रकृतिजैर्मुक्तं यदेभिः स्यात्त्रिभिर्गुणैः ॥ ४० ॥

(४०) या पृथ्वीवर, आकाशांत किंवा देवांत ह्म० देवलोकींहि असें कांहीं नाहीं कीं जें प्रकृतीच्या या तीन गुणांपासून मुक्त ह्म० सुटलेलें आहे.

[ अठराव्या श्लोकापासून येथपर्यंत ज्ञान, कर्म, कर्ता, बुद्धि, धृति व सुख यांचे भेद दाखवून, व एकंदर जगामध्यें प्रकृतीच्या गुणभेदानें वैचित्र्य कसें उत्पन्न होतें याचें चित्र अर्जुनाच्या डोळ्यांपुढें मांडून या सर्व प्रकारांत सात्त्विक प्रकार श्रेष्ठ व ग्राह्य असें प्रतिपादन केलें. या सात्त्विक प्रकारांमध्येंहि जी श्रेष्ठ स्थिति तिलाच गीतेंत त्रिगुणातीतावस्था हें नांव दिलेलें आहे. त्रिगुणातीत किंवा निर्गुण हा गीतेप्रमाणें एक स्वतंत्र ह्मणजे चवथा भेद नाहीं, हें आम्ही गीतारहस्याच्या सातव्या प्रकरणांत ( पृ. १६५ ) सांगितलें आहे; आणि हाच न्याय स्वीकारून मनुस्मृतींतहि सात्त्विक गतीचेच पुनः उत्तम, मध्यम व कनिष्ठ असे तीन भेद करून, उत्तम सात्त्विक ह्मणजे मोक्षप्रद, व मध्यम सात्त्विक ह्मणजे स्वर्गप्रद, असें ह्मटलें आहे (मनु. १२.४८–५० व ८९–९१ पहा). असो; जगांतील प्रकृतीच्या वैचित्र्याचें हें वर्णन संपलें. आतां या गुणविभागानेंच चातुर्वर्ण्यव्यवस्था कशी उत्पन्न झाली याचें निरूपण आहे. स्वधर्माप्रमाणें ज्यानें त्यानें आपलें 'नियत' ह्मणजे नेमलेलें कर्म फलाशा सोडून, पण धृति, उत्साह व सारासारविचार कायम ठेवून करणें हेंच त्याचें या जगांतील कर्तव्य होय असें वर अनेक वेळां सांगण्यांत आलें ( १८.७–९,२३; व ३. ८ पहा ). पण हें कर्म ज्यानें 'नियत' होतें, त्यांतील बीज अद्याप कोठेंहि सांगितलें नाहीं. मागें चातुर्वर्ण्यव्यवस्थेचा त्रोटक उल्लेख आलेला असून ( ४. १३ ), कर्तव्याकर्तव्य–निर्णय शास्त्राप्रमाणें करावा, असें ह्मटलें आहे ( गी. १६. २४ ). पण जगाचे व्यवहार शिस्तीनें चालण्याकरितां ( गी. र. पृ. ३३२, ३९६

§§ ब्राह्मणक्षत्रियविशां शूद्राणां च परंतप।
कर्माणि प्रविभक्तानि स्वभावप्रभवैर्गुणैः ॥ ४१ ॥
शमो दमस्तपः शौचं क्षांतिरार्जवमेव च ।
ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजम् ॥ ४२ ॥
शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम् ।
दानमीश्वरभावश्च क्षात्रं कर्म स्वभावजम् ॥ ४३ ॥
कृषिगौरक्ष्यवाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजम् ।
परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्यापि स्वभावजम् ॥ ४४ ॥

व ४९२ पहा ) ज्या गुणकर्मविभागाच्या तत्त्वावर चातुर्वर्ण्यरूपी शास्त्र-व्यवस्था निर्माण झाली, त्याचा पूर्ण खुलासा तेव्हां केलेला नाहीं. यासाठीं ज्या संस्थेनें समाजांत प्रत्येकाचें कर्तव्य, 'नियत,' होतें ह्म० ठरलें जातें, त्या चातुर्वर्ण्याची गुणत्रयविभागानें उपपत्ति सांगून त्याच-बरोबर प्रत्येक वर्णाचीं याप्रमाणें नियत झालेलीं कर्तव्यकर्मेंहि आतां सांगतात-- ]

(४१) हे परंतपा! ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांचीं कर्में, त्यांच्या स्वभावजन्य म्ह० प्रकृतिसिद्ध गुणांप्रमाणें पृथक् विभागलेलीं आहेत. (४२) शम, दम, तप, शुचिर्भूतपणा, शान्ति, सरळपणा (आर्जव), ज्ञान म्हणजे अध्यात्मज्ञान, विज्ञान म्ह० विविधज्ञान, व आस्तिक्यबुद्धि, हें ब्राह्मणाचें स्वभावजन्य कर्म होय. (४३) शौर्य, तेजस्विता, धैर्य, दक्षता, युद्धांतून पलायन न करणें, दातृत्व आणि (प्रजेवर) सत्ता चाल-विणें, हें क्षत्रियाचें स्वभावजन्य कर्म होय. (४४) कृषि म्ह० शेती, गोरक्ष्य म्हणजे गुरेंढोरें पाळण्याचा धंदा, आणि वाणिज्य म्ह० व्यापार, हें वैश्याचें स्वभावजन्य कर्म होय. आणि तसेंच सेवा करणें हें शूद्राचें स्वभावजन्य कर्म होय.

§§ स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः ।
स्वकर्मनिरतः सिद्धिं यथा विंदति तच्छृणु ॥ ४५ ॥
यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततम् ।
स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विंदति मानवः ॥ ४६ ॥

चातुर्वर्ण्यव्यवस्था स्वभावजन्य गुणभेदानें निर्माण झालेली आहे; ही उपपत्ति गीतेंतच अपूर्व आहे असें नाहीं. महाभारतांत वनपर्वांत नहुषयुधिष्ठिर व द्विजव्याध-संवादांत (वन. १८० व २११), शान्तिपर्वांत भृगुभारद्वाजसंवादांत (शां. १८८), अनुशासनपर्वांत उमामहेश्वरसंवादांत (अनु. १४३), आणि अश्वमेधपर्वांत अनुगीतेंत (अश्व. ३९.११) हीच गुणभेदाची उपपत्ति थोड्याशा फरकानें आढळून येत्ये. जगांतील विविध व्यवहार प्रकृतीच्या गुणभेदानें चालले आहेत हें पूर्वींच सांगितलें आहे; आणि कोणी काय करावें हें ज्या चातुर्वर्ण्यव्यवस्थेनें ठरविलें जातें ती व्यवस्थाहि प्रकृतीच्या गुणभेदाचा परिणाम होय, असें सिद्ध केलें. आतां हींच कर्में प्रत्येकानें निष्काम बुद्धीनें म्ह० परमेश्वरार्पणबुद्धीनें केलीं पाहिजेत, एरवीं जग चालावयाचें नाहीं. आणि याप्रमाणें मनुष्य वागला म्हणजे त्यानेंच सिद्धि मिळत्ये, सिद्धि मिळण्यास दुसरें कोणतेंच अनुष्ठान करण्याची जरूर नाहीं, असें सांगतात—]

(४५) आपआपल्या (स्वभावजन्य गुणांप्रमाणें प्राप्त झालेल्या) कर्मांत जो पुरुष नित्य रत त्याला (यांनीच) परम सिद्धि प्राप्त होत्ये. आपल्या कर्मांत तत्पर राहिल्यानें सिद्धि कशी मिळत्ये तें ऐक. (४६) ज्याच्यापासून सर्व भूतांची प्रवृत्ति झाली व ज्यानें हें सर्व जग विस्तारिलें किंवा व्यापिलें आहे, त्याची पूजा आपल्यास (स्वधर्माप्रमाणें) प्राप्त झालेल्या कर्मांनीं (केवळ वाणीनें अगर पुष्पांनीं नव्हे) केली म्हणजे मनुष्याला (त्यानेंच) सिद्धि प्राप्त होत असत्ये.

§§ श्रेयान् स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।
स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥ ४७ ॥
सहजं कर्म कौंतेय सदोषमपि न त्यजेत् ।
सर्वारंभा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः ॥ ४८ ॥
असक्तबुद्धिः सर्वत्र जितात्मा विगतस्पृहः ।

[ चातुर्वर्ण्यप्रमाणें प्राप्त कर्में निष्काम बुद्धीनें किंवा परमेश्वरार्पण बुद्धीनें केलीं म्हणजे तें विराट्स्वरूपी परमेश्वराचें एकप्रकारचें यजन-पूजनच होतें व त्यामुळें सिद्धि मिळत्ये असें सांगितलें (गीतार. पृ. ४३५ ). आतां या गुणकर्मभेदामुळें जें त्याला स्वभावतःच प्राप्त झालें तें कर्तव्य दुसऱ्या एखाद्या दृष्टीनें कदाचित् सदोष, अश्लाघ्य, अवघड किंवा अप्रियहि असूं शकेल; उदा० प्रकृतस्थलीं क्षत्रियधर्मांत हत्या घडत असल्यामुळें तो सदोष वाटेल. तरी अशा वेळीं मनुष्यानें स्वधर्म सोडून देऊन दुसरा धर्म पत्करावा (गी. ३.३५), किंवा कांहीं झालें तरी स्वकर्मच करावें, आणि करावें म्हटल्यास कसें करावें याचें उत्तर या अध्यायांत प्रथम (१८.६) यज्ञयागादि कर्मांस अनुलक्षून जो न्याय सांगितला त्याच्याच अनुरोधानें आतां सांगतात—]

(४७) परक्याचा धर्म सुखानें आचरितां आला तरी त्यापेक्षां आपला धर्म म्हणजे चातुर्वर्ण्यविहित कर्म विगुण म्ह० सदोष असलें, तरी तेंच अधिक श्रेयस्कर आहे; आपलें स्वभावसिद्ध म्हणजे गुणस्वभावानुरूप निर्मिलेल्या चातुर्वर्ण्यव्यवस्थेनें नियमित झालेलें कर्म करीत असतां त्यांत (कोणतेंहि) पाप लागत नाहीं. (४८) जें कर्म सहज म्हणजे जन्मतःच गुणकर्मविभागामुळें नियत आहे, तें सदोष असलें तरी हे कौंतेया ! (कधींहि) सोडूं नये. कारण धुरानें ज्याप्रमाणें विस्तव त्याप्रमाणें सर्व आरंभ म्हणजे उद्योग ( कोणत्या ना कोणत्या तरी ) दोषानें व्यापिलेले अस-

नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति ॥ ४९ ॥

तात. (४९) (ह्मणून) कोठेंहि आसक्ति न ठेवतां मन ताब्यांत आणून निष्काम बुद्धीनें वागलें ह्मणजे (कर्मफलाच्या) संन्यासानें परम नैष्कर्म्य-सिद्धि प्राप्त होत्ये.

[ परक्याच्या धर्मापेक्षां स्वधर्म चांगला (गी. ३.३५), व नैष्कर्म्यसिद्धि मिळण्यास कर्में सोडण्याची जरूर नाहीं (गी. ३.४). वैगेरे पूर्वी आलेले विचारच या उपसंहारात्मक अध्यायांत आतां पुनः व्यक्त करून दाखविले आहेत. नैष्कर्म्य ह्मणजें काय व खरी नैष्कर्म्यसिद्धि कशाला ह्मणावें, याची फोड आह्मी गी. ३.४ वरील टीपेंत केली आहे ती पहा. संन्यासमार्गातील लोकांची दृष्टि केवळ मोक्षावर असत्ये, आणि भगवंतांची मोक्ष व लोकसंग्रह या दोहोंवरहि सारखीच असत्ये, हें लक्षांत ठेविलें म्हणजे या तत्त्वाचें महत्त्व सहज कळून येईल. लोकसंग्रहार्थ म्हणजे समाजाचें धारणपोषण होण्यास ज्ञानविज्ञानयुक्त पुरुष, किंवा रणांगणांत तरवार गाजविणारा शूर क्षत्रिय, यांच्याप्रमाणेंच शेतकरी, वाणी, उदमी, सुतार, लोहार, कुंभार किंबहुना मांसविक्रय करणारा व्याध याचीहि जरूर आहे. आणि कर्में सोडल्या-खेरीज मोक्ष मिळत नाहीं, असें म्हटलें म्हणजे या लोकांस आपआपले धंदे सोडून संन्यासी व्हावयास पाहिजे ! कर्मसंन्यासमार्गातील लोक याची फारशी परवा करीत नाहींत; पण गीतेची दृष्टि तशी संकुचित नाहीं. यासाठीं गीता असें सांगत्ये कीं, आपल्या अधिकाराप्रमाणें प्राप्त झालेला धंदा सोडून, दुसऱ्याचा धंदा चांगला म्हणून तो करूं लागणें योग्य नव्हे. धंदा कोणताहि घेतला तरी त्यांत कांहींना कांहीं तरी खोड सांपडणारच. उदाहरणार्थ ब्राह्मणाला विशेषेकरून विहित जी क्षान्ति ( १८.४२ ), त्यांतहि ' क्षमावान् पुरुषाला दुर्बल समजतात ' हा एक मोठा दोष आहे ( म. भा. शां. १६०.३४ ); आणि व्याधाच्या धंद्यांत मांसविक्रय करावा लागतो हेंहि संकटच होय ( म. भा. वन. २०६ ).

§§ सिद्धिं प्राप्तो यथा ब्रह्म तथाप्नोति निबोध मे ।
समासेनैव कौंतेय निष्ठा ज्ञानस्य या परा ॥ ५० ॥
बुद्ध्या विशुद्धया युक्तो धृत्यात्मानं नियम्य च ।
शब्दादीन्विषयांस्त्यक्त्वा रागद्वेषौ व्युदस्य च ॥ ५१ ॥

पण तेवढ्यासाठीं हीं कर्मं सोडून देणें बरोबर नाहीं. कोणत्याहि कारणानें कां होईना जें कर्म एकदां आपलें म्हणून पत्करिलें तें कितीहि कठिण वा अप्रिय असलें तरी आसक्ति सोडून केलेंच पाहिजे. कारण मनुष्याचा लहानमोठेपणा धंद्यावर अवलंबून नसून, ज्या बुद्धीनें तो सदर धंदा अगर कर्म करितो त्या बुद्धीवर त्याची योग्यता अध्यात्मदृष्ट्या अवलंबून आहे ( गी. २. ४९ ). ज्याचें मन शान्त असून ज्यानें सर्वभूतान्तर्गत ऐक्य ओळखिलें तो धंद्यानें अगर जातीनें व्यापारी असो वा खाटीक असो; निष्काम बुद्धीनें हे धंदे करणारा सदर पुरुष स्नानसंध्याशील ब्राह्मणाइतका किंवा शूर क्षत्रियाइतकाच थोर व मोक्षाला अधिकारी आहे. इतकेंच नव्हे तर कर्मं सोडिल्यानें जी सिद्धि मिळावयाची तीच निष्काम बुद्धीनें आपआपले धंदे करणारांस मिळते असें ४९ व्या श्लोकांत स्पष्ट म्हटलें आहे. भागवत धर्मांतील जें काय रहस्य तें हेंच होय; याप्रमाणें आचरण ठेवून हें तत्त्व अंमलांत आणणें अशक्य नाहीं हें महाराष्ट्रसंतमंडळीच्या इतिहासावरून उघड होतें ( गीतार. प्र. १३ पृ. ४३७ पहा ). आतां आपल्या कर्मांत तत्पर राहिल्यानेंच अखेर मोक्ष कसा मिळतो याचें वर्णन करितात —]

(५०) ( याप्रमाणें ) सिद्धि प्राप्त झाल्यावर ( त्या पुरुषाला ) ज्ञानाची परमावधीची निष्ठा जें ब्रह्म तें हे कौंतेया ! ज्या प्रकारें प्राप्त होतें तें मी थोडक्यांतच सांगतों ऐक. (५१) शुद्ध बुद्धीनें युक्त होत्साता धैर्यानें आपलें संयमन करून, शब्दादि ( इंद्रियांचे ) विषय सोडून, आणि प्रीति व

विविक्तसेवी लघ्वाशी यतवाक्कायमानसः।
ध्यानयोगपरो नित्यं वैराग्यं समुपाश्रितः॥ ५२॥
अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहम्।
विमुच्य निर्ममः शान्तो ब्रह्मभूयाय कल्पते॥ ५३॥
ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न कांक्षति।
समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते पराम्॥ ५४॥
भक्त्या मामभिजानाति यावान्यश्चास्मि तत्त्वतः।
ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनंतरम्॥ ५५॥
सर्वकर्माण्यपि सदा कुर्वाणो मद्व्यपाश्रयः।
मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम्॥ ५६॥

द्वेष दूर करून, (५२) 'विविक्त' म्हणजे निवडक किंवा एकान्त स्थळीं रहाणारा मिताहारी, काया वाचा व मन ज्याच्या ताब्यांत, आणि नित्य ध्यानयुक्त व विरक्त, (५३) ( तसेंच ) अहंकार, बल, दर्प, काम, क्रोध व परिग्रह म्हणजे पाश सोडून शान्त व ममत्वरहित झालेला, ब्रह्मभूत होण्यास समर्थ होतो. (५४) ब्रह्मभूत झाला म्हणजे प्रसन्नचित्त होऊन तो कशाची आकांक्षा धरीत नाहीं, व कशाचा द्वेषहि करीत नाहीं; आणि सर्वांभूतीं सम होऊन माझी परम भक्ती प्राप्त करून घेतो. (५५) भक्तीनें मी केवढा व कोण आहें याचें त्याला तात्त्विक ज्ञान होतें, आणि याप्रमाणें माझी तात्त्विक ओळख झाल्यावर तो माझे ठायींच प्रवेश करितो; (५६) आणि माझाच आश्रय करून सर्व कर्मे नेहमीं करीत असतांहि माझ्या अनुग्रहानें शाश्वत व अव्यय स्थान त्याला प्राप्त होतें.

[ वरील सिद्धावस्थेचें वर्णन कर्मयोग्याचें आहे, कर्म-संन्यास करणाऱ्या पुरुषाचें नव्हे, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. आरंभींच ४५ व ४९ ह्या श्लोकांत हें वर्णन आसक्ति सोडून कर्मे करणाराचें आहे असे म्हटलें असून शेवटीं "सर्व कर्मे करीत असतांहि" असे ५६ व्या श्लोकांत शब्द आहेत. भक्त

§§ चेतसा सर्वकर्माणि मयि संन्यस्य मत्परः।

किंवा त्रिगुणातीत यांचीं जीं वर्णनें आहेत त्यांसारखेंच हें वर्णन आहे किंबहुना कांहीं शब्दहि त्याच वर्णनांतून घेतलेले आहेत. उदाहरणार्थ ५३ व्या श्लोकांतला 'परिग्रह' शब्द सहाव्या अध्यायांत (५.१०) योग्याच्या वर्णनांत आला आहे; ५४ व्या श्लोकांतील "न शोचति न कांक्षति" हीं पदें बाराव्या अध्यायांतील भक्तिमार्गाच्या वर्णनांत आहेत. (१२.१७); आणि विविक्त ह्मणजे निवडक (एकान्त) स्थलीं रहाणें हे शब्द पूर्वी गी. १३.१० श्लोकांत आहेत. कर्मयोग्याला प्राप्त होणारी ही अखेरची स्थिती आणि कर्मसंन्यासाप्रमाणें प्राप्त होणारी अखेरची स्थिती, केवळ मानसिकदृष्ट्या, एकच असल्यामुळें, हीं वर्णनें आमच्याच मार्गांतील आहेत असें समजण्यास संन्यासमार्गांतील टीकाकारांस सवड झाली आहे. परंतु हा मार्ग खरा नव्हे हें पूर्वी अनेक वेळां सांगितलें आहे. असो. संन्यास ह्मणजे कर्म सोडणें नव्हे, फलाशेच्या त्यागास संन्यास ह्मणावयाचें असा संन्यास या शब्दाचा अर्थ करून, अन्नत्यागादि कर्में काम्य असोत, नित्य असोत वा नैमित्तिक असोत, तीं इतर सर्व कर्मा-प्रमाणेंच फलाशा सोडून उत्साहानें व समतेनें केलीं पाहिजेत असें या अध्यायाचे आरंभीं प्रतिपादन केलें आणि नंतर जगांतील कर्म, कर्ता, बुद्धि वगैरे विषय गुणभेदानें नानाविध असले तरी त्यांत सात्त्विक श्रेष्ठ असें दाखवून, चातुर्वर्ण्यव्यवस्थेनें स्वधर्माप्रमाणें प्राप्त झालेलीं सर्व कर्में आसक्तिविरहित होऊन केल्यानें त्यांतच परमेश्वराचें यजन पूजन घडून क्रमाक्रमानें त्यानेंच अखेर परब्रह्माची किंवा मोक्षाची प्राप्ति होत्ये, मोक्षासाठीं दुसरें अनुष्ठान करावयास नको, किंवा कर्मत्याग-रूप संन्यासहि घ्यावयास नको, एका कर्मयोगानेंच मोक्षासुद्धां सर्व सिद्धि प्राप्त होतात, असा गीताशास्त्राचा इत्यर्थ सांगितला. आतां हाच कर्मयोगमार्ग स्वीकारण्याबद्दल अर्जुनास पुनः अखेरचा उपदेश करितात—]

बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चित्तः सततं भव ॥ ५७ ॥
मच्चित्तः सर्वदुर्गाणि मत्प्रसादात्तरिष्यसि ।
अथ चेत्त्वमहंकारान्न श्रोष्यसि विनंक्ष्यसि ॥ ५८ ॥
§§ यदहंकारमाश्रित्य न योत्स्य इति मन्यसे ।
मिथ्यैष व्यवसायस्ते प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति ॥ ५९ ॥
स्वभावजेन कौंतेय निबद्धः स्वेन कर्मणा ।
कर्तुं नेच्छसि यन्मोहात्करिष्यस्यवशोऽपि तत् ॥ ६० ॥

(५७) मनानें सर्व कर्में मला संन्यस्य म्ह० अर्पण करून मत्परायण होत्साता (साम्य) बुद्धियोगाच्या आश्रयानें माझ्या ठायीं नेहमीं चित्त ठेव.

[ 'बुद्धियोग' शब्द पूर्वीं दुसऱ्याच अध्यायांत आला आहे (२.४९), व तेथें त्याचा अर्थ फलाशेच्या ठिकाणीं बुद्धि न ठेवितां कर्में करण्याची युक्ति किंवा समत्वबुद्धि असा आहे. हाच अर्थ प्रकृतस्थलींहि विवक्षित असून कर्मापेक्षां बुद्धि श्रेष्ठ म्हणून दुसऱ्या अध्यायांत जें तत्त्व सांगितलें त्याचाच हा उपसंहार आहे. कर्मसंन्यास म्हणजे काय हेंहि यांतच "मनानें (म्ह० साक्षात् कर्मत्यागानें नव्हे तर केवळ बुद्धीनें) मला सर्व कर्में अर्पण करून" या शब्दांनीं सांगितलें असून तोच अर्थ मागें गीता ३. ३० व ५. १३ यांत वर्णिला आहे. ]

(५८) माझ्या ठायीं चित्त ठेविलेंस म्हणजे तूं माझ्या अनुग्रहानें सर्व संकटें म्हणजे कर्मांचीं शुभाशुभ फलें तरून जाशील. पण अहंकारानें माझें न ऐकशील तर (मात्र) नाश पावशील.

[ ५८ व्या श्लोकाचे अखेर अहंकाराचा जो परिणाम सांगितला त्याचा आतां जास्त खुलासा करितात— ]

(५९) मी लढणार नाहीं असें जें तूं अहंकारानें मानीत आहेस, तो तुझा निश्चय फुकट आहे. प्रकृति म्ह० स्वभाव तुला तें करावयास लावील. (६०) हे कौंतेया ! आपल्या स्वभावजन्य कर्मानें बद्ध झाल्यामुळें मोहानें

ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ।
भ्रामयन्सर्वभूतानि यंत्रारूढानि मायया ॥ ६१ ॥
तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत ।
तत्प्रसादात्परां शान्तिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतम् ॥ ६२ ॥
इति ते ज्ञानमाख्यातं गुह्याद्गुह्यतरं मया ।
विमृश्यैतदशेषेण यथेच्छसि तथा कुरु ॥ ६३ ॥

जें तूं करूं इच्छित नाहींस तेंच परतंत्र ( म्ह० प्रकृतीच्या स्वाधीन ) होऊन तुला करावें लागेल. (६१) हे अर्जुना ! ईश्वर सर्व भूतांच्या हृदयांत राहून यंत्रावर चढविल्याप्रमाणें सर्व भूतांना ( आपल्या ) मायेनें चाळवीत असतो. (६२) म्हणून हे भारता ! सर्व भावानें त्यालाच शरण जा. त्याच्या अनुग्रहानें परम शान्ति व नित्यस्थान तुला प्राप्त होईल. (६३) याप्रमाणें गुह्यांतलें गुह्य असें हें ज्ञान तुला मीं सांगितलें. याचा पूर्ण विचार करून तुझ्या इच्छेस येईल तें कर.

[ वरील श्लोकांत कर्मपारतंत्र्याचें जें गूढ तत्त्व सांगितलें आहे त्याचा विचार गीतारहस्याच्या १० व्या प्रकरणांत सविस्तर केलेला आहे तो पहा. आत्मा हा स्वतः जरी स्वतंत्र आहे तरी जगाच्या म्हणजे प्रकृतीच्या व्यवहाराकडे नजर दिली असतां असें आढळून येतें कीं, कर्माचें जें रहाटगाडगें अनादि कालापासून चालत आहे त्यावर आत्म्याची कांहीं सत्ता नाहीं. आपण न इच्छितां किंबहुना आपल्याला नको असतांहि शेंकडों, हजारों गोष्टी, जगांत चालल्या असून त्यांच्या व्यापाराचे परिणामहि आपणावर घडत असतात, किंवा त्या व्यापारांतलाच कांहीं भाग आपणांस करावा लागतो, नाहीं म्हणून चालत नाहीं. अशा वेळीं शहाणा पुरुष, आपली बुद्धि निर्मल ठेवून, आणि सुख व दुःख सारखेंच समजून हीं कामें करीत असतो, आणि मूर्ख त्यांचे पाशांत गुंततो, हा दोघांच्या वर्तनांतला महत्त्वाचा भेद आहे. " भूतें आपल्या प्रकृ-

§§ सर्वगुह्यतमं भूयः शृणु मे परमं वचः ।
इष्टोऽसि मे दृढमिति ततो वक्ष्यामि ते हितम् ॥ ६४ ॥

तीच्या वळणावर जातात, तेथें निग्रह चालत नाहीं" (गी ३. ३३) असें भगवंतांनीं तिसऱ्याच अध्यायांत सांगितलें आहे. अशा वेळीं कर्मांच्या ठायीं आसक्ति ठेवूं नका, यापलीकडे मोक्षशास्त्र किंवा नीतिशास्त्र जास्त कांहीं सांगूं शकत नाहीं. अध्यात्मदृष्ट्या हा विचार झाला. परंतु भक्तिदृष्ट्या प्रकृति तरी ईश्वराचाच अंश होय. म्हणून हाच सिद्धान्त ६१ व ६२ या श्लोकांत ईश्वराकडे सर्व कर्तृत्व देऊन येथें सांगितला आहे. जगांत जे कांहीं व्यवहार चालू आहेत ते परमेश्वर आपणास पाहिजे तसे करून घेत आहे. सबब अहंकारबुद्धि सोडून शहाण्या पुरुषानें आपल्याला सर्वस्वी परमेश्वराच्याच हवालीं करणें योग्य होय. ६३ व्या श्लोकांत "तुझ्या इच्छेस येईल तें कर" असें भगवंतांनीं म्हटलें आहे खरें; पण त्याचा अर्थ फार खोल आहे. ज्ञानानें किंवा भक्तीनें बुद्धि साम्यावस्थेस पोंचली म्हणजे वाईट इच्छाच शिल्लक रहात नसल्यामुळें अशा ज्ञानी पुरुषाचें 'इच्छास्वातंत्र्य' त्यास किंवा जगास कधींच अपायकारक होऊं शकत नाहीं. म्हणून "हें ज्ञान तूं समजून घेतलेंस (विमृश्य) म्हणजे तूं स्वयंप्रकाश होशील, व नंतर (आधीं नव्हे) तूं स्वेच्छेनें जें कर्म करशील तेंच धर्म्य व प्रमाण होईल; आणि अशा प्रकारची स्थितप्रज्ञाची अवस्था तुला प्राप्त झाल्यावर तुझ्या इच्छेला आळा घालण्याची जरूर रहाणार नाहीं," असा त्यांतील खरा भावार्थ आहे. असो; ज्ञानापेक्षां गीतेंत भक्तीलाच विशेष महत्त्व दिलें आहे हें रहस्याच्या १४ व्या प्रकरणांत आम्हीं दाखविलें आहे. या सिद्धान्ताला अनुसरून एकंदर गीताशास्त्राचा आतां भक्तिपर उपसंहार करितात— ]

(६४) सर्व गुह्यांतलें गुह्य अशी अखेरची एक गोष्ट पुनः मी सांगतों ऐक. तूं माझा अत्यंत आवडता आहेस म्हणून तुझ्या हिताची

मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।
मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे ॥ ६५ ॥
सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज ।
अहं त्वां सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ॥ ६६ ॥

ही गोष्ट तुला सांगणार आहें. (६५) माझ्या ठायीं मन ठेव, माझा भक्त हो, माझें यजन कर, आणि मला वंदन कर. ( म्हणजे ) तूं मलाच येऊन मिळशील, हें सत्य प्रतिज्ञेनें मी तुला सांगतों, ( कारण ) माझा तूं आवडता (भक्त) आहेस. (६६) सर्व धर्म सोडून तूं मला एकट्यालाच शरण ये. मी तुला सर्व पापांपासून मुक्त करीन, भिऊं नको.

[ केवळ ज्ञानमार्गांतील टीकाकारांस हा भक्तिपर उपसंहार गोड वाटत नाहीं. म्हणून धर्म या शब्दांतच अधर्माचा समावेश करून " धर्म व अधर्म, कृत व अकृत, भूत व भव्य हीं सर्व टाकून देऊन त्यांचे पलीकडचें परब्रह्म ओळख, " असा जो कठोपनिषदांत उपदेश आहे ( कठ. २.१४ ) त्याशीं हा श्लोक समानार्थक असून यांत निर्गुण ब्रह्माला शरण जाण्यास सांगितलें आहे, असें ते म्हणतात. कठोपनिषदांतील श्लोक महाभारतांतहि निर्गुण ब्रह्माच्या वर्णनांत आला आहे ( शां. ३२९.४०;३३१.४४ ). पण दोन्ही ठिकाणीं धर्म आणि अधर्म अशीं ज्याप्रमाणें स्पष्ट पदें आहेत, तशीं गीतेंत नाहींत, गीतेंला निर्गुण ब्रह्म मान्य असून तेंच परमेश्वराचें श्रेष्ठ स्वरूप होय असा गीतेत निर्णय केला आहे, हें खरें आहे ( गीता ७.२४. ) तथापि व्यक्तोपासना सुलभ व श्रेष्ठ असाहि गीतेचा सिद्धान्त असल्यामुळें ( १२.५ ), व भगवान श्रीकृष्ण येथें स्वतःच्या व्यक्त रूपालाच उद्देशून बोलत असल्यामुळें, हा उपसंहार भक्तिपरच आहे, असें आमचें कायमचें मत आहे. अर्थात् निर्गुण ब्रह्म या ठिकाणीं विवक्षित नसून धर्म या शब्दानें अहिंसाधर्म, सत्यधर्म, मातृपितृसेवाधर्म, गुरुसेवाधर्म, यज्ञयागधर्म, दानधर्म, संन्यासधर्म

§§ इदं ते नातपस्काय नाभक्ताय कदाचन।
न चाशुश्रूषवे वाच्यं न च मां योऽभ्यसूयति ॥ ६७ ॥
य इदं परमं गुह्यं मद्भक्तेष्वभिधास्यति।
भक्तिं मयि परां कृत्वा मामेवैष्यत्यसंशयः ॥ ६८ ॥
न च तस्मान्मनुष्येषु कश्चिन्मे प्रियकृत्तमः।
भविता न च मे तस्मादन्यः प्रियतरो भुवि ॥ ६९ ॥

इत्यादि परमेश्वरप्राप्तीचे जे अनेक मार्ग शास्त्रांतून सांगितले आहेत तेच येथें अभिप्रेत आहेत, असें ह्मटलें पाहिजे; आणि महाभारताच्या शांतिपर्वांत (शां. ३५४) व अनुगीतेंत (अश्व. ४९) या विषयाची जेथें चर्चा आली आहे तेथें याच मोक्षोपायांचा धर्म शब्दानें उल्लेख केलेला आहे. पण असल्या धर्मांच्या भानगडींत न पडतां "मला एकट्याला भज, मी तुला तारीन, भिऊं नको," असें भगवंतांचें या ठिकाणीं गीतेंतील प्रतिपाद्य धर्मास उद्देशून निश्चयात्मक सांगणें आहे (गीतार. प्र. १३ पृ ४३८ व ४३९ पहा). सारांश, माझी दृढ भक्ति करून मत्परायण बुद्धीनें स्वधर्माप्रमाणें प्राप्त झालेलीं कर्में करीत जा, ह्मणजे इहलोकीं व परलोकीं उभयत्र तुमचें कल्याण होईल, भिऊं नका, असें अर्जुनाला निमित्त करून भगवान अखेर सर्वांसच आश्वासन देत आहेत. यासच कर्मयोग असें ह्मणतात; व हेंच सर्व गीताधर्मांचें सार होय. आतां या गीताधर्माची, ह्मणजे ज्ञानमूलक व भक्तिप्रधान कर्मयोगाची, परंपरा पुढें कशी चालू ठेवावी हें सांगतात—]

(६७) हें (गुह्य) ज्याला तप नाहीं, भक्ति नाहीं व ऐकण्याची इच्छा नाहीं, तसेंच जो माझी निंदा करितो त्याला तूं कधींहि सांगू नको. (६८) जो हें परम गुह्य माझ्या भक्तांना कळवील, त्याची माझ्या ठायीं परम भक्ति होऊन तो मलाच येऊन पोंचेल यांत संशय नाहीं. (६९) आणि त्याच्यापेक्षां माझें जास्त प्रिय करणारा सर्व मनुष्यांत दुसरा कोणीहि

§§ अध्येष्यते च य इमं धर्म्यं संवादमावयोः ।
ज्ञानयज्ञेन तेनाहमिष्टः स्यामिति मे मतिः ॥ ७० ॥
श्रद्धावाननसूयश्च श्रृणुयादपि यो नरः ।
सोऽपि मुक्तः शुभाँल्लोकान्प्राप्नुयात्पुण्यकर्मणाम् ॥ ७१ ॥
§§ कच्चिदेतच्छ्रुतं पार्थ त्वयैकाग्रेण चेतसा ।
कच्चिदज्ञानसंमोहः प्रनष्टस्ते धनंजय ॥ ७२ ॥

अर्जुन उवाच ।

नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाच्युत ।
स्थितोऽस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव ॥ ७३ ॥

मिळणार नाहीं, आणि या भूमींत त्याच्यापेक्षां मला जास्त आवडता कोणी होणार नाहीं.

[ परंपरा राखण्याच्या या उपदेशाला जोडूनच आतां फलश्रुति सांगतात—]

(७०) आमच्या दोघांच्या या धर्मसंवादाचें जो कोणी अध्ययन करील त्यानें ज्ञानयज्ञानें माझी पूजा केल्यासारखें होईल, असें मी समजेन. (७१) तसेंच दोष न काढितां श्रद्धेनें जो जो कोणी हें ऐकेल तोहि ( पापांपासून ) मुक्त होऊन पुण्यवान लोकांना प्राप्त होणाऱ्या शुभ लोकांप्रत जाऊन पोंचेल.

[ याप्रमाणें उपदेश समाप्त झाला. आतां हा धर्म अर्जुनास नीट कळला कीं नाहीं हें पहाण्यासाठीं भगवान त्यास असें विचारितात कीं—]

(७२) हे पार्था ! तूं हें एकाग्र चित्तानें ऐकलेंस ना ? ( आणि ) तुझा अज्ञानरूपी मोह हे धनंजया ! आतां अगदीं नष्ट झाला ना ? अर्जुन म्हणाला–(७३) हे अच्युता ! तुमच्या प्रसादानें मोह नष्ट झाला; आणि

संजयउवाच ।

§§ इत्यहं वासुदेवस्य पार्थस्य च महात्मनः ।
संवादमिममश्रौषमद्भुतं रोमहर्षणम् ॥ ७४ ॥
व्यासप्रसादाच्छ्रुतवानेतद् गुह्यमहं परम् ।
योगं योगेश्वरात्कृष्णात्साक्षात्कथयतः स्वयम् ॥ ७५ ॥

मला ( कर्तव्यधर्माची ) स्मृति झाली, मी ( आतां ) निसंदेह होऊन राहिलों आहे. तुमच्या म्हणण्याप्रमाणें ( युद्ध ) करितों.

[ गीताधर्मांतहि संसार सोडण्यास सांगितलें आहे अशी ज्यांची सांप्रदायिक समजूत आहे त्यांनीं शेवटच्या म्ह० ७३ व्या श्लोकाची बरीच निराधार ओढाताण केली आहे. अर्जुनाला कशाची स्मृति राहिली नव्हती तें पाहूं गेलें, तर दुसऱ्या अध्यायांत ( २.७ ) "माझा धर्म किंवा कर्तव्य माझ्या मनाला कळत नाहींसें झालें आहे" ( धर्मसंमूढचेताः ), असें त्यानें म्हटलेलें आढळून येतें; आणि त्याच कर्तव्यधर्माची आतां त्याला स्मृति झाली असा वरील श्लोकाचा सरळ अर्थ आहे. अर्जुनाला युद्धास प्रवृत्त करण्यासाठीं गीता उपदेशिली असून जागोजाग "म्हणून तूं युद्ध कर" असें सांगितलें असल्यामुळें ( गी. २.१८; २.३७; ३.३०; ८.७; ११.३४ ) "तुमच्या म्हणण्याप्रमाणें करितों" याचा अर्थ "युद्ध करितों" असाच होतो. असो; श्रीकृष्णार्जुनसंवाद संपला; आतां महाभारतांतील कथासंदर्भाप्रमाणें धृतराष्ट्राला ही कथा सांगितल्यावर संजय आपला उपसंहार करितो—]

संजय म्हणला—( ७४ ) याप्रमाणें अंगावर रोमांच उभे करणारा वासुदेव व महात्मा अर्जुन यांचा हा अद्भुत संवाद मी ऐकिला. ( ७५ ) व्यासांच्या अनुग्रहामुळें हें परम गुह्य म्हणजे योग अर्थात् कर्मयोग साक्षात् योगेश्वर श्रीकृष्ण स्वतः सांगत असतां मला ऐकावयास मिळाला.

राजन्संस्मृत्य संस्मृत्य संवादमिममद्भुतम्।
केशवार्जुनयोः पुण्यं हृष्यामि च मुहुर्मुहुः ॥ ७६ ॥

[ व्यासांनीं संजयाला दिव्य दृष्टि दिली होती म्हणून रणभूमीवर जें काय घडे तें बसल्या ठिकाणींच त्याला प्रत्यक्ष दिसे, व त्याप्रमाणें तो धृतराष्ट्राला कळवी, हें आरंभींच सांगितलें आहे. श्रीकृष्णांनीं जो 'योग' सांगितला तो कर्मयोग असून (गी. ४.१–३) अर्जुनानें पूर्वीं त्याला 'योग' ( साम्ययोग ) असें म्हटलें आहे (गी. ६.३३ ); आणि आतां संजयहि श्रीकृष्णार्जुनांच्या संवादास 'योग' हेंच नांव या श्लोकांत देत आहे. यावरून श्रीकृष्ण, अर्जुन व संजय या तिघांच्याहि मतें 'योग' म्हणजे कर्मयोग हाच गीतेंतील प्रतिपाद्य विषय आहे हें उघड होतें आणि अध्यायसमाप्तिसूचक संकल्पांतहि तोच म्हणजे 'योगशास्त्र' हा शब्द आलेला आहे. परंतु योगेश्वर या पदांत 'योग' शब्दाचा अर्थ याहून व्यापक आहे. योग म्हणजे एखादें कर्म करण्याची युक्ति, कौशल, शैली असा सामान्य अर्थ आहे. याच अर्थी बहुरूपी आपली सोंगें योगानें म्ह० कौशलानें आणितो असें म्हणतात. पण कर्म करण्याच्या ज्या या युक्त्या त्यांत श्रेष्ठ कोणती हें पाहूं गेलें तर परमेश्वर मूळांत अव्यक्त असतां तो ज्या युक्तीनें स्वतःलाच व्यक्त स्वरूप देतो, ती युक्ति किंवा योग सर्वांत श्रेष्ठ होय असें म्हणावें लागतें. गीतेंत यालाच 'ईश्वरी योग' (गी. ९; ११.८) असें म्हटलें आहे; व वेदान्तांत ज्याला माया म्हणतात ती हीच होय (गी. ७. २५). हा अलौकिक किंवा अघटित योग ज्याला साधला त्याला बाकीच्या युक्त्या म्हणजे हाताचा मळ होय. परमेश्वर या योगांचा किंवा मायेचा अधिपति आहे, म्हणून त्यास योगेश्वर म्हणजे योगांचा स्वामी हें नांव पडलें आहे. योग म्हणजे पातंजल योग हा अर्थ 'योगेश्वर' शब्दांत विवक्षित नाहीं. ]

(७६) हे राजा ( धृतराष्ट्रा! ) केशव व अर्जुन या दोघांच्या या

तच्च संस्मृत्य संस्मृत्य रूपमत्यभ्दुतं हरेः।
विस्मयो मे महान् राजन् हृष्यामि च पुनः पुनः ॥७७॥
यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः।
तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ॥ ७८ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुन-संवादे मोक्षसंन्यासयोगो नाम अष्टादशोऽध्यायः ॥ १८ ॥

अभ्दुत व पुण्यकारक संवादाची आठवण होऊन होऊन मला पुनःपुनः हर्ष होत आहे; (७७) आणि श्रीहरीचें तें अत्यद्भुत विश्वरूप मनांत येऊन येऊन हे राजा! मला मोठा विस्मय वाटतो व पुनः हर्ष होतो! (७८) जिकडे योगेश्वर श्रीकृष्ण व जिकडे धनुर्धर अर्जुन तिकडेच श्री, विजय, शाश्वत ऐश्वर्य व नीति, असें माझें मत आहे.

[ सारांश, ज्या ठिकाणीं युक्ति व शक्ति एकत्र झाली तेथें ऋद्धिसिद्धि निश्चित वास करितात, नुसत्या शक्तीनें अगर युक्तीनें नेहमीं काम भागत नाहीं हा सिद्धान्त होय. जरासंधवधार्थ मसलत चालली असतां युधिष्ठिरानें श्रीकृष्णास "अनयं बलं जडं प्राहुः प्रणेतव्यं विचक्षणैः" (सभा. २०. १६)–बळ आंधळें व जड आहे त्याला शहाण्यांनीं मार्ग दाखविला पाहिजे—असें सांगितलें आहे; व श्रीकृष्णानींहि "मयि नीतिर्बलं भीमे" (सभा. २०. ३)=माझे ठायीं नीति व भीमाचे अंगांत बल असें म्हणून भीमसेनाला बरोबर घेऊन त्याच्याकडून जरासंधाचा वध युक्तीनें करविला आहे केवळ नीति सांगणारा अर्धा शहाणा समजावयाचा. अर्थात् योगेश्वर म्हणजे योग अथवा युक्ति यांचा ईश्वर आणि धनुर्धर म्हणजे योद्धा, असे अर्थ असून हीं दोन्ही विशेषणें या श्लोकांत सहेतुक योजिलेलीं आहेत. ]

याप्रमाणें श्रीभगवंतांनीं गाइलेल्या म्हणजे सांगितलेल्या उपनिषदांत ब्रह्मविद्यान्तर्गत योग—म्हणजे कर्मयोग—शास्त्रावरील श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या संवादांतील मोक्षसंन्यासयोग नांवाचा अठरावा अध्याय समाप्त झाला.

[ मोक्षसंन्यासयोग या शब्दांत 'संन्यास' शब्दाचा अर्थ या अध्यायाच्या आरंभीं सांगितल्याप्रमाणें 'काम्य कर्मांचा संन्यास' असा आहे, चतुर्थाश्रमरूपी संन्यास हा अर्थ विवक्षित नाहीं, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. स्वकर्म न सोडितां त्याचा परमेश्वराच्या ठायीं मनानें संन्यास म्हणजे अर्पण केल्यानें मोक्ष मिळतो, असें या अध्यायांत प्रतिपादन असल्यामुळें, याला मोक्षसंन्यासयोग हें नांव दिलें आहे. ]

येणेंप्रमाणें बाळ गंगाधर टिळककृत श्रीमद्भगवद्गीतेचें रहस्यसंजीवन नांवाचें प्राकृत भाषान्तर व टीका समाप्त झाली.

महाराष्ट्रीं बाळ द्विज—कुलज गंगाधर—सुत ।
वसे पुण्यक्षेत्रीं टिळक उपनामें श्रुतिरत ॥
रहस्या गीतेच्या प्रकटवुनि अष्टादशशतीं ।
समर्पी श्रीशातें सदतसि—युतीं तो शकमितीं ॥

॥ ॐ तत्सद्ब्रह्मार्पणमस्तु ॥

॥ शान्तिः पुष्टिस्तुष्टिश्चास्तु ॥

---

# गीतेंतील श्लोकांची सूची.

## द

# उपोद्घातांतील चुकांची दुरुस्ती.

| ुद्ध. | पृ. | ओ. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| लौकिक | ३ | ४ | ऐहलौकिक |
| आहेत जेथें | ४ | १५ | जेथें आहेत तेथें |
| ब | ५ | ११ | व |

## गीतेच्या अध्यायांतील विषयांच्या श्लोकवार अनुक्रमणिकेंतील अशुद्धें.

| शुद्ध. | पृ. | ओ. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ाणें | ६ | १९ | प्रमाणें |
| ल्प चरणहि | ७ | २ | स्वल्पाचरणहि |
| ़भवी | ८ | १६ | तद्भावीं |
| क्षपद | ८ | २० | मोक्षप्रद |
| त्म्यानें | ९ | १ | आत्म्याचें |
| ाजतात | ९ | १ | समजतात |
| त्यातिक | ९ | १४ | आत्यंतिक |
| मौपम्यबुद्धि | ९ | १६ | आत्मौपम्यबुद्धि |
| र्मयोगा सिद्धयर्थ | ९ | २३ | कर्मयोगासिद्धयर्थ |
| ल्यनें | १० | ३ | गेल्यानें |
| धियज्ञ | १० | १३ | अधियज्ञ |
| तकलीं | १० | १५ | अंतका |
| ंकराचें | १० | १६ | |
| गचिंतनानें | १० | १७ | |
| ानविज्ञनयुक्त | १० | २६ | |
| ानवानच | ११ | १९ | |

| अशुद्ध. | पृ. | ओ. | शुद्ध. |
| --- | --- | --- | --- |
| दाखविबद्दल | ११ | २४—२५ | दाखविण्याबद्दल |
| अव्यक्तेपासना | १२ | १३ | अव्यक्तोपासना |
| क्षेत्रक्षेत्रज्ञाविभागयोग | १२ | २० | क्षेत्रक्षेत्रज्ञविभागयोग |
| असला निर्लेप | १३ | ६ | असला तरी निर्लेप |
| प्रकृतिही | १३ | १० | प्रकृती ही |
| एककेच | १३ | १२ | एकेकच |
| झाल्यानें व | १३ | १४ | झाल्यानें |
| त्रिवेध | १४ | २ | त्रिविध |
| कर्मसग्रह | १६ | २४ | कर्मसंग्रह |
| आत्माबुद्धिप्रसादज | १५ | ४ | आत्मबुद्धिप्रसादज |
| निःसंम | १६ | ८ | निःसंग |

# शुद्धिपत्र.

## (१) श्रीमद्भगवद्गीतेतील श्लोकांचे शुद्धिपत्र.

### अध्याय १

| अशुद्ध. | पृ. | श्लो. | ओ. | शुद्ध. |
|---|---|---|---|---|
| युयुत्सवा: | १ | १ | १ | युयुत्सवः |
| पुरुचित् | ३ | ५ | २ | पुरुजित् |
| भावान् | ४ | ८ | १ | भवान् |
| यं | ९ | २२ | १ | य |
| सर्वान्बधून | ११ | २७ | २ | सर्वान्बंधून |
| भोगैः | ११ | ३२ | २ | किं भोगैः |
| बांधमान् | १२ | ३७ | १ | बांधवान् |

### अध्याय २

| अशुद्ध. | पृ. | श्लो. | ओ. | शुद्ध. |
|---|---|---|---|---|
| धार्तराष्ट्रः | १९ | ६ | २ | धार्तराष्ट्राः |
| कर्तुमर्हसि | २७ | १७ | २ | कर्तुमर्हति |
| नित्यस्योक्ता | २७ | १८ | १ | नित्यस्योक्ताः |
| युद्धाच्छोयो | ३३ | ३१ | २ | युद्धाच्छ्रेयो |
| यदृच्छ या | ३४ | ३२ | १ | यदृच्छया |
| भूत्वा | ३५ | ३५ | २ | भूत्वा |
| प्रहास्याति | ३६ | ३९ | २ | प्रहास्यसि |
| ह्यानंताश्च | ३७ | ४१ | २ | ह्यनंताश्च |
| संगोस्त्व | ४४ | ४७ | २ | संगोऽस्त्व |
| योनस्थः | ४५ | ४८ | १ | योगस्थः |

| अशुद्ध. | पृ. | श्लो. | ओ. | शुद्ध |
|---|---|---|---|---|
| मनीपिणीः | ४८ | ५१ | १ | मनीषिणः |
| गच्छंन्त्यनामयम् | ४९ | ५१ | २ | गच्छन्त्यनामयम् |
| र्व्यतितारिष्यति | ४९ | ५२ | १ | र्व्यतितरिष्यति |
| श्रुतस्य | ४९ | ५२ | २ | श्रुतस्य |
| बृद्धिः | ५४ | ६५ | २ | बुद्धिः |
| अपूर्यमाण | ५६ | ७० | १ | आपूर्यमाण |
| निमर्मो | ५७ | ७१ | २ | निर्ममो |

## अध्याय ३

| अशुद्ध. | पृ. | श्लो. | ओ. | शुद्ध |
|---|---|---|---|---|
| कर्मयोगेण | ६० | ३ | २ | कर्मयोगेन |
| नैप्कर्म्यं | ६१ | ४ | १ | नैष्कर्म्यं |
| पुरुषोऽश्नुते | ६१ | ४ | १ | पुरुषोऽश्नुते |
| गच्छाति | ६१ | ४ | २ | गच्छति |
| रक्षणमाणि | ६१ | ५ | १ | रक्षणमपि |
| ज्यायो | ६४ | ८ | १ | कर्म ज्यायो |
| ह्यक॰णाः | ६४ | ८ | १ | ह्यकर्मणः |
| दूकर्मणाः | ६५ | ८ | २ | दकर्मणः |
| वशमागच्छे | ८४ | ३४ | २ | वशमागच्छे |
| तस्मात्व | ८८ | ४१ | १ | तस्मात्त्व |

## अध्याय ४

| अशुद्ध. | पृ. | श्लो. | ओ. | शुद्ध |
|---|---|---|---|---|
| परंतम | ९४ | ५ | २ | परंतप |
| स्वामधिष्टाय | ९४ | ६ | २ | स्वामधिष्ठाय |
| तत्वतः | ९६ | ९ | १ | तत्त्वतः |
| बोधव्यं | १०० | १७ | १ | बोद्धव्यं |
| प्राणेपानं | १०९ | २९ | १ | प्राणेऽपानं |

| अशुद्ध. | पृ. | श्लो. | ओ. | शुद्ध. |
|---|---|---|---|---|
| रुद्ध्वां | ११० | २९ | २ | रुद्ध्वा |
| ज्ञांनं | ११६ | ३९ | १ | ज्ञानं |

अध्याय ५

| | | | | |
|---|---|---|---|---|
| गृह्णन् | १२३ | ९ | १ | गृह्णन् |
| मिषन्नपि | १२३ | ९ | १ | न्निमिषन्नपि |
| सन्यास्यास्ते | १२५ | १३ | १ | सन्यस्यास्ते |
| विंदंत्यात्मनि | १२८ | २१ | १ | विंदत्यात्मनि |
| सोढ्ढुं | १२८ | २३ | १ | सोढुं |
| याऽतः | १२९ | २४ | १ | योऽतः |

अध्याय ६

| | | | | |
|---|---|---|---|---|
| प्राहुंर्योगं | १३२ | २ | १ | प्राहुर्योगं |
| तिष्टते | १४४ | १८ | १ | तिष्ठते |
| प्रभावान् | १४६ | २४ | १ | प्रभवान् |
| ततस्तता | १४६ | २६ | २ | ततस्ततो |
| स्थितिं | १५० | ३३ | २ | स्थितिं |
| ह्रियते | १५४ | ४४ | १ | ह्रियते |

अध्याय ७

| | | | | |
|---|---|---|---|---|
| सहस्त्रेपु | १६२ | ३ | १ | सहस्रेषु |
| नराधमा | १६८ | १५ | १ | नराधमाः |
| नियतः | १७१ | २० | २ | नियताः |

अध्याय ८

| | | | | |
|---|---|---|---|---|
| स्मेरद्यः | १८५ | ९ | १ | स्मरेद्यः |
| वितरागाः | १८५ | ११ | १ | वीतरागाः |
| द्व्यक्रयः | १८८ | १८ | १ | द्व्यक्तयः |

| अशुद्ध. | पृ. | श्लो. | ओ. | शुद्ध. |
|---|---|---|---|---|
| ज्ञोति | १९० | २५ | २ | ज्योति |

अध्याय ९

| अशुद्ध. | पृ. | श्लो. | ओ. | शुद्ध. |
|---|---|---|---|---|
| शश्वच्छान्ति | २०८ | ३० | २ | शश्वच्छान्तिं |
| व्यापाश्रित्य | २०८ | ३२ | १ | व्यपाश्रित्य |

अध्याय १०

| अशुद्ध. | पृ. | श्लो. | ओ. | शुद्ध. |
|---|---|---|---|---|
| अहमादिर्हि | २१२ | २ | २ | अहमादिर्हि |
| नारद | २११ | १३ | १ | नारद |
| उश्चै: | २२४ | २७ | १ | उच्चै: |
| वज्रं | २२४ | २८ | १ | वज्रं |
| स्रोतसा | २२५ | ३१ | २ | स्रोतसा |
| जाह्नवि | २२५ | ३१ | २ | जाह्नवी |
| अथवा | २२८ | ४२ | १ | अथ वा |

अध्याय ११

| अशुद्ध. | पृ. | श्लो. | ओ. | शुद्ध. |
|---|---|---|---|---|
| त्वत्त: | २२९ | २ | २ | त्वत्त: |
| जगत्कृस्नं | २३१ | ७ | १ | जगत्कृत्स्नं |
| मेनका | २३२ | १० | १ | मनेका |
| तत्रकैस्थं | २३२ | १३ | १ | तत्रैकस्थं |
| मिह:प्रवृत्तः | २३७ | ३२ | १ | मिह प्रवृत्त: |
| मुात्तष्ठ | २३७ | ३३ | १ | मुत्तिष्ठ |
| नार्पि | २३७ | ३४ | १ | नापि |
| व्याधिष्ठा | २३७ | ३४ | २ | व्यथिष्ठा |
| हृषीकेश | २३८ | ३६ | १ | हृषीकेश |
| सिद्धसंधा: | २३८ | ३६ | २ | सिद्धसंघा: |

| अशुद्ध. | पृ. | श्लो. | ओ. | शुद्ध. |
|---|---|---|---|---|
| | | अध्याय १२ | | |
| अन्यन्ये | २४८ | ६ | २ | अनन्ये |
| द्वेष्टी | २५३ | १७ | १ | द्वेष्टि |
| | | अध्याय १३ | | |
| शांति | २६१ | ७ | १ | क्षांति |
| यज्ज्ञेयं | २६५ | १६ | २ | तज्ज्ञेयं |
| करण | २६८ | २० | १ | कारण |
| | | अध्याय १४ | | |
| प्रवृतिश्च | २७७ | १३ | १ | प्रवृत्तिश्च |
| | | अध्याय १५ | | |
| अघश्च | २८६ | २ | २ | अधश्च |
| श्चैवं | २९२ | ११ | १ | श्चैनं |
| भूतानी | २९३ | १३ | १ | भूतानि |
| प्रणापान | २९४ | १४ | २ | प्राणापान |
| बुध्वा | २९६ | २० | २ | बुद्ध्वा |
| | | अध्याय १६ | | |
| दर्पोऽतिमान | २९९ | ४ | १ | दर्पोऽभिमान |
| एतावदिती | ३०४ | ११ | २ | एतावदिति |
| आशापाशतै | ३०४ | १२ | १ | आशापाशशतै |
| | | अध्याय १७ | | |
| मुत्सृज्य | ३०७ | १ | १ | मुत्सृज्य |
| सत्व | ३०८ | १ | २ | सत्त्व |
| जना | ३१० | ५ | १ | जनाः |
| शृणु | ३११ | ७ | २ | शृणु |
| पत्रि | ३१५ | २० | २ | पात्रे |
| तदित्य | ३१७ | २५ | १ | तदित्य |

| अशुद्ध. | पृ. | श्लो. | ओ. | शुद्ध. |
|---|---|---|---|---|
| | | अध्याय १८ | | |
| षजयते | ३२७ | १० | १ | षज्जते |
| हत्वा | ३२९ | १७ | २ | हत्वापि |
| मुदाहृतन् | ३३४ | २४ | २ | मुदाहृतम् |
| फलाकांक्षि | ३३८ | ३४ | २ | फलाकांक्षी |
| मोक्षयिश्यामि | ३५२ | ६६ | २ | मोक्षयिष्यामि |

---

## गीतेच्या श्लोकांचे अर्थांतील व टीकेतील चुकांचें शुद्धिपत्र.

| अशुद्ध. | पृ. | ओ. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| एकच | २ | ३ | एकत्र |
| करीत | २ | ९ | करतील |
| पांडुपुत्रत्रांची | ३ | ४ | पांडुपुत्रांची |
| सात्या की | ३ | ६ | सात्यकी |
| ड्योगपवाच्या | ३ | १२ | उद्योगपर्वाच्या |
| व धर्म | ३ | १६ | व तो धर्म |
| प्रमुख बाजूचें प्रमुख | ४ | ५ | बाजूचें प्रमुख प्रमुख |
| लावालयाचे | ४ | १५ | लावावयाचे |
| सैनानायक | ४ | १९ | सेनानायक |
| बाजूंगीं | ६ | १३ | बाजूंनीं |
| सिंहसारखी | ७ | ५ | सिंहासारखी |
| द्रोपदीचे | ८ | २ | द्रौपदीचे |
| उभा केला केला | ९ | ७ | उभा केला |

